श्री. प. प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीटेंबेस्वामिविरचित

चतुर्थपुष्पम् (४)

# श्रीदत्तमाहात्म्य

आषाढ शुद्ध १ रविवार १८७५ ) किमत ५ रुपये ( सन १९५३ जुलै

# श्री. प. प. श्रीवासुदेवानन्दसरस्वतीटेम्बेस्वामिमहाराज




जन्म शक १७७६ श्रावण वद्य ५.     समाधि शक १८३६ आषाढ शुद्ध १.

नमः श्रीगुरो मेशधीशे दयाब्धे। भयार्तिघ्न ते स्वात्मदो वासुदेव ॥
यतीन्द्रसेवितानंतपादाब्जयुग्मं। सदा मे हृदि स्थास्नुतां यातु देव ॥१॥

॥ श्रीगणेशदत्तगुरुभ्योनमः ॥

# प्रकाशकाचें निवेदन



श्रीविष्णो जगत्पालका । जय विधे जगत्कारका ॥
जय शंभो जगत्तारका । चित्तहारका तुज नमो ॥ १ ॥
तूं आर्यसंरक्षक । तूंचि अनार्यशिक्षक ॥
तूंचि हें ग्रंथकौतुक । करविसी लोक तारावया ॥ २ ॥

(श्रीदत्तमाहात्म्य ५१)

श्रीमान् सर्वांतर्यामी जगदीश्वराच्या कृपेनें, श्रीवासुदेवानन्दसरस्वती-ग्रंथमालेचें हें चतुर्थ पुष्प प्रकाशित करण्याचा सुयोग आज येत आहे हें पाहून अत्यंत आनंद वाटतो. श्रीमहाराजांचे संपूर्ण ग्रंथ प्रकाशित व्हावेत असा संकल्प करून मंडळानें सुरू केलेल्या प्रयत्नास अजून तीन वर्षेंही पूर्ण झालीं नाहीत इतक्या अवधींत चार खंडांचें प्रकाशन कसें झालें असावें याबद्दल कारणमीमांसा करूं पाहांता सर्वसत्ताधीश, वीतराग सद्गुरुस्वामींची अमोघ इच्छाशक्ति हीच प्रमुख कारण मानावी लागेल. याच दिव्य अमूर्त शक्तीच्या पाठिंब्यामुळें, अनेक सात्त्विकवृत्तीच्या संतप्रेमी सज्जनांचेंहि मूर्त साहाय्य या सत्कार्याला मिळालें आणि त्या साहाय्याचें फलहि चार खंड प्रकाशित करून त्या रूपानें ग्राहकांना देण्याचें श्रेय मंडळाला लाभलें ही विशेष समाधानाची गोष्ट आहे. संध्या पांचव्या खंडाचेंही मुद्रण सुरू असून तोहि खंड लवकरच प्रकाशित करण्याचा सुयोग श्रीगुरूंचे कृपेनें येईल असा विश्वास वाटतो.

या खंडांत **श्रीदत्तमाहात्म्य** हा एकच ग्रंथ संपूर्ण छापला गेला आहे. मागील तीन खंडांतून श्रीमहाराजांचे वेगवेगळे ग्रंथ व संकीर्ण स्तोत्रादि-वाङ्मय एकत्र करून दिलें आहे. तसेंच आबालवृद्ध सर्वांना या ग्रंथाचें वाचन करण्यास सोईचें जावें या दृष्टीनें या खंडांतील टाईप मोठा वापरला आहे यामुळें पानांची संख्याही वाढली आहे. तथापि या खंडाची

किंमत न वाढवितां पूर्वीच्या खंडाइतकीच ठेवली आहे. हा ग्रंथ प्राकृत ओंवीबद्ध असा असल्यानें, मराठी भाषेंतील अनेक स्त्री-पुरुष वाचकांना याचें नित्य वाचन करण्यास सौलभ्य व्हावें हाच मुख्य उद्देश आहे. प्रत्येक खंडांत चारशें पानांपर्यंत तरी पृष्ठसंख्या असते. कदाचित् पुढील छापल्या जाणाऱ्या एखाद दुसऱ्या खंडामध्यें ग्रंथविभागाच्या सोईकरितां किंवा इतरही कांही कारणांनी कदाचित् पृष्ठसंख्या कमी होण्याचाहि संभव दिसतो. ठिकठिकाणी असणाऱ्या श्रीमहाराजांच्या शिष्यवर्गांचेकडून आणखी नवीन वाङ्मय प्रकाशनार्थ मंडळाकडे आल्यास सर्व खंडांतच प्रथमपासून असणारी निर्दिष्ट पृष्ठसंख्या कमी करण्याचें कारण पडणार नाहीं. या दृष्टीनेंही अनुपलब्ध वाङ्मय जमविण्याचा प्रयत्न मंडळाकडून चालू आहे. पूर्वी निवेदन केल्याप्रमाणें शके १८७६ श्रावण कृष्ण पंचमीस श्रीमहाराजांच्या शताब्दीपूर्तीपर्यंत हें महत्कार्य पूर्ण करण्याच्या मनीषेनें मंडळाचे प्रयत्न सध्यां विशेष स्वरूपांत चालू आहेत. श्रीगुरूंचे कृपेनें या प्रयत्नांना इष्ट कालांतच यश आल्यास तोंपर्यंत मिळेल तेव्हढेंच वाङ्मय प्रसिद्ध करावें लागेल. करितां श्रीमहाराजांच्या संप्रदायांतील सर्व मंडळींनीं व इतरहि संतप्रेमी सज्जनांनी आपणाजवळ जें श्रीमहाराजांचें वाङ्मय असेल तें व इतरत्रहि असलेलें माहीत असेल तर तें सर्व, मंडळाकडे शक्य तितक्या लवकर पोंचविण्याची व्यवस्था करावी अशी सर्वांना आग्रहाची विनंति आहे. तसेंच ज्यांना ज्यांना श्रीमहाराजांच्या कांही आठवणी माहीत असतील त्याही त्यांनीं इकडे पाठविण्याची त्वरित व्यवस्था करावी. श्रीमहाराजांच्या चरित्रखंडांत त्यांचा समावेश करतां येईल.

**श्रीदत्तमाहात्म्य** हा ग्रंथ मराठी वाचकांना अत्यंत उपकारक असा झाला आहे. या ग्रंथाच्या शेवटीं एका श्लोकांत श्रीमहाराजांनीं या ग्रंथाचा उद्गमकाल व स्थल याचा उल्लेख केला आहे. तो श्लोक असाः—

‘ त्र्यश्विदंतिक्षिति ( १८२३ ) मिते शालिवाहशके कलौ । अभ्राभ्राक्षमिते क्षिप्रातटे ग्रंथोयमुद्गतः ’ । या श्लोकांत, शके १८२३ मध्यें क्षिप्रा नदीच्या तटाकीं हा ग्रंथ निर्माण झाला असें श्रीमहाराज म्हणतात, ‘ हा पांच हजार चारशें ग्रंथ । पन्नास अध्याय केले येथ । भक्ति ज्ञान वैराग्य

येथ । स्पष्ट यथार्थ वर्णिले ॥' या ओवींत या ग्रंथांतील ओवीसंख्या ५४००, अध्याय ५० व भक्ति ज्ञान वैराग्य हे विषय सामान्यतः सुचविलेले आहेत. श्रीदत्तमाहात्म्य हा ग्रंथ कोणत्या आधारानें रचला याबद्दल ग्रंथारंभी थोडासा खुलासा श्रीमहाराजांनीं कांहीं ओव्यांमधून केला आहे. तो असा कीं–' जगदुद्धारार्थ परमेश्वर । अत्रीच्या घरीं धरी अवतार । त्याच्या चरिताचा विस्तार । वर्णिला सुंदर पुराणीं ॥ १ ॥ तत्सारभूत दत्तपुराण । आटसहस्र निरूपण । तें अपरिचित गीर्वाणभाषण । प्राकृतजन नेणती ॥ २ ॥ म्हणोनि हा ग्रथारंभ । ह्यायोगें उमजेल स्वयंप्रभ । भक्तवत्सल पद्मनाभ । चित्तक्षोभहर्ता जो ॥ ३ ॥ श्रीदत्तपुराणाचे तीन भाग । ज्ञानोपासनाकर्मयोग । त्यांतील उपासनाकांड भाग । ईश्वरानुराग दावी जो ॥ ४ ॥ जेथें कार्तवीर्याचें आख्यान । अलर्काचें विज्ञान । आयुयदूचें उद्धरण । हेंचि वर्णन मुख्यत्वें ॥ ५ ॥' श्रीवेदव्यासमहर्षींनीं निरनिराळ्या पुराणांतून जें श्रीदत्तचरित्र वर्णिलें आहे तें सर्व एकत्रित करून सारभूत असा **श्रीदत्तपुराण** हा ग्रंथ श्रीमहाराजांनीं केला. परंतु हा ग्रंथ संस्कृत भाषेमध्यें झाल्यामुळें सर्वसामान्य जनतेला त्याचा उपयोग फारसा होणार नाहीं असें पाहून श्रीदत्तपुराणांतील उपासनाकांडात्मक भागाचें विवरण म्हणून प्राकृत भाषेंत श्रीदत्तमाहात्म्य हा ग्रंथ श्रीमहाराजांनीं लिहिला असें दिसतें.

कर्म, उपासना व ज्ञान या तीन योगांमध्यें उपासनायोगाचें विशेष महत्त्व श्रीमहाराजांनीं दाखविलें आहे. ' जरी पाहिजे मुक्ति । तरी आदरावी नवविधा भक्ति । जिणें येथें मिळे भुक्ति । अंतीं मुक्ति अनायासें ॥' ' भक्ति ज्ञानाची माउली । करी कृपेची साउली । जिणें नामरूपा आणिली । ब्रह्ममूर्ति भली अनायासें ॥' ' सगुणब्रह्मध्यानें मन । शीघ्र होई सावधान । मग निरस्तोपाधिकल्पन । स्वात्मज्ञान स्फुरतसे ॥ ' याप्रमाणें ज्ञानप्राप्तीचें मुख्य साधन भगवद्भक्तीच आहे असें श्रीमहाराजांनीं दाखविलेलें आहे. 'मोक्षसाधनसामग्र्यां भक्तिरेव गरीयसी' असें श्रीमच्छंकराचार्य हेंच सांगतात. ' ती नवविधा भक्ति येथ । वर्णिजेल यथार्थ ' या ओवीत तर या ग्रंथाचा मुख्य प्रतिपाद्य विषय भक्तीच असल्याचें दाखविलें आहे. नवविधा भक्तीमध्यें, सर्व भक्तींना व्यापून राहणारी स्मरणभक्ति ही अत्यंत

श्रेष्ठ आहे असें सांगून, 'जातां येतां काम करितां। खातां पितां देतां घेतां। हृदयीं भगवत्स्मरण करितां। अकर्मता कर्माची ॥' याप्रमाणें कर्म करूनहि अलिप्तपणा हा भगवत्स्मरणानें साध्य होतो असें दाखविलें आहे. म्हणजे कर्मयोग व ज्ञानयोग या दोघांनाहि अत्यंत उपकारक असा हा भक्तियोग फार महत्त्वाचा असल्यानें त्याचेंच सांगोपांग प्रतिपादन करण्याकरितां हा ग्रंथ निर्माण झाला आहे.

या साधनभक्तीचाच परिपाक जी शेवटची आत्मनिवेदन भक्ति, ती भक्ति म्हणजेच ज्ञान होय याबद्दलचा उल्लेख असा—'तन मन धन। परिवार क्षेत्र सदन। करावें ईशा निवेदन। आत्मनिवेदन बोलिजे ॥ १ ॥ मी केवळ शुद्धबुद्ध। साक्षित्व हें म्हणणें विरुद्ध। अद्वितीय मी स्वतःसिद्ध। अपापविद्ध सदोदित ॥२॥ मला नाहीं कर्तृत्व। मग कैचें भोक्तृत्व। यास्तव नाहीं बद्धत्व। नित्य मुक्तत्व खास असे ॥ ३ ॥ असें अभ्यासें ठरतां। सहज हो निःसंगता। हेचि सर्वस्वात्मनिवेदनता। भक्ति संतां मानली ॥ ४ ' या सर्व ओव्यांचें चिंतन केलें असतां भक्ति हीच शेवटीं ज्ञानस्वरूप होऊन राहाते असाच श्रीमहाराजांचा अभिप्राय असल्याचें दिसून येईल. श्रीमच्छंकराचार्यमहाराजांनींहि गीताभाष्यांत असेंच सांगितलें आहे तें असे—' ज्ञानस्य स्वात्मोत्पत्तिपरिपाकहेतुयुक्तस्य प्रतिपक्षविहीनस्य यदात्मानुभवनिश्चयावसानत्व तस्य निष्ठाशब्दाभिलापात्। शास्त्राचार्योपदेशेन ज्ञानोत्पत्तिपरिपाकहेतु सहकारिकारणं बुद्धिविशुद्ध्याद्यमानित्वादि चापेक्ष्य जनितस्य क्षेत्रज्ञपरमात्मैकत्वज्ञानस्य कर्त्रादिकारकभेदबुद्धिनिबंधनसर्वकर्मसंन्यासहितस्य स्वात्मानुभवनिश्चयरूपेण यदवस्थानं सा परा ज्ञाननिष्ठेत्युच्यते। सेयं ज्ञाननिष्ठा आर्तादिभक्तित्रयापेक्षया परा चतुर्थी भक्तिरित्युक्ता। तया परया भक्त्या भगवन्तं तत्त्वतो अभिजानाति। यदनन्तरमेवेश्वरक्षेत्रज्ञभेदबुद्धिरशेषतो निवर्तते।' या श्रीमदाचार्यांच्या ग्रंथाचा भावार्थ—ज्ञान उत्पन्न झालें तरी त्याची परिपक्वता म्हणून पुढची एक अवस्था आहे. ज्या अवस्थेचें स्वरूप; अंगीं ज्ञान बाणणें, मुरणें, ठसणें इत्यादि शब्दांनीं दाखवितां येईल. ज्ञान उत्पन्न होण्याचें व तें परिपक्व होण्याचे उपाय जसे बुद्धिशुद्धि, श्रवण, मनन इत्यादि आहेत तसेंच अमानित्वादिकंहि कांहीं आहेत. शास्त्र व सद्गुरू यांच्या उपदेशानें जीवाला,

मीच परमात्मा आहें असें ज्ञान उत्पन्न झालें तरी तें प्रत्यक्ष अनुभव-पर्यवसायी होण्याकरितां म्हणजेच त्याच्या परिपाकाकरितां, रागद्वेषादि प्रबल वासनांचा क्षय व, मी कर्ता अमुक कर्म करून अमुक फल मिळवितो अशी भेदबुद्धि असतांनाच होणाऱ्या सर्व कर्मांचा संन्यास यांचीहि आवश्यकता आहे. या साधनांनीं ज्ञान परिपक्व होतें म्हणजे 'सकलमिद-महं च वासुदेवः' असा पक्का निश्चय प्रत्यक्षात्मक होतो. यालाच ज्ञाननिष्ठा असें म्हणतात. हीच ज्ञाननिष्ठा म्हणजे आर्त, जिज्ञासु व अर्थार्थी अशा तीन भक्तींपेक्षां श्रेष्ठ अशी चवथी भक्ति होय. जी भक्ति उत्पन्न झाली असतां भगवत्स्वरूपाचें खरें ज्ञान होतें म्हणजे सर्व द्वैताचा तत्काल लोप होऊन जातो. याप्रमाणें श्रीमदाचार्य हेहि ज्ञाननिष्ठा व भक्ति एकच समज-तात. भाष्यकारांते वाट पुसत जाणारे श्रीज्ञानेश्वरमहाराज तरी यांविरुद्ध कसे जातील ?—'तैसी मी एकवांचूनि कांहीं। तया तयाही सकट नाहीं। हे चौथी भक्ति पाहीं। माझी तो लाहे ॥' 'स्वप्नाचें दिसणें न दिसणें। जैसें आपलेनि असलेपणें। विश्वाचें आहे नाहीं जेणें। प्रकाशे तैसे ॥ १ ॥ ऐसा हा सहज माझा। प्रकाश जो कपिध्वजा। तो भक्तिया वोजा। बोलिजे गा ॥ २ ॥' 'ह्या ज्ञानभक्ति सहज। भक्त एकवटला मज। तो मीचि केवळ हें तुज। श्रुतही आहे ॥' 'ज्ञानी इयेतें स्वसंविति। शैव म्हणती शक्ति। आम्ही परम भक्ति। आपली म्हणों ॥' 'जाणे अज मी अजर। अक्षय मी अक्षर। अपूर्व मी अपार। आनंद मी ॥' 'ऐसे आत्मत्वें मज एकातें। इया अद्वयभक्ति जाणोनि निरुते। आणि याहि बोधा जाणतें। तेंहि मीच्चि जाणे ॥' इत्यादि अनेक ओव्यांचा विचार केला म्हणजे श्रीज्ञानेश्वरमहाराजांचें हृदय कळून येईल.

याप्रमाणें श्रीमहाराजांनीं प्रथम सिद्धान्त सांगितला असला तरी अल-र्काला ज्ञान झाल्यावरही त्याचें सगुणभगवत्स्वरूपाबद्दलचें दिव्य प्रेमहि श्रीमहाराजांनींच वर्णन केलें आहे. त्या मननीय ओव्या अशा—

'गुरूनें देतां आलिंगन। अंगी रोमांच उठून। प्रेमें गळा दाटून। आले नयन भरूनी ॥ १ ॥ देहभान हरपून। राजा निश्चळ होऊन। बाह्या-भ्यंतरभान। दे सोडून तत्क्षणीं ॥ २ ॥ ज्या सुखा नाहीं मिती। योग्या न ठावें जी स्थिति। प्रेमळ भक्ताची स्थिति। ती गती अनिर्वाच्य ॥ ६ ॥

कोटी जन्मांचें सुकृत । जेव्हा मूर्तिमंत । दैवें उदया येत । तेव्हां भक्त होईल ॥ ४ ॥ भक्तीचे प्रकार । जगी असती चार । त्यांत ज्ञानोत्तर । भक्ति थोर जाणावी ॥ ५ ॥ जो हा ज्ञानी भक्त । भगवंती नित्ययुक्त । तोचि परममुक्त । प्रेमरसासक्त सर्वथा ॥ ६ ॥ प्रेमळ भक्तांवीण । देवा न पडे चैन । म्हणूनी लाज सोडून । राहे तदधीन भक्तापासी ॥ ७ ॥ अशी ही प्रेमभक्ति । हीच एकांत भक्ति । इजवरुनि चारी मुक्ति । ओंवाळून टाकाव्या ॥८॥ ही भक्ति अलर्कासो । लाधली अनायासी । कोण त्याच्या दैवासी । वाखाणील ब्रम्हांडीं ॥ ९ ॥' इत्यादि, ज्ञानोत्तरही सगुण प्रेमलक्षणभक्तीचें वर्णन अत्यंत तन्मयतेनें श्रीमहाराजांनी केलेलें आहे. यावरून श्रीमहाराजही याच भूमिकेंतील होते हें स्पष्टपणें वाचकाच्या लक्षांत येईल. ' आत्मारामाश्च मुनयो निर्ग्रन्था अप्युरुक्रमे । कुर्वन्त्यहैतुकीं भक्तिमित्थंभूतगुणो हरिः ॥' असें ज्या भक्तीचें वर्णन श्री व्यासमहर्षींनी केलें; ' तो पाहावा हे डोहळे । म्हणोनि अचक्षूसि मज डोळे । हातीचेनि लीलाकमळें । पूजूं तयातें ॥' ' यालागीं तो कर्मयोगी । मी जालाची मातें भोगी । तारुण्य कां तरुणांगीं । जियापरी ॥' ' घडोनि सिंधूचिया आंगा । सिंधूवरी तळपे गंगा । तैसा पाड तया भोगा । अवधारी जो ॥' इत्यादि अनेक ओंव्यांमधून ज्या प्रेमलक्षणा भक्तीचें दिग्दर्शन श्रीज्ञानराजही करीत आहेत ती प्रेमभक्ति त्रिवार धन्य आहे.

या प्रमाणेंच अष्टांगयोग ज्ञानयोग, योगाभ्यासांतील विघ्नांवर उपाय, मृत्युलक्षणें व प्रवृत्ति आणि निवृत्ति यांचा बलाबलविचार असें अनेक विषय श्रीदत्तमाहात्म्यांत वर्णिलेले आहेत. जसें जसें या ग्रंथाचें परिशीलन करावें तसें तसें अनेकरूपानें शास्त्ररहस्य हळुवारपणें समजावून देणारी श्रीमहाराजांची अधिकारवाणी पाहून ' ऋतंभरातत्र प्रज्ञा ' या योगसूत्राची आठवण कोणासहि होईल आणि या दिव्य विभूतीच्या चरणी आपोआप त्याचें मस्तक नम्र होईल. अशा लोकोत्तर ग्रंथाचें श्रद्धेनें वाचन व मनन करून सर्वांनीं आपली उन्नति करून घ्यावी अशी सर्वांना प्रेमाची विनंति आहे.

बिहार प्रांताचे भूतपूर्व राज्यपाल श्रीमान् लोकनायक माधव श्रीहरी ऊर्फ बापूजी अणे यांनीं आमचे विनंतीस मान देऊन, शरीर पराधीन स्थितींत

असतांही प्रेमानें या ग्रंथावर प्रस्तावना लिहून दिली याबद्दल आम्ही त्यांचे अत्यंत आभारी आहोंत. तसेंच श्री. दत्तोपंत टाकळकर यांनीं गुरुसेवाबुद्धीनें हैद्राबाद प्रांतांत फिरून ग्राहक मिळविण्याचा विशेष प्रयत्न सुरू केला आहे. श्री. दामोदरपंत रत्नपारखी यांनींही मंडळाच्या कार्याचा प्रचार करून ग्राहक मिळवून दिले. सौ. सरस्वतीबाई कवीश्वर यांनीं तर स्त्री-वर्गांत या कार्याचा विशेष प्रचार करून बरेंच द्रव्यसाहाय्य मंडळास मिळवून दिलें या सर्वांची व इतरही साहाय्य करणाऱ्या मंडळींची गुरुसेवा श्रीमहाराजांचे चरणीं रुजू आहे. सर्वज्ञ, सर्वशक्तिसंपन्न श्रीमहाराज त्या सर्वांना योग्य फल देण्यास समर्थ आहेत. तसेंच अमरावती येथील राहणारे श्री. त्र्यं. गं. जोशी यांनीं श्रीदत्तमाहात्म्यावर सारभूत चार शब्द लिहून दिल्याबद्दल मंडळ त्यांचे आभारी आहे. समर्थ भारत छापखान्याचे मालक श्री. सरदेसाई यांनींही वेळेवर पुस्तक व्यवस्थित छापून दिल्याबद्दल तेही धन्यवादास पात्र आहेत.

याप्रमाणें हें चतुर्थपुष्प जनताजनार्दनास समर्पण केलें आहे. ईशप्रेरणे-नुसार या मालेची ग्राहकसंख्या वाढून, संकल्पित कालांत हें कार्य पूर्णत्वास जावो अशी त्या जगन्नियंत्याजवळ नित्य प्रार्थना आहे.

श्रीगुरुभक्त

आषाढ शुद्ध प्रतिपदा<br>रविवार १८७५

वामन दत्तात्रेय गुळवणी<br>नारायणपेठ २० पुणें

---

# प्रस्तावना



विविध धर्मान्वित । ज्ञानभक्तिरसभरित ।
असें हें श्रीदत्तचरित । मूर्तिमंत ब्रह्म कीं ।।
ब्रह्म तें अरूप असून । कोणा नये दिसून ।
करितां उपनिषदांचें श्रवण । मनन ध्यानें मग कळे ।।
मंदां विशेषें करून । नुमजे औपनिषदज्ञान ।
त्यांकरितां हें लेखन । करवी अत्रिनंदन दयाळू ।।
[ अध्याय ५१, १०४–१०६ ]

प्रस्तुत ग्रंथाचे प्रकाशकातर्फे वेदशास्त्रसंपन्न कवीश्वरशास्त्री यांनीं मला स्वामी वासुदेवानंदसरस्वती यांनीं केलेल्या श्रीदत्तमाहात्म्य या ग्रंथास प्रस्तावना लिहिण्यास सांगितलें. माझ्या हल्लींच्या व्याधिग्रस्त स्थितींत मला स्वतः नीट लिहितां वाचतां येत नसल्यामुळें मी ह्याला संमति देण्यास नाखुष होतों. परंतु त्यांचा विशेष आग्रह पडल्यामुळें शेवटीं मीं रुकार दिला व प्रस्तावनेदाखल चार शब्द लिहिण्याचें कबूल केलें.

ब्रह्मीभूत श्रीमत् परमहंस वासुदेवानंदसरस्वती हे एक सिद्ध-पुरुष या शतकामध्यें महाराष्ट्रांत होऊन गेले. त्यांनीं पूर्वाश्रमांत वेदशास्त्रांचें यथाविधि अध्ययन केलें: अनुष्ठानें व तपश्चर्या केली. नंतर चतुर्थाश्रम घेऊन लोकोद्धारार्थ विपुल ग्रंथरचना केली आणि दोन तपें सबंध भरत-खंडभर संचार करून धर्मप्रचाराचें कार्य केलें.त्यांची विशेषतः महाराष्ट्रांत शिष्यशाखा बरीच पसरली आहे. त्यांनीं संस्कृत व मराठी भाषेंत ग्रंथ-रचना केली, त्यांतील बरेच ग्रंथ पूर्वी प्रसिद्ध झालेले आहेत; पण अप्र-सिद्धहि पुष्कळसे आहेत. त्यांच्या शिष्यवर्गांतील कांहीं मंडळींनीं त्यांच्या समग्र ग्रंथांचें प्रकाशन करण्याचें ठरविलें आहे. त्यांपैकीं कांहीं खंड आतां-पर्यंत प्रसिद्धही झाले आहेत. ‘ श्रीदत्तमाहात्म्य ’ हा ग्रंथही त्याच माले-मध्यें प्रसिद्ध होत आहे.

हा ग्रंथ लिहिण्यापूर्वी स्वामींनीं 'दत्तपुराण' नांवाचा ग्रंथ संस्कृतमध्यें लिहिला. तो अनेक पुराणांच्या आधारें लिहिला असून त्यांत दत्तचरित्राचा विस्तार ३५०० श्लोकांत केला आहे. ग्रंथ गीर्वाणभाषेंत असल्यामुळें "प्राकृत जन नेणति" ( म्हणोन हा मराठी दत्तमाहात्म्य ग्रंथ लिहिला ). 'दत्तपुराण' या मूळ ग्रंथाचीं तीन काण्डें आहेत– ज्ञान, उपासना व कर्मयोग. त्यांतील फक्त उपासनाकाण्डात्मक भाग मराठी दत्तमाहात्म्यांत वर्णिला आहे. त्यांतून विशेषतः कार्तवीर्य अर्जुन आणि अलर्क, आयु, यदु, यांचीं चरित्रें हे विषय मुख्यत्वें आलेले आहेत. या विषयांच्या अनुरोधानें नवविधाभक्तीचें वर्णन, योगमार्गांच्या प्रक्रिया व अन्य उपासनासंबंधी विषय यांचेंहि निरूपण करण्यांत आलेलें आहे.

दत्तात्रेयांच्या २४ गुरूंचें श्रीमद्भागवताप्रमाणें याहि ग्रंथांत विस्तारानें वर्णन केलें आहे. या ग्रंथाच्या वाचनानें वेदान्त शास्त्रांतील प्रमुख सिद्धान्तांचा परिचय निव्वळ मराठी वाचकांस सुलभतेनें होईल; त्याचप्रमाणें उपासना मार्गाचें ज्ञानही होऊन वाचकाच्या हृदयांत भक्तीचा अंकुर उत्पन्न होईल असा मला विश्वास वाटतो. सुलभ रीतीनें ज्ञान आणि उपासना यांविषयीं मुमुक्षूच्या हृदयांत ज्ञानाचा उदय आणि उपासनेची आवड ही या ग्रंथाच्या श्रद्धापूर्वक वाचनानें एकसमयावच्छेदें करून होईल असा माझा समज आहे. व हा ग्रंथ स्वामींनीं लोकोपकारार्थ लिहिला व ग्रंथप्रकाशनमंडळानें तो प्रसिद्ध करून भाविक जनतेवर महदुपकार केले आहेत यांत शंका नाहीं.

अर्वाचीन पौरस्त्य व पाश्चात्य विद्वानांत सामान्यतः धर्मविषयाच्या अध्ययनासंबंधीं अनास्था दृष्टीस पडते. ज्या थोड्या विद्वानांना संस्कृतची गोडी आहे व अभ्यासाविषयीं गोडी आहे, त्यांपैकीं कांहींजण ऋग्वेदादि ग्रंथाचा ऐतिहासिक दृष्ट्या अभ्यास करतात; कांहीं जण काव्यशास्त्रादि विषयांचें परिशीलन करतात. परंतु पुराणविषयक वाङ्मयाची त्यांच्याकडून उपेक्षा केली जाते. प्रायः माझ्या मतानें वैदिक धर्माचें यथाविध स्वरूप समजून घेण्यासाठीं व त्याचें साकल्यानें आकलन करण्यासाठीं श्रुति, स्मृति व पुराण या तिन्ही ग्रंथांचा यथार्थ, यथाशास्त्र, परंपराशुद्ध व

संशोधनपूर्वक अभ्यास व्हावयास पाहिजे. कारण हिंदुधर्माची उत्पत्ति ही श्रुति, स्मृति व पुराण, या त्रिगुणात्मक कमलदलावर स्थिर असलेल्या धर्मपुरुषाकडून झाली आहे. पुराणांत इतिहास आहे; पुराणांत तत्त्वज्ञान आहे; पुराणांत आमच्या शास्त्रांचे सिद्धान्त आहेत: पुराणांत भविष्य आहे; आणि पुराणांतून लौकिक आचार व रुढि यांचेंहि विवेचन आहे. वैदिक ग्रंथांतून उल्लेखिलेल्या कथा पुराणांतून सविस्तर सांगितलेल्या आढळतात व त्या कथा नीट समजून घेतल्याशिवाय वैदिक ग्रंथांचें तात्पर्य समजणें कठीण जातें.

'दत्तपुराण' हा ग्रंथ अष्टादश पुराणांत समाविष्ट होत नाही. परंतु स्वामींनी संशोधन करून अष्टादश पुराणांतील दत्तविषयक उल्लेख संग्रहित करून हा ग्रंथ निर्माण केला आहे. या कार्याला सशोधनदृष्ट्या महत्त्व आहे.

संशोधकांनीं 'दत्तपुराण' आणि 'माहात्म्य' या ग्रंथांचा अभ्यास करून, भरतखंडांत दत्तसंप्रदाय कसा निर्माण झाला व त्याचा प्रसार कसा कसा होत गेला याच्या इतिहासाची रचना करण्यासाठीं त्याचा शक्य तेवढा उपयोग करून घ्यावा अशी माझी सूचना आहे.

'दत्तपुराण' आणि 'माहात्म्य' या दोन ग्रंथांत विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे ती ही की, यांतील आख्यानांत आलेल्या बहुतेक भक्तांच्या कार्याचें क्षेत्र नर्मदेपासून तो कृष्णेपर्यंतच्या टापूंत आहे. प्रायशः या प्रदेशांत आणि विशेषतः विदर्भांतील 'मातापूर' क्षेत्रीं दत्तात्रेयांचीं प्रमुख निवासस्थानें आहेत असें या ग्रंथांवरून स्पष्ट दिसतें. दत्तात्रेयांची उपासना आणि पंथ हा विशेषतः महाराष्ट्रांत आणि कर्नाटकांत दृष्टीस पडतो व त्याचीं प्रमुख स्थानेंहि गाणगापूर, वाडी, माहूर इत्यादि ठिकाणीं आहेत.

हा ग्रंथ दीपक व त्याचे गुरु यांचे संवादरूपानें प्रसिद्ध झालेला आहे. त्या संबंधींचा उल्लेख करतांना स्वामी अध्याय १ मध्यें लिहितात—

**गोदावासी वेदधर्मा । तो निस्तारावया निजकर्मा ।**
**काशीवास करोनि शर्मा । पावला दुष्कर्मा टाळोनियां ॥**

त्याची सेवा दीपक। शिष्य होवोनी करी चोख।
एकवीस वर्षे साहे दुःख। नोहे पराङ्मुख सेवेसी ॥
त्यासी हरिहर प्रसन्न होती। बळेंची वरदान देती।
तरी न भुले त्याची मती। सत्यधृती केवळ तो ॥
मग गुरू म्हणे वर घे आतां। शिष्य म्हणे सांगा दत्तचरिता ॥
तेणें तथास्तु म्हणोनि कथा। श्रीदत्ताची कथियेली ॥'

हा ग्रंथ गुरु व शिष्य (दीपक) यांच्या सवादरूपानें प्रगट झालेला आहे असें स्वामी लिहितात; ते गुरु गोदातटी राहणारे असा स्पष्ट उल्लेख केलेला आहे. या ग्रथाचें लेखनहि क्षिप्रेच्या कांठावर १८२३ शालिवाह शके या वर्षी संपवलें असा स्वामीचा उल्लेख आहे. शके १८२३ मध्यें स्वामींनी ग्रंथाच्या शेवटी श्री दत्तात्रेयांची कळकळीनें प्रार्थना केलेली आहे ती अशीः—

श्रीविष्णो जगत्पालका। जय विधे जगत्कारका।
जय शंभो जगत्तारका। चित्तहारका तुज नमो ॥
तूं आर्यसंरक्षक। तूंचि अनार्यशिक्षक।
तूंची हें ग्रंथकौतुक। करविसी लोक तारावया ॥
परात्पर परंज्योती। तूंचि परब्रह्ममूर्ती।
कोण जाणे तुझी गती। स्वयंज्योति तूं श्रीदत्त ॥
विहार तुझा स्वभक्त हृद्यांत। तूं भक्ताधीन सतत।
मी मागतों पसरून हात। ह्या ग्रंथी सतत सान्निध्य ठेवीं ॥
तूंचि मंदानुग्राहक। तूंचि वक्ता श्रोता पृच्छक।
तूंचि चालक भासक। होसी ग्रंथग्राहक निर्मत्सर ॥

[ अध्याय ५१, १०७–१११ ]

असें म्हणून त्यांनीं, ग्रंथाच्या ठिकाणी शाश्वत सान्निध्य असावें अशी दत्ताची प्रार्थना केली आहे.

जे वाचक श्रद्धायुक्त अंतःकरणानें हा ग्रथ पठण करतील त्यांना या ग्रंथांत श्रीदत्तात्रेयांचें सान्निध्य असलेलें आढळून येईल असा मला विश्वास

वाटतो. श्रद्धापूर्वक अध्ययनानें व त्यांत सांगितलेली दत्तोपासना भक्तियुक्त अंतःकरणानें केल्यास त्यांच्या जीवाचें सार्थक होईल; व ते विविध तापांतून मुक्त होऊन श्री दत्तात्रेयांत लीन होतील.

या ग्रंथाला अनेक सश्रद्ध वाचक मिळोत आणि धर्मप्रसाराची अभिवृद्धी होवो; असें झालें म्हणजे प्रकाशकांच्या श्रमाचें चीज झालें असें त्यांनाहि वाटेल अशी मी ईश्वराजवळ प्रार्थना करतों.

शेवटीं प्रकाशकमंडळातर्फे विद्वद्वर्य कवीश्वरशास्त्री यांनीं या ग्रंथाला प्रस्तावना लिहावयास प्रवृत्त करून ब्रह्मीभूत श्रीवासुदेवानंदसरस्वतीस्वामी यांची अल्प सेवा करण्याची संधी दिली म्हणून त्यांचे आभार मानून मी ही प्रस्तावना पूर्ण करतों.

लक्ष्मीनिवास ३४२ सदाशिव पेठ,
पुणें २.

**माधव श्रीहरी अणे**

दिनांक ४ जुलै १९५३.

---

## श्रीदत्तमाहात्म्य ग्रंथासंबंधीं चार शब्द

प. प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीमहाराजांनीं श्रीदत्तमाहात्म्य हा ओंवीबद्ध ग्रंथ शके १८२३ त उज्जैन मुक्कामीं क्षिप्रातटीं चातुर्मासांत लिहिल्याचा उल्लेख गद्य चरित्रांत आलेला आहे. अध्यात्मग्रंथांत निर्गुण व सगुण ह्यांचें विवेचन चालूं असतां बाह्यदृष्टि असलेल्या मनाला निर्गुणापेक्षां सगुणस्वरूपाचें आकलन व गोडी लवकर लागूं शकते व उपासना करण्यास सोपें जातें म्हणून सर्व सामान्य जनांस सगुणाचाच उपदेश संत जनांनीं केला आहे. ह्या ग्रंथांतहि स्वतः पाहिलेल्या श्रीदत्तस्वरूपाचेंच वर्णन महाराज करीत असलेले दिसतात. ' ती छबी दत्ताची । ती शोभा मुखकमलाची । ती चपलता नेत्रांची । लावण्याची ती सीमा ।। ५८ ।। ही स्वरूपाची मात । ती छबी अत्यभ्दुत । हें एक जाळें निश्चित । मनोमत्स्य ज्यांत सांपडे ।। ६२ ।। ।। अ. ३७ ।।' मनाला आकर्षण करणारें परमपवित्र सगुण चरित्राचें वर्णन करणाऱ्या ह्या ग्रंथाचें एक वैशिष्ट्य किंवा अपूर्वता स्वतः महाराजांनीं ओंवींत ग्रथित केलेली आहे. ती म्हणजे 'जगदुद्धारार्थ परमेश्वर । अत्रीच्या घरीं धरी अवतार । त्याच्या चरित्राचा विस्तार । वर्णिला सुंदर पुराणीं ।। ७ ।। १ ।। तत्सारभूत दत्तपुराण । औटसहस्र निरूपण । ते अपरिचित गीर्वाण भाषण । प्राकृत जन नेणती ।। ८ ।। १ ।। म्हणूनि हा ग्रंथारंभ ' म्हणजे सर्वसारभूत संस्कृत दत्तपुराणांतील स्वारस्याचा मराठी वाचकांस लाभ व्हावा ह्याकरितां हा ग्रंथ आहे असें स्पष्ट होईल.

## वाचनाचा स्त्रियांसही अधिकार

श्रीदत्तसाम्प्रदायांत अनेक ग्रंथ मंत्रगर्भ असल्यामुळें स्त्रियांना वाचावयास निषेध आहे. ह्यामध्यें अत्यंत शुद्ध मराठींत असलेल्या श्रीगुरुचरित्राचाही समावेश आहे. पण ह्या श्रीदत्तमाहात्म्य ग्रंथाचें पठण मंत्रगर्भता आड न येतां, स्त्रियांना करण्याचा अधिकार ठेवलेला व्यवहारांत दिसतो. महाराजांचे एकमेव दंडदिक्षीत शिष्य श्री. प. प. नृसिंहसरस्वती

दिक्षीत स्वामी ह्यांनीं अमरावती मुक्कामीं ह्या ग्रंथाचा पाठ अनेक शिष्यिणीं-कडून करविलेला आम्हीं पाहिला आहे.

**ग्रंथसंख्याः**—क्रमणिकेच्या ५१ व्या अध्यायांत 'पांचहजार चारशें ग्रंथ । पन्नास अध्याय वर्णिले येथ' असें म्हटलें आहे. प्रत्येक अध्यायांत साधारणतः १०८ ओव्या असल्या तरी त्याला अपवादहि आहेत. ओव्यां-मध्येच श्लोक, अभंग, पदें ह्यांचाहि समावेश आहे. प्रत्यक्ष मोजणी केली असतां क्रमांकाची गणना ५३९८ होते. ह्यामधून ४ अर्ध श्लोकांचा क्रमांक निमपट केला म्हणजे ही संख्या ५३९६ होते. दुसऱ्या अध्यायांतील क्रमांकविरहित श्लोक १ व अध्याय ३ व ३७ मधील क्रमांकरहित ध्रुव-पदें अनुक्रमें २ व १ ह्यांची त्यामध्यें गणना धरली म्हणजे ५० अध्या-यांची ५४०० ही संख्या बरोबर होते व ५१ व्या अध्यायांतील ११३ ओव्या मिळून एकूण संख्या ५५१३ होते.

**नमनाचें वैशिष्टयः**—ग्रंथारंभीं केलेल्या नमनांत ५ ज्ञानेंद्रियें, ५ कर्मे-द्रियें व ५ प्राण ह्यांचें, आध्यात्मिक मार्गात प्रगति होत असतां ह्या १५ च्या गणाचा पति म्हणजे पालन—संरक्षण करणारा आत्मारूपी श्रीदत्त-प्रभूचें चरणवंदन हें आध्यात्मिक स्वरूपाचें आहे व त्यानंतर श्रीदत्तात्रेय व श्रीगणेश ह्या उभय देवतांना बोध करतील असें अंबेचा सुत, गंधर्व-स्थित (गाणगापूर-घोडा) हे शब्द योजून नमन केलें आहे. व नंतर लगेच 'नृसिंहसरस्वती दत्तात्रेय' असा तिन्हींतील एकात्मतेचा अभिप्राय व्यक्त केला आहे.

**भक्ति ज्ञानाची माउलीः**—'ज्ञानादेव हि कैवल्यम्' ज्ञान झालें म्हणजे मुक्ति मिळते हा सिद्धान्त मान्य करूनहि हें ज्ञान प्राप्त होण्याची खाण भक्ति आहे असा सिद्धान्त मांडला आहे. 'भक्ती ज्ञानाची माऊली । करी कृपेची साऊली । जिनें नामरूपा आणिली । ब्रम्हमूर्ती भली अना-यासे ॥ १७ ॥ १ ॥' ह्या एका ओंवीचें प्रवचन पुढील सर्व ग्रंथामध्यें आहे! ही ह्या ग्रंथाची कील होय. ह्या नवविधाभक्तीपैकी एकीच्याहि साध-नानें 'सगुण ब्रम्हध्यानें मन । शीघ्र होई सावधान । मन निरस्तोपाधि कल्पन । स्वात्मज्ञान स्फुरतसे ॥ १९ ॥ १ ॥' असें फलहि वर्णन केलेलें आंहे. आणि तेंही मंदांनाहि होऊं शकेल हें आश्वासन १८ व्या ओवींत

दिलें आहे. अर्थात त्यांना साधना करीत असतां उत्कट श्रम करावे लागतील हें उघड आहे.

**ग्रंथांतील विषय:—**पहिले तीन अध्याय ग्रंथोपक्रम व श्रीदत्तात्रेयजन्म ह्याकरितां खर्ची पडल्यानंतर कार्तवीर्यार्जुनाख्यानाला सुरवात झाली व त्यामध्यें शास्त्रयुक्त कर्में केल्यानें क्रमाक्रमानें उन्नति होऊन ज्ञानप्राप्ति कशी होते हें सांगितलें व त्याचबरोबर २४ अध्यायापर्यंत परशुरामचरित्रवर्णनहि केलें आहे. पुढें २५ ते ३८ अध्यायांत अलर्काख्यान, ३९ ते ४५ पर्यंत आयुराजाचें आख्यान व ४६ ते ५० यदूचें आख्यान आलें आहे. निरनिराळ्या भक्तींचें वर्णन होत असतांच कांहीना कांहीं प्रमाणांत तत्वज्ञानाचा उपदेश प्रत्येक आख्यानांत आहेच. पण विशषेतः श्रीदत्तांनीं कार्तवीर्यार्जुनाला १२ व १३ व्या अध्यायांत तत्त्वांचा उपदेश केला आहे. अलर्काख्यानांत मदालसेनें अंगाई-गीत गातांना व श्रीदत्तांनीं केलेल्या प्रश्नाला उत्तर देतांना अलर्काला स्फुरलेल्या उद्गारांत हें तत्वज्ञान आलें आहे. यदूच्या आख्यानांत तर अवधूतगीतेंतील तत्वज्ञान हाच मुख्य विषय होय. ह्यानंतर विशेष महत्त्वाचा विषय म्हणजे अर्जुनाख्यानांत अध्याय १४ व १५ मधें व अलर्काख्यानांत योगांचा व बरोबरच अरिष्टलक्षणाचा विषय ३२,३३,३४ व ३६ अध्यायांत आला आहे. आणखी विवरणीय विषय म्हणजे दत्तात्रेयाच्या अवधूत स्वरूपाचा. ह्यापैकीं प्रत्येकाचें थोडक्यांत स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न करूं.

**तत्वज्ञान:—**तत्वज्ञानासंबंधी फारसें विवेचन ह्या छोट्याशा लेखनांत न करणेंच बरें. अनेक उदाहरणें देऊन सर्वव्यापी, अव्यय, अनंत व आनंदरूप असें आत्मस्वरूप आहे. त्या अवस्थेप्रत जाण्याकरितां ईश्वरार्पण बुद्धीनें केलेलीं निष्काम कर्में, बुद्धीचा मल हरण करून ईश्वरविषयक गोष्टींसंबंधी आवड उत्पन्न करतात. आवड उत्पन्न झाली म्हणजे श्रवण व श्रवणानंतर मनन व तदनंतर दृढ प्रयत्नानें अनेक प्रकारांपैकीं कोणची तरी उपासना तीव्रतेनें होऊन शेवटीं त्या आत्मस्वरूपाची प्राप्ति व्हावयाची असा क्रम ह्या बाबतींत ह्या ग्रंथांत दिग्दर्शित केला आहे असें म्हटले म्हणजे ह्या तत्वज्ञानाबाबत सर्व सार आलें असें होईल असें वाटतें.

**अष्टांग योगः**—ह्या संवाद-ग्रंथ असल्यामुळें तत्वज्ञानाप्रमाणें योगाचा विषयहि दोन ठिकाणीं विभागून आला आहे. योग ह्याचा सामान्यतः अर्थ अष्टांग राजयोग असा असला तरी दुसरीहि ह्यासंबंधींची मतें दिलीं आहेतः १ यम २ नियम ३ आसन ४ प्राणायाम ५ प्रत्याहार ६ धारणा ७ ध्यान व ८ समाधी अशीं हीं आठ अंगें असतांहि समाधि हें फल मानणारे सप्तांग योग व यम–नियम हे सर्व सामान्य म्हणजे षडंग योग आहे असे म्हणणारे साम्प्रदाय आहेत. पण हा फरक प्रत्यक्ष कृतीत नसून स्वीकारल्या जाणाऱ्या परिभाषेचा आहे हें लक्षांत येईल. यम–नियम हे ज्ञान-भक्ति किंवा कर्म–योग ह्यांपैकी कोणचाहि योग असला तरी त्याला आवश्यक असतात; किंवा यमनियमाचें दुसरें स्वरूप म्हणजे गीतेंत व ह्या ग्रंथांतहि दैवी संपत् म्हणून वर्णन केलेलें आहे. गीतेंत ज्याप्रमाणें 'मा शुचः संपदं दैवीं अभिजातोसि पांडव' म्हणून म्हटलें आहे त्याप्रमाणें श्रीदत्तप्रभूंनींहि 'दैवी संपत्तीचा नायक' असें म्हटलें आहे.

ह्या दैवी संपत्तीचे गुण अंगीं बाणविणें म्हणजेंच यमनियमसाधन होय. व्यवहार साधणाऱ्या लोकांना सुद्धां ह्यांतील मनःसंयमांचा अतिशय उपयोग होतो असें दिसेल.

सर्व गीतेमधें योग ह्याची व्याख्या 'तं विद्यात् दुःखसंयोगवियोगं योगसंज्ञितम् ॥' ह्या श्लोकार्धातच सांगितली आहे; व ती ह्या ग्रंथांत अगदीं स्पष्टपणें व थोडक्यांत सांगितली आहे. 'पुत्र म्हणे दुःखसंयोग । त्याचा करी जो वियोग । परी त्याला म्हणती योग । श्रीदत्तें तो सांग कथियेला ॥ २६ ॥ २ ॥' त्याचबरोबर 'केवळ योगानें नव्हे निर्वाण । नसतां ज्ञान योगियां ॥ ४ ॥ प्राणायामें करून । स्थिर होता आपुलें मन । जे ऐकिलें वाक्यज्ञान । त्याचें मनन करावें ॥ ५ ॥ ॥ १५ ॥' व त्यानें त्या आत्मस्वरूपाशी तादात्म्य पावावें असें उत्तर श्रीदत्तप्रभूंनीं: सहस्रार्जुनानें १५ अध्यायांत 'योगें होतां साक्षात्कार । कासया पाहिजे वाक्यविचार । हा संशय करा दूर । ठेविला निर्धार तुम्हांवरी ॥ ३ ॥' ह्या ओवींत विचारलेल्या ह्या प्रश्नाला दिलेलें आहे हें लक्षांत घ्यावयास पाहिजे. मनोदंडरूप असलेल्या योगसाधनेनें शक्तिसंचय होतो–सिद्धी प्राप्त होतात–ती शक्ति ऐहिक भोगाकडे लावल्यास आध्या-

त्मिक दृष्टीनें अधःपतन होतें; व वरच्या दर्जाच्या लाभास तो साधक मुकतो हेंही लक्षांत ठेवावयास पाहिजे.

**अरिष्टलक्षणेंः**—अरिष्टलक्षणें म्हणजे मृत्युसूचक लक्षणें होत. हीं झालीं असतां, मृत्यु हीं ह्या शरीराची स्वाभाविक अवस्था असल्यामुळें न भितां, न डगमगतां, शांतपणें योगाभ्यासी यानें ध्यान करून आत्मतत्त्वाशी तादात्म्य पावण्याचा प्रयत्न करावा असा उपदेश अलर्काला केलेला आहे. ह्या अरिष्टलक्षणांची गणना केल्यास ज्योतिषशास्त्राला अनुसरून ४, योगधारणेनें १, स्वप्नांतील दृश्यांमुळें २६, दृष्टिदोषामुळें २४, इतर ज्ञानेंद्रियांतील शक्तिनाश सुचविणारे ७, मांसभक्षक पक्षांच्यावरून ६ व इतर सामान्य १६ असे एकूण ८४ प्रकार वर्णिले आहेत.

प्राणिशरीराला मृत्यु हा दोन प्रकारानें प्राप्त होतो. १ शरीरांतील इंद्रियें झिजत झिजत जाऊन तीं अगदीं कार्यक्षमताहीन होऊन मृत्यु येणें. २ इंद्रियें कार्यक्षम असतांहि एखादा भाग किंवा इंद्रिय इतकें बिघडतें की तें शरीरावर विषवत् क्रिया करून शरीराचें घटनात्मक, वर्धनात्मक कार्य चालूं देत नाहीं. अशी अवस्था म्हणजे मृत्युपूर्व अवस्था व ह्याचीं दिसणारी लक्षणें म्हणजे हीं अरिष्टलक्षणें होत. ह्याचें आयुर्वेदीय ग्रंथामध्येंहि वर्णन केलें आहे. स्वप्नावस्थेमधील मनाच्या अवस्थेंत शरीरांतील बिघडलेल्या अवस्थेची सूक्ष्म स्वरूपाची जाणीव दाखविणारी हीं स्वप्नें असतात. विशेषतः एखाद्या इंद्रियांत किंवा मस्तिष्कसंस्था मेंदू व त्याचीं तंतुजालकें ह्यांमधें मृत्युकारक झालेला बिघाड हीं स्वप्नें दाखवितात म्हणजे ही लक्षणें दुसऱ्या स्वरूपाचा मृत्यु दिग्दर्शित करतात असें समजावयास हरकत नाहीं.

**श्रीदत्तप्रभूंचें अवधूतस्वरूपः**—'तुझी अवधूत मूर्ती। माझ्या जीवाची विश्रांती ॥' भागवत संप्रदायी श्रीसंत तुकाराममहाराजांसारख्या विरक्त पुरुषास ह्या अवधूत स्वरूपांत जीवाच्या विश्रांतिस्थानाची महती वाटते ही अत्यंत महत्त्वाची गोष्ट आहे. सर्व भारतांत श्रीदत्तप्रभूंचीं मंदिरें आढळून येतात. दहाहि प्रकारच्या संन्यासी संप्रदायांत श्रीदत्तप्रभूंचें एक विशिष्ट स्थान आढळून येतें. वऱ्हाडमध्यें जन्म पावलेल्या महानुभाव पंथांतहि श्रीदत्ताची पंचकृष्णामध्यें गणना करतात.

श्री. प. प. वासुदेवानंदसरस्वती स्वामीमहाराजांना कीर्तन प्रसंगीं इतर भारूड विषयहि खपत नसत. त्यांच्याच ह्या ग्रंथांत ५ वेळां नग्नस्थितींचें व अनघा स्त्रीशी केलेल्या क्रीडेचें वर्णन आहे. पण हे अध्याय ३,५,६,२३, व ३९ मधील—५ हि वेळचें वर्णन भक्तांची परीक्षा पाहाण्याकरितां व त्यांच्या श्रद्धेमध्यें कांहीं कमीपणा आहे कीं काय हें अजमांविण्याकरितां म्हणून हें मायावी स्वरूप म्हणजेच भासमान असणारें स्वरूप दाखविलें आहे. अलर्क व यदू ह्यांना हें क्रीडनाचें स्वरूप दाखविल्याचें वर्णन नाहीं. पण अवधूतस्वरूप आहे. ह्या स्वरूपासंबंधी ह्याच ग्रंथांत प्रत्येक ठिकाणीं निरनिराळी उत्तरें आलेलीं आहेत.'तेजीयसा नाहीं दोष' हें ३ ऱ्या अध्यायांत तसेंच २३ व्या अध्यायांत 'असा मायेचा थाट । पाहतांही जो होई धीट । मनीं न मानेल वीट । तोचि नीट जाई धामा ॥ १७ ॥' अशी सूचना दिली आहे. पण स्वतः श्रीदत्तप्रभूच आयुराजाला त्यानें नृकपालांतून ताजें मद्यमांस आणून वचनाप्रमाणें सेवा केल्यामुळें प्रसन्न होऊन म्हणतात—' नर स्थूलदृष्टीनें पाहती ॥ ८८ ॥ विशालदृष्टी माझें तत्व । नेणुनी तें अज्ञत्व । धरूनी माझें अभोक्तृत्व । अलिप्तत्व नेणती ॥ ८९ ॥ वैश्वानरांतर्गत । सर्व भोगी निश्चित । परी अभुक्त असें सतत । म्हणुनी अलिप्त कर्मासी ॥ ९१ ॥' बाह्य स्वरूप कसेंहि असलें तरी अंतःस्वरूपाकडे पाहण्याची माझी दृष्टि आहे व्र ही अशी विशाल दृष्टि जाणणारा ह्या मायेच्या पलीकडे माझ्या स्वरूपाला पाहूं शकणारा भक्त मला प्राप्त होतो असें म्हटलें आहे. २३ व्या अध्यायांत अस्पृश्य, अभाष्य ह्या शब्दांचें विवरण करीत असतां श्रीपरशुराममाता रेणुकेनें ' शब्दस्पर्शादि विषय । होती इंद्रियाला ग्राह्य । तुम्ही तरी अविषय । अस्पृश्य अभाष्य सत्य हे ॥ ३३ ॥ धर्माधर्मरूपद्वय । दूर होय तुम्हांपासूनी ॥३५ ॥ तेव्हां अस्पृश्य अभाष्य । ह्या शब्दांचें असेंचि भाष्य ॥ ४१ ॥' असें ठणठणीतपणें सांगितलें आहे. धर्माधर्माच्या नियमनाच्या पलीकडे असलेल्या तत्त्वाकडे पाहण्याची तयारी झाली आहे कीं नाही हें परीक्षण करण्याकरितां हें नग्न व अनघा स्त्री-क्रीडनाचें मायादृश्य दाखविलें गेलें असा ह्यांतून माथितार्थ निघतो.

अवधूतस्वरूपामधें शरीराची दिगंबर अवस्था मायाक्रीडनाच्या अनुषंगानें आलेली आहेच. परंतु यदूच्या आख्यानांत तो ज्ञानाधिकारी झाला आहे असें पाहून ' पार्थिवाचे समोर । एकाएकी दिसे दिगंबर । पहुडला धरणीवर । अतरी दर न धरितां ।। ६० ।। ४६ ।।' श्रीदत्ताचे ते चिंतारहित आनंदघन स्वरूप पाहून ह्या निर्जन वनांत शक्तिसंपन्न असून आत्मसंतुष्ट अशी आपली अवस्था कशी असा प्रश्न यदूनें केला असतां ' अवधूत तो हांसून । बोले वचन तयाप्रती ।। ७४ ।। ४६ ।।' अशी ओंवी आहे. ह्यावरून अवधूतस्वरूपांत शारीरिक दिगंबर अवस्थेचा समावेश आहे हें स्पष्ट होईल. अवधूतस्वरूपाची मानसिक अवस्था ही ह्याच अध्यायांत जास्त स्पष्टतेनें आलेली आहे. रेणुकेनें दिलेल्या उत्तरांत ह्याची दुसरी बाजू आहे. २४ गुरूंपासून घेतलेल्या उपदेशामुळें 'मी ह्या विवेकें संपन्न । झालो असें म्हणून । सर्व तळमळ जाऊन । आनंद भरून राहिलों येथें ।। ९१ ।। निजरंगें रंगून । मी सर्वदा असें म्हणन । सुखदुःखाचें स्फुरण । नसे जाण सर्वथा मला ।। ९७ ।।' हें आपल्या अवस्थेचें वर्णन अवधूतानें स्वतः केलेलें आहे. ह्या अवस्थेंत असल्यामुळें देहदृष्टी नसल्यामुळें अंबराऐवजी दिगंबरावस्था असली तर त्यांत अस्वाभाविक कांय आहे? ह्या अवधूत अवस्थेचें चिंतन करणारें श्रीगुरुदेवदत्त आहेत ही त्यांची बिरुदावली ' अवधूताचिंतन श्रीगुरुदेवदत्त ' ह्या स्वरूपाची साक्ष देत आहे.

**अवधूतगीतेचें वैशिष्ट्यः**—२४ गुरूपासून हेयोपादेय म्हणजे चांगलें तें घेणें व वाईट तें टाकणें ह्या हंसक्षीरन्यायानें घेतलेल्या उपदेशांत ३ आकाश, ६ सूर्य, २३ कोळी व ५ चंद्र ह्या चार पासून तत्वज्ञानीय गोष्टी आहेत. आकाशापासून सर्वव्यापित्व, सूर्यापासून आत्म्याचें प्रतिबिंबत्व दाखविलें आहे. बाकीच्या उपदेशामध्यें पाहिलें असतां दैवी संपत्तीपैकीं गुणांचा बोध घेतला आहे. ह्यांची एकत्र गणना केल्यास १ क्षमा २ सहनशक्ति ३ गर्व नसणें ४ परोपकार ५ रसासक्ति नसणें ६ मधुमक्षिकाभाव ७ स्वच्छता ८ परोपकारार्थ संग्रह करणें ९ वैराग्य १० ब्रम्हचर्य—स्त्रीसंबंधी उदासीनता ११ अन्नपाणी दैवाधीन आहे अशी श्रद्धा १२ इंद्रियसुखपराङ्मुखता १३ प्रसन्नता १४ गंभीरता १५ भिक्षावृत्ति

१६ रूप, गीत, काम, रस हें बंधनकारक म्हणून यांचा त्याग १७ एकान्ताची आवड १८ ध्यान–निष्ठता १९ आत्मरति–आत्मतृप्तता व २० पवित्रता हे गुण आहेत असें दिसून येईल. ह्यांमध्यें एका गुरूपासून अनेक गुण किंवा अनेक गुरूंपासून एक गुण घेतलेला आहे. ह्या प्रकाराने केलेल्या उपदेशामध्यें तत्वज्ञान तेंच असलें तरी ज्या सर्वसामान्य जनांत त्याचा प्रसार करावयाचा असतो त्यांच्या अनुभवांतील गोष्टींना धरून सांगितलें म्हणजे परिचित दृष्टान्त देऊन सांगितलें म्हणजे ती तत्वप्रणाली जनमनांत चांगल्या प्रकारें रुजते म्हणून ही पद्धति चांगली समजली जाते. संत मंडळींनींहि हीच पद्धति आपापल्या ग्रंथांत जास्त जास्त प्रमाणांत वापरलेली दिसून येते, असो.

ह्या ग्रंथावर जवळ जवळ १२५ पानांचें परीक्षण कारागृहांत असतांना लिहिलेलें आहे. त्याचें प्रकाशन सध्यां व्यवहार्य नसल्यामुळें त्याचें सार ह्या विवेचनांत आणण्याचा प्रयत्न केलेला आहे. ही नम्र अञ्जलि श्रीदत्तप्रभूच्या चरणीं अर्पण करून विशाल दृष्टीचा कृपाप्रसाद आम्हां सर्वांस मिळावा अशी प्रार्थना करून येथें विराम करतों.

॥ श्रीगुरुदेवदत्तार्पणमस्तु ॥

ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः

—त्र्यं. गं. जोशी.

अमरावती, २५-५-५३

# अनुक्रमणिका



अथ श्रीमत्परमहंस वासुदेवानंदसरस्वतीस्वामीकृत

# श्रीदत्तमाहात्म्य

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥
श्रीगुरुभ्यो नमः ॥ श्रीसीतारामचंद्राय नमः ॥
श्रीगुरुदत्तात्रेयः प्रसन्नोस्तु ॥ श्रीदत्त ॥

ज्ञानकर्मेंद्रियप्राणगण । ह्यांचें करी जो संरक्षण ।
त्या गणपतीचे वंदूं चरण । मंगलाचरण हें आमुचें ॥१॥
ज्याला म्हणती अंबेचा[1] सुत । कलियुगीं जो गंधर्वे[2]स्थित ।
जो वरदाभयदहस्त । स्मरणें समस्तविघ्नहर्ता ॥ २ ॥
कर्ता धर्ता संहर्ता । विश्वाचा जो तारी आर्ता ।
जो स्मरणें दुःखवार्ता । नुरवी भर्ता तो आमुचा ॥३॥
तो आमुचा गुरुवर । त्याला जोडूनी दोनी कर ।
त्याचे चरणीं ठेविलें शिर । ज्याला सुरवर वंदिती ॥४॥
तो हा परमात्मा श्रुतिगेय । नरसिंहसरस्वती दत्तात्रेय ।
परब्रह्म सच्चिदानंदमय । निरामय अद्वितीय तो ॥ ५ ॥
तोचि रची हा ग्रंथ । निमित्तमात्र वासुदेव[3] येथ ।
श्रवणें पठणें करवील स्वार्थ । हा यथार्थ भाविकांचा ॥६॥
जगदुद्धारार्थ परमेश्वर । अत्रीच्या घरीं धरी अवतार ।
त्याच्या चरिताचा विस्तार । वर्णिला सुंदर पुराणीं ॥७॥

---

१ पार्वतीचा मुलगा गणपती, किंवा अंबेचा मुलगा श्रीनृसिंहसरस्वती. २ घोड्यावर बसलेला गणपति, किंवा गंधर्वनगर-गाणगापुरीं राहिलेले श्रीनृसिंहसरस्वती. ३ ग्रंथकर्त्याचें नांव श्री० प० वासुदेवानंदसरस्वती.

तत्सारभूत दत्तपुराण। आठसहस्र निरूपण।
तें अपरिचित गीर्वाणभाषण। प्राकृतजन नेणती ॥८॥
म्हणोनि हा ग्रंथारंभ। ह्या योगें उमजेल स्वयंप्रभ।
भक्तवत्सल पद्मनाभ। चित्तक्षोभहर्ता जो ॥ ९ ॥
श्रीदत्तपुराणाचे तीन भाग। ज्ञानोपासनाकर्मयोग।
त्यांतील उपासनाकांडभाग। ईश्वरानुराग दावी जो ॥
जेथें कार्तवीर्याचें आख्यान। अलर्काचें विज्ञान।
आयुयदूंचें उद्धरण। हेंचि वर्णन मुख्यत्वें ॥ ११ ॥
जरी पाहिजे मुक्ति। तरी आदरावी नवविधाभक्ति।
जिणें येथें मिळे भुक्ति[1]। अंतीं मुक्ति अनायासें ॥१२॥
स्मरण आणि वंदन। सख्य सेवन आणि अर्चन।
दास्य श्रवण कीर्तन। सर्वनिवेदन नवविधाभक्ति॥१३॥
कार्तवीर्यें केली स्मरणभक्ति। अलर्कानें वंदनभक्ति।
आयुराजानें दास्यभक्ति। सख्यभक्ति परशुरामें॥१४॥
विष्णुदत्तें केलें सेवन। यदूनें केलें अर्चन।
वेदधर्मे केलें कीर्तन। दीपकें श्रवण श्रीदत्ताचें॥ १५ ॥
सर्वस्वात्मनिवेदन। कित्येक भक्तांनीं करून।
श्रीदत्तीं तल्लीन होऊन। निर्वाणस्थान घेतलें ॥ १६ ॥
भक्ती ज्ञानाची माउली। करी कृपेची साउली।
जिणें नामरूपा आणिली। ब्रह्ममूर्ती भली अनायासें॥
निर्विशेष परब्रह्म। साक्षात्कार करतां श्रम।
घडे मंदां त्याचा भ्रम। वारी हे क्रम दावूनी ॥ १८ ॥

१ भोग, ऐश्वर्य.

सगुणब्रह्मध्यानें मन। शीघ्र होई सावधान।
मग निरस्तोपाधिकल्पन[1]। स्वात्मज्ञान स्फुरतसे॥१९॥
ती नवविधाभक्ती येथ। वर्णिजेल यथार्थ।
जी करील कृतार्थ। दावोनि पंथ भाविकां॥२०॥
स्मरणभक्ती अतिश्रेष्ठ। ती नवांमाजी वरिष्ठ।
आठांलाही व्यापी गरिष्ठ[2]। भगवत्प्रेष्ठ[3] ती जाणा॥२१॥
ज्याचीं अंगें सहस्र। ज्याचीं स्वरूपें सहस्र।
ज्याचीं नामें सहस्र। कर्मे सहस्र जयाचीं॥२२॥
ह्या सर्वांचें स्मरण। भावें करितां प्रतिक्षण।
उतरे सर्व कर्मांचा शीण। लाभे निर्वाण सहजची २३
जातां येतां काम करितां। खातां पितां देतां घेतां।
हृदयीं भगवत्स्मरण करितां। अकर्मता कर्मांची॥२४॥
स्मरणाविणें न घडे कांहीं। म्हणोन श्रेष्ठ स्मरणभक्ति ही।
आतां कीर्तनभक्ति ऐका ही। तारी हेही भाविकां॥
यस्य स्मृत्या च नामोक्त्या। हे तो स्मृति न हो मिथ्या।
तपोयज्ञकर्म जें न्यून त्या। पूर्णत्वा नेई कीर्तन॥२६॥
अजन्म्याचें[4] दिव्य जन्मकीर्तन। अक्रियाचें दिव्य क्रियागान।
जन्मबीजाचें करी दहन। नुरवी गहन कर्मवार्ता॥२७॥
करितां कीर्तन भगवंताचें। उठावे सात्विक भाव साचे।
तरीच साफल्य जन्माचें। अन्यथा दंभाचें ठाणें तें॥

---

१ उपाधि शून्य. २ मोठी–गुरुतर. ३ प्रियकर. ४ ईश्वराचें.

नोहे हृदय सद्गदित । नोहे वाचा गद्गदित ।
न हो तनु रोमांचित । प्रेमाश्रुपात नोहे जरी ॥ २९ ॥
अंतर्भान नोहे जरी । देहभान न उडे तरी ।
दंभ मिथ्या प्रलापापरी । जाणिजे चतुरीं कीर्तनप्रौढी॥
कीर्तनभक्ती ऐसी हे । श्रवणभक्ती तसीच आहे ।
त्रिकरण[1] ज्याचें दृढ राहे । जो न पाहे बाहेर ॥ ३१ ॥
सोडोनि असूया[2] स्पर्धा । ठेवोनियां दृढ श्रद्धा ।
अंतर्निष्ठ जो राहे सुधा । श्रवणीं बद्धासन विनिद्र ३२
स्वयें जरी जाणे भगवद्गुण । तरी ऐकावितां तेंचि गुण ।
श्रद्धाभक्तीनें करी श्रवण । तेंचि श्रवण भक्तियुक्त ३३
प्रेम दावूनी जाती कीर्तना । तेथें वार्ता करिती नाना ।
कीं बैसोनि सेविती शयना । सोडिती अवधाना
श्रवणाच्या ॥ ३४ ॥
व्यर्थ त्याचा तो परिश्रम । अशा श्रवणें न उडे भ्रम ।
न लागे मोक्षाचा क्रम । स्वरूपीं विश्राम त्या कैंचा ३५
म्हणोनियां सावधान । करावें भावें श्रवण ।
हें तृतीय भक्तीचें लक्षण । आतां सेवन अवधारा ३६
मुळीं स्वरूपची एक । तेथें कैंचा सेव्य सेवक ।
उत्तमाधमभाव विवेक। परी ठेविती लोक द्वैतभावीं॥
अनादिकाल प्रवृत्ति । तीस अनुसरोनी वदे श्रुती ।
ज्या योगें मिळे पद्धती । लोक तरती अनायासें॥३८॥

---

१ काया वाचा मन. २ गुणाचे ठिकाणीं दोषारोप करणें.

वज्रांकुशध्वजांकित । भगवत्पद पद्मचिन्हित ।
त्याला सेवी जो संत । तो होय मुक्त निश्चयें ॥ ३९ ॥
आतां परिसावें अर्चन । साकार मूर्ति कल्पून ।
सर्व भावें कीजे पूजन । सर्वोपचारेंकरोनी ॥ ४० ॥
यथेष्ट प्रतिमा करून । स्वदेहाप्रमाणें मानून ।
मिळती ते उपचार समर्पून । करावें अर्चन भावार्थें ॥
त्रिकाल करावें अर्चन । किंवा षोडशोपचारीं प्रातःपूजन
मध्यान्हीं पंचोपचार देवून । रात्रौ नीरांजन समर्पावें ॥
जी जी वस्तु आपणा आवडे । ती ती ठेवावी देवापुढें ।
ऐसी भगवत्प्रीति जोडे । कडे पडे भवाब्धीच्या ॥४३॥
मूर्तिपूजा डोळां देखावी । तैसीच चित्तीं रेखावी ।
तेथेंच वृत्ती राखावी । ब्रह्मपदवी मिळेल ॥ ४४ ॥
एकाग्रतेनें पूजोत्तर । बसोनी देवासमोर ।
समरस[1] करूनी अंतर । गुरुदत्तमंत्र जपावा ॥ ४५ ॥
यांचें नांव अर्चन । आतां सांगतों वंदन ।
जेणें समान वृत्ति होऊन । अढळ स्थान मिळेल ॥४६॥
ब्राह्मणापासोनी चांडाळापर्यंत । गाई अश्व श्व खर
साहित ।
स्थावर जंगमात्मक समस्त । यांसी सतत वंदावें ॥४७॥
वाच्यार्थ तो देह सगुण । अंतर्यामीं लक्ष्यार्थ निर्गुण ।
तो एक भगवान् परिपूर्ण । चालक भासक सर्वांचा ४८

---

१ एकाकार वृत्ति.

सच्चिदात्मा स्वयें एक। अस्ति भाति प्रियत्वें देख।
भाव ठेवोनी तेथें एक। वंदितां लोक अढळ मिळे ४९
सर्वथा न निंदी कोणा कोण। त्याचा मनीं नाणी शीण।
सर्वभूतीं देवपण। मानूनि वंदन सर्वां कीजे ॥ ५० ॥
येथें रुद्राध्याय प्रमाण। याचें नांव वंदन।
आतां बोलिजेल दास्यलक्षण। वागावें आपण दासापरी
धन्यापाशीं सेवक जैसा। तदधीन होऊनि वागे तैसा।
मानापमान आणि आळसा। सोडोनि दिनानिशा
सेवावें ॥ ५२ ॥
दास न ठेवी पोटाची चिंता। तैसी योगक्षेमाची चिंता।
न ठेवावी सर्वथा। ते घे माथां परमेश्वर ॥ ५३ ॥
असें असे हें दास्य जाण। आतां सख्यभक्तीची खूण।
करिजेल निरूपण। श्रुतिप्रमाण विख्यात ॥ ५४ ॥
अनेक देह सुटले जरी। कल्पाचे कल्प लोटले तरी।
जो जिवलगा[1] अंतरीं। आम्हां क्षणभरी न विसंबे ५५
सर्वस्य चाहं हृदि सन्निविष्ट। असी स्मृति बोले स्पष्ट।
तो सर्वां वरिष्ठ। तोचि प्रेष्ठ[2] जिवलगा ॥ ५६ ॥
त्याचें करावें सख्य। निरपेक्ष करणें हें मुख्य।
येणें लाभे ब्रह्माख्य। पद जें सांख्ययोगगम्य ॥ ५७ ॥
त्यावांचुनी न गमावें। त्यावांचुनि न विसंबावें।
त्यावांचुनि न वागावें। त्याला गावें निरपेक्ष ॥ ५८ ॥

---

१ परमेश्वर. २ प्रियतम.

सापेक्ष सत्य जी मैत्री होय । ती संसारा वारील काय।
जरी ईश्वरीं सख्य होय । त्यास न होय पुनरावृत्ती ॥
तनु मन धन । परिवार क्षेत्र सदन ।
करावें ईशा निवेदन । आत्मनिवेदन बोलिजे ॥ ६० ॥
मी केवळ शुद्ध बुद्ध । साक्षित्व हें म्हणणें विरुद्ध ।
अद्वितीय मी स्वतःसिद्ध । अपापविद्ध[1] सदोदित॥६१॥
मला नाहीं कर्तृत्व । मग कैचें भोक्तृत्व ।
यास्तव नाहीं बद्धत्व । नित्य मुक्तत्व त्यास असे॥६२॥
असें अभ्यासें ठरतां । सहज हो निःसंगता ।
हेचि सर्वस्वात्मनिवेदनता । भक्ति संतां मानली ६३
अत्रिऋषी महामुनी ॥ नवविधा भक्ति करूनी ।
देवां अत्यंत प्रिय होवोनी । देवपिता होवोनी राहिला॥
परात्मा ईक्षणें[2] करून । भूत[3]भौतिकं[4] सृष्टी रचून ।
ब्रह्मदेवा उपजवून । वेद देवून सृष्टी रचवी ॥ ६५ ॥
ब्रह्मदेवें मानससुत । मुख्य उपजविले सात ।
त्यांतील दुसरा विख्यात । ब्रह्मसंमत[5] अत्रिऋषी ६६
सोडी तीनी देहांचा अभिमान । तीनी अवस्था सोडून।
तीनी गुणां उलंडून । सार्थक अभिधान मिरवे अत्री[6]॥
निष्कलमष ब्रह्मयाचें तप । नेत्रद्वारा आपोआप ।
प्रगटलें होवूनि सुरूप । ऋषिस्वरूप तो हा अत्री ६८

---

१ मुळींच पाप नसलेला, २ विचार करून. ३ पृथ्व्यादि. ४ मनुष्यादि अंडज स्वेदज जारज. ५ वेदसंमत. ६ नाहीं आहे त्री ज्यास.

पहिलें लागलें सूर्यग्रहण। कोणी नेणती तें कारण।
अत्री सर्वज्ञ तें जाणून। करी ग्रहण प्रगट तें ॥ ६९ ॥
ऋग्वेदाचें पांचवें मंडळ। जो प्रगट करी सकळ।
ज्यामध्यें अग्न्यादि देवकुळ। शीघ्र फलप्रद असे ७०
कृतयुगीं रोगग्रस्त। जाहले सर्व जीव त्रस्त।
वैद्य होऊनि रोगांचे अस्त। करी समस्त सुखी अत्री॥
मनूनें मंदबोधार्थ। स्मृती केली ती यथार्थ।
नेणे लोक म्हणोनी सुखार्थ। करी समर्थ दुसरी स्मृती॥
स्वयें जरी निरिच्छ मनीं। ब्रह्मवित् वरीयान्[1] असूनी।
पित्याची आज्ञा मानूनी। वरी मुनी अनसूयेतें ॥७३॥
कर्दमाचें तप मूर्तिमंत। प्रगटलें देवहूतीचे उदरांत।
ते हे अनसूया विख्यात। अत्री हात धरी जीचा ७४
अतिथी जिच्या स्वप्नींही। मागें परतोनि गेला नाहीं।
जिणें स्वयें नग्न होवोनिही। दिधली भिक्षा त्रिमूर्तीला॥
सावित्री लक्ष्मी पार्वती। ऐकून अनसूयासतीख्याती।
मत्सरें ग्रासूनि पाठवीती। स्वपतींतें जीपाशीं ॥७६॥
सतीचें सत्व हरावया। तीनी देव अतिथी होवोनियां।
आले बाल करूनि तयां। ठेवी अनसूया धर्मबळें ७७
गर्वताठा तुटतां येती। तीनी देवी पती मागती।
अनसूया बाळे ठेवी पुढती। त्या नेणती पतीच्या खुणा॥
मग हांसूनी अनसूया। त्यांचे पती देई तयां।
सती लाभे अशा सामर्थ्या। पातिव्रत्याश्रयें ती॥७९॥

---

१ श्रेष्ठ.

सूर्या शापी कौशिकसती । तेव्हां अंधकारें प्राणी मरती
तीशीं समजावोनी उदयाप्रती ।सूर्या आणि अनसूया॥
मांडव्यशापें ब्राह्मण । सहसा पावला मरण ।
न लागतां एकक्षण । अनसूया तया उठवी ॥ ८१ ॥
सुदुष्कर करणी पाहून । देव देती वरदान ।
तीनी देव पुत्र होऊन । त्वदधीन राहती असा ॥८२॥
जीला मृदुला झाली धरा । मंद मंद वाहे वारा ।
शीतलता ये दिवाकरा । अमरा थरथरा कांपरा ये ॥
चंद्रतुल्य तिचें सौंदर्य । म्हणतां वाटे मना भय ।
कलंकी तो तिचा तनय । कलांचा क्षय जयाच्या॥८४॥
पूर्णिमेसी पूर्ण हो जरी । तरी सरतांची रात्री ।
निस्तेजस्क होय त्याची सरी । कोण करी अनसूयेसी ॥
तेजस्वी सूर्य म्हणों तरी । उदयास्त असे बरोबरी ।
अनसूयेच्या तेजापरी । नित्य तेज दावी कोण अंगीं ॥
कौशिकस्त्रियेनें देतां शाप । कळलें सूर्याचें तप ।
जाणोनी सतीचा कोप । घेतली झोंप दशादिन ॥८७॥
त्याला उदया आणिला । असी दाविली सहज लीला ।
कोण तये अनसूयेला । जगीं तुला करील ॥ ८८ ॥
दया क्षमा शांती प्रमुख । गुण जयाचे सुरेख ।
तो विष्णु जगन्नियामक । जगीं एक मान्य असे॥८९॥
त्याला जिणें केला अनुज[१] । पुनरपि केला आत्मज[२] ।
त्याचे उपमेचें काय काज । वाटे लाज मजलागीं॥९०॥

१ कपिल महामुनि. २ दत्त.

तेव्हां केवला चित्कला। अनसूया वाटली मनाला।
जगीं उपमा नाहीं तिला। अबला कोण म्हणेल॥९१॥
अत्रिऋषी परम समर्थ। तपश्चर्या हा त्याचा अर्थ[१]।
ज्याला नाहीं किमपि स्वार्थ। परोपकारार्थ जो वागे॥
त्याची ही अनसूया। जाहली असे जाया।
पातिव्रत्यभूषणें काया। शोभवी दयाक्षमायुक्त॥९३॥
धुंडतां हें त्रिभुवन। न मिळे दुजें साध्वीरत्न।
न करितां तपःप्रयत्न। उत्तम साधन संपादिलें॥९४॥
ईश्वरें साकार व्हावया। जेवीं पूर्वीं रचिली माया।
पश्चात् सगुण होवोनियां। प्रगट झाला जगामाजी॥
तेवीं धरावया अवतार। प्राकट्यस्थान सुंदर।
अनसूयेचें हें शरीर। पृथ्वीवर प्रगटवी ॥ ९६ ॥
येथें अनसूयेशीं जरी। करावी मायेची बरोबरी।
माया जड हे चेतना निर्धारी। केवीं सरी द्यावी सरा॥
तेव्हां निरुपम अनसूया। पुत्री कर्दमाची द्वितीया।
ती दिली ब्रह्मपुत्रा द्वितीया। अद्वितीय आत्मज ज्यांचा ॥ ९८ ॥
तो हा भगवान् स्वयंदत्त। दत्तात्रेय नामें विख्यात।
जे आधुनिक दत्तक सुत। ते विख्यात द्यामुष्यायण[२]॥
ज्याला नाहीं मातापिता। नसे कुळगोत्राची वार्ता।
त्याणें आत्मदान करितां। द्यामुष्यायणता केवीं ये॥

१ संपात्ति. २ दोन पित्यांचे.

ऐसा तो भगवान अप्रमेय। भक्तीस्तव झाला दाता देय।
प्रसिद्ध तो दत्तात्रेय। श्रुतिगेय सद्गुण ॥ १०१ ॥
ज्याचे अनंत गुणगण। गणतां शीणती वेद पुराण।
आमुचें चित्त अल्प प्रमाण। गुणसंपूर्ण गणेल कीं ॥
अथवा सत्कवित्व रचून। देवाचें तोषवाया कीं मन।
बृहस्पतीचें कवित्व सद्गुण। विस्मय कारण तेंही नोहे॥
तरी येथें किमपि कारण। नसे जसें करी प्रेरण।
तसें घडे हें लेखन। नाहीं अभिमान कर्तृत्वाचा १०४
गोदावासी वेदधर्मा। तो निस्तारावया निजकर्मा।
काशीवास करोनि शर्मा। पावला दुष्कर्मा टाळोनियां।
त्याची सेवा दीपक। शिष्य होवोनी करी चोख।
एकवीस वर्षें साहे दुःख। नोहे पराङ्मुख सेवेसी१०६
त्यासी हरिहर प्रसन्न होती। बळेंची वरदान देती।
तरी न भुले त्याची मती। सत्यधृती केवळ तो १०७
मग गुरु म्हणे वर घे आतां। शिष्य म्हणे सांगा
दत्तचरिता।
तेणें तथास्तु म्हणोनि कथा। श्रीदत्ताची कथियेली ॥
इति श्रीदत्तमाहात्म्ये प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥
॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

# अध्याय दुसरा

श्रीदत्तसमर्थ ॥ करोनी साष्टांग नमन ।
दीपक करीतसे प्रश्न ॥
म्हणे गुरुजी माझें मन । समाधान करावें ॥ १ ॥
कोणी म्हणती दत्तात्रेय । हा ऋषीचा पुत्र होय ।
कोणी म्हणती देव होय । कोणी ध्येय म्हणताती ॥२॥
श्रीदत्त हा परब्रह्ममूर्ती । असें कोणीही बोलती ।
भ्रांत होते माझी मती । सांगा निगुती सत्य काय ॥
काय कारणें अवतरला । कैशा केल्या एथें लीला ।
शिष्यसंग्रह कसा केला । हें सर्व मला ऐकवा ॥ ४ ॥
परिसोनी शिष्याचा प्रश्न । सद्गदित झालें गुरूचें मन ।
म्हणे शिष्या हो सावधान । लावोनि कान ऐक तूं ॥५॥
एक भार्गवकुलोत्पन्न । होता उत्तम ब्राह्मण ।
त्यासीं नवसें करून । वृद्धपणीं पुत्र झाला ॥ ६ ॥
योगभ्रष्ट तो सर्वज्ञ । परि जडसा वागे सुज्ञ ।
त्याचा पिता विप्र प्राज्ञ । शिकवी प्रयत्नें तयासी ॥७॥
करूनियां मौंजीबंधन । पिता करवी अध्ययन ।
हांसोनि पुत्र बोले वचन । किमर्थ यत्न हा तुझा ॥८॥
पिता म्हणे करी अध्ययन । गृहस्थाश्रम करोन ।
करी मोक्षार्थ कर्माचरण । तेणें निर्वाण पाविजे ॥ ९ ॥
पुत्र म्हणे ताता ऐक । शिकलों मी वेदादिक ।
कर्में केलीं सकळिक । भोग अनेक भोगिले ॥ १० ॥

झालों मंत्री झालों राजा । झालों भृत्य झालों प्रजा ।
असती उत्तमाधम योनी ज्या । त्या त्या सर्व
अनुभाविल्या ॥ ११ ॥
तें मी सर्व स्मरें स्पष्ट । पूर्वीचा मी योगभ्रष्ट ।
आतां कर्तव्य नसे अवशिष्ट । कां हे कष्ट करसी तूं ॥
मी जातबोध केवळ । नको आतां कर्माचा खेळ ।
मनाचा झाडूनी मळ । वैराग्यें सबळ आहें मी ॥१३॥
पूर्वी होतों मी ब्राह्मण । सत्संगें विद्याभ्यास करून ।
वैराग्यें एकाग्रमन । करूनि ध्यान केलें म्यां ॥ १४ ॥
ज्ञानाला प्रतिबंध येऊन । अकस्मात पातलें मरण ।
पूर्वाभ्यासें विस्मरण । न झालें जाण मज ताता ॥१५॥
जसा निर्जेन विद्या विसरे । जागा होतां सर्व स्मरे ।
त्याप्रमाणें उपजतांचि सारें । अभ्यास स्मरे दृढवृत्त ॥
तीनी भूमिवरोनि फिरे । तोही अभ्यास न विसरे ।
मीं पंचम भूमिका आदरें । सेविली तें सारें आठवे ॥
आतां झाली वृत्तींची उपरती । मिळाली परम शांती।
दृढतर झाली विरती । पुनरावृत्ति आतां कैंची ॥१८॥
करावयाचें तें म्यां केलें । मिळवायाचें मिळविलें ।
आतां कांहीं नाहीं राहिलें । यथार्थ जाणविलें
तुजलागीं ॥ १९ ॥
ऐकोन पुत्राचें वचन । पिता वैराग्य पावून ।
बोले मग होऊन दीन । तूं नंदन धन्य धन्य ॥ २० ॥

१ शाब्दिक ज्ञान.

कुळ केलें पावन। पूर्वजांचें केलें उद्धरण।
आतां परिसें माझें वचन। सांगे ज्ञान[1] मजला हें २१
मी संसारा भिऊन। ऐहिक पारलौकिक सुख सोडून।
केवळ इच्छितों विज्ञान। ज्ञान वैराग्यसहित जें॥२२॥
तूं म्हणसी हा तात। तरी मी हा अज्ञानावृत।
केवळ होईन तुझा सुत। श्रुति संमत असे येथें॥२३॥
पुत्र म्हणे ऐक वचन। श्रीदत्तें उपदेशिला अर्जुन।
तो योगाभ्यासें लाधला ज्ञान। तसा यत्न करी तूं॥
पिता म्हणे कोण श्रीदत्त। अर्जुन हा कोणाचा सुत।
त्याला कसें झालें ज्ञान प्राप्त। हें समस्त सांगावें २५
पुत्र म्हणे दुःखसंयोग। त्याचा करी जो वियोग।
परी त्याला म्हणती योग। श्रीदत्तें तो सांग[2] कथियेला॥
हें सर्व करीन निरूपण। ऐके होवूनी सावधान।
प्रतिष्ठानीं होतां ब्राह्मण। कौशिकगोत्रोत्पन्न जो २७
दैवें व्यसनार्त होवोनी। सदा राहे वेश्यासदनीं।
भोग भोगितां प्रतिदिनीं। कुष्ठें व्यापून त्रस्त झाला॥
बीभत्सरूप देखोन। वेश्येनें दिधला काढून।
तेव्हां विवाहित स्त्रीला आठवून। आला ब्राह्मण
निजसदनीं॥ २९॥
असी लोकीं हे राहटी। सुज्ञें ठेवावी पोटीं।
पति येतां उठाउठीं। पायीं मिठी घाली सती॥३०॥

१ अनुभविक ज्ञान. २ समग्र.

म्हणे धन्य आजी सुदिन । सोन्याचा आला कीं पर्जन्य ।
झालें इष्ट देवाचें दर्शन । आनंदघन दाटला ॥ ३१ ॥
उत्तमासनीं बसवून । देवापरी करी अर्चन ।
भावें करून शुश्रुषण । घाली स्नान आवडीनें ॥३२॥
करी पादोदक प्राशन । स्वशरीरीं करी प्रोक्षण ।
करूनियां परमान्न । करवी भोजन सादरें ॥ ३३ ॥
पूय रक्तें भरतां वसन । नित्य करी क्षालन ।
उत्तम वस्त्रें नेसवून । अंगवाहन करी नित्य ॥ ३४ ॥
बोलोनि मंजुळ भाषण । करी औषधादि लेपन ।
श्लेष्म मूत्र मळ क्षालन । करितां मन न विटे तिचें ॥
एवं अत्यंत विनीत होवून । करी जरी नित्य सेवन ।
तरी तो कोपाविष्ट होवून । करी निर्भर्त्सन सतीचें ३६
जरी झाला पराधीन । तरी न सुटे वेश्येचें चिंतन ।
पत्नीला शिव्या देऊन । म्हणे सेवन न करसी ॥३७॥
वेश्येनें करवितां अंगसंवाहन । त्याणें मन न हो खिन्न ।
पत्नीनें करितां पादसंवाहन । वाटे शीण दुर्जना ॥३८॥
कसा असो पतीचा भाव । सतीनें ठेवावा अनन्य भाव ।
हें असो एकदां तो धव । डोळां देखे एक वेश्या॥३९॥
वेश्या केवळ व्याध जाण । निर्गुण भ्रूधनुष्य ओढून ।
कटाक्षबाणें अचुक संधान । करून विप्रमनमृग वेधला॥
वेश्या हा कामाचा शर । तेणें वेधिलें द्विजशरीर ।
विद्ध होतांचि सत्वर । निर्लज्ज होवोनी बोलतसे ॥४१॥

प्रिये तूं धर्मज्ञा असती । म्हणोनी कठोर वाग्बाण
सोससी ।
तरी आतां या समयासी । माझी मानसी व्यथा वारी ॥
जिवलग मित्र आणि गुणी भृत्य । प्रिय भार्येसि नित्य ।
साधूंलाही सांगावें सत्य । दुःख आपुलें सुखार्थ ॥४३॥
हे वेश्या घटस्तनी । स्वरूप सौंदर्य दावूनी ।
माझें मन दुरूनी । हरूनी जातसे ॥ ४४ ॥
देह जाहला अशक्त । परि मन नोहे विरक्त ।
तत्स्वरूपीं जाहलें अनुरक्त । ह्याला मुक्त करी तूं॥४५॥
वेश्येगृहीं नेई मला । नातरी मृत्यु पातला ।
उपाय दुजा नाठवे मला । येवो तुला काकुळती॥४६॥
कामाची विपरीत गती । ब्रह्मादिकांची खुंटे मती ।
मी तो बापुडा मंदमती । केवीं विरती पावेन ॥४७॥
ऐकोनी पतीचें वचन । हृष्ट झालें सतीचें मन ।
सत्वर कमर बांधोन । तथास्तु म्हणून उभी ठेली॥४८॥
वेश्या वश्य व्हावी म्हणून । तिला द्यावया घेई काढून ।
अलंकार ते पदरीं बांधून । पतीस खांद्यावरी घेतलें ४९
पतीस व्यथा न व्हावी । म्हणून हळु हळु चाले पदवी ।
मनीं शीण न वागवी । तों अंधकार पातला ॥ ५० ॥
विद्युत्तेजें धरी खूण । मंद मंद ठेवी चरण ।
तों पातलें विघ्न दारुण । दैववशें करूनी ॥ ५१ ॥
सुळीं देतां एक चोर । पळोनि गेला सत्वर ।
राजदूतीं शोधितां दूर । तत्समान नर देखिला ॥५२॥

तोचि चोर मानुनी । राजाची आज्ञा घेउनी ।
तया सुळावरी चढवूनी । राजधानीप्रती दूत गेले ५३
चोर नव्हे तो मांडव्य मुनी । सुळीं असे ध्याननिष्ठ होवोनी ।
ध्वांतीं तया नेणुनी । चाले तेथूनी सती ते ॥ ५४ ॥
तव कौशिकाचा धक्का लागूनी । शूळें त्रस्त झाला मुनी।
शाप देतसे कोपोनि । विवेक मनीं न धरितां ॥ ५५ ॥
धक्का दिधला मज ज्याणें । सूर्योदय होतांचि क्षणें ।
तो मरो असें म्हणे । ऐकतां शिणे ती साध्वी ॥ ५६ ॥
मग पतिव्रता म्हणे । पतीवांचोनी कायसा जिणें ।
यास्तव वाक्य ऐक तरणे । उदय न करणें त्वां आपला॥
जरी मी पतिव्रता नारी । तरी माझें वाक्य अवधारी ।
भस्म होशी नातरी । हें अंतरीं ठेव सूर्या ॥ ५८ ॥
ऐसा शाप देवूनी । पतीचा मनोरथ पुरवूनी ।
पुनः तयासह सदनीं । विप्रपत्नी पातली ॥ ५९ ॥
कामी पुरुष अविचारी । कार्याकार्य न विचारी ।
पापाची पर्वा न करी । उपशम अंतरीं नसे ज्याच्या ॥
वेश्या हे कामाग्नीची ज्वाळा । रूपकाष्ठें पेटली सोज्वळा ।
कामी जाळीती पडोनी गळा । यौवनकळा आणि धनें ॥ ६१ ॥
अहो योनी हे दुर्गंधी व्रण । तेथें रमतां नये शीण ।
तरी किड्याला याहून । काय न्यूनत्व आहे हो ॥६२॥

थुंकी कफ आणि शेंबूड । यानें भरलें जें तोंड ।
त्याला चंद्रोपमा देती मूढ । मायेनें दृढ आलिंगिलें ६३
स्वस्त्री स्वाधीन असतां । नीच वांछी परवानिता ।
तळें भरलें असतां । जेवी काक कुंभोदक ॥ ६४ ॥
विषय भोगितां झाला रुग्ण । तरी विषया न सोडी ब्राह्मण ।
असो त्याचें हें मूर्खपण । धन्य जाण सती ते ॥ ६५ ॥
सवतीचे मत्सरें प्राण देती । ही तरी स्कंधीं वाहोनि पती ।
आली वेश्येच्या गृहाप्रती । धन्य पतिव्रता हो ॥ ६६ ॥
तिच्या शापा भिऊन । सूर्य राहिला लपून ।
पडला अंधकार गहन । भ्याले जन सर्वत्र ॥ ६७ ॥
सर्व मनुष्य गडबडले । पशु पक्षी तडफडले ।
काळाभावें अडले । विप्र पडले संकटीं ॥ ६८ ॥
त्रिकाळ संध्यावंदन । सायंप्रातर्भोजन ।
कैसे करतील ब्राह्मण । दिनरात्रीमान न होतां ॥६९॥
यज्ञ याग लोपले । देवा उपवास घडले ।
सर्व संकटीं बुडाले । सर्वांचें खचलें बुद्धिबळ ॥ ७० ॥
स्वर्गी देव म्हणती । नर आम्हां बळी देती ।
वृष्टिद्वारा त्यांची तृप्ति । करितों आम्ही निरंतर ॥७१॥
आम्ही वृष्टिद्वारा अन्न देतां । मनुष्यीं यज्ञ न करितां ।
उपसर्गें पीडावें तत्वतां । तरी आतां तसें नाहीं ७२

अतिवृष्टिरनावृष्टिर्मूषकाः शलभाः शुकाः । स्वचक्रं
परचक्रं च सप्तैता ईतयः स्मृताः ॥ १ ॥

धाडाव्या ह्या सात ईति । तरी केवळ अनीती ।
काळलोपें यज्ञ न करिती । भयांत भीती काय द्यावी ॥
आतां जावें ब्रह्मयापाशीं । सर्व सांगावें तयाशीं ।
तो उपाय आम्हांशीं । निश्चयेंशी सांगेल ॥ ७४ ॥
असें म्हणोनी देवगण । सत्यलोका जाऊन ।
ब्रह्मयातें वंदून । सर्व निवेदन करीती ते ॥ ७५ ॥
ब्रह्मा म्हणे सतीच्या शापें । भिवूनी सूर्य लोपे ।
जरी एकदां सती कोपे । थरथरां कांपे ब्रह्मांड ॥ ७६ ॥
आतां उपाय एक असे । तेजें तेज लोपतसे ।
सूर्यापुढें दिवे जसे । सतीसमूह तसे अनसूयेपुढें ॥ ७७ ॥
पतिव्रताग्रगणनीया । मनास्विनी अनसूया ।
तिला तुम्ही प्रार्थुनियां । चला घेऊनियां पैठणासी ७८
त्या कौशिकपत्नीस । अनसूया उपदेशील खास ।
निवारील तुमचा त्रास । हें इतरांस न घडेल ॥ ७९ ॥
देव म्हणती आपणही यावें । तथास्तु म्हणून ब्रह्मदेवें ।
पैठणीं गमन केलें जवें । देवांसवें तत्क्षणीं ॥ ८० ॥
तयां पाहूनी अत्री अनसूया । यथायोग्य पूजोनियां ।
विनयावनत होवोनियां । पुसलें तयां सर्व कुशल ८१
मग वंदूनी म्हणती देव । अनसूये त्वत्पदीं भाव ।
ठेवोनि घेतली धांव । तुझें नांव ऐकोनि ॥ ८२ ॥

सतीनें सूर्या शाप दिधला । सूर्य नभीं लोपला ।
कर्ममार्ग खुंटला । अनर्थ घडला जगांत ॥ ८३ ॥
तरी तूं होई प्रसन्न । सतीचें करी समाधान ।
उदया पाववी तपन । ऐसें तप न त्वदितराचें ॥ ८४ ॥
सती म्हणे तुम्ही देव । लोकपालक सदैव ।
तुम्ही म्हणतां घेतली धांव । वाटे अभिनव आश्चर्य हें
असो तथापि चला जावूं । त्या सतीला समजावूं ।
युक्तीनें तिला वळवूं । म्हणोनी निघाली अनसूया ८६
पतीसह सती चाले । देवही समागमें आले ।
कौशिकगृहीं पातले । हर्ष पावले मनांत ॥ ८७ ॥
कौशिकपत्नी येवोन । घेतलें अनसूयेचें आलिंगन ।
अनसूयेसी सत्कारून । कुशल प्रश्न केला ॥ ८८ ॥
अनुसया म्हणे गे साध्वी । तुझी वाणी लागे माध्वी।
लोकीं ज्या ज्या साध्वी। कीर्ति स्वाद्वी तयांची॥८९॥
देवाहूनही अधिक । पती वाटे कीं त्याचें मुख ।
पाहतां ब्रह्मसुखादिक । वाटे सुख काय बोल ॥९०॥
काया वाचा मनेंकरून । करितां पतीचें सेवन ।
सती होवोनी पावन । इतरां पावन करीतसे ॥९१॥
नारी तीर्थ पतिव्रता । असे ही उक्ती विख्याता ।
पतीची शुश्रूषा करितां । ऋणमुक्तता नारीची ॥९२॥
धर्म अर्थ काम हे । पतिसेवेनें नारी लाहे ।
काळाचीही भीती न वाहे। जी न पाहे यातना॥९३॥

पतिव्रताधर्मपालन । हे क्लेश वाटती कठिण ।
जी दुर्भगा मानी शीण । ती दारुण यातना भोगी ॥
मनासारखी न मिळतां साडी । जावोनी माहेरीं करी चाडी ।
न मिळतां वाळी बुगडी । फुगडी घाली पतीपुढें॥९५॥
बरें बरें खाणें पिणें । काय करावीं भूषणें ।
येती इहपर दूषणें । त्याला शिणे ती धन्य ॥ ९६ ॥
कसाही असो पती । त्यावरी ठेवी जी प्रीती ।
पतीसह तिला गती । लाभे पतिलोकीं ॥ ९७ ॥
स्त्रियांला नाहीं वेगळें कर्म । पती देतो अर्धा धर्म ।
उभयलोकीं मिळे शर्म । हें मुख्य वर्म धरावें ॥ ९८ ॥
म्हणोनी नित्य पतिव्रते । भावें सेवी स्वधर्मातें ।
ऐहिकामुष्मिक सुखातें । घेशील माते निश्चयें ॥९९॥
मीही ह्या धर्मेंकरून । आत्मा केला पावन ।
म्हणोनी सर्वदा माझें मन । समाधान भर्तृचरणीं१००
पतीच परब्रह्म माझें । जेणें उतरलें संसाराचें ओझें ।
त्रिविध तापही विझे । आतां न दुजें आठवे ॥१०१॥
ऐकोनी अनसूयेचें वचन । सती होवोनी सुप्रसन्न ।
करद्वय जोडून । बोले वचन मधुरपणें ॥ १०२ ॥
धन्य हो अये अनसूये । पतिव्रते महामाये ।
धन्य हो अत्रिप्रिये । निगमगेये तुज नमो ॥ १०३ ॥
मी नेणें निज धर्म । मी नेणें स्वकर्म ।
मी नेणें निजवर्म । न ठावे शर्म कारणही ॥ १०४ ॥

मज आवडे पतिसेवन । त्याला त्वां दिलें उत्तेजन ।
आह्मां दैवत काय याहून । प्राणजीवन पूर्णाधार १०५
तप करितां नोहे भेटी । ती तूं कंठीं घालूनि मिठी ।
प्रेमें धरिसी पोटीं । काढूनि हिंपुटी अनसूये ॥ १०६ ॥
त्वां केला उपदेश । तेणें हर्ष झाला चित्तास ।
पतिसेवेचें हें खास । फळ आम्हांस मिळालें ॥१०७॥
देवांसह तुझें दर्शन । झालें मज न होतां यत्न ।
पावन केलें हें सदन । आजचा सुदीन अहो भाग्य ॥
तूं अससी पूर्ण काम । तथापि कां केला आगम ।
ह्या मच्चित्ताचा भ्रम । वारी विश्राम घेऊनी ॥ १०९ ॥

इति श्रीदत्तमाहात्म्ये द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥
श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

# अध्याय तिसरा

श्रीदत्त॥ गुरु म्हणे शिष्या परीस। सतीप्रश्न ऐकोनी सुरस।
अनसूया पाहूनी देवांस। म्हणे सतीस तेधवां ॥ १ ॥
हे देव आले तव सदनीं। सूर्योदय व्हावा म्हणोनी।
हेंच मागती विनवूनी। मीही मनीं तेंचि आणीं ॥२॥
सूर्य न दिसतां कालोच्छेद। कालोच्छेदें कर्मोच्छेद।
कर्मोच्छेदें लोकोच्छेद। होई स्वच्छंद सत्वर ॥ ३ ॥
तेव्हां साध्वी किमर्थ। करावा असा हा अनर्थ।
आग्रह करूं नको व्यर्थ। गेलिया परार्थ देहही ॥ ४ ॥
सती म्हणे अनसूये ऐक। काय सांगसी हा विवेक।
जेणें मजला घडेल शोक। महादुःख ओढवेल ॥ ५ ॥
मांडव्यशाप दारुण। पती केवळ माझा प्राण।
सूर्योदयें पावेल मरण। हें तों कठिण नेणसी कीं ॥६॥
अनसूया म्हणे गे सती। जरी मरे तुझा पती।
तत्क्षणीं वांचवीन सुमती। नको खंती करूं त्याची ७
तुझा पति निःशंक। निरोगी होऊनी उठेल ऐक।
मनीं आणूं नको दुःख। देतें भाक त्रिवाचे ॥ ८ ॥
असें अनसूयेचें वचन। तिनें तें अंगिकारून।
तथास्तु ऐसें म्हणून। केलें नमन आदित्या ॥ ९ ॥
जय सूर्या तूं तेजोराशी। समर्थ असोनी मर्यादेशीं।
न टाळसी तूं पाळसी। मद्वाक्यासी विश्वकर्त्या ॥१०॥

माझें वाक्य म्यां घेतलें परत। त्वां शीघ्र व्हावें उदित।
असें तिणें वदतां त्वरित। आदित्य उदित जाहला ११
जिच्या वचनें झाला लीन। तिच्या वचनें तोचि तपन।
तत्काळ उदया पावोन। हें त्रिभुवन सुखी करी॥१२॥
चिरकाळ प्रवास करून। निजपती येतां देखोन।
करी वदन सुप्रसन्न। कमाळिणी प्रसन्न तेंवी हो ती॥१३॥
सूर्य उदित होवोन। तत्काळ करी कृत्यें दोन।
निःशेष अंधकारहरण। विप्रप्राणशोषणाहि ॥ १४ ॥
सतीचें म्लान मुख देखून। अनसूया वदे प्रौढ वचन।
नको भिवूं हो सावधान। माझें वचन आठवोनी १५
जरी मी अनन्य भक्तीनें। देह झिजविला पतिसेवेनें।
जरी काया वाचा मनें। धर्मानें सेविला निजपती १६
पतीहूनी परदैवत। दुसरें स्वप्नींही नेणत।
साध्वीधर्म संतत। जरी यथार्थ घडला ॥ १७ ॥
त्या धर्माच्या लेशेंकरून। ब्राह्मणा मिळो पुनः जीवन।
निरोगपणें उठोन। वांचो हा शत वर्षें ॥ १८ ॥
कोठेंही ह्याचें मन। गेलें असेल निघोन।
त्याचें होवो आवर्तन। देई जीवन असुनी ते ॥ १९ ॥
ऐसें बोलतां अनसूया। विप्र सजीव होवोनियां।
बैसला स्वयें उठोनियां। त्याची भार्या हर्षली ॥२०॥
बाह्यांतर्भाव पालटला। विप्र तो देवसा भासला।
आनंद झाला सर्वांला। पुष्पें वर्षती सुरवर ॥ २१ ॥

सर्व देव वंदन करिती। अप्सरा हर्षें नाचती।
गंधर्व तेही प्रेमें गाती। करिती ख्याती अनसूयेची ॥
जयजय सतीवर्ये वेदगेयेऽत्रिभार्ये। जय निजवृषवीर्ये
भर्तृसेवासुचर्ये। जयजय कृतकार्ये दर्शितत्रस्तसूर्ये।
सततनिहतधैर्ये ते नमो मातरार्ये ॥ २३ ॥
देव म्हणती अनसूयेसी। त्वां वांचविलें विश्वासी।
केलें अघटित कार्यासी। यश आम्हांसी समर्पिलें २४
आम्ही झालों प्रसन्न। तुला देतों वरदान।
अनसूया वदे वंदून। काय मागोन घेऊं मी ॥ २५ ॥
स्वधर्में मी कृतार्थ आतां। जरी तुम्ही वर देतां।
तरी हेंचि मागतें आतां। यावत् जीव असो पतीयोग॥
ब्रह्मा विष्णु त्रिनेत्र। हे व्हावे माझे पुत्र।
याहूनि न इच्छीं इह परत्र। न जाई अन्यत्र मन माझें॥
देव म्हणती हे दिले वर। पुत्र होतील विधिहरिहर।
करितील जगाचा उद्धार। धरी निर्धार अनसूये ॥२८॥
ऐसा देव वर देती। आज्ञा घेवोनी स्वर्गा जाती।
अत्रीसवें अनसूया सती। आश्रमाप्रती पावली ॥२९॥
त्या रायें मांडव्या जाणोनी। उतरला सुळावरोनी।
प्रार्थिला शांतवचनीं। तो यमसदनीं पातला ॥३०॥
यमाप्रती येवोनी तो। म्हणे दिक्पालांशें राजा होतों।
राजा जो दंड करितो। करितो दंड दिक्पाल ॥ ३१ ॥
त्वां कां मातें सुळावर। चढविलें बोल सत्वर।
यम बोले तूं असतां कुमार। कंटकें पक्षी वेधिला ३२

त्या पापाचा परिपाक । शूलारोहण निःशंक ।
येरू बोले हा अविवेक । लागे पातक पितयातें ॥३३॥
धर्मा तुझा हा अधर्म । दासीपोटीं घेसी जन्म ।
मग विदुर झाला यम । तेव्हां अर्यमे दंड धरी ॥३४॥
असो आतां ऐक शिष्या । त्रिमूर्ती देववरा मानुनियां।
अनसूयेच्या उदरीं येवोनियां । गर्भरूपें वाढती ॥३५॥
ज्यांच्या स्मरणें तुटे फांस । त्यासी कैंचा गर्भवास ।
अज असोनी दाविती खास । भक्ताधीनत्व या लोकीं ॥
अनसूये डोहळे होती । उत्तम ज्ञान बोले ती ।
ऐसे नवमास लोटती । करी संस्कार अत्रीमुनी ॥३७॥
मार्गशीर्ष पौर्णिमेसी । बुधवारीं प्रदोषसमयासी ।
मृग नक्षत्रीं शुभ दिवशीं । अनसूयेसी पुत्र झाले ३८
तव अत्रिऋषी येऊन । पाहीन म्हणे पुत्रवदन ।
तों अकस्मात् त्रिमूर्ती पाहून । विस्मित मन जाहला ३९
माला कमंडलु अधःकरीं । डमरू त्रिशूल मध्यकरीं ।
शंखचक्र ऊर्ध्वकरीं धरी । भक्तकैवारी त्रिमूर्त्यात्मक४०
काषायवस्त्र परिधान । विभूतीचें लेपन ।
मस्तकीं जटामंडन । वात्सल्यरसायन धाम जें ॥४१॥
तें दिव्यरूप पाहून । करसंपुट जोडून ।
अनसूया अत्रि वंदून । करिती स्तवन सद्गद ॥ ४२ ॥
जयजया परात्परा । अजा अव्यया निर्विकारा ।
जगत्कारणा जगदाधारा । सत्या असंगा उदासीना॥

१ पितृलोकाधिपति.

सावकाश ज्याच्या पोटीं । परिभ्रमती ब्रह्मांडकोटी ।
तो तूं व्यापक आमुचे पोटीं । ऐसी हे खोटी गोष्ट होय॥
सृष्टीपूर्वीं तूं एक सत्य। स्थितिकालींही न होसी असत्य।
प्रळयीं निर्बाधत्वें सत्य । त्वद्वचन असत्य होय कीं४५
निज बिरुदावळी पाळिसी । वासनावन जाळिसी ।
भक्तजनां संभाळिसी । आळसी न होसी भक्तकार्जीं॥
स्वयें असोनी स्वतंत्र। भावाच्या भुकेनें होसी परतंत्र।
कोण जाणे तुझा मंत्र । भ्रमाविसी यंत्रबद्ध विश्व॥४७॥
ह्या रूपा आमुचा नंदन । म्हणणें हें जगीं विडंबन ।
म्हणूनि तूं बाल होऊन । राहतां मन हर्षेल ॥ ४८ ॥
पुत्रभावेंकरून । तुझें करितां लालन पालन ।
जाईल आमुचें मायावरण । म्हणोनी चरण धरियेले ॥
मग बोले वनमाळी । तुम्हीं तप केलें कुलाचळीं[1] ।
तीन स्वरूपीं त्या वेळीं । तुम्हां दर्शन दीधलें ॥ ५० ॥
एकाचें करितां ध्यान । तुम्ही आलेंत कोण तीन ।
ऐसें तुम्हीं पुसतां दिलें वचन ।आम्ही तीन एकरूप ५१
पुढें अतिथी होऊन । जसें मागितलें भिक्षादान ।
तसेंच देतां नग्न होवून। अनसूयेपुढें तीन बाळ झालों॥
आमच्या शक्त्या येऊन । आम्हां मागती प्रार्थना करून ।
तेव्हां हा पाळणा न व्हावा शून्य। म्हणोनि वरदान मागितलें ॥ ५३ ॥

१ हिमाचलावरील एक प्रदेश—ऋक्षपर्वत.

तसाच वर देऊन । शक्तींसह केलें गमन ।
निजभक्त देवगण । त्यांहीं वरदान तुम्हां दिलें ॥५४॥
तें सर्व सत्य करावया । पूर्व वरा स्मरावया ।
लोकीं भक्तिख्याती व्हावया।प्रगट केलें ह्या दिव्यरूपा॥
तुमचा भाव पाहोन । तुम्हां दिलें म्यां माझें दान ।
राहीन तुमच्या स्वाधीन । देतों वचन त्रिवार ॥५६॥
माझें दर्शन न हो निष्फळ । जें गती दे तत्काळ ।
असें म्हणोनि तीन बाळ । झाला घननीळ
विश्वनाटकी ॥ ५७ ॥
मग आत्रि करी स्नान । करी जातकर्मविधान ।
मिळोनियां मुनिजन । जयजयकार करिती ॥ ५८ ॥
पुष्पें वर्षती सुरवर । वारा चाले मनोहर ।
जगीं आनंद होय थोर । परात्पर अवतरतां ॥ ५९ ॥
वांझ वृक्ष झाले सफळ । वंध्येपोटीं आलें बाळ ।
पळोनि गेला दुष्काळ । अवतरतां मूळ पुरुष हा ६०
अनसूया धन्य पतिव्रता। विधिहरिहरांची झाली माता।
जिचें स्तनपान करितां । ये तृप्तता त्रिमूर्तीला ॥६१॥
बारावे दिनीं अत्रिमुनीं । नामकर्म करोनी ।
अन्वर्थक नामें तिन्ही । तयांचीं ठेविलीं प्रेमानें ॥६२॥
ज्यानें केलें स्वात्मदान । त्याचें दत्त हें अभिधान ।
सर्वां देई आल्हादन । म्हणोनि चंद्राभिधान ब्रह्मांशा
दुर्वासा नाम रुद्रांशा दे । मग अनसूया आनंदें ।
पाळणा बांधूनी स्वच्छंदें । बाळा निजवूनी गातसे६४

(पाळणा) ॥ जो जो जो जो रे परात्परा ॥ भजकांच्या
माहेरा ॥ ध्रु० ॥
सह्याद्रीवरि जो । अत्रिसुत । अनसूया जठरांत ।
प्रगटुनि विख्यात । हो दत्त ॥ तारिल जो निजभक्त ।
जय जगदुद्धारा । उदारा ॥ भजकांच्या माहेरा ॥
जोजो जोजोरे ॥ ६५ ॥
प्रल्हादा देशी । विज्ञान । येतां अर्जुन शरण ।
सिद्धी देऊन । उद्धरून । स्वपदीं देशी स्थान ॥
अलर्क यदुतारा । योगिवरा । भजकांच्या माहेरा ॥
जोजो जोजोरे ॥ २ ॥ ६६ ॥
(पाळणा ॥ २ ॥) जोजो रे जोजो जयविश्वात्मन् ।
परावर भूमन् । जयजय जय भगवन् ॥ ध्रु० ॥
चारभूत खाणी । पाळणा बांधोनी । चोवीस तत्वें ।
दृढतर ओंवोनी ॥ ६७ ॥
गुणसूत्रें माया । स्तंभीं बांधुनीयां ।
कर्मदोरी धरूनी । झोंके घेसी वायां ॥ ६८ ॥
चाळाचाळी टाकुनी । श्रुतिगीत ऐकूनी ।
घे झोंप उन्मनी । स्वानुभवें करूनी ॥ ६९ ॥
(पाळणा संपूर्ण) ॥ जे सृष्टिस्थिति संहार करितीं ।
तयास पाळण्यांत निजवी सती ।
स्वकरें पुनः पुनः झोंके देती । काय गती भक्तीची हो॥
जे त्रैलोक्याचे पालक । त्यांला लागली भूक ।
अनसूयेपुढें करती शोक । भावाची भूक असी असे॥

दोघां लावी दोन स्तनीं । तिसरा रडे आक्रंदोनी ।
तया कृपादृष्ट्यमृतपानीं । थोरवी साजणी अनसूया ॥
यज्ञ याग जयाला । अद्यापि न देती तृप्तीला ।
सती स्तनपानें तयाला । ढेंकर आला तृप्तीचा ॥ ७३ ॥
ऐहिक जे भोग मिळती । तीं भक्तीचीं फळें न होती ।
जी मिळे सायुज्य गती । अवांतर स्थिति ती केवळ ॥
निःसीम प्रेम म्हणों भक्तींचें फळ । तरी लालना-
दिकांचें काय फळ ।
म्हणों जरी उद्धरील पितृकुळ । हेंही निष्फळ बोलणें ॥
स्वयें पिता पितामह झाले बाळ । तेथें कैचें पूर्वजकुळ ।
तरी हा केवळ विशाळ । ज्याचा खेळ तो जाणो ॥७६॥
चंद्र तो करोनि वंदन । चंद्रमंडळीं राहिला जावून ।
ओषधींला देई जीवन । वाढलें संतान तेथें ज्याचें ॥७७॥
दुर्वासाही उद्धत । स्वच्छंदें जगीं धुंडत ।
जे असती दुर्वृत्त । करी सद्वृत्त तयांतें ॥ ७८ ॥
निघोन जातां दोघे सुत । दुःखी झालें अनसूयेचें चित्त ।
तेव्हां पुढें येऊनी श्रीदत्त । पूर्व वृत्तांत्त स्मरें म्हणे ॥७९॥
मग स्मरतां वृत्तांत । तव त्रिमूर्ति दिसे दत्त ।
सर्वोचि विश्वरूप दिसत । झाली चकित अनसूया ॥८०॥
सर्वांचि बाळ होऊन । योगमाया पसरून ।
तीतें मोहित करून । अंकीं बैसोनी स्तन्य पिये ॥८१॥
आप्तकामही[1] असून । योगमाया पसरून ।
बालभाव धरून । करी क्रीडन कौतुकें ॥ ८२ ॥

१ निष्काम.

बोलोनि बोबडे बोल । मुग्ध चेष्टा करी केवळ ।
मुक्या करी जो वाचाळ । त्याचा खेळ काय हा ॥८३॥
जो वागवी पांगुळा । तो अडखळे वेळोवेळां ।
विश्वाधार तो अनसूयेच्या गळां। मिठी घाली लवलाहें॥
ज्या ज्या बाळलीला सकळ । दावी मातेसी करून खेळ।
जमवूनी मुनींचे बाळ । स्वयें खेळे त्यांसवें ॥ ८५ ॥
अनसूया बोलावी भोजनार्थ । न ये गुंतूनी क्रीडार्थ ।
माता धरावया येत । धुडुधुडु धांवत जातसे ॥ ८६ ॥
माता पाठी लागतां । योग्यां अगम्य तो न ये हाता ।
तिची देखोनी श्रांतता । तिच्या हातीं येई स्वयें ॥८७॥
ब्रह्मांडें ज्याचे उदरीं । त्याला धरी कमरेवरी ।
न्हाणूनि बैसवितां मंदिरीं। मृत्तिका शरीरीं माखी दत्त॥
दाखवूनि नाना लीला । हर्ष देई मातापितरांला ।
भक्तवशता दावी जगताला । जो एकला असंग॥८९॥
आठ वर्षें होतां व्रतबंध। अत्रि करी विद्याबोध ।
शास्त्रयोनि जो निर्बाध । लीला अगाध तयाची॥९०॥
कौपीनादिक टाकून । स्मशानीं जावूनि बैसे नग्न ।
नासाग्रदृष्टि ध्याननिमग्न । यत्पदसंलग्न होती योगी९१
पिंगल नाग आणि साध्यदेव । रूप पाहतां अपूर्व ।
प्रश्न करिती सगर्व । पाहूनी खर्वमूर्ती[1] ते ॥ ९२ ॥
त्यांतें सदुपदेश करून । दिधलें योगपूर्वक ज्ञान ।
त्या दिवसापासून । प्रसिद्धि झाली श्रीदत्ताची ॥९३॥

---

१ वामनमूर्ति.

दुष्टशिक्षक शिष्टपाळक। योगमार्गप्रवर्तक।
जाणूनि येती मुनीबाळक। विश्वचालक काय करी ॥
तत्परीक्षार्थ त्या वेळीं। श्रीदत्त बुडे अगाध जळीं।
भिवूनि पळती त्या काळीं। कित्येक मंडळी सत्वर ॥
तो मानूनि खेळ। तेथें राहिले कित्येक बाळ।
त्यांची परीक्षा करावया केवळ। भलता खेळ आरंभी॥
एक नग्न स्त्री घेऊन। श्रीदत्त तीरीं येवून।
स्वयें नग्न होवून। क्रीडा करूनि राहिला ॥ ९७ ॥
स्वाश्रया जी स्वविषया। नारी झाली ती आदिमाया
ती अंकीं बैसोनियां। वाद्यें वाजवोनियां गातसे ९८
तीतें करवोनियां पान। शक्तीचें उच्छिष्ट घेई आपण।
तिला देई वीर चर्वण। बाळ पाहोनी पळाले ॥ ९९ ॥
तेजीयसां नाहीं दोष। ह्मणोनि राहिले जे शेष।
त्यावरी करूनि तोष। योग सविशेष सांगितला१००
ईश्वर करी साहस। धर्मव्यतिक्रम ज्यास।
तेजीयस्त्वामुळें नाहीं दोष। अग्नि निर्दोष ज्यापरी१०१
ऐश्वर सामर्थ्य नसोन। मूढ एवढा घेई गुण।
तो नष्ट होई न लागतां क्षण। कर्म दारुण गती दे॥२॥
धर्मातीत वागे हर। तो गुण घेती पामर।
काळकूट जिरवी शंकर। मरे पामर त्या शिवतां॥३॥
ईश आणि गुणातीत। धर्माधर्मविवर्जित।
श्रुतीमस्तकीं राहतात। ते वायुवत् निर्दोषी। ॥ ४ ॥

त्यांचीं आचरणें प्रायः न घ्यावीं।वचनें मात्र न टाळावीं।
दोन्हीशीं योग्य तीं पाळावीं । सांभाळावीं धर्मांहें॥५॥
त्यांचीं सुचरितें घ्यावीं । असी बोले श्रुति बरवी ।
त्याचे सरीस ये न रवी । नर वीर्यहीन कायसा ॥ ६ ॥
काय सारिखा दिसला तरी । ज्ञानी अज्ञानी यांची न हो सरी ।
हें जाणिजे सूज्ञ चतुरीं । कुतर्क करी तो मूर्ख ।' ७ ॥
असो असें बीभत्सही पाहून । सर्व कष्ट सोसून ।
टिकला कार्तवीर्य अर्जुन । योगज्ञान लाभला ॥१०८॥
इति श्रीदत्तमाहात्म्ये श्रीदत्तावतारकथनं नाम तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

---

# अध्याय चवथा

## श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

कृतयुगीं सोमवंशांत । हैहयकुळीं विख्यात ।
जाह्ला कृतवीर्य जितारिहित[1] । धर्मरत सार्वभौम ॥१॥
त्याला शतपुत्र झाले । च्यवनशापें ते मेले ।
राजाला तें दुःख झालें । राज्य सोडिलें शोकानें ॥२॥
तों एके दिनीं अकस्मात । गुरु येऊनी भेटत ।
राजा पडे दंडवत । खिन्न चित्त होवोनी ॥ ३ ॥
राजा ह्मणे हाय हाय । अपुत्र मी करूं काय ।
दैवें देखिले हे पाय । माझा अपाय दुरावेल ॥ ४ ॥
गुरु ह्मणे धरीं धैर्य । तुज सांगतों उपाय ।
जेणें घडेल श्रेय । तुझा अन्वय[2] वाढेल ॥ ५ ॥
असे एक रविव्रत । सर्व पापा करील शांत ।
देईल सुख अत्यंत । उत्तम सुत देतें जें ॥ ६ ॥
हो कां जातिवंध्या नारी । मृतवंध्या होई जरी ।
ती हें व्रत करी तरी । होईल निर्धारीं सुपुत्र ॥ ७ ॥
जीचा गर्भ स्रवेल । किंवा पोटीं धरील सल ।
नवमासांपूर्वीं पडेल । मरोनी उपजेल बालक ॥ ८ ॥
उपजतांची शून्य पडेल । किंवा सटवी शिवेल ।
किंवा बाळपणीं मरेल । जड होईल सर्वथा ॥ ९ ॥

---

१ शत्रु जिंकणारा. २ वंश.

होई ग्रहभूतरोगार्त । किंवा आकस्मित प्राणांत ।
ऐसे हे दोष समस्त । हें व्रत निवारील ॥ १० ॥
सप्तमी रविवार दिनीं । पंचांगशुद्धी पाहोनी ।
चंद्र अनुकूल जाणोनी । व्रतारंभ करावा ॥ ११ ॥
व्रतसंकल्प करून । करावें पुण्याहवाचन ।
नांदीश्राद्ध करून । आचार्यवरण करावें ॥ १२ ॥
आचार्यें गृहशुद्धी करून । करावें अग्निस्थापन ।
विधीनें कलश मांडून । त्यावरी देवता स्थापाव्या १३
सूर्य रुद्र सप्त मातृका । ह्यांच्या स्वर्णप्रतिमा देखा ।
पूजोनी तदुत्तरभागीं ऐका । शांत्यर्थ ठेवा सात कलश
ते विधीनें पूजोन । शांतिसूक्त जपून ।
करोनियां अन्वाधान । करावें हवन विधीनें ॥ १५ ॥
समित्तिल यव पायस । अष्टोत्तरशत प्रत्येकास ।
आहुती द्याव्या होमशेष । बलीदानादि करावें ॥१६॥
पूर्णाहुती करूनी । जीवत्प्रजा सुवासिनी ।
त्यांकरवीं कलशोदकांनीं । अभिषेक करवावा ॥ १७ ॥
दीर्घायु होवो ह्यांचा बाळ । सूर्यादि ग्रहमंडळ ।
त्रिमूर्ती लोकपाळ सकळ । सर्वथा बाळ रक्षोत ॥१८॥
सर्वही रक्षोत अनुदिनीं । बालग्रह भूत अग्नि शनी ।
न पीडोत निशिदिनीं । असें चिंतुनी अभिषेकावें १९
स्नान करोनी वस्त्रें तीं । द्यावीं आचार्यांचे हातीं ।
सुवासिनी ब्राह्मणाप्रती । यथाशक्ती दक्षिणा द्यावी२०

आचार्या द्यावें गोप्रदान । तिलपात्रीं काळमूर्ती पूजोन ।
ती ब्राह्मणा देवोन । ब्राह्मणभोजन करावें ॥ २१ ॥
यथेष्ट वाढावें पायसान्न । दक्षिणा तयां देवून ।
घ्यावें आशीर्वचन । अरिष्टनिरसन होईल ॥ २२ ॥
दीर्घायु होवो बालक । शंभर वर्षें भोगो सुख ।
जें याचें दुरितदुःख । तें वडवामुखांत पडो ॥ २३ ॥
ब्रह्मा हरिहर षडानन । इंद्र वायु हुताशन ।
करोत अरिष्टनिरसन । विप्रें आशीर्वचन असें द्यावें २४
करावें कर्म ईश्वरार्पण । करावें कुटुंबासह भोजन ।
सूर्यप्रसादें अरिष्टनिरसन । होवोनी संतान वाढेल २५
असें ऐकोनी गुरुवचन । राजा गुरूस पुजून ।
भक्तिभावेंकरून । व्रताचरण करिता झाला ॥ २६ ॥
मैत्रेयी एके दिनीं । स्वच्छंदें आली राजसदनीं ।
राणी लागे तिचे चरणीं । निवेदून दुःख आपुलें ॥२७॥
मैत्रेयी म्हणे अनंतव्रत । करी तेणें होईल सुत ।
भूमंडळीं प्रख्यात । गुणवंत समरधीर ॥ २८ ॥
मार्गशीर्ष पौर्णिमेसी । आरंभावें व्रतासी ।
एक वर्ष नियमेंसी । प्रति पूर्णिमेसी पूजिजे ॥ २९ ॥
पूर्वी करोनी स्वस्तिवाचन । विधिवत् व्रत आरंभोन ।
प्रदोषीं पूर्णिमेसी पूजन । कीजे हविष्यान्न वर्षभर ३०
कामपूरक भगवान् अनंत । हर्षें करितां हें महाव्रत ।
फळ दे सर्वेश्वर अनंत । देवो सुत भद्र दे जो ॥ ३१ ॥

असें करावें पूजन । वर्ष होतां संपूर्ण ।
उद्यापन करून । गोप्रदान विप्रा द्यावें ॥ ३२ ॥
बारा उदकुंभ देवून । कीजे शक्त्या विप्रभोजन ।
एवं करितां आचरण । पाप शमन होईल ॥ ३३ ॥
लोकोत्तर गुणी पुत्र । चक्रवर्ती पवित्र ।
होईल मान्य सर्वत्र । यशस्वी अमित्रदमन दाता॥३४॥
ब्रह्मवादिनी मैत्रेयी । असें सांगोनी आज्ञा घेई ।
शीलधरा राज्ञी वंदी पायीं । ह्मणे आई लोभ ठेवीं३५
मैत्रेयीचें वचन । तें भूपा कळवोन ।
पतीच्या आज्ञें करून । व्रताचरण करितसे ॥ ३६ ॥
एक वर्ष हविष्यान्न । ब्रह्मचर्य भूमीं शयन ।
कामक्रोधादि वर्जून । धरी मौन शीलधरा ॥ ३७ ॥
तिला दत्ताची उपासना । व्रतीं ठेवी तीच भावना ।
सावरोनियां मना । व्रत संपूर्ण करी यत्नें ॥ ३८ ॥
व्रतें श्रीदत्त झाला प्रसन्न । स्वप्नीं निजरूप दाखवून ।
बोले सुहास्यवदन । साधु साधु म्हणोनियां ॥ ३९ ॥
अत्युत्कट धर्मफळ । राज्ञी मिळेल तत्काळ ।
तुला पुत्र होईल सबळ । सप्तद्वीपपाळक ॥ ४० ॥
जो अकुंठितगती । स्मरतां देईल भेटी ।
असें बोलोनी भक्तपती । गुप्त होती तत्क्षणीं ॥ ४१ ॥
राणी मग उठोन । तें स्वरूप स्मरून ।
अत्यंत हृष्ट होऊन । सांगे स्वप्न राजातें ॥ ४२ ॥

कृतवीर्य संतोषला । राणीचे पोटीं गर्भ राहिला ।
उत्तम डोहाळा लागला । रायें केला पूर्ण तो ॥ ४३ ॥
केले संस्कार यथाकाळीं । उच्चीं पांच ग्रह जे वेळीं ।
उदित असती ते वेळीं । निशीथकाळीं प्रसवली॥४४॥
दिशा झाल्या प्रसन्न । मंद वाहे पवन ।
अग्निज्वाला प्रदक्षिण । वाहती गगन स्वच्छ हो॥४५॥
ब्रह्मांडीं हर्ष झाला । देवीं दुंदुभिनाद केला ।
अप्सरा नाचती सलीला । गंधर्व गाती समरसें॥४६॥
पुष्पें वर्षती दिविज । बाळाचें फांकलें तेज ।
दीप झाले निस्तेज । वाटे लाज नक्षत्रां ॥ ४७ ॥
धर्मीं राहिलें जनाचें मन । सज्जन होती प्रसन्न ।
सिद्ध देती आशीर्वचन । आयुष्मान् हो म्हणोनी ४८
राजा बोलावी गणकां । करवी बाळाच्या जातका ।
धन धान्य वस्त्रादिकां । देई लोकां यथायोग्य॥ ४९ ॥
द्विजां दिधलें सुवर्ण । केलें अमित गोदान ।
ज्योतिषी साधूनी लग्न । बोलती वचन सुहर्षें ॥ ५० ॥
दैवशाली हा कुमार । श्रीदत्तात्रेय कृपापात्र ।
तपोबळें पवित्र । होईल सर्वत्र प्रख्यात ॥ ५१ ॥
याचें घेतां नाम । नष्ट वस्तूचा आगम ।
स्मरतां करील आगम । निगमागमप्रवीण हो ॥ ५२ ॥
सप्तद्वीप महीपती । होईल हा चक्रवर्ती ।
अनंत व्रतें निश्चिती । पंचाशिती सहस्त्र वर्षें ॥ ५३ ॥

सूर्यव्रतें रोगरहित। लक्षायु होय निश्चित।
जितेंद्रिय विजयी संतत। जो संमत सर्वांला ॥ ५४ ॥
ऐसें ऐकोन गणकवचन। राजा करी त्यांचें पूजन।
सोळावे दिवशीं अभिधान। ठेवी अर्जुन सुताचें ॥५५॥
यौवराज्या योग्य अर्जुन। हो तों पिता गेला मरून।
म्हणती पौर प्रधान। करीं राज्य अर्जुना ॥ ५६ ॥
अर्जुन म्हणे नको राज्य। मनापासोन केलें त्याज्य।
तें जरी हो का पूज्य। अंतीं प्राज्य कष्ट दे ॥ ५७ ॥
भूमीचा षष्ठांश। व्यापाराचा द्वादशांश।
घेवूनी जो प्रजेस। न पाळी प्रजेस न्यायानें ॥ ५८ ॥
चोरादिकांपासून। न करी प्रजासंरक्षण।
न हो हें राज्यलक्षण। नरक दारुण तया अंतीं ॥ ५९ ॥
असोनियां समर्थ। अधर्म न वारितां व्यर्थ।
सांठवी अन्यायें अर्थ। तो धूर्त नरकीं पडेल ॥ ६० ॥
जो नीति सोडूनी। क्रोधलोभ जोडूनी।
अदंड्यातें दंडूनी। दे सोडूनी दंड्यातें ॥ ६१ ॥
तुम्ही म्हणाल हें असें। कळे तरी त्वां वागावें तसें।
हें तों घडेल कसें। परविश्वासें राज्य करूनी ॥ ६२ ॥
जे भृत्य ठेवी भूप। ते करिती जें पाप।
चतुर्थांशें आपोआप। तें नृपमस्तकीं पडे ॥ ६३ ॥
एवं मी एकला। कसें जोडूं साधुफला।
मग ह्या राजाच्या बोला। ऐकोनि बोलला गर्गमुनी ६४

अर्जुना तूं धन्य होसी । हें यथार्थ बोलसी ।
जो दोहील भूधेनूसी । तेणें प्रजावत्सासीं पाळावें ६५
धरितां तीक्ष्ण दंडा । होईल प्रजेला पीडा ।
कीं धरितां मृदु दंडा । तया वेडा करितील ॥ ६६ ॥
जसा नातिशीतोष्ण । मनोहर वाटे पवन ।
युक्तदंड तसा जाण । प्रजारंजन करी भूप ॥ ६७ ॥
जरी पराव्याच्या विश्वासा । तूं न धरिसी सहसा ।
तरी तूं योगाभ्यासा । करी साध्वसा[1] वारील तो ६८
योगें नाना देह धरिसी । तूं एकला राज्य करिसी ।
मनोवेगें तूं फिरसी । सर्व जाणशील साक्षित्वें ॥६९॥
अनसूयागर्भरत्न । दत्तात्रेयाभिधान ।
सह्य पर्वतीं आसन । असें जाण ज्याचें ॥ ७० ॥
ज्याला म्हणती योगींद्र । यन्नामें सुके भवसमुद्र ।
नित्य जो विनिद्र । ध्याती वितंद्र मुनी ज्यातें ॥ ७१ ॥
निस्त्रैगुण्यमार्गें चाले । भक्ता रक्षी योगबळें ।
योगानंदें जो डुले । ज्या देखिलें समदर्शनीं ॥ ७२ ॥
महात्मा तो विश्वसाक्षी । सर्वां समान निरीक्षी ।
भजकांचा जो पक्षी । दुष्टां शिक्षी स्वयेंची ॥ ७३ ॥
तरी त्या नये विषमत्व । नये ज्याला निर्दयत्व ।
नित्य धरी समत्व । योगी सत्वबळानें ॥ ७४ ॥
माता बाळाचें लालन । किंवा करी ताडन ।

---

१ भय.

तिला निर्दय म्हणोन । दोष कोण ठेवील ॥ ७५ ॥
तसें संतांचें पालन । दुष्टां करितां शिक्षण ।
नियंत्या नसे दूषण । हें भूषण गुणदोषातीता ॥ ७६ ॥
जगद्धाता अत्रिनंदन । तपस्वी योग्यांचें ध्यान ।
जो भक्तां दे इष्टदान । त्याचें आराधन करीं तूं ॥७७॥
जंभ दैत्यें स्वर्गस्थान । हरिलें तेव्हां येऊन ।
इंद्रें केलें आराधन । त्याला स्थान पुनः दिलें ॥ ७८ ॥
अद्यापि इंद्र सेवा करी । देवासह नित्य दर्शन करी ।
म्हणोनी नाहीं त्याला सरी । सुखें राज्य करी स्वर्गाचें ७९
ज्याचें दुष्कर आराधन । दुर्मतीला वाटे कठिण ।
सुमतीला सुकर जाण । जो कारण आत्मभूत ॥ ८० ॥
देहाभिमानी बहिर्मुख । जे न सोडिती विषयसुख ।
न दिसे तयां भगवन्मुख । कैचें सुख मग तयां ॥ ८१ ॥
दुर्मतीला तो दूर । भक्तांसमीप निरंतर ।
व्यापक जो योगीश्वर । त्यापासून वर मिळवीं तूं ॥८२॥
ज्याचें नित्य गंगास्नान । माहूरीं करी शयन ।
सह्याद्रीवरी आसन । करी ध्यान गाणगापुरीं ॥ ८३ ॥
कुरुक्षेत्रीं आचमन । धोपेश्वरीं जाऊन ।
करी जो भस्मधारण । संध्यावंदन कऱ्हाडीं ॥ ८४ ॥
कोल्हापुरीं भिक्षाटन । पांचाळेश्वरीं जाऊन ।
नित्य करी भोजन । विचित्राचरण ज्याचें ॥ ८५ ॥
पंढरपुरीं जाऊन । नित्य सुगंध लेवून ।
पश्चिम सागरीं येऊन । करी अर्घ्यदान सायंकाळीं ८६

जो जो करील स्मरण । त्या त्या देई दर्शन ।
व्यापिलें जेणें त्रिभुवन । असो नमन तच्चरणा ॥ ८७ ॥
ज्याची लीला ऐकोन । तृप्त होती कान मन ।
त्याला कोण कां नमन । न करील जनमान्य जो ॥८८॥
जो मायाध्यक्ष होऊन । करी जग उत्पन्न ।
त्याचें करीं पालन । जो स्वयें उदासीन निगर्व ॥ ८९ ॥
ब्रह्मरूपें उत्पादक । विष्णुरूपें पालक ।
रुद्ररूपें संहारक । करी एक तो सर्व ॥ ९० ॥
तो भक्तीचा भुकेला । भक्ताधीन राहिला ।
अंतर न देतां भक्तांला । ग्वेळ भला करी तो ॥ ९१ ॥
योग क्षेम भजकाचें । वाहे हें बिरुद त्याचें ।
आगम गाजवी तयाचें । दर्शन करी अर्जुना ॥ ९२ ॥
भावें करितां सेवन । तो होईल प्रसन्न ।
ना तरी त्याचें मन । वळवील कोण कसें बा ॥ ९३ ॥
त्याणें देतां वरदान । एकला करशील तूं जाण ।
सप्तद्वीप पृथ्वी पालन । स्वेच्छाचरण होवोनी ॥ ९४ ॥
तो देईल तुला धृती । तो देईल नाना शक्ती ।
भावें करीं त्याची भक्ती । दे जो सन्मती मुक्तिदाता ॥
जें जें मनीं आणसी । योगप्रभावें तें मिळविसी ।
मानूनी माझ्या वचनासी । सेवीं दत्तासी सत्वर॥९६॥
ऐकोन गर्गाचें वचन । वेधलें तत्काळ मन ।
गर्गा करोनी नमन । प्रेमें अर्जुन बोलतसे ॥ ९७ ॥

धन्य धन्य तूं मुनी । श्रीदत्ताच्या स्मरणीं ।
योजिलें मजलागोनी । हा मी मानीं अनुग्रह ॥ ९८ ॥
सकाम हित दावूनी । माझी वृत्ती वळवोनी ।
लाविली श्रीदत्तभजनीं । झाला मनीं परम हर्ष ॥९९॥
धन्य धन्य अत्रिमुनी । धन्य अनुसया साजणी ।
परात्मा आणिला ज्याणीं । नामरूपा आश्चर्य हें ॥
असा जो आत्रिपुत्र । दत्तात्रेय पवित्र ।
ज्याणें घातलें योगसत्र । असे सर्वत्र जो ॥ १०१ ॥
ज्याची ऐकोनी दिनचर्या । मी पावलों आश्चर्या ।
तो कसा भेटला देववर्या । मुनिवर्या हें सांगावें ॥ २ ॥
देवेंद्रें जाऊन । कोठें केलें दर्शन ।
कसें केलें आराधन । वळविलें मन केवी त्याचें ॥ ३ ॥
त्याच्या राज्याचा जंभासुर । कसा करी अपहार ।
असुरांशीं कीं समर । अमरेंद्रा वर काय दिला ॥ ४ ॥
हें चरित्र अपूर्व । ऐकावें वाटे सर्व ।
कान पसरूनही शर्व । सोडोनी गर्व नायकेल कीं ॥५॥
मी असे श्रद्दधान । माझें करी समाधान ।
दत्तचरित्र पावन । ऐकवा कान भरोनी ॥ ६ ॥
मग मीही करीन । श्रीदत्ताचें सेवन ।
जेणें होय प्रसन्न । देईल वरदान श्रीदत्त ॥ ७ ॥
असें बोलतां अर्जुन । गर्ग पावे समाधान ।
बोले उत्तर वचन । चित्तीं चिंतोनि श्रीदत्त ॥ १०८ ॥
इति श्रीदत्तमाहात्म्ये चतुर्थोऽध्यायः ॥ ४ ॥
श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

*

# अध्याय पांचवा

॥ श्रीदत्त समर्थ ॥

गुरु ह्मणे शिष्या परीस। गर्ग सांगे अर्जुनास।
जंभ नामें दैत्य खास। भूतळीं वास जयाचा ॥ १ ॥
जिंकोनी नृपमंडळ। स्वाधीन केलें भूमंडळ।
तो अजय झाला सबळ। महाखळ दारुण ॥ २ ॥
आतां जिंकावें देवांसी। हिसकून घ्यावें स्वर्गासी।
ह्मणोनि एका भृत्यासी। देवांपासी पाठवी ॥ ३ ॥
देवीं न मानितां सत्वर। मिळवोनियां असुर।
स्वर्गीं आला जंभासुर। समरधीर शूर जो ॥ ४ ॥
मग देव जावोन। इंद्रा सांगती वर्तमान।
इंद्रें देवसेना घेऊन। दैत्यकंदन आरंभिलें ॥ ५ ॥
तो संग्राम दारुण। देव घेती दैत्यांचे प्राण।
दैत्या अंगीं नुरे त्राण। अंगीं बाण झोंबतां ॥ ६ ॥
दैत्य करती पलायन। जंभासुरें पाहून।
दैत्यां मागें वळवून। सरसावून ये पुढें।
पुढें होवोनी जंभासुर। देवां करी जर्जर।
नानाशस्त्रीं देतां मार। ते निर्जर घाबरले ॥ ८ ॥
न हाटे तो दनुज। थकले सर्व दिविज।
पळतां वाटे लाज। देवराज तें पाहे ॥ ९ ॥
ऐरावतारुढ होऊन। हातीं वज्र धरून।
इंद्र करी दैत्यमर्दन। दैत्य मरोनि जाती ते ॥ १० ॥

दैत्यांचे देह तोडी । वज्रें मस्तकें फोडी ।
वाहनावरोनी पाडी । मोडी हस्तपादादिक ॥ ११ ॥
करोनी वज्रप्रहार । मूर्च्छित केला जंभासुर ।
तथापि तो महाशूर । वेगें सत्वर ऊठला ॥ १२ ॥
केलें इंद्रा जर्जर । पळविले निर्जर ।
करोनी शब्द थोर । झाला असुर तो विजयी ॥ १३ ॥
सर्व दैत्य घेऊन । अमरावतींत जाऊन ।
इंद्रपदीं बसोन । इंद्र आपणा म्हणवी तो ॥ १४ ॥
देवां भूतळीं घालोन । दिक्पालांचे अधिकार घेऊन ।
त्रैलोक्य आपुलेंसें करून । भोगी आपण यज्ञभाग १५
जेथें देव असती । तेथें दैत्य जावोनी भिडती ।
देव मेरुगुहेंत लपती । अन्य गती नसे जयां ॥ १६ ॥
सर्व देव मिळोनी । गुरूपाशीं येवोनी ।
दुःख निवेदिती वंदूनी । दीन होवोनी दुःखातुर॥१७॥
गुरो आमुची ही स्थिती । पुढें आमुची काय गती ।
शत्रु आम्हां नावरती । खचली मती आमुची ॥ १८ ॥
गुरु म्हणे वासवा । कोणी न टाळी दैवा ।
जें जें होणार जेव्हां । तें तें तेव्हां होतसे ॥ १९ ॥
आतां तुम्हीं सत्वर । जावें सह्यगिरीवर ।
तेथें वसे देववर । आत्रिकुमार श्रीदत्त ॥ २० ॥
परमात्मा तपोधन । करी शरणागतरक्षण ।
तो करील कृपेक्षण । दुःखहरण शरण तो ॥ २१ ॥

जो मनीं धरी धीर। त्याला देईल तो वर।
तुम्ही चला सत्वर। सेवातत्पर होवूनी ॥ २२ ॥
तें गुरुवाक्य मानून। गुरुचरण वंदून।
दत्ताश्रमीं देवगण। येऊन भावें वंदिती ॥ २३ ॥
दिसे मूर्ती आजानुकर। सर्वावयवीं सुंदर।
अप्रतर्क्य मनोहर। दिगंबर विशालाक्ष ॥ २४ ॥
प्रफुल्लकमलमुख। रूप दिसे सुरेख।
कंबुकंठ त्रिरेख। पाहतां सुख अपार ॥ २५ ॥
नग्नयुवती मांडीवर। घेवोनियां वारंवार।
चुंबन घेई धरोनि कर। प्रेमभर आणोनि ॥ २६ ॥
स्वयें अनघ असोनी। अनघा नामें स्त्रियेलागूनी।
पाचारी जो मद्यपानीं। आसक्त होवोनी मत्त दिसे २७
असें त्याचें रूप पाहोन। देव दूरी राहून।
करिती साष्टांग नमन। न मन दे त्यांकडे श्रीदत्त २८
श्रीदत्त चालतां चालती। उभा होतां उभे राहती।
बैसतां बैसती। नमन करिती पुनः पुनः ॥ २९ ॥
असा बहुकाळ गेला। श्रीदत्तें प्रश्नही न केला।
खेद वाटे देवांला। धिक्कारिती आपणांतें ॥ ३० ॥
अहो आम्हां तपोबळ। नाहीं किंवा भावबळ।
म्हणोनी उपेक्षी केवळ। भक्तपाळ हा गोविंद ॥३१॥
आतां हाचि निर्धार। येथें टाकूं कलेवर।
जंव न मिळे अभयवर। परमेश्वराचा आम्हांशीं॥३२॥

असें म्हणोनि ते देव । न सोडिती तो ठाव ।
होतां त्यांचा दृढ भाव । दत्तदेव बोलतसे ॥ ३३ ॥
सोडूनियां स्वर्गस्थान । येथें कां केलें आगमन ।
कां वाळलें तुमचें वदन । कदन कोणी केलें कीं ॥३४॥
ऐसें वचन ऐकून । श्रीदत्ता करूनी नमन ।
बोलती होवोनि दीन । ते गीर्वाण दुःखित ॥ ३५ ॥
जगत्प्रभो देव देव । सर्वज्ञ तूं जाणसी सर्व ।
जंभनामा दानव । महावैभव मानला ॥ ३६ ॥
तेणें आराधुनी भर्ग । घेतला आमुचा स्वर्ग ।
तेथें वसवी दैत्यवर्ग । आमुचा मार्ग काय आतां॥३७॥
तेणें घेतले यज्ञभाग । तोच भोगी सर्व भोग ।
ज्यावरी शस्त्रप्रयोग । न चाले भंग नसे ज्याचा॥३८॥
तूं तरी परमेश्वर । आम्ही तुझे किंकर ।
शत्रूंचा करी संहार । आतां उशीर न लागावा॥३९॥
प्रळयीं हा ब्रह्मांडगोल । न लागतां एक पळ ।
जाळिसी एकला सकळ । कायसा वेळ दैत्यदळणीं ४०
आम्ही सर्व गताधिकार । करूं भूमीवरी संचार ।
होवोनी लाचार जसे नर । तूं कृपासागर तारक हो ॥
देवा आम्ही तुझे भक्त । तूंच आमुची गती व्यक्त ।
आतां त्वत्पदीं झालों सक्त । दुःखमुक्त करी आतां४२
श्रीदत्त बोले हंसोन । स्त्रीचें उच्छिष्ट खाऊन ।
भ्रष्ट झालों मी पीवून । पानशेष दूषित मी ॥ ४३ ॥

मद्यासक्त मी न वशी । माझी स्थिती झाली अशी ।
व्यर्थ तुम्ही मजपासीं । आलेत शीघ्र चला परत ॥४४॥
स्त्रीसंयोगें ये पतन । स्त्रीसंभोगें दुःख दारुण ।
दैवें स्त्रीचें उच्छिष्टपान । करोनि भ्रष्ट झालों मी ॥४५॥
आतां पुढें काय गती । हेंही येतसे चित्तीं ।
धर्माधर्माची नसे खंती । पापपुण्यगणती मग कैंची४६
असें श्रीदत्ताचें वचन । ऐकोनियां देवगण ।
गुरुवचन स्मरून । नमन करूनी बोलती ॥ ४७ ॥
भगवन् हें तव यथार्थ । जे मायारचित पदार्थ ।
ते व्यापिले हा उच्छिष्टाचा अर्थ । भ्रष्ट पदार्थ जीवत्व॥
मद्य हे मोह प्रमाद । ह्याचा जीव घे स्वाद ।
तूं ईश्वर स्वच्छंद । भेदपरिच्छेद तुज नाहीं ॥ ४९ ॥
तूं अनघ असती । अनघा हे असे तसी ।
तव शक्ती निश्चयेंसी । विद्या तुजसी अभिन्न हे॥५०॥
सूर्याची प्रभा जशी । विप्र आणि चांडाळ यांसी ।
स्पर्शितां पुण्य पापाशीं । न घे तशी तव शक्ती॥५१॥
तुझा होतां अनुग्रह । कोण करील निग्रह ।
अज्ञार्थ हा धर्मसंग्रह । सुज्ञ आग्रह धरील कीं ॥५२॥
श्रीदत्त वदे हें जरी । निश्चित केलें अंतरीं ।
दुःख जाईल दुरी । मिळेल बरी गती सत्य ॥ ५३ ॥
आतां तुम्ही शीघ्र चला । युद्ध करूनी शत्रूला ।
येथें आणा तयाला । निर्वीर्य करीन क्षणार्धें ॥ ५४ ॥

---

१ जितेंद्रिय.

असें वचन ऐकून। देव करिती वंदन।
शत्रूसमोर जाऊन। धैर्यें रण आरंभिलें ॥ ५५ ॥
दैत्य बळें मार देती। देव तेथून पळती।
दैत्य पाठीसी लागती। आश्रमा येती श्रीदत्ताच्या५६
मागें दैत्यही पातले। दत्ताश्रमीं प्रवेशले।
तेथें स्त्रीरत्न देखिलें। ते भुलले पाहून ॥ ५७ ॥
कनक आणि कांता। भ्रम करिती अवलोकितां।
जे न भुलती तयां तत्त्वतां। पूर्ण मुक्तता जाणावी ५८
जीचीं अंगें सुंदर। पद्मपत्रसम नेत्र।
प्रफुल्ल कमलसें दिसे वक्त्र। विचित्र गात्र मनोहर ५९
ओंठ बिंबासमान। हिरे भासती रदन।
स्वर्णकलशापरी स्तन। रूपमंडन न वर्णवे ॥ ६० ॥
अशी ती सुंदरी नारी। श्रीदत्ताच्या अंकावरी।
बैसली ती त्या असुरीं। पाहिली नेत्रीं मनोज्ञ[1] ॥ ६१ ॥
दैत्य मोहित होऊन। तिचा अभिलाष धरून।
देवां देती सोडून। होवोनी ते कामातुर ॥ ६२ ॥
न करितां प्रयत्न। आम्हां मिळालें स्त्रीरत्न।
निर्बळ हे सपत्न[2]। यांचा यत्न कायसा ॥ ६३ ॥
देव मागें येतील। तरी ते ठार मरतील।
असें बोलोनी दैत्य खल। शिबिका पुढें आणिती ६४॥
दत्ताच्या मांडीवरूनी। त्या नारीतें उचलोनी।
शिबिकेंत बसवूनी। मस्तकीं घेऊनी चालले ॥ ६५ ॥

---

१ मनोहर. २ वैरी.

देव तटस्थ पाहती । कांहीं बोलूं न शकती ।
दत्त बोले तयांप्रती । नेली सती दैत्यांनीं ॥ ६६ ॥
दोषांमाजी विशेष । परांगनास्पर्शदोष ।
जाळील कुळ निःशेष । एक निमेष न लागतां ॥ ६७ ॥
यांहीं केलें महापातक । यांला लागला कलंक ।
हतबळ हतश्रीक । उभयलोक भ्रष्ट झाले ॥ ६८ ॥
साक्षात् लक्ष्मी हे मच्छक्ती । दैत्यमस्तकीं बैसली ती ।
तोडोनि त्यांचीं शिरें सती । येईल मागुती सत्वर ६९॥
दैत्य झाले मृतोपम । करा यांसी संग्राम ।
तुमचा हे एक रोम । न तोडितील निश्चयें ॥ ७० ॥
आतां तुम्ही निमित्त मात्र । उठा देव हो सत्वर ।
कां लावतां उशिर । न धरा दर[1] हृदयांत ॥ ७१ ॥
ऐकोनियां असें वचन । देवीं विश्वास ठेऊन ।
हातीं शस्त्रें घेऊन । जाऊनि दैत्यां मारिती ॥ ७२ ॥
कोणी तोडिती पादाग्र । कोणी तोडिती शिर ।
कोणी तोडिती कर । पाठीवर मार देती ॥ ७३ ॥
क्रोधावेशें निर्जर । देती शस्त्रांचा मार ।
दैत्यां पाडिती भूमीवर । पूर्व वैर स्मरोनी ॥ ७४ ॥
केला परस्त्रीसंपर्क । तेंची थोर पातक ।
तेणें झाले निस्तेजस्क । महामूर्ख दैत्य ते ॥ ७५ ॥
जरी देव हाणिती । तरी वरी हात न करिती ।
गेली तयांची शक्ती । नाठवीती मंत्रासी ॥ ७६ ॥

---

१ भय.

श्रीच्या कृपेनें अमर । जय पावले सत्वर ।
मेले ते सर्व असुर । श्रीदत्तवरप्रभावें ॥ ७७ ॥
मग शक्ती येऊन । दत्ताअंकीं बैसून ।
प्रेमें घेई चुंबन । तंव सुरगण पातले ॥ ७८ ॥
येऊनी वंदिती चरण । दत्त वदे हो देवगण ।
तुम्ही करोनियां रण । दैत्यगण मारिले ॥ ७९ ॥
भयंकर जंभासुर । त्याशीं युद्ध केलें घोर ।
मारिले सर्व असुर । विजय थोर घेतला ॥ ८० ॥
उभारिला विजयध्वज । धन्य हो तुम्ही दिविज ।
माझी ही रक्षिली लाज । स्त्रीही आज सोडविली ८१
तुम्हीं केला उपकार । काय करूं प्रत्युपकार ।
माझे अंगींच तो निर्धार । जिरो अमर शूर हो ॥८२॥
ऐसें ऐकोनि वचन । चकित झाले देवगण ।
वंदूनी प्रभूचे चरण । गद्गद वचन बोलती ॥ ८३ ॥
नमो नमस्ते जनार्दन । बोलोनियां कूट वचन ।
मोहविसी आम्हां लागून । कार्य करूनी स्वयेंची ८४
जे दैत्य आम्हां बांधिती । ज्यांला कोणी न जिंकिती ।
ते मारविले आम्हां हातीं । आमची शक्ती हे नोहे
काष्ठाची बाहुली जेवी । सूत्रधार खेळवी ।
जयश्री आम्हां करवीं । घेवविली तेवी दयाळा ॥८६॥
आमुची कायसी मती । आमुची कायसी शक्ती ।
स्वल्पही नसतां भक्ती । केली मुक्ती आमुची ॥ ८७ ॥

तूं असती स्वतंत्र । आम्ही खास परतंत्र ।
बांधोनियां कर्मसूत्र । मायायंत्रीं भ्रमविसी ॥ ८८ ॥
तुझा नेणों अंत पार । तुला जोडूं दोनी कर ।
भूमीवर टाकूं शरीर । चरणीं शिर ठेवूं हें ॥ ८९ ॥
(श्लोक) । जय जय भयहारिन् भक्तचित्तानुसारिन् ।
सततविनततारिन् । मर्त्यकृत्यानुकारिन् ।
सदयहृदयचारिन् देवदेवाब्जधारिन् ।
अवितविनतहारिन् ते नमश्चित्तहारिन् ॥ ९० ॥
(ओवी) । ऐसा स्तवितां श्रीदत्त । होवोनियां प्रसन्नचित्त ।
म्हणे देवहो अप्रमत्त । होवोनी स्वर्गभोग घ्या ॥९१॥
मी तुम्हां झालों प्रसन्न । मागोनि घ्या वरदान ।
माझ्या भक्तां काय न्यून । मी आसन्न नित्य ज्यांसीं॥
देव म्हणती विनयेंसी । जरी आम्हां वर देशी ।
भक्ती द्यावी निश्चयेंसी । दिवा निशी प्रेमयुक्त ॥९३॥
मग तथास्तु म्हणे आत्रेय । देव वंदूनिया पाय ।
ज्यांचा टळला अपाय । कांहीं उपाय न करितां॥९४॥
चित्तीं दत्ता चिंतूनी । पुनः पुनः नमूनी ।
देव जाती स्वर्गभुवनीं । घेती जाऊनी स्वाधिकार ९५
अद्यापि देवांसह इंद्र । पावूनी आनंद सांद्र ।
नित्य दर्शना येती वितंद्र । भावें योगींद्रपदाच्या॥९६॥
गर्ग म्हणे रे अर्जुना । बरवी तुझी वासना ।
जाई दत्ताच्या दर्शना । तो कामना पुरवील ॥ ९७ ॥

---

१ रक्षित आहे शरणागत ज्यानें

होवोनियां निःसंशय । भावें धरितां त्याचे पाय ।
केवी घडेल अपाय । हा उपाय वेद सांगे ॥ ९८ ॥
ऐकोनि गर्गाचें वचन । द्रवलें अर्जुनाचें मन ।
भक्त्युत्कंठित होवून । बोले वचन गर्गाप्रती ॥ ९९ ॥
धन्य धन्य तूं मुनी । अससी कीं महाज्ञानी ।
भक्ती उपजविली माझे मनीं । दत्तचरणीं सादरें॥१००॥
मी करतों गमन । द्यावें मला वरदान ।
दत्ताचें घडावें दर्शन । हेंची मन चिंतीतसे ॥ १०१ ॥
गर्गें तथास्तु म्हणतां । तो अर्जुन धरी पंथा ।
एकला सह्याद्रीवरता । येता झाला सत्वर ॥ १०२ ॥
जेथें जळ वाहे मंजुळ । वाटे परम शीतळ ।
वायु राहे निश्चळ । गाती कोकिळ कोमल स्वरें॥१०३॥
जेथें घनदाटी वृक्षांची । नित्य वस्ती पक्ष्यांची ।
समृद्धी हो फलपुष्पांची । दुःखाची नच वार्ता ॥१०४॥
जेथें वैर सोडूनी । व्याघ्र धेनु मिळोनि ।
एकत्र खेळती त्या वनीं । आश्रम मुनीचा देखिला१०५
जेवी साजे नंदनवन । तेवी तें आश्रमस्थान ।
तेथें जाऊन अर्जुन । अत्रिनंदनपद देखे ॥ १०६ ॥
देखोनी पदचिन्हासी । उल्हास झाला रायासी ।
गुरु म्हणे दीपकासी । वर्णितां त्यासी नवल वाटे॥१०७॥

इति श्रीदत्तमाहात्म्ये पंचमोऽध्यायः ॥ ५ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

# अध्याय सहावा

## श्रीदत्तात्रेयाय नमः॥

गुरु म्हणे शिष्याप्रती। त्वां ऐकावें एकचित्तीं।
पुत्र सांगे पित्याप्रती। तेची उक्ती सांगतों ॥ १ ॥
सह्याद्रीवरी अर्जुन। जातां देखे पदचिन्ह।
वज्रांकुश ध्वज नलिन। शोभायमान उमटलें ॥ २ ॥
पाहतां साचिन्ह पाउलें। अर्जुनाचें मन दाटलें।
अंगीं रोमांच उठले। नेत्रीं सुटले प्रेमाश्रु ॥ ३ ॥
मन झालें निश्चळ। इंद्रियें न करिती खेळ।
बुद्धी झाली विमळ। राहिली केवळ चेष्टाहीन ॥ ४ ॥
अंतर्बाह्य नेणें कांहीं। मीतूंपण ठावें नाहीं।
पददर्शनाची गती ही। योग्यां नाहीं ठावी जी॥ ५ ॥
दैवयोगें ये देहावर। करी तया नमस्कार।
तेथें लोळे सादर। टाकी अंगावर ती माती ॥ ६ ॥
म्हणे अहो धन्य हे मही। जें पद अलभ्य देवांलाही।
तें अश्रांत सेवी ही। ऐसी नाहीं दुजी धन्या ॥ ७ ॥
रोमांचसे तृणांकुर। उभारून पाठीवर।
सुचवी हर्ष निर्भर। कृपापात्र हे भूमी ॥ ८ ॥
तंव देखिले वृक्ष फलित। शाखाग्रें नम्र होत।
म्हणे अर्जुन हे निश्चित। केवळ भागवत वाटती॥९॥
पूर्वी केला अपराध। ताठा धरोनी मदांध।
म्हणोनी हा तमोंध। वृक्षजन्म दीधला ॥ १० ॥

असें मनीं आणून। फळें पुढें करून।
शाखामस्तकें नमून। करिती वंदन भक्तीनें ॥ ११ ॥
हा पर्वत मनोरम। वाटे हा भागवतोत्तम।
नित्य सेवी हा सत्तम। पुरुषोत्तमचरणरजा ॥ १२ ॥
नित्य कंदमूल फळ। भगवंता दे स्वादुजळ।
हा भाविक प्रेमळ। भक्त केवळ वाटे हा ॥ १३ ॥
असें मनीं चिंतून। चाले पुढें अर्जुन।
चकोर चांदणें पाहून। आनंदघन होय जेवी ॥ १४ ॥
तेवी आश्रम पाहोनी। वेदध्वनी ऐकूनी।
पुढें अर्जुन येऊन। पाहे नयनीं भगवंता ॥ १५ ॥
कोटी कंदर्प गाळूनी। मूर्ती ओतिली वाटे मनीं।
मंद हास्य दिसे वदनीं। पाहतां मनीं हर्ष होय ॥१६॥
आजानुबाहु सुरेख। पहातां डोळां होय सुख।
दृष्टी चिकटे सविवेक। सेवी चोख रूपामृत. ॥ १७ ॥
प्रफुल्ल कमलवदन। वाटे घ्यावें चुंबन।
शरीर परम शोभन। वाटे आलिंगन दृढ घ्यावें ॥१८॥
दिसे दिगंबर मूर्ती। परम गोजिरी आकृती।
तेथोनि न फिरे मागें वृत्ती। जेवी गती योगियाची१९
मायेची करोनियां नारी। प्रेमें तिशीं क्रीडा करी।
तें देखोनी पळती दुरी। अविचारी मुनी जे ॥ २० ॥
गर्गवचन स्मरून। हा खेळ जाणून !
केवळ प्रेमळ अर्जुन। भाव धरोनी राहिला ॥ २१ ॥

दत्त म्हणे जा निघोन। नातरी करीन ताडन।
येरू तथास्तु म्हणून। श्रीचरण चुरूं लागे ॥ २२ ॥
अंकीं ठेवून चरण। भावें करी संवाहन।
जरी दत्त करी निर्भर्त्सन। तिकडे मन न देई ॥ २३ ॥
जसी कां सती नारी। कोपें पती मारी तरी।
सेवेसी न अंतरीं। न अंतरीं धरी तें ॥ २४ ॥
प्रभूचे पाय चुरतां। नखमाणिकें चमकतां।
हार्दतम[1] जाय अस्ता। स्वरूपीं लीनता सहज हो॥२५॥
सहज होतां सेवन। समूळ नासे अज्ञान।
ज्ञानें भगवत्प्रेमबंधन। हो तें तोडून कोण टाकी २६
टाकी पदीं लोटूनि दत्त। तरी शिष्य न सोडित।
जेवी लोहचुंबका धरित। तसा संसक्त होई राजा २७
करी पादसंवाहन। मद्य मांस दे आणून।
दे सुगंधस्रक्[2] चंदन। फळें आणून देतसे ॥ २८ ॥
निद्रा आळस सोडून। चरणीं मन लावून।
न सांगतां करी सेवन। उच्छिष्ट पानप्रसाद घे ॥२९॥
त्याचें जाणाया अंतर। कौतुक करी ईश्वर।
श्वाहु पाडी घरेवर। ईक्षण[3]मात्रेंकरून ॥ ३० ॥
हांसोनि बोले आपण। भूपा अरिष्ट हें दारुण।
पळत जा येथून। येईल मरण वाटतें ॥ ३१ ॥

---

१ हार्दतम = हृदयांतील अज्ञानांधकार. २ मांळा किंवा हार.
३ नेत्रकटाक्षानें.

अशुद्ध संगाचें हें फळ। मी असें अमंगळ।
कर्म बहिष्कृत केवळ। भक्ष्याभक्ष्यवर्जित ॥ ३२ ॥
मी उन्मत्त नग्न। नग्न स्त्रिये घेऊन।
क्रीडा तिसीं करून। राहें अनुदिनीं भूपाला ॥ ३३ ॥
माझा संसर्गदोष। तुज लागला विशेष।
तोचि करील प्राणशोष। निःशेष तुला झळकोन ३४॥
ऐसें ऐकोनि वचन। गर्गोपदेश स्मरून।
बोले नमस्कार करून। तो अर्जुन दत्तातें ॥ ३५ ॥
देवा व्यर्थ कां मोहविशी। समजलों मी मानसीं।
लोकानुसारें वदसी। लीला दाविसी तसाच ॥ ३६ ॥
तूं सर्वात्मा पुरुष। घेशी मायेनें हा वेश।
असोनियां निर्विशेष। सविशेष भाससी ॥ ३७ ॥
तूं अनघ निश्चळ। अनघा ही शक्ती केवळ।
आपुल्यावरी घेसी आळ। जगज्जाळ आधाराची ३८॥
हें जग उपजेल जरी। जगीं असशील तूं तरी।
हें तो मृगजळापरी। हें विकारी दृष्ट नष्ट ॥ ३९ ॥
तूं आणि विश्व चराचर। जो उभयांचें नेणे अंतर।
तो भेददर्शी पामर। तो शास्त्रें बद्ध होतो ॥ ४० ॥
नाहीं जयाहून शुद्ध। तो तूं स्वास अशुद्ध।
एवं यथार्थ जाणे जो बुद्ध। तो हो अशुद्ध त्वत्सम ४१
अज्ञां दिसे हा भेद। त्यां बांधी धर्मे वेद।
त्यांचे शिरीं विधिनिषेध। तूं तो निर्बाध सर्वथा ४२॥

देह जावो अथवा राहो । त्वद्रूपीं मन निश्चळ होवो ।
विपरीत भावना न राहो । हा निश्चय भगवंता ॥४३॥
ऐकूनी अर्जुनाचें वचन । श्रीदत्त प्रसन्न होऊन ।
धन्य रे तूं भूपनंदन । देतों वरदान माग आतां ॥४४॥
तूं भक्तीतत्व जाणसी । ह्मणोनि मज न सोडिसी ।
जिवलग तूं आवडसी । भक्त होसी निश्चळ ॥ ४५ ॥
जे माझे अनन्य भक्त । त्यांपाशीं राहें मी सतत ।
जे असती अभक्त । दुःखयुक्त ते होती ॥ ४६ ॥
तूं न धरितां देहस्वार्थ । सोडोनियां भोग्यार्थ ।
मत्सेवा केली यथार्थ । केलें सार्थक जन्माचें ॥ ४७ ॥
ऐसें बोलतां दत्त । राजा झाला पुलकांकित ।
निरिच्छ असून निश्चिंत । प्रारब्धप्रेरित वदे तो ॥४८॥
देवा जरी प्रसन्न होसी । देईं सर्व समृद्धीसी ।
यावें मला एकुलत्यासी । प्रजापालनसामर्थ्य ॥ ४९ ॥
अविरोधें धर्मार्थकाम । असावें यश निःसीम ।
स्यां व्हावें बलधाम । देवो मन्नाम नष्टलाभ ॥ ५० ॥
धर्मं प्रजापालन । व्हावें परचित्तज्ञान ।
स्मरती त्याला घडावें दर्शन । सर्वसिद्ध्यागमन असावें
सहस्र बाहू असावें इच्छितां । जय मिळावा सर्वथा ।
इच्छित स्थानीं जाण्याकरितां । अकुंठित गती असावी
सदा सर्वज्ञता असावी । स्वर्गीं पाताळीं गती व्हावी ।
कुमार्गीं प्रवृत्ती न व्हावी । सदा असावी सत्संगती५३

अतिथी पूज्य यावें घरीं। अक्षय द्रव्य असावें भांडारीं
अरी न रहावा भूमीवरी। व्हावें महीवरी साम्राज्य ॥
आयुष्य पूर्ण असावें। धारातीर्थीं मरावें।
भवत्तुल्यानें मारावें। तुमचें असावें नित्य स्मरण॥५५॥
भक्ती असावी भवच्चरणीं। सदोदित अव्यभिचारिणी
हेचि आवडी माझे मनीं। असें म्हणोनी नमस्कारी५६
प्रभु ह्मणे हे दिले वर। तूं होसी सप्तद्वीपेश्वर।
ऐसें बोलतां योगेश्वर। फुटले सुंदर दोन भुज॥ ५७॥
मग प्रेमें दाटून। दृढ घेई देवाचें आलिंगन।
आलिंगितां द्वैतभान। जाऊनी निश्चळ राहिला॥५८॥
ओळखोनी अंतःस्थिती। वरदान आणूनी चित्तीं।
त्यावरी माया सोडिती। पुनः उठविती तयातें॥५९॥
श्रीदत्त म्हणे तयासी। त्वां जावोनि माहिष्मतीसी[1]।
राज्याभिषेक आपणासी। करवी विधिसी मदाज्ञेनें६०
तथास्तु म्हणोन अर्जुन। भावें गमन करून।
म्हणे शिरसा मान्य वचन। विस्मरण न व्हावें तुमचें६१
माझें असावें स्मरण। आपले हे चरण।
हेंचि माझें जीवन। येथें प्रमाण मन तुमचें॥ ६२॥
जेवी बाळा सोडून। दुरावे जरी कुर्मीण।
त्याचें करितां स्मरण। तया जीवन येतसे॥ ६३॥

---

१ माळव्यांतील महेश्वर.

जीवन येतसे भक्तां । तुम्हीं मनीं आठवितां ।
जेवीं कुर्मिणीनें विसरतां । बाळें पंचता पावती॥६४॥
कूर्मिणीला येवो भ्रमप्रमाद । तुम्ही ईश्वर स्वच्छंद ।
तुम्हां न ठावा भ्रमप्रमाद । साक्षी वेद देतसे ॥ ६५ ॥
तुमचे आज्ञेकरून । जीवावरी आवरण ।
घाली माया दारुण । म्हणोनी भ्रमण पावती ॥ ६६ ॥
तीच माया तुम्हांपासीं । तिचें आवरण नये तुम्हांसी ।
लौकिक मायेसी[1] । उपमेय जी ॥ ६७ ॥
स्वाधीन स्वाश्रय माया । अन्या ठेवी मोहुनियां ।
ती नावरी स्वाश्रया । लोकत्रया ठावें हें ॥ ६८ ॥
जैसा पाळला कुतरा । छु म्हणतां धरी परा ।
धन्यावरी नये त्याच्या घरा । सेवी त्यावरी न भोके६९
जो होई तुझा भक्त । त्यापुढें माया हो अशक्त ।
मी तुझा भक्त व्यक्त । अव्यक्त माया काय करील७०
आम्हां मायेचें नाहीं भय । आम्हां पुढें काळ काय ।
दैवरेषेवरी पाय । देवूं हे पाय आठवितां ॥ ७१ ॥
देवा योगक्षेमाची वार्ता । सोडूनि देवूं सर्वथा ।
जेथें तेथें तुझ्या कथा । गाऊं माथा नम्र करूनी ॥ ७२ ॥
असो आतां हें मागणें । सर्वथा आम्हां न विसरणें ।
आम्हां वांचवावें स्मरणें । हें गाऱ्हाणें पुनः पुनः ॥७३॥

---

१ इंद्रजालादि.

असें म्हणोनी अर्जुन । चाले मागें पाहून ।
जेवीं सासुऱ्या जातां सून । पुनःपुनः फिरोनि मागें पाहे
स्मरण ठेवूनी अंतरीं । राजा आला रेवातीरीं ।
प्रवेशला माहिष्मतीपुरीं । येती सामोरी पौरमंत्री ७५
देव ऋषी आणि महर्षी । त्यांतें आणिलें संतोषीं ।
त्यांहीं मंत्रवाद्यघोषीं । अभिषेक केला विधीनें ॥७६ ॥
स्वर्णपवित्रयुक्त सुरेखा । औदुंबराची ओली शाखा ।
तिणें अभिषेकिती तीर्थोदका । नाना शाखामंत्रेंसी ७७
त्यांसी अभिषिक्त अर्जुन । देई क्षेत्र-गो-स्वर्ण ।
दीनांधकृपणा धन । देई अन्न यथेच्छ ॥ ७८ ॥
वसुरुद्रादित्य देव । आले मरुद्गण विश्वेदेव ।
त्यांहीं अभिषेकिला राव । महोत्सव तेव्हां झाला ७९
महाराज अर्जुन । सर्वांचें करी पूजन ।
ते देती आशीर्वचन । सुखी आयुष्मान् हो ह्मणुनी ८०
नाना राजे करभार । घेऊनि आले समोर ।
डांगोरा पिटे नृपवर । ते सर्व पौर ऐकतां ॥ ८१ ॥
माझ्या वांचोनी जो करीं । जरी कां शस्त्र धरी ।
किंवा जो हिंसा चौर्य करी । त्याला मारीन ठार मी॥
ऐसें ऐकोनी वचन । शस्त्रें देती टाकून ।
भयें पाळिती वचन । लीन होवोन सर्वदा ॥ ८३ ॥
तोचि झाला क्षेत्रपाळ । ग्रामपाळ पशुपाळ ।
सेना धान्य धनपाळ । विप्रपाळ तोचि झाला ॥ ८४॥
अग्नि चोर रिपु व्याळ । यांहीं प्रजा होता व्याकुळ ।

नाना रूपें धरोनी संभाळ । करी भूपाळ विपद्धर्ता ८५
नष्ट लाभे नाम घेतां । दर्शन दे ध्यान करितां ।
सर्वां झाली अरोगता । वृष्टी पडे यथाकाळीं ॥ ८६ ॥
सुफळा झाली धरा । भूपें यज्ञें भूसुरामरां ।
तृप्त केलें न्यायें नरा । पाळी फिरे जो त्रिलोकीं ॥८७॥
माघ कृष्ण अष्टमीदिनीं । अनघाष्टमी व्रत करूनी ।
ब्राह्मणां भोजन दे दुसरे दिनीं । प्रतिवर्षीं नियमानें८८
जो हें अष्टमीव्रत करील। तो नर सुखी होईल।
सकलाभिष्ट लाभेल। हे बोल मानील जो ॥ ८९ ॥
याद्दिनीं मिळाला वर। ताद्दिनीं उत्सव करी थोर।
श्रीदत्तदर्शन वारंवार। करी प्रेमभर होवोनी ॥ ९० ॥
जो परम दुर्धर्ष तेजस्वी। बळी सहस्रकर कीं रवी।
विजयी सुकीर्ति मिरवी। नुरवी जो दुःखवार्ता॥ ९१ ॥
ज्याला नसे विस्मरण। करी शरणागतरक्षण।
सर्वैश्वर्य भोगून। गाथा वदवीं जगीं हे ॥ ९२ ॥
(श्लोक) न नूनं कार्तवीर्यस्य। गतिं यास्यंति पार्थिवाः।
यज्ञदानतपोयोगश्रुतवीर्यजयादिभिः ॥ ९३ ॥
एके दिवशीं सहस्र नारी घेवोनियां रेवातीरीं।
स्वच्छंदें अर्जुन क्रीडा करी। तंव देवारी रावण आला९४
अर्जुन हा महाशूर। नारदवाक्यें जाणूनी निशाचर।
आला करावया समर। तया देखती त्या नारी ॥ ९५ ॥
अर्जुनें नेत्रसंकेत करून। स्त्रियांकरवीं कराविलें बंधन।
बाळा खेळावया लागून। ठेविला नेऊन सदनांत ॥९६॥

पोर धरिती त्याच्या करा। भोवंडिती त्या निशाचरा।
हें कळलें कुबेरा। प्रार्थुनी नृपवरा सोडविला ॥ ९७ ॥
असा बळी तो अर्जुन। नगरींही नित्य राहून।
नानारूपीं सप्तद्वीप धुंडोन। राज्यपालन करी धर्मे॥९८॥
नमस्ते कार्तवीर्याय। हा तयाचा मंत्र होय।
येणें सर्वारिष्टक्षय। होय हा निश्चय जाणावा ॥९९॥
प्रणवबीज लावून। जपतां होय भवबंधमोचन।
ऱ्हींबीज लावून। जपतां सर्वैश्वर्य मिळेल ॥ १०० ॥
ऐंबीज लावितां वाक्सिद्धी होई। सर्वविद्यापारंगत होई।
लक्ष जपतां कार्यसिद्धी होई। मंत्रशक्तिप्रभावें ॥१०१॥
श्रींबीजें लक्ष्मी मिळे। द्रांबीजें अपमृत्यु टळे।
रोगपीडा पळे। आरोग्य मिळे निश्चयें ॥ १०२ ॥
वषट्बीजें वशीकरण। वौषट्बीजें होई आकर्षण।
हुंबीजें होई विद्वेषण। फट्बीजें उच्चाटण होतसे ॥१०३॥
ठः ठःबीजें होय स्तंभन। खें खेंबीजें होय मारण।
नमःबीजें होय संपन्न। होय पोषण स्वाहाबीजें ॥१०४॥
सौःबीजें होय क्षोभन। क्लींबीजें वशीकरण।
ग्रहभूतादि निवारण। हुंफट्बीजें होईल ॥ १०५ ॥
अक्षिरोग मेह सान्निपात। श्लेष्मज्वर क्षय कुष्ठ।
गुल्म पैत्तिक वात। देश कालोत्थ संगज ॥ १०६ ॥
हे रोग समस्त। किंवा त्रिविध उत्पात।
प्रणवबीजें होती शांत। परप्रयोगाचा अंत होईल १०७

दत्त निवेशित नष्ट प्रयुक्त । तें सहस्त्रं जपें मिळे वित्त ।
घनदीप लावून एकांत । जपतां साधे प्रयोग ॥ १०८ ॥
( श्लोक ) । कार्तवीर्योऽर्जुनो नाम राजा बाहुसहस्त्रवान् ।
तस्य स्मरणमात्रेण गतं नष्टं च लभ्यते ॥ १०९ ॥

इति श्रीदत्तमाहात्म्ये श्रीवासुदेवानंदसरस्वतीकृते
षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

---

# अध्याय सातवा

श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

असा प्रतापें दुर्धर । चौऱ्यायशीसहस्रवर्षें शूर ।
राज्यकरी नृपवर । योगीश्वरप्रसादें ॥ १ ॥
धर्मबळें जो सुमती । सप्तद्वीप वसुमती ।
पाळी एकला आपुले हातीं । नमूनी राहती मांडलिक
जया ॥ २ ॥
श्रीदत्ताचें करी दर्शन । नमस्कार करूं येई प्रतिदिन ।
कधीं कधींही राहून । धर्मचिंतन करीतसे ॥ ३ ॥
एवं चौऱ्यायशी सहस्र । वर्षें लोटतां नृपवर ।
एके दिनीं शय्येवर । होवोनी एकाग्र विचारी ॥ ४ ॥
म्यां काय केला पुरुषार्थ । हा श्रम केला व्यर्थ ।
राज्यानें काय होईल स्वार्थ । पुढें अनर्थ ओढवेल ॥५॥
जें जें दृश्य सकळ । तें तें नाशिवंत चपळ ।
जें केवळ निश्चळ निर्मळ । तें विपुळ न जाणिलें ॥ ६ ॥
रायें रंका वर देतां । कोंडा मागे रंक तत्वतां ।
तैसे म्यां केलें वर घेतां । दुर्दैवता पुढें ये कीं ॥ ७ ॥
श्रीदत्त प्रसन्न होऊन । संतोषें देतां वरदान ।
म्यां काय घेतलें हें मागोन । केवळ भुलोन मूढपणें॥८॥
देवाचा काय अन्याय । म्यांच माझा केला अपाय ।
सर्व सोडून ज्याचे पाय । योगिवर्य इच्छिती ॥ ९ ॥

त्याचे धरूनी चरण । न चुकाविलें जन्ममरण ।
राज्य अंधकूप गहन । डोळस असूनी त्यांत पडलों १०
क्षणभंगुर विलास लक्ष्मीचा । काय भरवसा
आयुष्याचा ।
काय उपयोग परिवाराचा । अंतकाळाची वेळ येतां ११
कोण कोणाचे पुत्र दार । कोण कोणाचे मित्र किंकर ।
कोठें राहील राज्य भांडार । हा परिवार लटिकाच १२
जो निजकरें शत्रु बांधी । त्याला बांधूनी घेती स्कंधीं ।
जो प्रतापें जाळी सुधी । स्मशानामधीं टाकिती तया॥
जया वंदिती भूपती । तया बांधूनीया स्वहस्तीं ।
मृगसा फिरविती युवती ।कृमि विट् भस्म अंतीं ज्याचें॥
त्या देहाचें उपलालन । कराया केलें दुराचरण ।
असें माझें मूढपण । ज्याणें शीण मनीं नये ॥ १५ ॥
दयाळु परमेश्वर । तया असो नमस्कार ।
तेणेंच हा सुविचार । आजी सारभूत दिधला ॥ १६ ॥
तो असे सकरुण । तया जावें शरण ।
त्याचे धरावे चरण । तयाविण कोण तारी ॥ १७ ॥
असा विरक्त होवोन । सह्याद्रीवरी ये तो अर्जुन ।
तत्पूर्वींच भगवान् । बसे ध्याननिश्चळसा ॥ १८ ॥
शिष्याचे परीक्षार्थ । गुरूला हें उचित ।
जेणें शिष्याचें दृढचित्त । होई हित देई जें ॥ १९ ॥
कायावाचामनेंकरून । सर्वभावें करी भजन ।
तरी देव न सोडी ध्यान । त्याचें मन ओळखी जो २०

उदकही न पितां । खिन्न होवोनी स्तवितां ।
वारंवार नमनही करितां । न दे श्रीदत्त आश्वासन २१
मग होऊनी खिन्न । राजा करी स्तवन ।
सद्गद होऊन । दृष्टी लावून श्रीचरणीं ॥ २२ ॥ ( पद )
जय करुणाकरा जगदुद्धारा । आजि कां रुससी
परमोदारा ॥ ध्रु० ॥ २३ ॥
तूं मायबापा धारितां कोपा । कोण माझ्या तापा
शमवी बापा ॥ २४ ॥
बालवाक्यापरी स्तव अवधारी । वारी मम चिंता
तूंचि भवारी ॥ २५ ॥
तुज शरणागत तोचि कृतार्थ । व्यर्थ कीं हें मत वद
वेदसंमत ॥ २६ ॥
जो मम भक्त मत्पदीं सक्त । दोषवियुक्त तो सुखी
मुक्त ॥ २७ ॥
नाश न होई मम भक्ताचा । न करी मिथ्या हे तव
वाचा ॥ २८ ॥ ( गीत—जोगी )
आजि सखया रुससि कां रे । भववैरे श्रीहरे ॥ध्रु०॥ २९
तव भक्त त्वत्परायण । होवुनि म्यां प्राण हे ।
धारियेले रे दयाब्धे निष्ठुरता बाण हे ।
नाराजी आजि होऊनी । सोडिसि कां कोण हे ॥
सोसि बरें बोल बा रे काय चुकलों भवतरे ॥ ३० ॥
वांचुं कसा जेवि मासा जळ नसतां तळमळे ।
मजविषयीं कां न तूझें मन बापा कळवळे ।

धेनु जसी धांवें वत्सालागीं तसा कळकळें।
आजि दयादुग्ध पाजी ना तरि रे मी मरें ॥ ३१ ॥
( भोला नाथ दिगंबर ) ( पद चाल—इसतन धन० ॥ )
मजवरि कां बरि दृष्टि नसे। जरी मी दोषि असे ध्रु० ३२
माझ्या दोषा नाहीं गणित। अगणित भूकणसे॥३३॥
नाहीं दयाळू लोकीं तुजसम। मजसम दोषि नसे ३४
रोगीच नसतां मग कोण पुसता। असतां वैद्य जसे ३५
दैयनीय नसतां दयाळू वार्ता। पुसतां कोण असे ३६
गुरु माय बाप तूं हरी ताप। कोप तव चित्तीं नसे ३७
(ओवी)। यद्रूपीं जडजगभ्रांती। दिसे स्वप्नोपम असती।
अलातचक्रसी तच्छांती। करिती यती ज्ञानबळें॥३८॥
जगद्भ्रांती शमवून। जयाचे पदीं जावून।
भक्त होती अत्यंत लीन। पुनरावर्तन नसे त्यांचें॥३९॥
असें ज्याचें हें पद। जेथें निरतिशयानंद।
तो तूं त्र्यधीश गोविंद। असती स्वच्छंद निश्चयें ४०
देवा मी तुझा भक्त। बद्ध झालों निश्चित।
जन्ममरणभयत्रस्त। शोकमोहग्रस्त असें॥ ४१ ॥
दया कां नये तव मना। करी प्रसन्न वदना।
न सोसवे भवयातना। हें तव मना न ठावें कीं॥४२॥
आतां स्मरलें मज ख्यास। प्रसूतीवेदना वंध्येस।
न ठावी तेवी तव मनास। भवत्रास कसा कळेल ४३
सर्वज्ञ तूं नित्यमुक्त। जन्ममरणभयातीत।

१ दाता. २ त्रिगुणमायेचा स्वामी.

शोकमोहादिवर्जित । सदोदित पूर्णानंद ॥ ४४ ॥
जेवी गर्भश्रीमंत । दुष्काळ नेणे संतत ।
तेवि तूं शिव अनंत । भववेदना नेणसी ॥ ४५ ॥
नसो तुला भवानुभव । जें असे साक्षी वैभव ।
तेणें पाहें हा जीव । कसा भवव्यथित हें ॥ ४६ ॥
सूर्यनेत्रें विश्वा पाहसी । तो तूं नेत्र कसे झांकिसी ।
अजुनि मला कीं नेणसी । उपेक्षिसी कीं दयाब्धे॥४७॥
चर्खी भरलें जेवि सूत । तेवी जग हें त्वदुदरांत ।
तो तूं काय माझा अंत । घेसी अनंत असूनी ॥४८॥
तूं सच्चिदानंद नारायण । तूंचि भवभयहरण ।
म्यां धरिले चरण । शरणागत होऊनी ॥ ४९ ॥
कोण जाणे तुझा मनोगत । ब्रह्मादिक नेणती अंत ।
मी पामर अत्यंत । तव हृद्गत काय जाणें ॥ ५० ॥
आतां होईं प्रसन्न । करी अपराधक्षमापन ।
उघडोनिया नयन । प्रसादवचन बोल बापा ॥ ५१ ॥
विषयसुख कुत्सित । त्यासाठीं संसारबिळांत ।
घुसतां डसला अकस्मात । काळसर्प मूषका जेवी ५२
भवाटवींत पडलों । तापत्रयवणव्यानें पोळलों ।
दीन आर्त मुमूर्षु झालों । दयाघना आलों शरण तुज
हा तुझा अवतार । दे भक्ती ज्ञान वैराग्य वर ।
करी मुमूक्षूंचा उद्धार । हा निर्धार मच्चित्तीं ॥ ५४ ॥
भोगी संसारसुख । म्हणसी तरी हें दुःख ।
याहुनी वाटे बरें विख । त्याला पराङ्मुख मी झालों॥

स्त्री पुत्र मित्र द्रव्य । राज्यभोग मायामय ।
स्वरूपावरक हें हेय[1] । उद्वेग होय स्मरतांही ॥ ५६ ॥
घेऊनी विंचवाचें प्रावरण । सर्पाचें उसें करून ।
खदिरांगारीं शयन । सुखें करूनी निजवेल कीं ॥५७॥
एकाद्यास घडेल हेंही । भवसुख[2] त्याहूनही ।
प्रमाद[3]मृत्युमोहीं । घाली जें तापोद्वेगद ॥ ५८ ॥
त्याहूनि बरा नरकवास । नको वार्ता त्याची आम्हांस
हा निश्चय केला खास । तुझी कास धरिली म्यां ॥५९॥
भवचक्राहूनी इतर । शत्रू वज्र दंडधर[4] ।
भूतें[5] भौतिक हिंस्र । त्यापासूनि दर न वाटे ॥ ६० ॥
भवचक्रभंगोपाय । केवळ हे तुझे पाय ।
हाचि मनाचा निश्चय । भयाचें भय[6] पाय हे ॥ ६१ ॥
करितां पायांचा आश्रय । होय आनंदाश्रुसांद्रकाय ।
भवचक्राचा होईल लय । यापुढें श्रेयँ काय तें ॥ ६२ ॥
जे नर पराङ्मुख । त्यां दे हे विषयसुख ।
ते असती उन्मुख । विषयसुख भोगावया ॥ ६३ ॥
मी सारज्ञ विरक्त । मुमुक्षु तुझा भक्त ।
तव पदीं आसक्त । करी मुक्त मुकुंदा ॥ ६४ ॥
नाहीं इहपर भोगेच्छा । कोण पाहे तया तुच्छा ।
पादसेवेची धरी वांच्छा । ती पुरवी इच्छा कल्पवृक्षा॥

---

१ त्याज्य. २ संसारसुख, विषयसुख. ३ नजरचूक, दुर्लक्ष, प्रमादरूपी मृत्यु त्यामध्यें आणि मोहीं = मोहामध्यें. ४ यम. ५ पृथिव्यादि, जग. ६ भयासही भीति देणारे. ७ मोक्ष.

धन्य अत्री अनसूया । वंदूं तयांचिया पायां ।
ज्याचा न ठाव आम्नाया । आणिलें तया नामरूपा ६६
तो तूं साक्षात्परमेश्वर । निजभक्तांचें माहेर ।
मला केवी करिसी दूर । काठीनें नीर दुरावें कीं॥६७॥
नमो भक्ताधिव्याधिनाशा । विश्वाध्यक्षा हृषीकेशा ।
वासुदेवा परेशा । मायाधीशा तुज नमो ॥ ६८ ॥
ऐसी स्तुति करून । मूर्च्छित झाला अर्जुन ।
पुनः होवोनी सावधान । करी स्तवन भावार्थें ॥ ६९ ॥
(भूपाळी) ॥ उठि उठि मुनिनंदना । भक्त पातले दर्शना ।
त्यांची पुरवी तूं कामना । पाही नयन उघडूनी ॥७०॥
उघडुनियां करुणादृष्टी । दासा धरीं आपुले पोटीं ।
नको येऊं देऊं हिंपुटी । घाली कंठीं मिठी हर्षें ॥ ७१ ॥
हर्षें तुझे पदीं रंगले । दारागारा विसरले ।
निजदेहा न भुलले । विनटले निजभावें ॥ ७२ ॥
निजभावें येतां शरण । लपविसी कां बा चरण ।
जेणें तरती दुष्टाचरण । मग मरणभय कैचें ॥ ७३ ॥
नको करूं निष्ठुर मन । शीघ्र देई आश्वासन ।
तूं असती करुणाघन । तापशमन करि शीघ्र ॥ ७४ ॥
उठी उठी बा सद्गुरुराया । उठी उठी करुणालया ।
उठी उठी बा चिन्मया । निज माया आवरी ॥ ७५ ॥
(ओवी) ॥ असें स्तवूनी अर्जुन । उभा राहे धरूनी मौन ।
तव उदया आला अरुण । अरुण दिसे प्राचीमुख॥७६॥

सिद्ध मुनी ऋषी देव । दर्शना येती अप्सरा गंधर्व ।
ते वंदोनी जाती सर्व । जयां गर्व न ठावा ॥ ७७ ॥
सह्याद्रिवासी मुनी । तेही जाती वंदूनी ।
मृत्तिका जल घेवूनी । आला मुनी शांततपा ॥ ७८ ॥
मग श्रीदत्त उठोन । करीं मृज्जल घेऊन ।
नैर्ऋती दिशे जाऊन । मलोत्सर्ग करून पातला ॥७९॥
मृज्जल समिधा घेऊनी । तंव आला दुसरा मुनी ।
श्रीदत्तें शौच करूनी । दंतधावन पैं केलें ॥ ८० ॥
सरोवरीं केलें स्नान । केलें देवर्षिपितृतर्पण ।
तंव एक मुनी येऊन । भस्म वल्कल देतसे ॥ ८१ ॥
करूनि त्रिपुंड्र धारण । वल्कल तें पांघरून ।
करूनी संध्यावंदन । पुनः ध्यान आरंभिलें ॥ ८२ ॥
राजा मनीं झाला खिन्न । उभा राहे हात जोडून ।
मग शांततपा बोले वचन । नमन करून गुरूतें ॥८३॥
भगवन् हा तुमचा दास । उभा राहे करून उपवास ।
यानें आपुली धरली कास । यास उदास न करावा ८४
हा करी भक्ती बरवी । याची उपेक्षा न करावी ।
कृपादृष्टी यावरी करावी । हा भाविक ठावा असेल ८५
हंसोनी बोले श्रीदत्त । काय इच्छितें याचें चित्त ।
आणिक इच्छी जरी वित्त । तरी देतों सत्वर ॥ ८६ ॥
माझ्या भक्ता काय दुर्लभ । सर्व सिद्धी केल्या सुलभ ।
यावरी ठेविला लोभ । अर्जुनीं सिद्धी किती देऊं ॥८७॥

ऐकूनी श्रीदत्तवचन । राजा झाला साश्रुलोचन ।
म्हणे देवा तूं प्राणजीवन । माझें मन जाणसी ॥ ८८ ॥
पुरे पुरे परीक्षा । बरवी केली हे शिक्षा ।
आतां करी कृपेक्षा । न करी उपेक्षा दीनाची ॥ ८९ ॥
तृषिता द्यावें पान । क्षुधिता द्यावें अन्न ।
दुर्गता[1] द्यावें धन । करावें अवन आर्ताचें ॥ ९० ॥
योग्या योग्य द्यावें । हे सर्वज्ञा काय सांगावें ।
आतां म्यां काय मागावें । त्वां जाणावें अंतरींचें ॥९१॥
आतां कांहीं नाहीं कांक्षा । घेतां आपुली दीक्षा ।
दैवें झाली मुमुक्षा । ज्ञानदीक्षा द्यावी आतां ॥ ९२ ॥
स्वबुध्या करितां श्रम । शास्त्रीं झाला मला भ्रम ।
न कळे ज्ञाननिष्ठाक्रम । इंद्रियग्राम नावरे ॥ ९३ ॥
वाङ्मनसागोचर । ब्रह्म एक परात्पर ।
जग मायिक क्षणभंगुर । तें खोटें म्हणे वेदांती ॥९४॥
दुसरा म्हणे सत्य हे । म्हणोनी व्यवहार करी हे ।
मीमांसक म्हणे सुखी होते हे । कर्मयोगें निश्चय ॥९५॥
काणाद बोले हे असद्धेतुक । सांख्य बोले जीव अनेक ।
योगी म्हणती योगें ये सुख । म्हणे क्षणिक शून्यवादी[2]९६
कोणी म्हणती ईश्वर निमित्त । कर्मपरतंत्र कोणी म्हणत
कोणी प्रधान कारण बोलत । कोणी म्हणत द्वंद्वज हें ९७
स्वस्वपक्ष सिद्ध करिती । श्रुतिप्रमाण दाखविती ।
भ्रम पावे माझी मती । म्हणोनी प्रणती म्यां केली ९८

१ दरिद्र. २ सौगत ( बौध्य ).

यांमध्यें सत्य काय । मुमुक्षूनें करावें काय ।
म्हणोनी धरिले हे पाय । मोक्षोपाय दाखवा ॥ ९९ ॥
माझी आज्ञा त्रिभुवनीं । कोणी न जाती उलंडुनी ।
शत्रु ठेविले भृत्य करोनी । समृद्धी सदनीं अक्षय १००
सर्व भोग भोगिले । माझें मन कंटाळलें ।
आतां ज्ञानावांचून भलें । न मानिलें कांहींच म्यां ॥१॥
बोलतों वाहूनी आण । गुरुदेव माझे आपण ।
दृढ धरिले हे चरण । करा उत्तीर्ण भवापासुनी ॥ २ ॥
कोणत्याही युक्तीनें आतां । काढा मज वरता ।
भीतो ह्या भवगर्ता । दुसरा उद्धर्ता नाहीं मला ॥३॥
ब्रह्मादिकांचे गुरु आपण । यालागीं वेद प्रमाण ।
तुम्हांहूनी दयाळु कोण । मायावरण काढील हें ॥ ४ ॥
कायावाचामनेंकरून । तुम्हांवरी निश्चय ठेऊन ।
बैसलों धरणें घेऊन । सर्व आपण जाणतसां ॥ ५ ॥
देवा पूर्वीं आपण । सुप्रसन्न होऊन ।
माग ह्मणतां वरदान । ऐहिक धन मागितलें ॥ ६ ॥
त्या वेळीं माझें दुर्दैव । तेथें आलें घेवोनी धांव ।
तेणें ऐहिक वैभव । मागविलें क्षणलवविरस जें ॥ ७ ॥
तुझी माया दुर्धर । कोण लावी तिचा पार ।
आतां करितों नमस्कार । माझा उद्धार करावा १०८॥
इति श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचिते श्रीदत्तमाहात्म्ये सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥

श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

# अध्याय आठवा

श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

गुरु ह्मणे दीपकाप्रती । ऐसी अर्जुनें करितां विनंती ।
आश्वासूनि तयाप्रती । म्हणती तया योगिराज ॥१॥
अर्जुना तूं सात्विक । दैवी संपत्तीचा नायक ।
प्रारब्धवशें सकळिक । भोग भोगिले मद्दूरें ॥ २ ॥
माझ्या सेवेच्या योगानें हें । वैराग्य जाहलें आहे ।
आतां सत्वर पाहें । याच डोळा मुक्तिसुख ॥ ३ ॥
आत्मस्वरूप जाणणें । तरी शास्त्रप्रमाण घेणें ।
शास्त्रांचें एक तत्व जाणणें । द्वैत न पाहणें सुविचारें ४
शास्त्रांचें तात्पर्य एक । असे सांगतों तें ऐक ।
एकदां देवनायक । गुरुदर्शना पातला ॥ ५ ॥
दूरीं देखतां गुरुवर । पायीं चालोनि ये इंद्र ।
करी भावें नमस्कार । परमादर करूनि ॥ ६ ॥
गुरु बैसवी तयासी । तो बैसोनि देखे शिष्यासी ।
ह्मटले जे शास्त्राभ्यासीं । अन्य मानसीं न आणिती ७
कोणी लौकायत[1] शास्त्र । कोणी पढती कामशास्त्र ।
कोणी शिल्प[2] सौगत[3]शास्त्र । न्यायशास्त्र कोणी पढती
तें ऐकोनि इंद्र पुसे । म्हणे गुरो काय हें असे ।
आपण पढावितां कसें । बंध येतसे ज्यायोगें ॥ ९ ॥

---

१ चार्वाक, दृश्य आहे तें खरें आहे, तें शास्त्र. २ त्वाष्ट्र. ३ बुद्ध.

उपजतांची पूर्वाभ्यासें । विषयवासना होतसे ।
ती कामादिशास्त्राभ्यासें । बुडवितसे ठार नरकीं १०
आधींच उल्हास । त्यांत पातला फाल्गुनमास ।
तसें क्षुद्रशास्त्रें ह्यांस । विषयाध्यास होईल ॥ ११ ॥
हे होत विषयाक्रांत । दुःशास्त्रीं करितां आसक्त ।
जेवी अंध कूपांत । लोटावे तसें हें वाटे ॥ १२ ॥
मुळीं हे कामुक । हीं शास्त्रें अर्थात्मक[1] ।
गुरु ह्मणे इंद्रा ऐक । मनीं कौतुक न मानी ॥ १३ ॥
शास्त्रें न होती बाधक । सर्वांचें तात्पर्य एक ।
सात गाथा सांगतों ऐक । मन निःशंक होईल॥ १४ ॥
कांपिल्यनगरीं शिल्पज्ञ । होता नामें विधिज्ञ ।
वास्तुशास्त्रीं अभिज्ञ । ज्याला प्राज्ञ मानिती ॥ १५ ॥
क्षेत्रशुद्धि आय व्यय । जाणे शल्य[2]ज्ञानोपाय ।
विधिनें बांधी आलय । सुखालय केवळ तें ॥ १६ ॥
तेणें बांधितां घर । त्यांत घडती निरंतर ।
धर्म उत्सव अध्वर । लोकां ज्वर न येती ॥ १७ ॥
त्याकरवीं लोक । घरें बांधविती सुरेख ।
त्या घरीं नित्य होय सुख । होती मख मंगलें ॥ १८ ॥
तो विधिज्ञ प्रसिद्ध झाला । द्रव्य लाभे त्या कुशला ।
कधीं नेणे मिथ्या बोला । सर्वां भला वाटे तो ॥१९॥
जीं लोकांचीं घरें बांधी । तेथें नोहे आधिव्याधी ।
अपमृत्यु न ये कधीं । शास्त्राधारें घरें बांधितां ॥२०॥

---

१ विषयात्मक. २ भूतदोष.

तो मरोनी स्वर्गा गेला। सुख भोगोनी पुनः आला।
भूमीवरी राजा झाला। पूर्वपुण्यबलानें तो ॥ २१ ॥
प्रासाद देवालयें। बांधवी धर्मशाळा स्वयें।
पूर्तेष्टें[1][2] दत्तें[3] करितां ये। तया मृत्यु सुखानें ॥ २२ ॥
पुनः स्वर्गी जाऊन। दिव्य भोग भोगून।
पुनः भूतळीं येऊन। विप्रकुळीं जन्मला ॥ २३ ॥
कर्माची गती गहन। दुर्लभ हें नरजनन।
सर्वेंद्रियनिधानें[4]। पुण्यवंता मिळे क्वचित्[5] ॥ २४ ॥
त्यांमध्यें विप्रजाती। मिळतां सायास होती।
होणें विद्वान् सुमती। हें तो अतिपुण्यफळ ॥ २५ ॥
जन्मा येतां ब्राह्मण। सूर्य करी गोदान।
म्हणोनि थोर ब्राह्मण। करी उद्धरण लोकांचें ॥ २६ ॥
तो शिल्पज्ञ पूर्वीचा। पुढें तया राजाचा।
जन्म लाभला मग साचा। झाला विप्राचा पुत्र तो २७
गर्भी येतां गर्भाधानादि। क्रिया घडल्या यथाविधि।
मातेला दुःख न दे कधीं। सुवेळी सुधी जन्मला ॥२८॥
पिता त्याचें जातकर्म। करी प्रेमें दानधर्म।
करोनियां नामकर्म। देवशर्मा म्हणती तया ॥ २९ ॥
स्वरूपें सौम्य दिसत। प्रकृतीनें असे शांत।
लोकांचीं मनें तो कांत। रमवी अश्रांत सुखी तो॥३०॥
यथाकालीं चौल करून। केलें मौंजीबंधन।
तो करी वेदाध्ययन। घालवीना मन खेळाकडे ॥ ३१ ॥

१ वापी, कूप, तडाग, बगीचे. २ यज्ञयाग. ३ दान. ४ पटुत्व सकलेंद्रियीं. ५ विरळा.

संध्यावंदन अग्निकार्या। करी गुरूची सपर्या।
धर्में पाळी ब्रह्मचर्या। धरी औदार्या स्वभावें ॥ ३२ ॥
संहिता-पद-क्रम। अंगें शास्त्रें यथाक्रम।
पढला ज्याला न हो श्रम। सफल श्रम तयाचे ॥ ३३ ॥
सार्थ विद्या मिळवून। व्रताचरण करून।
गुरूला दक्षिणा देऊन। समावर्तन करी तो ॥ ३४ ॥
बुद्धिरूपशीलसंपन्न। पाहूनि कन्या कुलीन।
तिशीं विवाह करून। गृह्याचरण करी तो ॥ ३५ ॥
वेदशास्त्रार्थतत्वज्ञ। करी नित्य पंचयज्ञ।
विशेषतः जपयज्ञ। करी प्राज्ञ दैवयोगें ॥ ३६ ॥
समयीं स्नानसंध्यावंदन। होम जपयज्ञ पठन।
करी गुरुशुश्रुषण। भगवद्भजन प्रेमभरें ॥ ३७ ॥
कर्मीं अभिमान न करी। फळाची इच्छा नच धरी।
निर्ममत्वें वागे घरीं। उदासीनापरी सर्वथा ॥ ३८ ॥
आगंतुक साधन। करी यज्ञदानाध्ययन।
प्रतिग्रह याजनाध्यापन। यांहीं जीवन करीतसे ॥३९॥
ईश्वरोद्देशें कर्म करितां। चित्ता ये शुद्धता।
प्रतिग्रहा तो सोडी ज्ञाता। तपस्तेजहर्ता जो ॥४० ॥
होतां ईश्वरीं आवडी। याजनाध्यापना सोडी।
भिक्षेची धरी आवडी। सोडी गोडी विषयांची॥४१॥
शम दम तप शौच। क्षांति आर्जव ज्ञान साच।
आस्तिक्य विज्ञान हेंच। स्वाभाविक ब्रह्मकर्म ॥४२॥

हें प्रकृतिवशें मिळालें। कामादिक पळाले।
मीपणही गळालें। उत्तरोत्तर विप्राचें ॥ ४३ ॥
कर्में झालें मन शुचि। श्रवणाची लागली रुचि।
समाप्ति गृहस्थाश्रमाची। करूनि वनीं राहिला ॥४४॥
शीतोष्ण सहन करी। ध्याननिष्ठ अंतरीं।
श्रीहरीचें चिंतन करीं। न धरी योगक्षेमवांच्छा ॥४५॥
असा महाव्रत होवोनी। सर्वसंन्यास करूनि।
गुरूपदिष्टचिंतनीं। निशिदिनीं निमग्न हो ॥ ४६ ॥
श्रवणें संशयभावना। मननें असंभावना।
ध्यानें विपरीत भावना। निमाल्या मनापासून ॥४७॥
करूनियां योग। केला प्रतिबंधभंग।
वासनाक्षय मनोभंग। ज्ञानयोग मिळवी जो ॥ ४८ ॥
बोध वैराग्य उपरती। पूर्णपणें जेथें वसती।
त्यालागीं किंकरी मुक्ती। हे उक्ति सत्य असे ॥ ४९ ॥
असा जीवन्मुक्त। विप्र झाला ईशभक्त।
प्रारब्ध भोगूनि असक्त। विदेहमुक्त झाला तो ॥५०॥
शास्त्र तें शासन करी। ईशवाक्य तें हो कां क्षुद्र जरी।
विश्वास ठेविता त्यावरी। ये गति बरी अनुक्रमें ॥५१॥
शिल्पशास्त्रविधीनें। वागतां विधिज्ञानें।
गति अनुक्रमानें। घेतली योगानें दुर्लभ जी ॥ ५२ ॥
ही एक गाथा अशी। दुसरीही असे तशी।
गुरु सांगे इंद्राशी। दत्त ह्मणे अर्जुना ऐक ॥ ५३ ॥

नर्मदेच्या तीरीं । माहिष्मती नगरी ।
द्विज एक अवधारी । गीत वादित्रीं रत असे ॥ ५४ ॥
तो स्वरूपें सुंदर । असे कवी उदार ।
पूर्ण जाणे कामशास्त्र । धुंडे सुंदर नारीतें ॥ ५५ ॥
मिळावी सुलक्षणा पद्मिनी । हें चित्तीं ठेवूनि ।
पातला राजसदनीं । रायें वंदूनि पूजिला ॥ ५६ ॥
राजा ह्मणे विप्रासी । काय इच्छा मानसीं ।
विप्र ह्मणे रायासी । शास्त्रोक्त नारी धुंडितों ॥५७॥
जाणें मी कामशास्त्र । तसेंच सामुद्रिक शास्त्र ।
नारी मिळावी पवित्र । शास्त्रयुक्त लक्षणांची ॥५८॥
ऐकून त्याचें वचन । रायें तया स्वकन्यारत्न ।
दाविलें तें पाहून । मोहित होवोनि तो पडला ॥ ५९ ॥
शास्त्रोक्त सर्व लक्षणें । पाहतां पीडिला कामबाणें ।
सावध होवोनि क्षणें । यथेष्ट वीक्षणें पाहिली ॥ ६० ॥
मुख पाहतां विप्राचें । भुललें मन कन्येचें ।
हार्द[1] जाणोनि दोघांचें । राजाचें मन सुखावलें ॥ ६१ ॥
राजा म्हणे हा सुपात्र । विप्र असे पवित्र ।
मीही असें अपुत्र । हा घरजांवई करावा ॥ ६२ ॥
विप्र कन्येसी पाहून । राहिला मोहित होऊन ।
कन्येचेंही अंतःकरण । रंगलें याहून काय पाहूं ॥ ६३ ॥
जरी हा असे निर्धन । याला द्यावें राज्यार्धदान ।
असा विचार करून । मुहूर्त पाहूनि लग्न करी ॥ ६४ ॥

१ प्रेम.

ब्राह्मविधीनें कन्यादान । दिलें राज्यार्ध आंदण ।
केला उत्सव सोळा दिन । जांवई ठेवून घेतला ॥६५॥
चक्रवाकासमान । परस्पर प्रेमबंधन ।
झालें तयांचें अनुदिन । आनंदनिमग्न होती ते ॥६६॥
वाचे मना अगोचर । तें सुख आत्यंतिक पर ।
आत्मस्वरूप तें वर । नित्य निरतिशय जें ॥ ६७ ॥
मनुष्यानंदाहूनि । उत्तरोत्तर शतगुणी ।
ब्रह्मसुखांत जीं तयाहूनि । शतगुणीं आत्मसुख ॥६८॥
रत्यारूढ तेंची पूर्ण । कामशास्त्रीं जो विचक्षण ।
जाणे ब्रह्मसुखाचें लक्षण । तो घे पूर्णपणें तें ॥ ६९ ॥
पामरें भोगितां नारी । सोपाधिक सुख घेतो अंतरीं ।
नित्य निरतिशय सुखाची सरी । मैथुनांतरी त्या यावीकीं
शास्त्र नेणे तया स्पष्ट । स्पर्धासूयादि दुष्ट ।
रतिसुख जाणे स्पष्ट । मानी श्रेष्ठ तत्वज्ञ ॥ ७१ ॥
मैथुनांतीं शयनांतीं । जी बाणे पूर्णस्थिति ।
ती सदैव जे पाळिती । जीवन्मुक्ति तयां हातीं ॥७२॥
हें नेणे तो पामर । धरीं संसार अनिवार ।
विषयासक्ति निरंतर । करी पराङ्मुखपणें ॥ ७३ ॥
असा तो ब्राम्हण । कामशास्त्रप्रवीण ।
रत्युपाधीनें जाणून । ब्रह्मानंदीं निमाला ॥ ७४ ॥
राजकन्या हृष्ट झाली । विप्रचरणीं रमली ।
कधींही दृष्टि आपुली । अन्यत्र न घाली क्षणमपि ७५

धरोनि पतीची चित्तवृत्ती । रमे राजकन्या सती ।
मानी परब्रह्म पती । ती सुमती धन्य हो ॥ ७६ ॥
दोघांनीं न केलें पातक । स्वप्नींही न देखिलें दुःख ।
परस्पर भोगूनि सुख । राहती एकमनेंसी ॥ ७७ ॥
यथायोग्य पाळिती धर्म । जो असे गृहाश्रम ।
तदनुगुणें करिती कर्म । परब्रह्मनर्म[1] ज्याचें ॥ ७८ ॥
जें सुख देव नेणती । तें सुख ते अनुभवती ।
सुखें मरोनी ते अंतीं । दोघेंही जाती गंधर्वलोकीं ७९
तेथेंही दंपती होऊन । होती नादब्रह्मलीन ।
गीतवाद्यनानानिपुण । गंधर्वगण मान्य झाले ॥ ८० ॥
एके दिनीं हिमाचळीं । ते स्वच्छंद गाती त्या वेळीं ।
गाणें ऐकूनि चंद्रमौळी । तयांजवळी पातला ॥ ८१ ॥
गाणें मंजुळस्वर । तालासह सप्तस्वर ।
बावीस श्रुति धरिता उर । तान बरोबर एकुणपन्नास ८२
रागासह रागिणी । विरामासह दावितां त्यांनीं ।
हर्षा न पुरे धरणी । शिवाचे श्रवणीं भरे तें ॥ ८३ ॥
गीतरागे हराचें मन । त्यांणीं हारितां सोडून ध्यान ।
हर बोले होऊनि प्रसन्न । कर उचलून प्रेमानें ॥ ८४ ॥
तुह्मी सुशिक्ष्य उत्तम । तुमचें गाणें मनोरम ।
यापुढें काय साम । आनंदधाम हें गाणें ॥ ८५ ॥
जैसें तुह्मीं गाइलें । ऐसें अद्यापि न ऐकिलें ।
माझें मन पूर्ण धालें । ऐकतां भलें गाणें हें ॥ ८६ ॥

१. विलास.

तुम्हां न होईल त्रास। तुम्हां देतों स्वर्गवास।
तेथें रमवूनि देवांस। करा निवास आनंदें ॥ ८७ ॥
असें म्हणोनि शंकरें। विमानीं बैसवोनि त्वरें।
तयां मानपुरःसरें। स्वर्गावरी पाठविलें ॥ ८८ ॥
त्यांचीं गाणीं ऐकूनि। किन्नर किन्नरी जाती भुलोनि।
गंधर्वहि ऐकोनि। चकित होऊनि राहती ॥ ८९ ॥
ऐसा तो ब्राह्मण। स्वर्गीं देवगंधर्वांहून।
मान्य झाला अनुदिन। आनंदलीनमानस ॥ ९० ॥
कालांतरीं एके दिनीं। उत्सव झाला ब्रह्मभुवनीं।
तेथें गंधर्व बोलावूनि। आणिले असती अनेक ॥ ९१ ॥
जो हा पूर्वींचा ब्राह्मण। गंधर्व झाला जाण।
त्यालाही देवगण। घेऊनि आले ब्रह्मलोकीं ॥ ९२ ॥
मृदंगादि आनद्ध वाद्यें। वीणादिक तंतुवाद्यें।
मुरलीप्रमुख सुषिरें[1] वाद्यें। वाजती घनवाद्यें तालादिक॥
अप्सरा कौशल्यें नाचती। हाव भाव कळा दाविती।
गंधर्व प्रेमभरें गाती। आनंदविती देवांसी ॥ ९४ ॥
सर्वांमध्यें विस्पष्ट। ब्राह्मणाचा स्वर उत्कृष्ट।
सर्वांचें चित करी हृष्ट। झाला संतुष्ट ब्रह्मदेव ॥ ९५ ॥
सर्व गंधर्वां वारूनि। त्या दोघां पुढें बैसवूनि।
ब्रह्मा ऐके चित देऊनि। त्यांचीं गाणीं मनोरम ॥ ९६ ॥
ऐकतां ज्यांचें गाणें। साक्षात् ब्रह्मानंद होणें।
संतोषूनि ब्रह्मा म्हणे। धन्य जिणें तुमचें हें ॥ ९७ ॥

---

१ छिद्रयुक्त.

नादब्रह्मात्म तत्व जें। ज्यासमान नाहीं दुजें।
म्हणूनि सर्वोत्तम जें। तें उमजे हा एक ॥ ९८ ॥
विलक्षण ह्याचा आनंद। दुसऱ्या देई परमानंद।
केवळ ब्रह्मरसास्वाद। सर्व खेद वारी जो ॥ ९९ ॥
याचा नित्य निवास। ब्रह्मलोकीं व्हावा खास।
आतां स्त्रियेसह ह्यास। माझे जवळी ठेवितों ॥१००॥
ऐसें ब्रह्मा बोलून। सुप्रसन्न होऊन।
तया दे स्वसन्निधान। प्रेमें मानपुरःसर ॥ १०१ ॥
ऐसा तो ब्राह्मण। कामशास्त्रप्रवीण।
पुढें गंधर्व होऊन। ब्रह्मलोकीं राहिला ॥ १०२ ॥
कृतोपासकां जी गति। ती आली तया पुढती।
तेणें घेतली क्रममुक्ति। पुनरावृत्ति न हो तया॥१०३॥
ज्यांचें अपक्क ज्ञान। ते ब्रह्मलोकीं येऊन।
तेथें श्रवणादि करून। क्रमें निर्वाण पावती ॥ १०४ ॥
जे केवळ पुण्यैंकरून। ब्रह्मलोकीं येऊन।
राहती तयां ये पतन। पुण्य भोगून सरतांचीं ॥१०५॥
गुरु म्हणे इंद्रा ऐक। कामशास्त्रनिश्चायक।
तो ब्राह्मण सस्त्रीक। ब्रह्मलोकवासी झाला ॥ १०६ ॥
तो क्रममुक्तीचा अधिकारी। जाहला असे जो यापरी।
शास्त्रतत्व निर्धारी। क्रमें चारी मुक्ति घेतो ॥१०७॥
श्रीदत्त म्हणे अर्जुना। द्वितीय गाथा ऐकून देवराणा।
पावोनियां समाधाना। तृतीयोदाहरण पुसतसे १०८
इति श्रीमत्परमहंसवासुदेवसरस्वतीविरचिते श्रीदत्त-माहात्म्ये अष्टमोऽध्यायः श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु॥८॥

*

# अध्याय नववा

## श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

श्रीदत्त म्हणे अर्जुना । परिसे करूनी एकमना ।
ह्या तिसऱ्या उदाहरणा । समाधाना पावसी ॥ १ ॥
वेदशर्मा विप्र एक । गोदावासी सुविवेक ।
तया पुत्र झाला एक । नामें अन्वर्थक सुशील ॥ २ ॥
तो स्वाचारसंपन्न । गायत्री जपे करी श्रवण मनन ।
दैवयोगेंकरून । सात भूतांनीं गांठिला ॥ ३ ॥
सातही ब्रम्हराक्षस । पीडिती त्या पुत्रास ।
नानापरी देती त्रास । न देती ग्रास भक्षावया ॥ ४ ॥
सातांच्या चेष्टा सात । एकाकाळीं एक येत ।
एवं विप्र सतत । भूतग्रस्त झाला असे ॥ ५ ॥
एक रडे एक उडे । एक हंसे गाढें ।
एक नाचे पुढें पुढें । खायी गायी पडे एक ॥ ६ ॥
द्विजाअंगीं घुसती । अशा चेष्टा दाविती ।
कांहीं उपाय न चालती । झाली भीती ब्राह्मणा ॥ ७ ॥
म्हणे माझा पुत्र एक । त्याला भूतें देती दुःख ।
पाहूनियां झाला शोक । उभय लोक अंतरले ॥ ८ ॥
श्रीदत्ताचा उपासक । मी असोनी हें दुःख ।
केवीं झाले विवेक[1] । तोही योग्य न राहे ॥ ९ ॥

१ विचार.

असा करी विप्र शोक। तंव आला भिक्षुक।
दुर्गंधांगी मलिन मूर्ख। दिसे लोकदृष्ट्या तो ॥ १० ॥
भिक्षा देतां त्याची कांती। पाहतां विप्रा झाली भ्रांती।
म्हणे हा कीं दिनपती। माझी मती भ्रमतसे ॥ ११ ॥
करूं याचें परीक्षण। असें म्हणतां तत्क्षण।
भिक्षुक धांवे त्वरा करून। पाठी लागोन धांवे विप्र ॥
भिक्षुक वनीं चालिला। द्विज पाठीसी लागला।
पाषाण मारी तयाला। जा जा मागें फिर म्हणे ॥१३॥
मार सोसोनि ब्राह्मण। जाऊनी दृढ धरी चरण।
म्हणे आलों शरण। करी रक्षण सत्पुरुषा ॥ १४ ॥
भिक्षु म्हणे मी व्रात्य भ्रष्ट। तूं ब्राह्मण पूज्य श्रेष्ठ।
विप्र म्हणे आपण वरिष्ठ। स्पष्ट देव भूलोकीं ॥ १५ ॥
हंसूनी भिक्षु दावी रूप। तों दिसे त्रिमूर्तिस्वरूप।
विप्र म्हणे गेलें पाप दर्शनें ताप नष्ट झाले ॥ १६ ॥
भूतें त्रासिला माझा सुत। तुम्ही त्याला करा मुक्त।
हांसोनि वदे भिक्षुक दत्त। मंत्र सात हे घे तूं ॥ १७ ॥
एका एका भूता। एक एक मंत्र योजितां।
तत्काल ये बहुता। होईल मुक्तता पुत्राची ॥ १८ ॥
जसे मनाचे मळ। एका एका शास्त्रें केवळ।
जाऊनी आत्मयाची आळ। दुरावे तत्काळ तया परी॥
एका एका मंत्रें एक एक। भूत जाईल निःशंक।
परस्परविरुद्ध ते ऐक। न जाती एक मंत्रानें ॥ २० ॥

असें बोलोनी साविधान । सात मंत्र सांगून ।
गुप्त झाला भगवान । विप्र वंदून मागें फिरे ॥ २१ ॥
विप्र घरीं येऊन । सुस्नात होऊन ।
यथाविधी न्यास ध्यान । करून प्रयोग करितसे ॥२२॥
एक भूताचें झालें बंधन । ती एक चेष्टा जाऊन ।
पुत्र पावला समाधान । मंत्रविधानबळानें ॥ २३ ॥
विप्रें असा सात दिवस । उपाय केला तयास ।
बांधोनी सात भूतांस । टाकिलें ख्वास मंत्रबळें ॥ २४ ॥
ज्या ज्या भूताची जी जी चेष्टा । तो तो बद्ध होतां ती अदृष्टा ।
झाली अशा सातही चेष्टा । जाऊनी पुत्र मुक्त झाला ॥
मग तो अभ्यास करून । मुक्त झाला द्विजनंदन ।
असा क्षुद्र शास्त्रापासून । उपयोग जन करितात २६॥
मंत्रशास्त्रही उपकारक । ही तिसरी गाथा सुरेख ।
आतां चौथी गाथा ऐक । मन निःशंक होईल ॥ २७ ॥
सह्याद्रिनिकट मातापुर । तेथें वसे द्विजवर ।
विष्णुदत्तशर्मा पवित्र । कर्मशूर गृहस्थ ॥ २८ ॥
पत्नी तयाची सुशीला । सदा वागे अनुकूला ।
सदा आदरी पतिसेवेला । न हो प्रतिकूला कधींही २९
तो विप्र श्रीदत्तोपासक । असे कर्मठ मीमांसक ।
यथाकालीं आन्हिक । करी विवेकपूर्वक तो ॥ ३० ॥
अश्वत्थ असे त्याचे दारीं । ब्रह्मराक्षस वसे त्यावरी ।
भूतबळी भक्षण करीं । वैश्वदेवांतरी टाकितां ॥ ३१ ॥

१ माहुरी.

न देती जे बलिदान । करी तयांचें पीडन ।
भूतांचा हा स्वभाव म्हणून । वैश्वदेव करूनि बलि
द्यावा ॥ ३२ ॥
विष्णुदत्तें बळि देतां । नित्य येऊनी तो खातां ।
राक्षसा ये शांतता । शुद्धान्न सेवितां काय नोहे॥३३॥
एके दिनीं घेऊनी बळी । विष्णुदत्त आला वृक्षातळीं ।
ब्रह्मराक्षस तत्काळीं । अश्वत्थमूळीं उतरला ॥ ३४ ॥
भयंकर तो दिसत । विप्र झाला चकित ।
थरथरां कांपे भयभीत । म्हणे हें दुरित काय आलें ३५
रूप दिसे विशाळ । मुखही अति विक्राळ ।
जेवीं भेटतां शार्दूळ । गाय व्याकुळ होतसे ॥ ३६ ॥
व्याकुळ हो तसा द्विज । म्हणे हें काय विघ्न आज ।
रुसला कीं योगिराज । माझी लाज न ठेवी कीं॥३७॥
भ्याला ब्राह्मण जाणून । राक्षस शांत होऊन ।
बोले मंजुळ वचन । देतों वरदान राक्षस मी ॥ ३८ ॥
तूं देशी बलिदान । तें नित्य भक्षून ।
शांत झालों म्हणून । उपकार फेडीन तुझे आतां ३९
ऐसें राक्षसवचन । ब्राह्मणानें ऐकून ।
आपुलें कर्म म्हणून । करी स्तवन दत्ताचें ॥ ४० ॥
(पद) अहहा कौतुक हें लोकीं । दत्ता दाविसी कीं ॥ध्रु०॥
करितां नित्य तुझी सेवा । धरूनी मनीं ह्या सद्भावा ।
धर्महि आचरितां देवा । भूता प्रसन्न करविसि कीं ४२

जीं असती भूतें क्रूर। त्वत्स्मरणें तीं जाती दूर।
तुज स्मरतां आजि कां समोर। राक्षस घोर दाविसि
कीं ॥ ४३ ॥ (ओवी) ॥
राक्षस म्हणे ब्राह्मणा। काय ही तुझी विचारणा।
जरी तूं असती शाहणा। दैववाणा[1] होऊं नको॥ ४४॥
मनींचें भय सोडून। आतां घेईं वरदान।
नको करूं अनुमान। मी सुप्रसन्न देतसें ॥ ४५ ॥
विप्र ऐकूनी वचन। मनीं करी चिंतन।
जरी मागावें पुत्रसंतान। तरी निर्धन मी असें ॥४६॥
जरी मागावें धन। तरी राहाया नाहीं स्थान।
काय मागावें हें मन। एक निर्धार न करी ॥ ४७ ॥
जरी नश्वर ऐहिक। तरी मागावा कीं परलोक।
तोही नश्वर म्हणती लोक। निर्वाणसुख मागों कीं ४८
असा विप्र गडबडूनी। मग गृहांत जाऊनी।
संशयास्पद होऊनी। सांगे पत्नीप्रती सर्व ॥ ४९ ॥
पत्नी म्हणे प्राणेश्वरा। मागूं नका नश्वरा।
श्रीदत्ताची भेटी करा। ऐशा वरा मागावें ॥ ५० ॥
होतां श्रीदत्ताची भेटी। सर्व संपदा पडती गांठी।
याहूनि प्राप्ति नाहीं मोठी। योगी ज्यासाठीं तळतळती
पडतां दत्ताची गांठ। सर्व देव देतील भेट।
संपदा न सोडतील पाठ। मग आटाआट कासया ५२
असें प्रियेचें भाषण। ऐकतां तो ब्राह्मण।
म्हणे हेंचि शहाणपण। श्रीचरण पहावे ॥ ५३ ॥

---

१ दुर्दैवी.

तो तथास्तु म्हणून । पुनः बाहेर येऊन ।
म्हणे दत्ताचें दर्शन । व्हावें हें दान दे भूता ॥ ५४ ॥
भूत म्हणे नाम त्याचें । ऐकतां मन आमुचें ।
भितें तथापि वाचे । वदलों तें साचें करीन ॥ ५५ ॥
त्वां केला उपकार । जरी हा प्रत्युपकार ।
न घडे तरी धिक्कार । असो निर्धारपणें मला ॥ ५६ ॥
आतां यत्नें दर्शन । तुला निश्चयें करवीन ।
तूं धीर धरून । धरीं चरण दृढ त्याचे ॥ ५७ ॥
तो नानारूपधर । देवादिकां दुर्धर ।
भक्तिगम्य योगिवर । जया निर्धार मिळे तया ॥५८॥
जरी होईल दर्शन । तरी कृतकृत्य जीवन ।
निजकुला उद्धरोन । घेईल निर्वाण मानव ॥ ५९ ॥
राक्षस असें बोलुनी । गुप्त होई तत्क्षणीं ।
ब्राह्मण आश्चर्य पाहुनी । घरीं येवूनी राहिला ॥ ६० ॥
मद्याचे दुकानांत । एकदां पातला दत्त ।
राक्षस तें जाणत । विप्राप्रत सांगतसे ॥ ६१ ॥
म्हणे विप्रा त्वरें जावें । श्रीच्या पदीं लागावें ।
मागें पुढें न पाहावें । तरीच गावेल पद त्याचें ॥ ६२ ॥
उन्मत्तसा मद्यापणीं[१] । जो फिरे त्याचे चरणीं ।
लागें निश्चय करूनी । न करीं मनीं अनुमान ॥ ६३ ॥
ऐकूनी विप्र धांवत । तसाचि देखिला उन्मत्त ।
दुर्गंधांग मक्षिकावृत । म्हणे हा अवधूत होय कीं ६४

१ मद्याचे दुकानांत.

आधीं जातीचा भूत । तया काय ठावा दत्त ।
लोक हांसतील निश्चित । पाय धरितां मद्यप्याचे ॥६५॥
मनीं विकल्प येतां असा । दत्त गुप्त झाला सहसा ।
विप्र तळतळे जसा मासा । म्हणे कसा मी दुर्दैव ॥६६॥
जरी असता हा उन्मत्त । तरी न होता गुप्त ।
राक्षसें हाचि दत्त । म्हणोनि निश्चित दाविला ॥६७॥
कशी माझी दुष्टवासना । कसा दावूं भूता वदना ।
पत्नी म्हणेल भक्तिहीना । कां निधाना दवडिलें॥६८॥
असा अनुतप्त होउनी । विप्र आला परतूनी ।
भूत म्हणे धिक्कारूनी । तुझा मद्वचनीं न विश्वास ६९
असो पुनः अजुनी । दत्ता दावीन दुरोनी ।
सावधान होवोनी । लागे चरणीं धीरानें ॥ ७० ॥
मग कांहीं काल गेल्यावर । स्मशानीं खेळे योगेश्वर ।
हाक मारूनी असुर । विप्राप्रती सांगतसे ॥ ७१ ॥
तुझा देव स्मशानीं बसून । अंगीं धूळ माखून ।
बरोबर कुत्रे घेऊन । करी क्रीडन कौतुकें ॥ ७२ ॥
तो जाणे आत्माराम । आत्मक्रीड उत्तम ।
ज्या भजती मुनिसत्तम। मुक्तिधाम तेंचि जाण ॥७३॥
जाणावया तयाची गती । भूतांची काय शक्ती ।
मीं पूर्वी केली भक्ती । म्हणोनी युक्ती सांगतों॥७४॥
मी भक्त असोन । विप्रांचा केला अवमान ।
त्या पापें असा होऊन । राहिलों तरी स्मृती असे ७५

मग विप्र जाय स्मशानीं । दत्त मारी अस्थी घेऊनी ।
मरणभयें पळे सदनीं । भूत निर्भर्त्सूनी वदे तया ७६
मिथ्याभूत देहा भुलून । पाप्या देवा देशी सोडून ।
तथापि दावितों अजून । यापुढें जाण दैव तुझें ॥७७॥
मग पुनः एके दिनीं स्मशानीं । मृतखरमांस तोडुनी ।
कुत्र्या कावळ्या दे वांटूनी । त्या पाहूनी विप्रातें जाणवी॥
पत्नी म्हणे व्हा सादर । विप्र म्हणे मी न सोडी धीर ।
भूत म्हणे जरी योगेश्वर । देईल वर तये वेळीं ॥७९॥
दर्शश्राद्धीं यावया क्षण । आलों तुम्हीं घ्यावें आमंत्रण ।
असें मागावें वरदान । विप्र तथास्तु म्हणोन निघाला॥
स्मशानीं विप्र येऊन । तशीच मूर्ती पाहून ।
जाऊनी दृढ धरी चरण । न सोडी ताडन करितांही ॥
म्हणे दत्त कां पाद धरिसी । विप्र म्हणे आलों क्षण यावयासी ।
येरू म्हणे भ्रष्टासी । कां देशी श्राद्धीं क्षण ॥ ८२ ॥
मी धर्माधर्मवर्जित । विप्र म्हणे हें यथार्थ ।
परमात्मा तूं समर्थ । तुला किमर्थ धर्माधर्म ॥ ८३ ॥
हांसोनि ॐ तथा म्हणे दत्त । निजस्वरूप दाखवित ।
कुत्रे होती श्रुती मूर्तिमंत । वायस होत शास्त्रें तीं८४
योगभूमी दिसे स्मशान । पाहतां चकित झाला ब्राह्मण ।
दत्त म्हणे होतां मध्यान्ह । स्नान करूनी येतों मी ८५
पंक्तियोग्य असेल ब्राह्मण । तरीच मी करीन भोजन ।
विप्र तथास्तु म्हणोन । वंदन करूनी घरीं आला॥८६॥

राक्षसाप्रती येऊन। सर्व सांगे वर्तमान।
पंक्तियोग ब्राह्मण। आणूं कोठून शोधूनी ॥ ८७ ॥

भूत बोले अग्नि आदित्य। पंक्तियोग्य असती तथ्य।
तुझें कार्य झालें सत्य। माझें अगत्य स्मरण करी॥८८॥

विप्र सदनीं येऊन। भार्येप्रती सांगे सर्व विस्तारून।
तीही अत्यंत हृष्ट होऊन। पाक करून राहिली ॥८९॥

तंव मध्यान्हीं पातले दत्त। म्हणती अजूनी विप्र न दिसत।
विप्र देखूनी स्वरूप अद्भुत। पाहे विस्मित होऊनी ॥

तंव पत्नी आसन देऊन। म्हणे करावें उपवेशन।
सत्वर येतील ब्राह्मण। तथास्तु म्हणून दत्त बसे॥९१॥

पत्नी बाहेर येऊन। सूर्या प्रार्थी हात जोडून।
भो सर्वात्मन् कश्यपनंदन। जीवां चेतन करिसी तूं॥
ब्राह्मणांचें तूं दैवत। रूपांतरें येऊनी त्वरित।
श्राद्धीं क्षण घ्यावा निश्चित। अत्रिसुत वाट पाहे ९३
असी प्रार्थना ऐकून। विप्ररूप घेऊन।
सत्वर उतरला अरूण। तया आसन देई सती ॥९४॥
दत्त म्हणे षड्दैवत। दर्शश्राद्ध हें निश्चित।
तीन विप्र पाहिजेत। तिसरा येतो म्हणे सती ॥९५॥
अग्निशाळेंत जाऊन। प्रार्थी सती हात जोडून।
अग्ने तूं गृहपती म्हणून। प्रख्यात होसी कर्माध्यक्ष९६

तुला असो गृहाची लाज । तूं होवोनी द्विज ।
श्राद्धीं क्षण घेईं आज । योगिराज वाट पाहे ॥ ९७ ॥

असें प्रार्थितां अग्नी विप्र होऊन । देवस्थानीं बैसला येऊन ।
विप्रें संकल्पादि करून । केलें श्राद्ध यथाविधी ॥ ९८ ॥

तीन देव तृप्त झाले । पितर सद्गतीतें पावले ।
द्विजें अष्टोत्तरशतनामें स्तविलें । दत्ता वंदिलें प्रेमानें

विप्र म्हणे माझी मती अल्प । जरी माझे मनीं विकल्प ।
देवा तूं सत्यसंकल्प । माझें निर्विकल्प मन केलें १००

धन्य हे माझे नेत्र । हें रूप पाहोनी झाले पवित्र ।
हें धन्य माझें गात्र । कुळगोत्र पवित्र करी ॥ १०१ ॥

मी तो कःपदार्थ । तुम्ही भगवान् समर्थ ।
पूर्ण केले मनोरथ । झालों कृतार्थ कुळासह ॥ १०२ ॥

राक्षसाच्या वचनें करून । देखिले म्यां हे चरण ।
दत्त म्हणे रे ब्राम्हणा । तो राक्षस जाण भक्त माझा॥

दुर्दैवें दुर्गत झाला । हें उच्छिष्ट देईं त्याला ।
तोही जाईल सद्गतीला । घे मुक्तीला स्त्रियेसह तूं १०४

माझी भक्ती दुर्लभ जाण । ती तुला मिळाली दैवेंकरून।
तूं इहपर भोग भोगून । सायुज्य निर्वाण घेशील १०५

असें म्हणोनी श्रीदत्त । विद्या परोपकारार्थ देत ।
कामगती विमान दे सविता । भाग्यसंपदा दे अग्नी ॥

आज्ञा घेऊनी तिघे जाती । विप्र दत्ता चिंती चित्तीं ।
उच्छिष्टाशनें राक्षसा ये गती । ये जीवनमुक्ती सस्त्रीक
विप्रा ॥ १०७ ॥

करितां मीमांसोक्त कर्म । विप्रा मिळालें अलभ्य शर्म ।
शास्त्राचें जो जाणील वर्म । सर्व धर्मफळ घे तो १०८॥

इति श्रीमत्परमहंसवासुदेवानंदसरस्वतीविरचिते
श्रीदत्तमाहात्म्ये नवमोऽध्यायः ॥ ९ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

# अध्याय दहावा

श्रीदत्तात्रेयाय नमः ॥

गुरु म्हणे परमपवित्र । विष्णुदत्ताची गाथा विचित्र ।
जो दत्तभगवान् स्वतंत्र । होतो परतंत्र भावभुकेनें १॥
अद्यापि यज्ञ ज्याला । तृप्ती न करिती तयाला ।
तृप्तीचा ढेंकर आला । श्राद्धान्न जेवितां हर्षानें ॥ २ ॥
धन्य ती सुशीला सती । दत्ता जेवूं वाढी जी स्वहस्तीं।
आग्रह करूनी निगुती । दीक्षिता गती न ये ही ॥३॥
धन्य तो विष्णुदत्त । ज्याचें परम शुद्ध चित्त ।
आराधोनियां श्रीदत्त । उद्धरिलें समस्त कुळ ज्याणें ४
धन्य तोही राक्षस । आपणासह विप्रास ।
उद्धरी ऐशा परम हिनास । दावी तो खास परम गुरु॥
श्रीदत्तें विष्णुदत्तावर । अनुग्रह केला हा थोर ।
करावया परोपकार । दयेनें वर विद्या दिधल्या ॥ ६ ॥
ज्या ज्यावरी अनुग्रह करी । तो तरे या संसारीं ।
विष्णुदत्तासम उपकारी । ब्रह्मांडोदरी विरळ ॥ ७ ॥
ग्रहभूत डचकती । विष्णुदत्ता देव भीति ।
नुरवी लोकांची खंती । महामती दत्तवरें ॥ ८ ॥
आतां ऐक देवनाथा । पांचवी असे हे गाथा ।
कर्मविपाकाची कथा । मोक्षपंथा मिळेल ॥ ९ ॥
हरिशर्मा विप्र गोदावासी । एक पुत्र झाला त्यासी ।
अल्पवय असतां तयासी । मातापितयासी मृत्यु आला

धनी होता म्हणून । तयाचें जाहलें लग्न ।
परि व्याधिग्रस्त दुःखमग्न । सदा उद्विग्न मन ज्याचें ॥
उपजतांचि बरोबर गुल्मरोग । तेरावे वर्षीं क्षयरोग ।
अठरावे वर्षीं जलोदर रोग । सर्वांग निस्तेजस्क झालें ॥
एकुणीस वर्षें होतां अतिसार । कासश्वास बरोबर ।
पुढें झाला भगंदर । मग त्रिदोषें जोर केला ॥ १३ ॥
करितां औषधदान । मृत्युंजयजप हवन ।
ग्रहदेवांचें अर्चन । करितां रोगांचें शमन न झालें १४
त्याची भार्या सोळा वर्षांची । ऐकूनि कीर्ति विष्णुदत्ताची ।
येऊनि पाउलें धरी त्याचीं । सौभाग्यदान द्या म्हणे ॥
माझा पती वीस वर्षांचा । त्याला गुल्मरोग जन्माचा ।
क्षयरोग आठ वर्षांचा । तीन वर्षांचा जलोदर ॥ १६ ॥
एक वर्षाचा जीर्णज्वर । षण्मासांचा अतिसार ।
चौमासांचा भगंदर । त्रिदोष थोर वाढला आतां १७
केले अनेक उपाय । तरी न झालें आरोग्य ।
मला द्यावें सौभाग्य । तुम्ही सभाग्य दत्तभक्त ॥१८॥
असी प्रार्थना ऐकून । तिचे सदनीं येऊन ।
तया विप्रा पाहून । बोले वचन विष्णुदत्त ॥ १९ ॥
पूर्वपापें सर्व रोग होती । प्रायश्चित्तें पापें शमती ।
कर्मविपाकीं हे ख्याती । ऋषिसंमती अशीच असे २०
ब्रह्मवधदोषें क्षय झाला । द्वादशाब्द प्रायश्चित्त कीजे तयाला ।
देवद्रोहें गुल्म झाला । षडब्द तयाला प्रायश्चित्त ॥२१॥

जलोदरा द्वादशाब्द । जीर्णज्वरा एकाब्द ।
भगंदरा एकाब्द । योजी अब्द अतिसारा ॥ २२ ॥
पत्नीकरवीं विष्णुदत्त । करवी असें प्रायश्चित्त ।
ज्या ज्या रोगांचें जें जें प्रायश्चित्त । तें तें करितां तो तो रोग जाई ॥ २३ ॥
त्रिदोषावरी रसायन । देतां त्याचें निरसन ।
जाहलें तेव्हां तो ब्राह्मण । बैसला उठोन सुखानें ॥२४॥
त्याचें हृदय स्पर्शोन । विष्णुदत्त मंत्र म्हणोन ।
तया देई आशीर्वचन । मनीं स्मरोनी श्रीदत्ता ॥२५॥
मग त्या द्विजा आरोग्य । आयुष्य प्रजा ऐश्वर्य ।
यश दिव्यगती वीर्य । मिळालें औदार्य विप्रवरें॥२६॥
दत्तपदीं दृढ भक्ती । मिळाली उत्तम मुक्ती ।
निर्मळ जाहली मती । मंत्रशक्ती अशी हे ॥ २७ ॥
विप्रस्त्री म्हणे विष्णुदत्ता । त्वां सौभाग्यदान दिलें आतां
यथेच्छ घेई वित्ता । विष्णुदत्त नको म्हणे ॥ २८ ॥
तूं केवळ माझी कन्या । होसी निश्चयें विश्वमान्या ।
पतीसेवनें हो धन्या । तुम्हा अन्या गती नाहीं ॥२९॥
स्वप्नींही परपुरुषा न देखे ती । जाण ते उत्तम सती ।
बंधुसमान नरां देखे ती । मध्यम सती जाणावी॥३०॥
परपुरुषा पाहुनी । उपजे काम जरी मनीं ।
राहे प्रयत्नें आवरूनी । कनिष्ठ सती ती जाण ॥३१॥
परपुरुषा भोगी नारी । ती जारिणी निर्धारी ।
ती विधवा होई जन्मांतरीं । पुनः पुनः निश्चित॥३२॥

जी जारकर्म करी। ती कुलत्रय घाली रौरव घोरीं।
स्वयेंही नरकीं कष्ट भारी। भोगी ती नारी दुर्भगा ३३
यास्तव साध्वी तूं आतां। धरीं पतीच्या चित्ता।
स्वप्नींही न सोडीं सद्वृत्ता। मिळेल सुभगता अखंडित
असा उपदेश करूनी। निस्पृह तो ये स्वभवनीं।
विप्रा कर्मविपाक शास्त्रेंकरूनी। रोग जाऊनी ये सद्गती॥
प्रायश्चित्तें रोगनाश। मग आरोग्य दे रस।
तसा शास्त्रें होतां अविद्यानाश। प्रबोध ब्रह्मरस देतसे॥
जरी फळाची लालुची। शास्त्रीं दाविली साची।
ती मना वळवावयाची। युक्ती शास्त्राची जाणावी ३७
एक पुत्र बहु गोड खातां। रोगी झाला त्याची माता।
त्या निंब पाजी तो तत्वता। न पिये माता तया बोले॥
बाळा निंब जरी कडू। हा पितां तुला देईन लाडू।
हें ऐकतां निंबरसाचा गडू। पिये तो लाडू मिळेल म्हणूनी
हातीं लाडू देउनी। अपथ्य होईल म्हणूनी।
युक्तीनें घे काढूनी। त्यापासूनी दयाळु माय ॥ ४० ॥
लड्डूकासारिखें गौण फळ। आरोग्य हें मुख्य फळ।
भवार्त हा जेवी रोगी बाळ। श्रुती कनवाळ मातेपरी॥
शास्त्र नव्हे हें स्वर्गार्थ। नव्हे हें वशीकरणार्थ।
नव्हे कामभोगार्थ। शत्रुघातार्थ नव्हे हें ॥ ४२ ॥
शास्त्र बुद्धिशुद्धी करी। युक्तीनें भ्रम निवारी।
एतदर्थ अवधारी। साहावी गाथा बरी असे ॥ ४३ ॥

सह्याद्रीचे उत्तरेस । विप्र एक करी वास ।
एके दिनीं मित्रानें त्यास । आपल्या गांवास पाचारिलें॥
त्याची भार्या सुरूपा असे । तियेसी तो सांगतसे ।
मला मित्रानें पाचारिलें असे । एक मास रहावया ४४
त्वां सुखें राहावें घरीं । मी येईन मास लोटल्यावरी ।
तें ऐकूनियां नारी । पाथेय त्याकरीं देतसे ॥ ४६ ॥
तें घेऊनी तो निघाला । ती स्त्री स्नाना आली नदीला।
मार्गीं अश्वत्थीं झोटिंग बैसला । तेणें ती अबला देखिली
ब्रह्मचारीदर्शन । जो मरे कामार्त ।
तो होय झोटिंग भूत । कामलंपट दुर्धर्ष ॥ ४८ ॥
भूतवर्तमानज्ञान । भूतांला येतें स्पष्ट कळून ।
तिचा पती गेला हें जाणून । पतिसा होऊन ये घरीं ॥
त्याची भार्या पतिव्रता । नेणें तयाचिया कपटा ।
पती आला जाणूनि त्वरिता । हास्यवदनें पुढें आली ॥
तया आसन देऊन । पादप्रक्षालन करून ।
तें तीर्थ शिरसा वंदून । वायू घालूनी श्रम वारी॥५१॥
मंद मंद वाक्यें बोले । त्वरित कां आगमन झालें ।
किंवा अपशकुन पाहूनी फिरविलें । काढिलेलें प्रस्थान माघारा ॥ ५२ ॥
किंवा माझ्या स्नेहामुळें । प्रवासीं मन न वळे ।
सतीचें मन विरहें वाळे । तुम्हां कळे हे यथार्थ ॥५३॥
मग तो कपटी काय बोले । ज्याकारितां मीं गमन केलें
ते मार्गीं जवळचि भेटले । त्यांणीं फिरविलें माघारां॥

अशी ऐकूनी त्याची उक्ती। म्यां मागें फिरविली गती।
पुनः जाऊं मासांती। व्यर्थ तुला वियोगार्ति कां घ्यावी ॥
असें हें कपट्याचें वचन। तिणें सर्व ऐकून।
तें यथार्थ मानून। करी तत्सेवन निष्कपटें ॥ ५६ ॥
अशी तीशी वश करून। तो झोटिंग दुर्जन।
तीशीं रमे अनुदिन। पतीसमान होवोनी ॥ ५७ ॥
वय अवस्था रूप शीळ। शब्द वर्ण आकार सरळ।
चाल चालणूक सकळ। दावी ग्वळ पतीसमान ॥५८॥
रात्रौ करितां संग। तिचें चुरलें सर्वांग।
परी त्याचा पुरा न हो भोग। ज्या नये भंग सुरतयुद्धीं
त्याचें बळ दांडगेपण। भोगशक्ती दारुण।
विकारही विलक्षण। जाणूनि क्षीण पावे नारी ॥६०॥
ती नारी ग्विन्न होउनी। विचार करी आपुले मनीं।
भोग न देतां धर्महानी। देतां ग्लानी येतसे ॥ ६१ ॥
असें चिंतूनी हो दुःग्वित। त्याविषयीं संदेह वाटत।
परी सांगावया लाजत। हा अनर्थ इतरांप्रती ॥ ६२ ॥
प्रत्यहीं सर्वरात्र तिला भोगितां। तया नये तृप्तता।
तिये आली कृशता। तंव मास लोटतां पती आला ॥
तो द्वारीं पातला। तंव स्वसमान एक दारीं बैसला।
तो त्याणें पाहिला। संदेह झाला तयासी ॥ ६४ ॥
विप्र म्हणे तूं कोण। माझें रूप घेऊन।
माझे घरीं राहून। कापट्य करून साचा होशी ॥६५॥

झोटिंग बोले तया लागूनि । मी प्रख्यात घरधनी ।
तूं कोण आलासी कोठुनी । माझें रूप घेऊनी कपटिया
तूं कपटी तूं कपटी म्हणती । असे परस्पर भांडती ।
तेथें ग्रामस्थ लोक येती । तेही भुलती तयां पाहतां ६७
दोनी दिसती समान । खरा खोटा निवडी कोण ।
त्यांचें भांडण दारुण । निवारील कोण कसें ॥ ६८ ॥
विप्र म्हणे सर्वांसी । घरांतूनी दवडा यासी ।
तो म्हणे दारांतून यासी । घालवा तुम्ही ग्रामलोक ॥
माझी नारी सुंदर । भोगीन म्हणतो हा पामर ।
करुनी आला रूपांतर । परी मी घर न सोडीन ॥७० ॥
जरी करील हा बलात्कार । तरी मारीन मी ठार ।
हें ऐकूनी ते नर । कांहींच उत्तर न देती ॥ ७१ ॥
सासूसासरे विप्राचे । येऊनी पाहती रूप त्याचें ।
ते म्हणती विष्णुदत्ताचे । घरीं न्यावें या दोघां ॥७२॥
जेणें आराधिला दत्त । सर्वज्ञ तो विष्णुदत्त ।
सर्वांचें ओळखी चित्त । तो निश्चय करील ॥ ७३ ॥
मानलें हें वचन सर्वांस । सर्व म्हणती त्या दोघांस ।
घेऊनियां स्त्रियेस । विष्णुदत्ता भेटूं चला ॥ ७४ ॥
तेंही बरें म्हणून । स्त्रियेसी पुढें करून ।
तेही दोघे निघोन । विष्णुदत्ता येऊनी भेटले ॥ ७५ ॥
सर्व वर्तमान ऐकून । सत्कारें सर्वां बैसवून ।
झोटिंगालाही ओळखून । बोले वचन विष्णुदत्त॥७६॥

अवस्था वय रूप शील । स्वर वर्ण आकार सकळ ।
नाम गोत्र आणि कुल । सांगा आपुलें दोघेही ॥७७॥
दोघेही एकच बोलत । तयां म्हणे विष्णुदत्त ।
यांत काय करावें निश्चित । आतां उपाय करितों मी॥
जें करीन प्रमाणेंसी । तें मान्य होईल लोकांसी ।
क्षमा मागतों तुम्हासी । सभ्य म्हणती बहु बरें॥७९॥
असें बोलूनी विप्रमस्तकीं । श्वेतमुद्रा तो रेखी ।
लाल मुद्रा भूत मस्तकीं । मंत्रें रेखी सुव्यक्त ॥ ८० ॥
लोकां म्हणे मुद्रेवरून । चित्तीं धरा तुम्ही खूण ।
मंत्रित मुद्रा बदलून । न टाकवेल भूताला ॥ ८१ ॥
असें बोलूनी विष्णुदत्त । विप्रा बोलावूनी पुसे व्यक्त ।
भांडीं वस्त्रें धन घरांत । काय आहेत सर्व सांग॥८२॥
स्त्रियेच्या गुप्त खुणा । सर्व सांग तूं ब्राह्मणा ।
ब्राह्मण ह्मणे यथार्थ जाणा । न सांगवेल पात्रादिक ८३
स्त्रियेच्या बाह्य खुणा । ठाऊक असती आपणा ।
याह्वानि गुप्त खुणा । नेणे म्हणे सभेंत ॥ ८४ ॥
भूत सांगे पात्र वस्त्र धन । पात्रांचेंही वजन ।
म्हणे घराच्या इटाही जाण । सांगेन जरी पुसाल॥८५॥
बाह्यांतर खुणा स्त्रियेच्या । सांगतां मनीं सभ्यांच्या ।
शंका आली बोलती वाचा । हा न साचा यथार्थ॥८६॥
विष्णुदत्त म्हणे तयांसी । ह्या पंचक्रोशी क्षेत्रासी ।
प्रदक्षिणा करूनी आम्हापाशीं । पूर्वी येईल त्यासी
सत्य मानूं ॥ ८७ ॥

बरें म्हणोनी दोघे जाती । घटिकेनें पिशाच ये मागुती ।
म्हणे प्रदक्षिणा करूनी क्षेत्राप्रती । तुम्हांप्रती प्रथम
आलों ॥ ८८ ॥
सभ्य पुसती खुणा तया । तो यथार्थ सांगे तयां ।
ते म्हणती हें तों मनुष्या । घटिकेमध्यें न घडेल ॥८९॥
तेव्हां वाटतो हा भूत । दोन प्रहरांनीं विप्र येत ।
कांहीं कांहीं खुणा सांगत । तें यथार्थ सभ्य म्हणती ॥
विष्णुदत्त म्हणे ह्या पर्वतीं । सिद्ध किती वसती ।
पुसोनी त्यांच्या नामगोत्राप्रती । पर्वता प्रदक्षिणा
करावी ॥ ९१ ॥
प्रदक्षिणा करून । जो भेटेल पूर्वीं येऊन ।
सत्यपणा त्यावरून । आम्हां कळोन येईल ॥ ९२ ॥
असें ऐकूनी वचन । दोघे जाती निघोन ।
लोटितां घटिका दोन । प्रदक्षिणा करूनी भूत आला ॥
यथास्थित सर्व सांगे । विप्र पांच प्रहरांनीं ये मागें ।
विष्णुदत्ताप्रती सांगे । न भेटले सिद्ध कोणी ॥ ९४ ॥
हें ऐकतां विप्राचा विश्वास । झाला सर्व सभासदांस ।
विष्णुदत्त म्हणे तयास । परीक्षा एक शेष राहिली ९५
असें म्हणूनी लोखंडाची झारी । विष्णुदत्त तयापुढें करी
म्हणे इच्या मुखानें जाऊनी अंतरीं । तोटीनें बाहेर
निघावें ॥ ९६ ॥
असें म्हणूनी स्वांगरक्षा करी । भूत मुखानें प्रवेश करी ।
विष्णुदत्त मंत्र उच्चारी । आच्छादित करी दोनी तोंडें ॥

तोटी मुख बंद होतां । मार्ग न मिळे भूता ।
हें कृत्य पाहतां । सर्वांला आनंद झाला ॥ ९८ ॥
उचलतां जड झाली झारी । ती गाडिली पर्वतावरी ।
तो आनंद सर्वांतरी । न माये त्यावरी भक्त बोले॥९९॥
येतांच ओळखिला भूत । एकाएकीं करितां निगृहीत ।
माझ्यावरी समस्त । दोष निश्चित ठेवितील ॥ १०० ॥
म्हणोनी हा यत्न केला । सर्वांचा संशय फिटला ।
झोटिंगही बद्ध झाला । सोडविली अबला ब्राह्मणी१०१
शास्त्रकर्मैं करून । अज्ञानाचें करिती निरसन ।
तेणें संशय जाऊन । आत्मज्ञान जेंवी होतें ॥ १०२ ॥
तसा करितां हा उपाय । प्रथम झाला संशय ।
दुसरे वेळीं गेला संशय । झाला निश्चय तिसरे वेळीं ॥
आतां कोणी शब्द न ठेविल । आतां भूतही न सुटेल ।
साध्वीलाही दोष न लागेल । माझा बोल निश्चित१०४
ऐकूनी असें वचन । साधु साधू ह्मणोन ।
लोक जाती निघोन । सस्त्रीक ब्राह्मण वंदन करी१०५
म्हणे माझें अरिष्ट घालविलें । झोटिंगाचें बंधन केलें ।
माझें घर मला दिधलें । यश गाजविलें हें जगीं १०६
तुम्ही भगवद्भक्त समर्थ । तुम्हां मुळींच नाहीं स्वार्थ ।
तुमचें जिणें परार्थ । सार्थकता हीच तयाची ॥ १०७ ॥
असें म्हणूनी दंपती वंदिती । निरोप घेऊनी घरीं जाती
गुरू म्हणे इंद्राप्रती । शास्त्रें जाती संशय ॥ १०८ ॥

तंत्रशास्त्रें करून । होतां भ्रमनिरसन ।
सत्य कळलें हें तसेंचि जाण । ब्रम्हज्ञान होतसे १०९

इति श्रीमत्परमहंसवासुदेवानंदसरस्वतीकृते श्रीदत्त-माहात्म्ये दशमोऽध्यायः ॥ १० ॥

श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

## अध्याय अकरावा

श्रीदत्त समर्थ ॥

गुरु म्हणे इंद्रासी । शास्त्रें न घालवी जो भ्रमासी ।
मुक्ती न मिळे तयासी । गर्भवासीं पडे तो ॥ १ ॥
भूलोकांतूनी पर्जन्यांत । पर्जन्यांतूनी अन्नांत ।
अन्नद्वारा पितृशरीरांत । येऊनी राहे तीन मास ॥२॥
राही रेत होऊन । कामाग्नीनें तापून ।
ऋतुकाळीं होतां मैथुन । स्त्रीयोनींत प्रविष्ट होई ॥ ३ ॥
योनिरक्त विमिश्रित । राही गर्भाशयांत ।
दैवे वाढे वारेनें वेष्टित । न मरे कष्ट होतांही ॥ ४ ॥
अस्थि-स्नायु मज्जारेतानें । होती त्वचा मांस रक्त रक्तानें।
मोदका उकडतां त्या तऱ्हेनें । हा देह बने अमंगळ ५
मूत्राचें आधण विष्ठेचा दाथर । रेत रक्ताची उकड थोर
मातेची कूस हेंच पात्र । तयामाजी जठराग्नी उकडी॥
शुक्र अधिक असे जर । तरी उपजे खास नर ।
रक्त अधिक असे जर । नारीशरीर उपजेल ॥ ७ ॥
रक्त रेत समान होतां । खास ये नपुंसकता ।
शुक्र वायूनें भिन्न होतां । आवळे जुळे देह होती ॥८॥
अमंगळाहूनी अमंगळ । रजस्वलेचा विटाळ ।
तेथेंच उपजे बाळ । तो निर्मळ धुवूनी होय कीं ॥ ९ ॥
रेत रक्त जें एकत्र मिळतें । पांच रात्रीनें बुद्‌बुद होतें ।
सात दिवसांनीं पिशवी होते । पक्षानें फुगते तीच पैं॥

महिन्यानें होई कठीण । दों मासांनीं मस्तक निर्माण।
तिसरे मासीं पोट होवून । हस्तपादांकुर फुटती ॥११॥
चौथे मासीं त्वचा । पांचवे मासीं उद्गम नखांचा ।
साहावे मासीं नवछिद्रांचा । उद्भव होय अनुक्रमें १२
वायू पायापासून । अंतरीं राहे प्राण होऊन ।
सातवे मासीं ताळू फोडुनी । अंतरीं चेतन प्रवेश करी
मातेनें खातां अन्न । त्याचा रस नाभिछिद्रांतून ।
पोंचे पोटांत जाऊन । तेंचि जीवन गर्भासी ॥ १४ ॥
दोन्हीं हृदयें एक होती । तेव्हां डोहाळे उठती ।
अजीर्ण कृशता वांती । मातेला सुस्ती येनसे ॥ १५ ॥
निजकर्में भोगी हा नरक । परी तेथेंही ईश्वर संरक्षक।
स्तन होती पुष्ट कृष्ण मुख । ही पूर्वीं योजना दुग्धाची
दक्षिण कूस होतां थोर । समजावा जन्मेल पुत्र ।
वामकुक्षी होतां थोर । कन्या निर्धार जाणावी ॥१७॥
लोटतां नवमास । पूर्णत्व ये गर्भास ।
स्मरोनी पूर्व कर्मास । प्रार्थी ईश्वरास पोळूनी ॥ १८ ॥
सातवे मासापासून । होवूनियां चलायमान ।
अवाङ्मुख पीडून । वंदून बोले परमेश्वरा ॥ १९ ॥
देवा कर्म केलें गहन । त्याचें हें दुःख दारुण ।
भोगविलें त्वां मजलागून । पुरे शिक्षण आतां हें॥२०॥
दुर्गंधीनें कंटाळलों । जठराग्नीनें पोळलों ।
ह्या नरकांत लोळलों । शिणलों आतां सोडवी मज ॥

निजकर्में नानायोनी । येथें आलों भोगूनी ।
वाटे मला नरकाहूनी । गर्भवास हा महा कष्ट दे २२
आतां सोडवी येथून । यावरी पाप न करीन ।
देवा तुझें भजन करीन । तुला विसरें न कधींही ॥२३॥
असी स्तुति करितां । दशम मास प्राप्त होतां ।
सूतीदायूची लहरी उठतां । पडे योनिद्वारें किडा जसा
उपजतां स्पर्शे वात । ती स्मृती जाई अकस्मात ।
सोहं विसरूनियां पोत । राहे रडत कोहं कोहं ॥२५॥
बोलों नये पराधीना । न जाणती त्याच्या मना ।
विपरीत होती सर्व योजना । शयन पानादिकांच्या २६
बाल्यावस्था खेळांत जाय । विषयभोगीं तारुण्य जाय
तेव्हां धर्माधर्म दिसेल काय । संतांचे पाय न धरवती॥
स्त्री सांगेल तें प्रमाण । माता वाटे कीं वैरिण ।
ऐकाया शास्त्रपुराण । मनीं शीण येतसे ॥ २८ ॥
जसें मोगरीचें फूल । मावळे न लागतां वेळ ।
मनीं विषयांचा मांडितां खेळ । तारुण्य तत्काळ मावळे
ईश्वरभजनीं उतावेळ । न केली त्यांचें हें फळ ।
जरेस पाठवी काळ । काना जवळ ये ती टवळी ॥३०॥
जरा हळू कानीं सांगत । मान हालउनी हातें नाहीं म्हणत ।
मग ती पाडूनियां दांत । कान डोळे आंत ओढीतसे ३१
तसें पाहुनी तें बेरूप । पोरें जवळ घालिती हूप ।
त्याच्या मनीं ये कोप । आपोआप अपमान होतां ३२

मग म्हणूं जाई राम राम। तों होई लाम लाम।
जवळी ज्याला न पडे दाम। तो निकाम दुरावे ॥३३॥
पुन्हा काळचक्रीं पडे। परिभ्रमण पूर्ववत घडे।
जेव्हां मनींचा भ्रम उडे। तेव्हां सांकडे कडे पडती ३४
पूर्व संस्कारें जी प्रकृती। तदनुसार कर्मे घडती।
शास्त्राविणें न पालटे ती। म्हणूनी शास्त्रयुक्ती
आदरावी ॥ ३५ ॥
शास्त्रें होतां भ्रमनिरसन। जरी हातीं येईल ज्ञान।
स्थिरबोध न हो तंव जाण। भय दारुण वाटे कीं ३६
ऐक इंद्रा तूं आतां। सांगतों सातवी गाथा।
प्रतिष्ठानीं विप्र होता। झाला सूत तयासी ॥ ३७ ॥
योगभ्रष्ट तो पूर्वींचा। भय मानूनी द्वैताचा।
उन्मत्त झाला असोन साचा। व्यर्थ वाचाळपण करी ३८
लोकसंगा डरे तो। विषयां विष मानी तो।
मान न व्हावा म्हणूनी तो। राहे जडमूढ होवूनी ३९
माता म्हणे नायके सुत। विष्टामूत्रीं लोळत।
पिता म्हणे खचित। ग्रहग्रस्त हा होय ॥ ४० ॥
मग व्रतें करिती। नियमें देवा पूजिती।
हातीं रक्षा बांधिती। दानें देती विप्रांला ॥ ४१ ॥
वैद्यही औषध देती। तीर्थयात्रा जप शांति।
करिती आंगारे लाविती। भूतभीती मानूनी ॥४२॥
कांहीं नोहे उपयुक्त। लागलें महाभूत।
जें जगा चेष्टावित। तें बंधांत कैंवी ये ॥ ४३ ॥

अहं ब्रह्मास्मि उच्चारी । स्वयें झाला पंचाक्षरी ।
यापुढें बापुडा मंत्री । भागवतावांचुनी ॥ ४४ ॥
करितां उपाय फार । तो नये प्रकृतीवर ।
तो लोळे भूमीवर । मळमूत्र नेणे तो ॥ ४५ ॥
हगे मुते उभ्यानें । काय खाणें काय पिणें ।
हेंही तो मुळींच नेणे । त्याचें बोलणें न समजे ॥ ४६ ॥
न जाणे हिताहित । असीं जातां वर्षें आठ ।
मौंजीबंध करी तात । सांगे कानांत गायत्री ॥ ४७ ॥
संध्यावंदन न करी । जरी तया पिता मारी ।
तरी न जपे गायत्री । मैत्री न ठेवी कोणासी ॥४८॥
विष्णुदत्ता ऐकून । तया पुत्रा घेऊन ।
त्याचे घरीं जाऊन । बोलती वंदून मायबाप ॥४९॥
हा जन्मापासून । पडें जडसा होंवून ।
यासी उपाय योजून । पुत्रदान द्या आह्मां ॥ ५० ॥
आम्हा एकचि सूत । झाला कीं रोगग्रस्त ।
भूतत्रस्त कीं उन्मत्त । ग्रहग्रस्त कीं न कळे हा ॥५१॥
विष्णुदत्त तें ऐकून । तया पुत्रा पाहून ।
ब्रम्हनिष्ठ ओळखून । म्हणे पुत्रा ठेऊनी चला ॥ ५२ ॥
पिता म्हणे हा सुत । मुतेल ह्या यज्ञशाळेंत ।
तया म्हणे विष्णुदत्त । चला निश्चिंत आपुले घरीं ५३
बरें म्हणूनी ते जाती । विष्णुदत्त तयाप्रती ।
म्हणे कां घेसी ही भीति । काय चिंती चित्त
तुझें ॥ ५४ ॥

तूं कोणाचा कोण । येथें येण्याचें काय कारण ।
कां दाविसी हे दुर्गुण । तुज कोण मोहवील ॥ ५५ ॥
त्वां घरीं जावें आनंदें । मायबापा सुख दे ।
लोकसंग्रह सोडून न दे । या स्वच्छंदें काय लाभ॥५६॥
सोडूनी दे ह्या चेष्टा । तुझें काय करूं आतां ।
हें सांग तूं तत्वता । म्हणूनी माथां हात ठेवी ॥५७॥
हंसुनिया पुत्र बोले । विप्रा काय हें ऐकविलें ।
निजरूप माझें भलें । तें एकलें तूं जाणसी ॥ ५८ ॥
मूळीं न माझी उत्पत्ती । मायबाप कसे असती ।
कर्में ही आक्रिया हातीं । केवी केवी घडती बोल बापा॥
मी सच्चिदानंद व्यापक । प्रळयजळापरी एक ।
मी कोणाचा होवूं लेक । जावूं येवूं कुठें कसा ॥ ६० ॥
मी अन्न आणि अन्नाद । नाहीं भोग्य भोगस्वाद ।
मुळींच नाहीं भेद । परि छेद केवीं घडे ॥ ६१ ॥
जरी असतों परिच्छिन्न । तरी हा तुझा प्रश्न ।
मानितों मी समीचीन । सर्वथा न घडे असें ॥ ६२ ॥
देशकाल वस्तु व्यापून । मी असे संपूर्ण ।
मला परिच्छेद न । भेद न सर्वथा ॥ ६३ ॥
ऐकून हें वचन । विष्णुदत्त हर्षून ।
प्रेमें तया अलिंगून । गाढ वचन बोलतसे ॥ ६४ ॥
बापा तूं साच धन्य । असस्री सर्व देवमान्य ।
तुझ्यासारिखा कोण अन्य । तूं संन्यस्त साच मानी ॥

कोणीही पुरुष पाहे । कधींही अकर्मा न राहे ।
प्रकृतीस्वभावप्रवाहे । कर्म करिती हें निश्चित ॥६६॥
तरी करावें शास्त्राचरण । दुसऱ्यालाही तें शिक्षण ।
मिळेल त्याणें दूषण । कीं भूषण येईल ॥ ६७ ॥
जे वशिष्टादिक । ते ज्ञानी सम्यक ।
परंतु ते लौकिक । सर्वथा न टाकिती ॥ ६८ ॥
स्वयें आचरूनी । अन्या मार्ग दावूनी ।
ज्ञानभूमी धरूनी । पहिले मुनी राहिले ॥ ६९ ॥
पहिल्या योगभूमी तीन । योगी यांचे जागरण ।
मानिती चौथी स्वप्न । तेथें जाण ब्रम्हवेत्ता ॥ ७० ॥
भूमी धरितां पांचवी । ब्रह्मविद्वर पदवी ।
मिळे घेई जो सहावी । तो ब्रम्हविद्वरीयान ॥ ७१ ॥
पांचवी स्वल्प निद्रा । सहावी गाढ निद्रा ।
ही स्वयें न सोडी योगमुद्रा । परतः उत्थान होय जेणें॥
तुर्या ते सातवी । स्वतः परतः न उठवी ।
इच्या योगें ये पदवी । ब्रम्हविद्वरिष्ठसंज्ञक ॥ ७३ ॥
तो विधिनिषेधातीत । अजूनी तूं ती मात ।
नेणसी म्हणूनी भीत । करिसी व्यर्थ ह्या चेष्टा ॥७४॥
सुखी राहे जीवन्मुक्त । वागूनियां अनासक्त ।
करी कर्म शास्त्रोक्त । मुक्तसंग होवूनी ॥ ७५ ॥
येणें ज्ञान होय स्थीर । घडे लोकोपकार ।
ढिला होई अहंकार । शास्त्राधार असा असे ॥ ७६ ॥

अभिमान हाची बंध । सोडी त्याचा संमंध ।
हीच युक्ती म्हणती वुध । आत्मबोध होई जेणें ॥७७॥
ठेवितां स्वात्मदृष्टी । नोहे अहंममता भेटी ।
मानापमानाच्या गोष्टी । कैंवी पोटीं येती मग ॥७८॥
असी बाणतां स्थिती । विषयवासना नुठती ।
मना विकार केवीं होती । निरंहकृती राहतां ॥ ७९ ॥
असा जो समाहित । तोची मानिजे मुक्त ।
त्याची दृष्टी जेथें जात । तेथें होत समाधी ॥ ८० ॥
जो कर्मफळ सोडी । अहंकारा न जोडी ।
हो कां तो अज्ञ अनाडी । बंध तोडी निश्चयें ॥ ८१ ॥
आतां तूं तरी ज्ञाता । बंधाची नसे वार्ता ।
यापरी वागतां । केवी बद्धता येईल ॥ ८२ ॥
ज्याचें अवश चित्त । होई विषयासक्त ।
तो न होई मुक्त । घेई गुप्त मार तो ॥ ८३ ॥
ज्याचें स्वात्मनिष्ठ मन । तो विषयां भोगून ।
अलिप्त असे नित्य जाण । तया कोण बद्ध म्हणे ॥८४॥
परव्यसनीं जी नारी । घरधंदा करी जरी ।
जारसंग अंतरीं । ती घरीं वावरतांही ॥ ८५ ॥
तेवीं रूपीं विश्रांत । बाहेर वावरे मुक्त ।
तसा तूं अनासक्त । होई मुक्त बाळका ॥ ८६ ॥
मोक्ष नाहीं स्वर्गावरी । खालीं किंवा भूमीवरी ।
जो अहंकारा मारी । त्याचे अंतरीं मोक्ष वसे ॥ ८७ ॥

जाईचेंही फूल । चोळतां श्रम होईल ।
त्याहुनी सुखें करवेल । अहंकारत्याग तो ॥ ८८ ॥
मीतूंपणाची गती । जी उठे स्फूर्ती भ्रांती ।
ह्या मनाच्या चेष्टा निश्चिती । त्या न शिवती ज्ञात्याला
चित्तीं ठेवी हा बोध । न बाधेल मग संबंध ।
तुटेल तो कर्मबंध । हा निर्बंध न मानी ॥ ९० ॥
मग ज्ञान स्थिरावेल । शांती अंगीं बाणेल ।
मुक्तिपदीं डोलशील । माझा बोल साच मानी ॥९१॥
असें वचन ऐकून । बाळ चेष्टा दे सोडून ।
विष्णुदत्ताचे घरीं जाऊन । करी भोजन स्वस्थचित्तें ॥
सतीचे हातानें मिळतां अन्न । तयाचा श्रम गेला निघोन
त्याची शांत वृत्ती पाहून । झालें समाधान मायबापा॥
म्हणती जन्मापासून । जो धड न बोले वचन ।
त्याला न लागतां क्षण । सावधान केला विप्रें ॥ ९४ ॥
ते म्हणती विष्णुदत्ता । आम्हांवरी दया केली आतां ।
काय उपाय योजला सुता । जेणें स्वस्थता शीघ्र आली॥
आम्हां दिलें जीवदान । म्हणोनि घालिती लोटांगण ।
घरीं जाती आज्ञा घेऊन । बाळही सावधान वागे तो॥
शास्त्राचें एक तात्पर्य । अज्ञा पदोपदीं भय ।
संसार असतां ब्रम्हमय । वाटे मायामय तयासी ९७
स्वरूपातें भुलोनी । कर्तृत्व भोक्तृत्व वाढूनी ।
व्यर्थ जाते शिणूनी । हे अज्ञानी मूढपणें ॥ ९८ ॥

नथ गळसरींत ग्वोंविली । तिची विसर पडली ।
तसे असे ही बोली । चतुरीं जाणिली पाहिजे ॥ ९९ ॥
नथ गळ्यांत दावितां । ती म्हणे मिळाली आतां ।
तेवीं शास्त्रीं स्वात्मा कळतां । म्हणती आतां मिळाला।
शास्त्रें लहान थोर । सर्व असती बोधपर ।
असें गुरूचें उत्तर । ऐकोनी इंद्र नमन करी ॥ १०१ ॥
करा जी अपराध क्षमा । चित्तीं न ठेवा अतिक्रमा ।
असें म्हणूनी सुत्रामा। नमोनी स्वधामा चालिला १०२
श्रीदत्त म्हणे अर्जुना । ठेवी शास्त्रसारांशीं मना ।
शास्त्रापासुनी परोक्षज्ञाना । घेवूनि विज्ञाना पावसी॥
जीं कर्माचीं फळें बोलती । अणिमादी सिद्ध असती ।
तिकडे न द्यावी चित्तवृत्ती । नश्वर होती अंतीं ज्या ॥
सर्व शास्त्रें पाहून । स्वार्थ घ्यावा शोधून ।
हंस जेवीं पाणी टाकून । दुग्ध पिवून जाई तेवीं १०५
असें श्रीदत्ताचें वचन । सविस्तर ऐकून ।
तो कार्तवीर्य अर्जुन । बोले वंदून श्रीदत्ता ॥ १०६ ॥
सह्याद्रीवरी येवून । किंचित् जटांनीं आच्छन्न ।
जें पाहिलें हें श्रीवदन । तेणें सदन समृद्ध झालें ॥१०७॥
हें वैराग्यही झालें । शास्त्रतत्व ऐकिलें ।
आतां ज्ञान विज्ञान भलें । कृपेनें कळलें पाहिजे॥१०९॥
इति श्रीदत्तचरिते एकादशोऽध्यायः ॥ ११ ॥

# अध्याय बारावा

श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

गुरू म्हणे दीपकाप्रती। अर्जुनाची परिसोनी विनंती।
श्रीदत्त तयाप्रती। विस्तरें सांगती उत्तर ॥ १ ॥
संसारी हे मूढ जीव। शास्त्रावरी न ठेविती भाव।
त्यावरी अवकृपा करी देव। तेणें भवभ्रमण हो ॥ २ ॥
स्वयें चिद्धन साक्षी असून। तीनी अवस्थेहूनि भिन्न।
स्वयें अनुभव येत असून। जाती विसरून स्वरूपा ॥
मी कर्ता मी दाता। म्हणती मी सुखदुःखभोक्ता।
असी घेवूनी मूढता। जगीं भिन्नता पाहती ॥ ४ ॥
ही केवळ होय भ्रांती। ही जातां दूर नाहीं मुक्ती।
हाही आत्म्यावर उपचार म्हणती। जे वेदांती निष्णात ॥ ५ ॥
मुळीं बंध नाहीं जाण। मग मुक्ती खरी म्हणे कोण।
अज्ञबोधार्थ हें निरूपण। शास्त्रपुराण करीतसे ॥ ६ ॥
जें सत्य ज्ञान अनंत। ब्रम्ह एक सदोदित।
भ्रमें नामरूपें निश्चित। असती कल्पीत ब्रम्हावरी॥७॥
दिसे जो हा सर्व लोक। तें पूर्वीं ब्रम्ह होतें एक।
भेदरहित देख। सच्चित्सुखस्वरूप। ॥ ८ ॥
न दुजें तत्समान। त्याला सजातीय भेद कोठून।
दुसरें नाहींच म्हणोन। विजातीय भेद नसे तया॥९॥

सच्चिदानंद ब्रम्ह खास । तें असे अखंडैकरस ।
स्वगत[1]भेद तयास । नाहींत खास वृक्षापरी ॥ १० ॥
वृक्षा पत्र एकदेशीं । फळ पुष्प एकदेशीं ।
ब्रम्ह सच्चिदानंद सर्वांशीं । दृष्टांत तयासी रक्तोष्ण
प्रकाशदीप ॥ ११ ॥
निर्विकारा नये विकार । म्हणोनी करितां मायेचा
अंगिकार ।
ती आत्मशक्ती निराकार । तिणें नये द्वैतपणा ॥१२॥
शक्ती शक्ताहूनी भिन्न नसे । लोकीं ठावें असे ।
तिणें द्वितीयत्व येतसे । असें कसें म्हणावें ॥ १३ ॥
कोणी म्हणती पहातां माती । ईचे पुढें घडे होती ।
तेव्हां नाम आकृती । पूर्वीं चित्तीं येतसे ॥ १४ ॥
तसें येथें मानितां । पूर्वीं कांहीं नव्हतां ।
जिव्हा मन नसतां । नामआकारता कोण करी ॥१५॥
तें अद्वितीय ब्रम्ह एक । संकल्पानें झालें स्वयें अनेक ।
म्हणोनी एकाच्या ज्ञानें सकळीक । कळे विवेकं[2] होतांची
घेवूनियां माती । कुंभार घडा करी हातीं ।
हा आरंभवाद म्हणती । उपादान माती निमित्त
कुलाल ॥ १७ ॥
ईश्वर निमित्त उपादान । उभ[3]यरूप होवून ।
करी जग निर्माण । निर्विकारपण न जातां ॥ १८ ॥

१ पत्रपुष्प हे गतभेद. २ विचार. ३ निमित्त ईश्वर, उपादानही ईश्वर.

ईश्वर कोळ्याचे परी । विश्वोत्पत्ती संहार करी ।
याला कुंभारापरी । आरंभवाद न घडे ॥ १९ ॥
आम्लानें होतें दुधाचें दहीं । हा परिणामवाद[1] तोही ।
ह्या निर्विकार आत्म्याला नाहीं । म्हणूनी विवर्तवाद बोलती ॥ २० ॥
रूपें भासे शिंपीवर । किंवा सर्प दोरीवर ।
तसा हा जगदुत्पत्तिप्रकार । निर्विकार आधिष्ठान तें ॥
जीव आणि ईश्वर । यांचा भेद परस्पर ।
चितीं अविद्या तद्भेद परस्पर । हे सहा प्रकार अनादी मानिले ॥ २२ ॥
कल्पित जाण भेद हाही । मुळीं अविद्याच नाहीं ।
मग कैंची भेदवार्ता ही । कांहींच नाहीं स्वरूपीं भेद ॥
तूं ह्मणशी कीं मिथ्या भ्रम । मग किमर्थ हा श्रवणादि श्रम ।
जरी होय मिथ्या भ्रम । महा अनर्थ घडवी हा ॥२४॥
ह्मणूनी योगादिकें करून । करावें याचें निरसन ।
जसा अग्नी मलिन सुवर्ण । मळ जाळून स्वच्छ करी२५
तसा भ्रम मळ योगें जातां । स्वयें प्रकाशे स्वयंप्रकाशता
तेथें कैंची द्वैतवार्ता । आभासमात्रता जयाची ॥ २६ ॥
गारुड्यानें दाविलें जळ । त्याणें न भिजे भूमंडळ ।
परि भुलती लोक सकळ । हें जळ म्हणोनी ॥ २७ ॥

१ वस्त्वंतर होणें.

तेवीं जाण हें जगद्वैत । भ्रमची असे समस्त ।
संसारही भ्रमभूत । भ्रमजात सुख दुःख ॥ २८ ॥
हा भ्रम नष्ट होतां । मग कैंची द्वैतवार्ता ।
प्रारब्धाची काय कथा । भ्रम नासतां अर्जुना ॥ २९ ॥
कर्मादिकें व्यर्थ श्रम । त्याणें न निरसे भ्रम ।
वस्तुज्ञानाचा क्रम । धरितां भ्रम दुरावे ॥ ३० ॥
जो ज्ञानयोग पर । तो करी भ्रम दूर ।
तोचि आनंद निर्भर । तोचि नर कृतकृत्य ॥ ३१ ॥
असें ऐकुनी वचन । वंदूनी बोले अर्जुन ।
कसें साधावें योगज्ञान । कृपा करोन सांगावें ॥३२॥
ब्रह्म असोनी एक । कसें झालें अनेक ।
केवी आलें हें दुःख । हा विवेक मज व्हावा ॥ ३३ ॥
श्रीदत्त म्हणे अर्जुना । स्वरूपीं नाहीं कल्पना ।
नित्यमुक्त निर्विकारपणा । तो कोणा न मोडवे ॥३४॥
शुद्धसत्व प्रकृतींत । तेंची ब्रम्ह प्रतिबिंबित ।
तोची जगाचा तात । श्रुतिसंमत ईश्वर ॥ ३५ ॥
ब्रम्हाविष्णुरुद्ररूपें धरी । तोचि सृष्टी स्थिती संहार करी
तोची राहे सर्वांतरीं । तोचि तारी भक्तजनां ॥ ३६ ॥
शुद्धसत्वगुणी त्याची शक्ती । तिला विद्यामाया म्हणती
ही उपाधिभूत प्रकृती । सर्वज्ञता येती इच्या योगें ३७
मलिनसत्व जी प्रकृती । त्यांत ब्रम्हप्रतिबिंबें पडती ।
त्यांना जीव असें म्हणती । ते असती पराधीन ॥३८॥

ते व्यष्टीभूत किंचिज्ज्ञ । समष्ट्यभिमानी जो सर्वज्ञ ।
तो स्वतंत्र ईश्वर प्राज्ञ । वागवी अज्ञ जीववर्गा ॥ ३९ ॥
मायेच्या शक्ती दोन । आवरण विक्षेप म्हणोन ।
स्वरूपा ठेवी आच्छादून।म्हणूनी आवरण ह्मणती तया
ईश्वर आणि मुक्त यांसी । सोडून इतर जीवांसी ।
आवरण पडे निश्चयेंसी । मग मी अज्ञ असी प्रतीत ये ।
असें होतां अज्ञान । कर्तृत्व भोक्तृत्व ये लागून ।
हें विक्षेपाचें कार्य जाण । नानायोनी भ्रमणरूप ॥४२॥
विक्षेप हें सुख दुःख । विक्षेपची भूतभौतिक ।
कार्य जें सकळीक । विक्षेप एक पसरला ॥ ४३ ॥
जैसी मंदांधकारीं । पडली असतां दोरी ।
तें नेणतां अंतरीं । वाटे खरोखरी हा सर्प ॥ ४४ ॥
जो हा विकल्प घे मन । हेंची होय आवरण ।
मग धडकी कंप होय दारुण । तो विक्षेप जाण अर्जुना
दोरीचें होतां ज्ञान । होय सर्पभ्रमनिरसन ।
मग विक्षेप राहिला म्हणून । तया कोण गडबडे॥४६॥
जें असे जीवा अज्ञान । त्याचें होतां निरसन ।
जीवा न होय भ्रमण । विक्षेपानें सर्वथा ॥ ४७ ॥
ब्रह्मापासुनी प्रकृती । ती पासूनी महत्तत्वोत्पत्ती ।
महत्तत्वापासूनी अहंकारोत्पत्ती । त्यापासुनी होती पंचभूतें ॥४८॥
आकाश हो शब्दगुण । वायु शब्दस्पर्शगुण ।
तेज शब्दस्पर्शरूपगुण । जलाचे गुण शब्दस्पर्शरूपरस

शब्दस्पर्शरूपरसगंधांनीं । युक्त असे मेदिनीं ।
भूतांच्या सत्वगुणांशांनीं । ज्ञानेंद्रियें पांच होती ॥५०॥
श्रोत्र त्वचा आणि नयन । रसना आणि घ्राण ।
हीं ज्ञानेंद्रियें जाण । आतां अंतःकरण ऐक ॥५१॥
भूतसत्वांश एकत्र होवून । होतसे अंतःकरण ।
वृत्तिभेदें पंचधा जाण । अंतःकरण निर्विकल्प ॥५२॥
संकल्पात्मक तें मन । निश्चयात्मक बुद्धि जाण ।
चित्त करी अनुसंधान । करी मीपण अहंकार तो ॥५३॥
याचा अंतर्भाव करून । कोणी म्हणती हीं दोन ।
आतां रजोगुणें जाण । कर्मेंद्रिय प्राण झाले ॥ ५४ ॥
वाचा हस्तपाद । लिंग आणि गुद ।
हीं कर्मेंद्रियें निर्वाद । प्राणाचे भेद पांच हे ॥ ५५ ॥
प्राण अपान व्यान । उदान आणि समान ।
हे पांच वायू जाण । क्रियात्मक असती हे ॥ ५६ ॥
ज्ञानकर्मेंद्रिय प्राण । मिळोनी लिंगदेह जाण ।
हाचि ब्रह्मांडीं करी भ्रमण । जोंवरी ज्ञान न होय ५७
अज्ञान हें कारण शरीर । आनंदमय कोशाचें हें घर ।
लिंगाख्य सूक्ष्म शरीर । हेंही घर तीन कोशांचें॥५८॥
कर्मेंद्रिय पांच । रजोगुणी प्राणही पांच ।
हा प्राणमय कोश साच । करवी हाच कर्मातें ॥५९॥
ज्ञानेंद्रिय मनासहित । मनोमय कोश ख्यात ।
बुद्धि ज्ञानेंद्रियांशीं सहित। कोश हा प्रथित विज्ञानमय

आकाशादि भूतांचे । दोन दोन भाग करूनी साचे ।
पुनः चार चार अर्ध्यांचे । भाग करोनी ते एक ॥ ६१ ॥
आपुल्या भागीं न मिळवितां । प्रत्येकाच्या अर्धभागीं योजितां ।
पंचीकरण होई तत्वतां । त्यापासूनीच सर्व शरीरें ६२
रोम त्वचा मांस नाडी अस्थी । हे पृथ्वीचे अंशें होती।
उदकाचे पांच असती । लाळ रक्त स्वेद शुक्र मूत्र॥६३॥
क्षुधा तृषा आणि कांती । निद्रा आळस हे होती ।
तेजाचे अंश निगुती । ऐक आतां वायूचे ॥ ६४ ॥
गमन आणि धावन । लंघन आकुंचन प्रसारण ।
हे वायूचे अंश जाण । चपळपणा असे हा ॥ ६५ ॥
काम क्रोध लोभ मोह भय। हे आकाशांश यांहीं होय
चतुर्विध स्थूल काय। अन्नमय कोश हा ॥ ६६ ॥
जसे स्थालीं वर प्रासाद । करूनी राजा करी विनोद ।
तसे जीवात्म्याचे हे प्रासाद । तीन देह जाणावे ॥६७॥
स्थूल देहाचा करूनी संग।इंद्रियांनीं घेई जागृद्विषयभोग
विश्वनायक होई मग। धे प्रविविक्त भोग सूक्ष्म देहीं॥
जागृद्वासना घेऊनी । तैजस नामक होवूनी ।
स्वप्नावस्था कल्पूनी । एक असुनी अनेकत्व पाहे ॥६९॥
कारणदेहीं जाउनी । प्राज्ञ नामक होवूनी ।
निद्रावस्था अनुभवुनी । जागृत होउनी पुनः भ्रमे ७०
देह हें अधिष्ठान । अहंकार कर्ता जाण ।
इंद्रियसमूह हें कारण । चवथी जाण वायुचेष्टा ॥७१॥

इंद्रियादिकांच्या देवता । हें पांच एकत्र होतां ।
शुभाशुभ कर्मचेष्टा । कायावाचामनें घडे ॥ ७२ ॥
इष्ट पुण्य स्वर्गादि सुख दे । अनिष्ट पाप नरकादि दुःख दे
मिश्र पापपुण्य मनुष्यजन्म दे। त्रिविधकर्म दे असी गती
अंडज आणि स्वेदज । उद्भिज आणि जारज ।
पांचवी योनी दिविज । कर्मभोगार्थ ह्या योनी ॥ ७४ ॥
कर्मयोगें ह्या योनी फिरे । जरी कल्पकोटी होती फेरे ।
तरी भोगिल्याविना कर्म न सरे । जंववरी बरें ज्ञान न ठसे ॥ ७५ ॥
असा सृष्टिक्रम । दावीतसे वेदागम ।
हा सत्य म्हणोनी भ्रम । घेई अधम मानव जो ॥ ७६॥
अमानित्वादि गुण । अंगीं घ्यावे बाणून ।
गुरुला शरण जाऊन । आत्मज्ञान जोडावें ॥ ७७ ॥
फलाभिमान त्यागून । करितां स्वधर्मानुष्टान ।
ईश्वरप्रीती होवून । सद्गुरुचें दर्शन होईल ॥ ७८ ॥
गुरु देवासमान । श्रद्धेनें मानून ।
त्याची सेवा करूनी श्रवण । करावें निर्वाणलाभार्थ ७९
गुरुच्या अनुग्रहें करून । विचार ठसेल सत्य जाण ।
अन्यथा व्यर्थ ये शीण। अंतरीं ज्ञान न ठसेल ॥ ८० ॥
राजा त्वां आश्रमोक्त । कर्म केलें अनासक्त ।
म्हणूनी झालासी माझा भक्त । आतां व्यक्त सांगतों
भ्रम मोह मलहर । वैराग्य झालें जें पर ।
आतां तुजवरी सत्वर । विद्या प्रसाद करील ॥८२॥

विद्या म्हणजे ज्ञान । तें दोन प्रकारचे जाण ।
परोक्ष अपरोक्ष म्हणून । श्रुतिप्रवीण बोलती ॥ ८३ ॥
गुरुमुखें श्रवण करणें । उपक्रमादि सहालिंगानें ।
वेदांताचें तात्पर्य घेणें । हें जाणणें परोक्ष ज्ञान ॥८४॥
ब्रह्म एक कीं अनेक असे । असा संशय जो होतसे ।
ती संशयभावना तीही नासे । श्रवण असें करितां हें॥
ब्रह्म नाहीं हेही मती । असत्वावरण तें म्हणती ।
तेंही नष्ट होई निश्चिती । वस्तु आहे म्हणती मग तेची॥
श्रवणानुसारें मनना । करितां हरे असंभावना ।
स्थिर करूनियां मना । सावधाना पावूनी ॥ ८७ ॥
मी किंचिज्ज्ञ अपरोक्ष असें । ईश सर्वज्ञ परोक्ष असे।
मग ऐक्य व्हावें कसें । वाटे ती संशयभावना ॥८८॥
तीनी अवस्थेंत ज्ञान एक । तें सदा सच्चिदानंद रूपक ।
तें प्रत्यक् उपाधीनें अज्ञत्वादिक । त्याचा विवेक
नसतां दिसे ॥ ८९ ॥
आत्मा एक सदोदित । जग हें मिथ्या स्वप्नवत ।
उपक्रमोपसंहारें पहात । उपाधीमुळें द्वैतता ॥ ९० ॥
अध्यारोपा सोडूनी । अपवादा विचारूनी ।
पाहातां एकत्व ये मननीं । चिंतितां मनीं श्रवणानुसारें॥
वस्तु न भासे ही मती । तें अभानावरण म्हणती ।
जे हें मनन करिती । जाई अभानावरण त्यांचें ॥९२॥
असें निदिध्यासन होतां । आवरण दूर जातां ।
ध्यानें अद्वितीयता । अभ्यास करितां स्थिरावें ॥९३॥

सर्व संकल्प सोडून । एकांतीं बैसून ।
ध्यान करितां अनुदिन । स्वयें आपण ब्रह्म होय ॥९४॥
भ्रमराचें ध्यान करितां । कीटां ये भ्रमरता ।
हा ध्यानाचा प्रभाव तत्वतां । लोकीं प्रसिद्धता असे ही॥
जीव तरी ब्रह्म असून । करितां स्वरूपाचें ध्यान ।
ब्रह्मस्वरूपा पावतां कोण । मानील निपुण आश्चर्य हें॥
ध्यान तरी किमर्थ । म्हणसी तरी यथार्थ ।
ऐक राया कृतार्थ । होसील स्वार्थ जोडूनी ॥ ९७ ॥
जी अनिर्वचनीय ख्याती । तीणें स्वरूपीं ये भ्रांती ।
रज्जुसर्पापरी ती । मिथ्या असूनी अनर्थ करी ॥९८॥
अविद्या काम कर्मेंसी । युक्त होई दिनानिशीं ।
होऊनी रागादिकां वशी । अविनाशित्व हरपवी॥९९॥
रागद्वेषवशेंकरून । करितां त्रिविध कर्माचरण ।
त्याणें ये सदा भ्रमण । जन्ममरण पुनः पुनः ॥ १०० ॥
राहुग्रस्त झाला रवी । म्हणती अज्ञ जेंवी ।
जिवावरी आवरण तेंवी । भास मात्र असे तें॥१०१॥
ज्ञानावांचूनी तन्निवृत्ती । कोण करील कवण्या रितीं ।
श्रवणादिकर्में जे ज्ञानी होती । तेचि मिळती स्वरूपीं॥
शाब्दज्ञान परोक्ष । आत्मा तरी अप्रत्यक्ष ।
ध्यानें होई अपरोक्ष । म्हणोनी ध्यान करावें ॥१०३॥
राजा तूं सभाग्य । तुला झालें वैराग्य ।
तूं होसी उपदेशयोग्य । मोक्षभागी तूं खास ॥१०४॥

कर्म केलें मदर्पण। झालें शुद्ध अंतःकरण।
तुझी मजविषयीं जाण। दृढ भक्ती जाहली ॥ १०५ ॥
आतां तुला निर्विघ्न। घडेल महावाक्याचिंतन।
अपरोक्षानुभव घेऊन। समाधीमध्यें लीन हो ॥१०६॥
स्थिरऊनी तत्वज्ञान। मनाचा भंग करून।
टाकी वासनावन। समूळ जाळून सर्वथा ॥ १०७ ॥
मग होसी जीवन्मुक्त। प्रारब्ध भोगूनी पूर्ववत।
विदेह कैवल्यें मद्रूपांत। मिळसील निश्चित हें मानीं॥
नृपा आतां तूं सादर। करी महावाक्यविचार।
तेणें अपरोक्ष साक्षात्कार। होईल सत्वर निर्धारें १०९

इति श्रीमत्परमहंसवासुदेवानंदसरस्वतीकृते श्रीदत्त-माहात्म्ये द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥

श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

---

# अध्याय तेरावा

श्रीगुरु ॥

दत्त ह्मणे दीपकासी । आनंद झाला अर्जुनासी ।
वंदूनी प्रार्थी दत्तासी । विनयेंसी भावार्थें ॥ १ ॥
महावाक्य कोणतें । कसें चिंतावें तयातें ।
जेणें अपरोक्षता येते । तें मातें निरोपावें ॥ २ ॥
ऐकूनी अर्जुनाची विनंती । श्रीदत्त ह्मणती तयाप्रती ।
सामवेदी श्वेतकेतूप्रती । अरुण सांगे तत्वबोध ॥ ३ ॥
नऊ वेळ अभ्यासे । तें तूं असती वाक्य असें ।
युक्तीनें उपदेशिलें असें । महावाक्य तें अवधारी ॥४॥
येथें चित्त दे सादर । येणें होय साक्षात्कार ।
उतरसील भवपार । हा निर्धार धरीं मनीं ॥ ५ ॥
नित्यानित्यविचार । हें पहिलें साधन साचार ।
विषयभोग जो इहपर । त्याचा अनादर सर्वथा ॥ ६ ॥
याचे नांव इहामुत्रार्थविराग । हें दुसरें साधन चांग ।
नसतां विषयविराग । ध्यानयोग मग कसा घडे ॥७॥
करणें मनाचें शमन । इंद्रियांचें करणें दमन ।
व्यवहाराचें वर्जन । शीतोष्णादिक सहन करावें ॥८॥
गुरुवचनीं श्रद्धा धरावी । समाधानता चित्तीं असावी।
हे सहा मिळोनी जाणावी । तिसरी साधनसंपत्ती ९॥
माझी मुक्ती व्हावी ऐसें । मन उतावेळ होतसे ।
हें चौथें साधन मुमुक्षत्व असें । सांगतसे मोक्षशास्त्र॥

हीं चार साधनें जोडून । गुरुला शरण जाऊन ।
भावें नमस्कार करून । वाक्यविचारण करावें ॥ ११ ॥
जो शब्दज्ञाननिपुण । स्वरूपानुभवप्रवीण ।
तोचि सद्‌गुरु जाणून । त्याचे चरण धरावे ॥ १२ ॥
उद्धतपणा सोडून । भावें करितां सेवन ।
गुरु करवील श्रवण । भ्रमनिरसन करि जें ॥ १३ ॥
साहा लिंगें तात्पर्यग्रहण । याचें नाम श्रवण ।
उपक्रमोपसंहार जाण । पहिलें लिंग असें हें ॥ १४ ॥
अभ्यास अपूर्वता फल । अर्थवाद उपपत्ती विमल ।
हीं सहा लिंगें सबल । करवितील श्रवण तें ॥ १५ ॥
हें जग पूर्वी सद्रूप । होतें ब्रह्म अरूप ।
अद्वितीय एकविरूप । असा उपक्रम करोनी ॥ १६ ॥
हें सर्व जग ब्रह्मात्मक । हेंचि आपुलें रूप एक ।
आत्मा सत्य आहे हा विवेक । उपसंहार जाणावा१७
उपक्रमोपसंहार मिळोन । अर्जुना हे एक लिंग जाण ।
आतां अभ्यासाचें लक्षण जाण । ऐक सांगेन निश्चयें॥
शरीर हें अन्नमय । त्याचें कारण तोय ।
त्याचें कारण तेज होय । त्याचें सद्ब्रह्म होय कारण१९
सन्मूल ह्या प्रजा जाण । सत्प्रतिष्ठा सदायतन ।
हा एक अभ्यास जाण । दुसरा अवधारण करी ॥२०॥

ह्या सर्व नद्यांची खूण । नामरूपें केवळ जाण ।
कृष्णा गोदा नर्मदा गंगा म्हणून । करिती जन
व्यवहार ॥ २१ ॥
त्या समुद्रीं मिळतां जाण। त्यांचीं नामरूपें ओळखील
कोण ।
तसें ज्ञानानें ब्रम्हीं होतां लीन । कैंवी भिन्न जीव होय
हा दुसरा अभ्यास । आतां तिसरा परिस ।
मधुकर आणिती पुष्परस । नाना वृक्षांचे यत्नानें॥२३॥
ते सर्व एक होतां । त्याला येई मधुरता ।
मग एकरस होतां । ते ओळखतां न येती ॥ २४ ॥
तेंवीं जीव सद्ब्रम्हीं मिळतां जाण । कसा ओळखील
कोण ।
हा तिसरा अभ्यास पूर्ण । करी अवधारण चौथ्याचें॥
फळांतील बीज वडाचें । अति सूक्ष्म असे साचे ।
ऋतु क्षेत्र जळानें तयाचें । मोठें झाड होतसे ॥ २६ ॥
तसें सद्ब्रह्म जाण । सूक्ष्म असे तें जगत्कारण ।
काल दैवादियोगें तें वाढून । जगद्रूप होवूनी टवटवे ॥
तें ब्रम्ह तूं अससी । हा चौथा अभ्यास घे मानसीं ।
आतां सावधानेंसी । लवणाचा दृष्टांत ऐक ॥ २८ ॥
समुद्रापासोनी झालें लवण । तें नामरूप पोंचून ।
पुन्हां समुद्रीं जातां मिळोन । नामरूप सोडूनी एक होय।
तसा जीव ब्रम्हीं मिळतां । सोडी नामरूपता ।
ब्रम्ह होय तत्वतां । हा पांचवा अभ्यास ॥ ३० ॥

वृक्षाची ग्वांदी तोडितां । तिलाच ये निर्जीवता ।
तेवीं जीवें शरीर सोडितां । शरीरा ये पंचता न जीवा॥
जीव ब्रह्म आहे म्हणून । त्याला नाहीं जन्ममरण ।
तो शरीराहून । सर्वथा भिन्न जाणावा ॥ ३२ ॥
हा सहावा अभ्यास । आतां सातवा परिस ।
चोरानें बांधूनी नेत्रांस । एका नरास पळविला ॥३३॥
देशांतरीं त्या टाकून । चोर जाती अलंकार घेऊन ।
तो रडतां ऐकून । एक सज्जन तेथें आला ॥ ३४ ॥
त्याणें सर्व जाणून । तोडूनी त्याचें नेत्रबंधन ।
त्याच्या देशाची ग्वूण । दिग्दर्शन करूनी दाविली ३५
दावितां मग तो मेधावी । दिग्दर्शनें धरी पदवी ।
पोंचे आपुल्या गांवीं । समजावें तेंवी येथेंही ॥ ३६ ॥
नरा येतां मुमुक्षता । तापत्रयें कळवळतां ।
दया येई गुरुनाथा । जवळी येई कळकळे ॥ ३७ ॥
मायापटल तोडून । म्हणे हा स्वदेशमार्ग धरून ।
सावधान करी गमन । असें म्हणून मार्गी लावी॥३८॥
मग तो त्या मार्गी चाले । गुरुकृपेनें न भुले ।
स्थान घे आपुलें पहिलें । वेद बोले असें हें ॥ ३९ ॥
हा सातवा अभ्यास । गुरुविणें न मिळे मोक्ष ग्वास ।
आतां आठवा अभ्यास । भावें परिस अर्जुना ॥४०॥
येतां नरा अंतकाळ । त्रिदोष वाढे तत्काळ ।
तेणें होई व्याकुळ । प्रतिकूळ झाल्यानें ॥ ४१ ॥

मग इंद्रियें ओढ घेती। मनामध्यें लपती।
मनाचीही होई गती। प्राणामध्यें तत्काळ ॥ ४२ ॥
प्राण तेजामध्यें होय लीन। तेजही जाई मिळोन।
परदेवता रूपीं जाण। मग कोण कोणा जाणेल ॥४३॥
स्त्रीपुत्र जवळी रडती। मला पहा पहा म्हणती।
तरी न फिरे मागुती। दृष्टी ती लीन झालेली ॥४४॥
तेवीं अभ्यास करितां। देहभानही उडतां।
इंद्रियांची लीनता। होई चित्तामध्यें ती ॥ ४५ ॥
चित्त प्राणामध्यें लपे। प्राण तेजामध्यें लपे।
तेज परदेवतेमध्यें लपे। अनुकूलरूपें अभ्यासें ॥४६॥
मग एक रस बाणे। तेव्हां कोणा कोण जाणे।
जरी विस्मृती होय मरणें। पुनः शिणे जन्ममरणीं ४७
अभ्यासें रूपीं होय लीन। नराचें हरपे देहभान।
त्याला नये मरण। आणि जनन पुनरपि ॥ ४८ ॥
हा अभ्यास आठवा। आतां ऐक नववा।
चोरी केली म्हणूनी मानवा। धरून नेती राजदूत॥४९॥
तो न होतां कबूल। हातीं धरवीती तप्त शूल।
तेणें हात जळे तात्काळ। पापफळ हें असे ॥ ५० ॥
मग त्यासी दंडिती। जरी धरितां शूल हातीं।
चोरी न होतां सत्यता येती। जाळूं न दे त्याच्या हाता ॥ ४१ ॥
न जळतां त्याचा हात। सोडूनी देती राजदूत।
तेंवी निरभिमानी जो निर्लिप्त। तया मुक्त करी यम॥

तो या उभय लोकांतूनी । जायी मग सुटोनी ।
हा नववा अभ्यास मनीं । निश्चयेंकरूनी धरावा॥५३॥
प्रत्येक अभ्यासें । तें तूं ब्रह्म आहेस असें ।
छांदोग्यामध्यें सांगितलें असे । तें हें असे दुसरें लिंग॥
ब्रह्म असे अतींद्रिय । प्रत्यक्ष प्रमाणा अविषय ।
ब्रह्म तें निरंश होय । अनुमानागम्य आहे तें ॥ ५५ ॥
ब्रह्म अद्वितीय म्हणूनी । उपमा नसे त्रिभुवनीं ।
केवळ वेदांत वाक्येंकरूनी । धरिती ध्यानीं मिळतसे॥
त्याला म्हणती शब्द प्रमाण । अखंडैकार्थरसज्ञान ।
शाब्दें[1] होय नरा जाण । ही खूण तिसऱ्या लिंगाची॥
एवं विज्ञान होतां । प्रारब्ध भोगूनीं सरतां ।
ये विदेहकैवल्यता । चौथें लिंग हें म्हणती ॥ ५८ ॥
सृष्टी स्थिती प्रलय जाण । प्रवेश पदार्थशोधन ।
नियमन फल जाण । सात हे अर्थवाद ॥ ५९ ॥
हे सात मिळोन । अर्थवाद एक जाण ।
सर्वांची उत्पत्ती ब्रह्मापासून । ब्रह्मरूपी स्थिती होय॥
ब्रह्मरूपी प्रळय जाण । जीवरूपें करी प्रवेशन ।
एक व्यापक असून । प्रवेश करी सर्वदेहीं ॥ ६१ ॥
बिंबप्रतिबिंबन्यायें जरी । हा प्रवेश मानावा तरी ।
ब्रह्म अरूप निर्विकारी । कवण्यापरी प्रतिबिंबलें ॥६२॥
ब्रह्म असे अपरिच्छिन्न । त्याचा शरीरामध्यें जाण ।
प्रवेश होतो त्याची खूण । वेदांतनिपुण वदती ही ६३

१ आप्तवाक्यं शाब्दं = वेदवाक्य.

जें पाहणें ऐकणें। हुंगणें चाखणें बोलणें।
घेणें देणें जाणें येणें। मल सोडणें रति घेणें ॥ ६४ ॥
व्हावया हे व्यवहार। जें कारण अगोचर।
त्याच रूपें साचार। ब्रह्म शरीरप्रविष्ट म्हणती ॥६५॥
ब्रह्मची स्वयें आपण। सर्वांचें करी नियमन।
तत्त्वंपदार्थ शोधितां जाण। ब्रह्म एक लक्ष होय ॥६६॥
होतां पूर्ण विज्ञान। सर्व कामना होती पूर्ण।
ब्रह्मज्ञानाचें हें फळ जाण। अंतीं निर्वाण निश्चळ॥६७॥
हे सात अर्थवाद मिळोन। एक पांचवें लिंग जाण।
सहाव्याचें करीं श्रवण। उपपत्ती म्हणून जें असे॥६८॥
घडा होण्यापूर्वीं माती। मध्येंही व्यापून असे ती।
घडा फुटतां अंतीं। हो ती माती पूर्ववत ॥ ६९ ॥
एक घडा पारखतां। सर्वमृद्विकार ओळखी ज्ञाता।
जेथें ये आकारता। नाम तेथें येतसें ॥ ७० ॥
तसें हें ब्रह्म जाण। याचें होतां ज्ञान।
सर्व ये कळोन। हें सहावें लिंग जाण ॥ ७१ ॥
यांही श्रवण करावें। तात्पर्य तें चित्तीं घ्यावें।
मग संशय नाश पावे। करितां भावें श्रवण हें ॥७२॥
आतां ऐक वाक्यविवरण। तत्पदें परब्रह्म जाण।
त्वंपदें प्रत्यक् ब्रह्म म्हणून। श्रुती वचन प्रसिद्ध असे॥
अंतःकरण आणि त्याच्या वृत्ती। साक्षीपणें ज्याला कळती।
ज्याची चैतन्यमूर्ती। त्वंपदार्थ तो जाण ॥ ७४ ॥

घटद्रष्टा घटाहून । वेगळा जसा तसा जाण ।
देहद्रष्टा देहाहून । असे भिन्न तो त्वंपदार्थ ॥ ७६ ॥
स्वप्रीत्यर्थ ज्याला पुत्रादिक । तत्प्रीत्यर्थ आपण न हो ऐक ।
स्वात्मा प्रियतम ज्याला एक । सुखरूप तो त्वंपदार्थ॥
मीं असावें हें वाटे । ज्याचें स्वप्रेम न तुटे ।
जरी देहही सुटे । तरी न तुटे स्वप्रेमबंध ॥ ७७ ॥
मनाचें जाणें येणें । बुद्धीचे भाव अनुक्षणें ।
जाग्रत्स्वप्ननिद्रालक्षणें । जो जाणें तो त्वंपदार्थ ॥ ७८ ॥
स्वयें विकारी न होतां । बुद्ध्यादिकां खेळवितां ।
लोहचुंबकापरी जो चेता । तो त्वंपदार्थ जाणावा ७९ ॥
देहेंद्रियादि संघात । हे सर्व जड होत ।
ह्याला जो वागवी सतत । त्वंपदार्थ तो जाणा ॥ ८० ॥
जो बोध साक्षीलक्षण । त्वंपदार्थ तो जाण ।
बोद्धृत्व आणि साक्षिपण । निर्विकारपणें जयाला ८१ ॥
देहेंद्रिय मनःप्राण । आणि अहंकार यांहून ।
जो सर्वथा असे भिन्न । निर्विकारपणें जयाला ॥ ८२ ॥
हा होय त्वंपदार्थ । आतां सांगतो तत्पदार्थ ।
हा जाणता यथार्थ । सर्वानर्थ नष्ट होती ॥ ८३ ॥
तत् म्हणजे ब्रह्म एक । अतत् म्हणजे द्वैत अनेक ।
तें दूर करणें देख । अतत् व्यावृत्ती तिला म्हणती ८४
अतत् व्यावृत्तीरूपानें । आणि साक्षात् विधिमुखानें ।
तत्पदार्थ जाणणें । ब्रह्म होणें निजांगें ॥ ८५ ॥

तो विष्णु संसारधर्मरहित । स्थूलसूक्ष्मादिचिन्हवर्जित
अदृश्यत्वादि गुणयुक्त । तत्पदार्थ तो जाण ॥ ८६ ॥
ज्याच्या आनंदा नाहीं सीमा । जो सच्चिदानंदात्मा ।
ज्याला म्हणती परमात्मा । तो भूमा[1] तत्पदार्थ ॥८७॥
जयाला सर्वज्ञत्व । जया असे सर्वेश्वरत्व ।
जया सर्वशक्तिमत्व । जया समत्व तत्पदार्थ तो॥८८॥
ज्याच्या ज्ञानें सर्व कळे । ज्याचें अनंतत्व न चळे ।
प्रपंचकार्य शक्तिबळें । करी तोचि तत्पदार्थ ॥ ८९ ॥
जीवरूपीं सर्व शरीरीं । अविकारी जो प्रवेश करी ।
सर्वांचें नियमन करी । तो अवधारी तत्पदार्थ ॥ ९० ॥
जीवां कर्मफळें देई । स्वयें अलिप्त आपण होई ।
जो परोक्ष अमृताची पोयी । तो होई तत्पदार्थ ॥९१॥
सर्वज्ञ परोक्ष तत्पदें । किंचिज्ज्ञ अपरोक्ष त्वंपदें ।
वर्णिलें असें वेदें । या भेदें ऐक्य कसें ॥ ९२ ॥
असें म्हणशी तरी ऐक । तो हा देवदत्तनामक ।
येथें तो हा ह्या पदां एक । देवदत्त देख आधार॥ ९३ ॥
तत्पदें तो देश गतकाल । हा ह्या पदें हा देश वर्तमानकाल ।
दोनी विरुद्ध टाकुनी केवळ । घेती आधार निश्चळ देवदत्त
जो पूर्वीं देखिला काशींत । राज्य करी तारुण्यांत ।
तो हा भ्रष्टराज्य वृद्ध येथ । देवदत्त लक्ष्यार्थ एक ९५॥

---

१ अपरिच्छिन्न, सर्वव्यापक.

दोनी अवस्था दोनी काळ। दोनी देश टाकितां केवळ।
देवदत्त एक निश्चळ। लक्षणावृत्या जसा कळे ॥ ९६ ॥
तेंवी किंचिज्ज्ञत्व सर्वज्ञत्व। अपरोक्षत्व आणि परोक्षत्व
जीवेश्वराचें टाकूनी एकतत्व। लक्ष्यार्थ रूप तें घ्यावें॥
सुखी दुःखी कर्ता भोक्ता। किंचिज्ज्ञ अपरोक्षादि हे तत्वता।
त्वंपदाचे वाच्यार्थ आतां। लक्ष्यार्थ तुज सांगेन ॥९८॥
असज्जडदुःखरूप देहादिक। तत्प्रतिकूल सच्चिदानंद रूपक।
प्रत्यगात्मा स्वयंप्रकाशक। लक्ष्यार्थ तो एक त्वंपदाचा॥
ज्याचे सर्वज्ञत्वादि गुण। तो तत्पदवाच्यार्थ जाण।
जें सत्यज्ञानानंदादिलक्षण। तें लक्ष्यार्थ जाण तत्पदाचें
लक्ष्यार्थें ये अविरोध। वाच्यार्थें असे विरोध।
म्हणूनी लक्षणावृत्ती निर्बाध। अखंडैकरसबोध करीतसे
जी स्वार्थत्याग करी। ती जहल्लक्षणा निर्धारी।
गंगेवर गोठा येथें ज्यापरी। स्वार्थ सोडूनी तीरलक्षणा
लक्ष्यार्थ एक असल्यामुळें। जहल्लक्षणा एथें न जुळे।
स्वार्थ न सोडितां अन्य घेई बळें। अजहल्लक्षणा ती होय
कावळ्यापासूनी दही राख म्हणतां। त्याला कुत्र्यानें खावूं येतां।
त्यांचेंही निवारण करिजेल तत्वता। ती अजहल्लक्षणा होय ॥ १०४ ॥
जे विरुद्ध लक्ष्यार्थ। ते न सोडितां ये अनर्थ।
म्हणूनी जी करी स्वार्थ। जहदजहल्लक्षणा ती घ्यावी॥

विरुद्धांश तत्वंपदाचे । सोडूनी अविरुद्धांश त्यांचे ।
ध्यावा हें तत्व वाक्याचें । जाणती साचे ते तरती ॥

तें ब्रह्म मी असें । मी तें ब्रह्म असें ।
शिष्यें जाणावें असें । सांगतसे हें महावाक्य ॥१०७॥

योगाभ्यासें मन । स्थिरवूनी हें करितां ध्यान ।
तत्काळ तुटोनी बंधन । मिळे स्थान अढळ जें १०८॥

इति श्रीमत्परमहंसवासुदेवानंदसरस्वतीकृते
श्रीदत्तमाहात्म्ये त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥

# अध्याय चौदावा

श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

अर्जुन नमन करूनी । म्हणे वाक्यार्थ ऐकूनी ।
आनंद झाला मनीं । आतां योग सांगावा ॥ १ ॥
श्रीदत्त म्हणे रे अर्जुना । सावधान करी मना ।
अष्टांगयोगविचारणा । सांगतों मना स्थिरवी जी॥२॥
यम नियम आसन । प्राणायाम प्रत्याहार जाण ।
धारणा आणि ध्यान । समाधी जाण अष्टांगें हीं ॥३॥
यम नियम स्वाभाविक असती । म्हणोनी षडंग योग कोणी म्हणती ।
कोणी समाधी फळ मानिती । ते म्हणती सप्तांग योग
सविकल्प निर्विकल्प समाधी मानून । एक योगांग कल्पून ।
दुसरें फल मानून । अष्टांग योग म्हणती ते ॥ ५ ॥
प्राणिमात्राचें न करावें पीडन । हें अहिंसेचें लक्षण ।
बोलावें यथार्थ मृदु भाषण । हें सत्य जाण अर्जुना॥६॥
तृणसुद्धां न चोरावें दुसऱ्याचें । हें लक्षण अस्तेयाचें ।
दुःख जाणावें प्राण्यांचें । हें दयेचें लक्षण ॥ ७ ॥
न करावें मैथुन । हें ब्रह्मचर्यलक्षण ।
रहावें सरळपणा धरून । हें लक्षण आर्जवाचें ॥ ८ ॥
करावें दुःखादि सहन । क्षमेचें हें लक्षण ।
हानी होतांही निर्विकार होऊन । राहणें जाण धृती ती॥९

दोन भाग भरून। जेवावें पथ्य अन्न।
जलानें तिसरा भाग भरून। राहणें हा मिताहार १०
करितां मलमूत्र विसर्जन। मृत्तिकाजळानें करावें शोधन।
हें बाह्य शौच जाण। म्हणती ध्यान अंतर्शौच ॥११॥
हे होत दहा यम। आतां ऐका नियम।
तेही दहा उत्तम। ऋषिस्तोम सांगतसे ॥ १२ ॥
चांद्रायणादिकें देहशोषण। करणें तें तप जाण।
दैवलाभास तोषोन। असणें तो संतोष ॥ १३ ॥
वेदवाक्याचा विश्वास। आस्तिक्य म्हणती तयास।
वेदांताचा जो अभ्यास। श्रवण खास म्हणती तें॥१४॥
योग्यायोग्यसमर्पण। तया म्हणती दान।
सर्व करावें विष्णवर्पण। तेंचि पूजन निश्चित ॥ १५ ॥
वेदोक्तकर्मीं जी प्रीती। तिला श्रद्धा म्हणती।
कुकर्मीं लाजणें ती। ऱ्ही म्हणती योगज्ञ ॥ १६ ॥
जो एकादश्यादि उपवास। व्रत म्हणती तयास।
गुरूपदिष्टमंत्राभ्यास। जप तयास म्हणिजे ॥ १७ ॥
वाचिक जप अधम। उपांशु मध्यम।
मानसिक उत्तम। वदे आगम त्रिविध जप ॥ १८ ॥
हे दहा नियम। पतंजलीनें पांच यम।
सांगितले पांच नियम। हे उत्तम असावे ॥ १९ ॥
गोमनुष्यां मारितां हिंसा। इतरां मारितां न हिंसा।
हे जात्यवच्छिन्ना हिंसा। ही महाव्रत न होय॥ २० ॥

तीर्थावरी वर्जावी हिंसा। ही देशावच्छिन्न हिंसा।
श्राद्धसमयीं न करणें हिंसा। ती हिंसा कालावच्छिन्न॥
प्राणिमात्रासी न मारणें। सर्व देशीं हिंसा न करणें।
सर्व काळीं हिंसा न करणें। तें जाणणें महाव्रत ॥२२॥
असे सर्व यमनियम। संपादावे ते उत्तम।
यांही घडे परम धर्म। कर्मसाफल्य होईल ॥ २३ ॥
अहिंसा सिद्ध झाली जयासी। तत्सान्निध राहतां जीवांसी।
वैरभाव न उमटे मानसीं। जातीवैऱ्यासी मित्रत्व ये॥
म्हणूनीं ऋषींच्या आश्रमांत। उंदीर मांजरासी खेळत।
गाई व्याघ्र एकत्र होत। अहिंसा फळ असें असे २५
सत्यानें मिळे मंत्रफळ। ब्रह्मचर्यें मिळे बळ।
अस्तेयें मिळे धन विपुळ। कळे पूर्वफळ[1] अपरिग्रहें २६
बाह्यशौचें ये स्वदेहाचा वीट। अंतशौचें ये इंद्रियजय स्पष्ट।
मनस्थैर्यें सौमनस्य[2] नीट। आत्मदर्शनयोग्यता ये २७
उत्तम सौख्य मिळे संतोषानें। देहेंद्रियशुद्धि हो तपानें।
देवसान्निध्य हो जपानें। मिळे भक्तीनें समाधी॥२८॥
आतां ऐक आसन। मांड्यांमध्यें पाय[3] ठेऊन।
बसावें सरळ होऊन। स्वस्तिकासन होय हें ॥ २९ ॥
डाव्या उजव्या कमरेखालून। उजवी डावी खोंट टेंकून।
दोंहांतीं पाय धरून। बसतां गोमुखासन जाणावें ३०

---

१ पूर्वजन्माचें. २ मनःप्रसन्नता. ३ पावलें.

डाव्या उजव्या मांड्यांवरी । उजवे डावे पाय करी ।
पृष्ठतः डाव्या उजव्या करीं । दृढ धरी हें पद्मासन ३१
उलट गुढगे गुदा लावून । ढोंपरावरी बोटें पसरून ।
मुख पसरूनी नासाग्र पाहून । बसतां सिंहासन होतसे॥
अंडाखालीं डावा पाय । लिंगावरी उजवा पाय ।
ठेवी सरळ करी काय । ठेवी हृदयप्रदेशीं हनु ॥३३॥
नासाग्र दृष्टी ठेऊन । बैसता होय सिद्धासन ।
बंधत्रय साधून । समाधी लावून देईल हें ॥ ३४ ॥
हात टेकूनी भूमीवरी । नाभी ठेवावी कोंपरावरी ।
अंतराळीं दंडापरी । राहतां मयूरासन होय ॥ ३५ ॥
दोनी पाय हातीं जोडूनी । शिवणीला खोटा लावूनी ।
बसावें नासाग्रनयनीं । म्हणती मुनी भद्रासन हें॥३६॥
शववत् पडणें होतां श्रम । शवासन त्याचें नाम ।
चिरकाळ बसतां न व्हावा श्रम ।ही उत्तम आसनसिद्धि
जेथें उपद्रव नसे । शब्दही ऐकूं न येतसे ।
एकांतीं पवित्रस्थळ असे । सुख होतसे ज्या ठायीं ३८
तेथें मठ कीजे सुंदर । असावें लहान द्वार ।
आंत नसावें छिद्र । सारवूनी पवित्र करावें ॥ ३९ ॥
चार हातपर्यंत । पाषाण अग्नी जळवर्जित ।
करूनी बसावें निश्चिंत । गुरुआदिकां वंदूनी ॥ ४० ॥
खालीं दर्भ वरी कृष्णाजिन । त्यावरी मृदुवस्त्र घालून ।
त्यावरी करावें उपवेशन । आसनविधी करूनी॥ ४१ ॥

शरीर गळा मान । यांना सरळ करून ।
इकडे तिकडे न पाहून । नासाग्रदर्शन बसावें ॥ ४२ ॥
सर्व चिंता सोडूनी । मनीं धैर्य धरूनी ।
दृढनिश्चय करूनी । प्राणायामा करावें ॥ ४३ ॥
जंव चाले प्राण । तंव चपळ होय मन ।
चपळ होतां मन । चाले प्राण निश्चयें ॥ ४४ ॥
म्हणोनियां दोहोंतून । घ्यावें एकाला जिंकून ।
दोहोंचाही जय होऊन । समाधिसाधन होतसे ॥४५॥
प्राणायामीं दृढाभ्यास । करावा ठेवूनी विश्वास ।
असें जिंकावें प्राणास । मग श्वासोच्छ्वास बंद होती ॥
होतां प्राणांचा जय । मनाचाही होई जय ।
दोहोंचाही एकत्र विलय । असें निश्चयें जाणावें॥४७॥
नवद्वारें रोधितां । प्राणजय ये हातां ।
परी न जिंकवे चित्ता । दृढ विरक्तता नसतां ॥ ४८ ॥
मन असे चपळ । इंद्रियां क्षोभवी तत्काळ ।
तें दृढ असूनी सबळ । श्रम केवळ तज्जयीं ॥ ४९ ॥
म्हणूनी प्राणायामादि करून । जिंकावें चपळही मन ।
कित्येक देवाचें ध्यान करून । सुखें मन वश करिती५०
डाव्या नासापुटांत । इडा येऊन संपत ।
तिचें चंद्र दैवत । शुभकार्य साधून दे ती ॥५१॥
उजव्या नासापुटांत । पिंगला येऊन संपत ।
तियेचें सूर्य दैवत । उग्रकार्य साधून दे ती ॥ ५२ ॥

दोंमध्यें सुषुम्ना असे । ती ब्रह्मरंध्रीं संपतसे ।
तिचे मुळीं कुंडली वसे । साडेतीन वेंटाळ्या देऊनी॥
मुखानें सुषुम्ना मुख धरी । म्हणूनी तिच्या अंतरीं ।
प्राण प्रवेश न करी । यास्तव तिला चाळवावी ॥५४॥
ती चळे करितां अभ्यास । तो न करावा दिवसास ।
रात्रींही अभ्यास । शास्त्रें वर्ज्य असे ॥ ५५ ॥
हें तों असे कूट । याचा अर्थ ऐक स्पष्ट ।
चंद्र चालतां रात्र स्फुट । सूर्य चालतां दिवस हो॥५६॥
डावा अपान उजवा प्राण । यांसीं करावें समान ।
तीच सुषुम्ना जाण । रात्रदिन भोक्त्री ॥ ५७ ॥
सोळा मात्रांनीं पूरक । चौसष्टांनीं कुंभक ।
बत्तीसांनीं रेचक । हा प्राणायाम उत्तम ॥ ५८ ॥
इडेनें पूरक करावा । कंठीं जालंधर बांधावा ।
जोरानें कुंभक रोधावा । रेचक करावा पिंगलेनें ॥५९॥
बांधोनियां उड्डियान । करावें हळु हळु रेचन ।
पुनः पिंगलेनें घेऊन । पूर्ववत् करोन सोडावा ॥ ६० ॥
जिणें प्राण घ्यावा । तिणें तो न सोडावा ।
असा अभ्यास करावा । पुनः पुनः त्रिकाळ ॥ ६१ ॥
किंवा श्वास बाहेर सोडावा । हा पूरक जाणावा ।
तसाचि तो थांबवावा । तो जाणावा कुंभक ॥ ६२ ॥
मग आंत हळू घ्यावा । हा रेचक जाणावा ।
असा अभ्यास करावा । केवळ कुंभकपर्यंत ॥ ६३ ॥

जसी मात्रावृद्धी होय । हो तसा प्राणजय ।
चित्ताचें होय स्थैर्य । नाडीद्वार शुद्ध होतां ॥ ६४ ॥
कफ वात आणि पित्त । हे दोष होतां शांत ।
हो योगी रोगरहित । अग्नी प्रदीप्त होय त्याचा ॥६५॥
कनिष्ठ प्राणायाम होतां । घर्म सुटे विशेषता ।
मध्यम प्राणायाम होतां । सुटे कंप सर्वांगीं ॥ ६६ ॥
उत्तम प्राणायामें जाण । ब्रह्मरंध्रीं जाई प्राण ।
श्वासोच्छ्वास बंद होऊन । निश्चळत्व ये सर्वथा ॥६७॥
जंव इंद्रियशुद्धी न झाली । कुंडली ती न हालली ।
सुषुम्णेमध्यें न झाली । प्राणाची गती जंववरी॥६८॥
तंववरी वृथा प्रयास । केवळ पाविजे त्रास ।
मध्यमार्ग मिळतां प्राणास । आयास सफळ जाणावें॥
मेदश्लेष्मा अधिक असतां । षट्क्रिया अभ्यासाव्या तत्वतां ।
किंवा विशेष प्राणायाम करितां । नाडीशुद्धता होतसे
जे जपध्यानरहित । ते निर्बीज प्राणायाम होत ।
जे जपध्यान सहित । ते होत सबीज प्राणायाम ॥७१॥
हा सबीज प्राणायाम । योगी मानिती उत्तम ।
शीघ्र मिळे ब्रम्हरंध्रधाम।सबीज प्राणायाम करितां७२
पांच पांच रोज चढवीत । चढवावे ऐशींपर्यंत ।
एवं त्रिकाळीं सतत । तीन मास अभ्यास करावा ७३

मग सुषुम्णापंथा। शुद्ध होय सर्वथा।
मग कुंडली चाळवितां। प्राण वरती जातसे ॥ ७४ ॥
होतां कुंडलीचें चालन। षट्चक्रें जाती भेदून।
ब्रम्हविष्णुशिवग्रंथी तुटून। सरळ मार्ग होतसे ॥७५॥
नाभिदेशीं अग्नी जाण। तेथें तर्जनी टेंकून।
अग्नीचें करावें आकुंचन। दररोज तीन वेळां ॥ ७६ ॥
हातीं पाय धरून। करावें कंदाचें ताडण।
आठ वेळ भस्त्रिका करून। निर्विकल्प मन करावें ७७
लय विक्षेप सोडून। रूपीं मन जोडून।
राहतां वर चढे प्राण। मनाचें उन्मन होय मग ॥७८॥
दोन पळें पांच विपळें जाण। ब्रह्मांडी ठरतां प्राण।
प्राणायाम तो मुख्य जाण। पापशमन करी तो॥७९॥
बारापट प्राणायामकाळ। प्रत्याहार तितुका वेळ।
बारापट उत्तरोत्तर काळ। धारणादिकांचा वेळ होय॥
ब्रह्मरंध्रीं बारा दिन। राहतां निश्चळ प्राण।
निर्विकल्प समाधी जाण। यत्नें साधून घ्यावा हा ८१
अथवा प्राण जिंकून। इंद्रियें विषयांपासून।
मनानें घ्यावीं फिरवून। हा जाण प्रत्याहार ॥८२॥
सोडूनियां आळस। पुनः पुनः हा अभ्यास।
करितां प्रत्याहार होई खास। मग त्रास न होय॥८३॥
कूर्म जसा आपुलीं अंगें। आयास न होतां वेगें।
आंत बाहेर आपुलीं अंगें। वागवी वश करूनी॥८४॥

योगियानें तयापरी । इंद्रियें धरावीं अंतरीं ।
जरी कां जाती बाहेरी । पुनः अंतरीं ठेवावीं ॥८५॥
जया इंद्रियें वश झालीं । त्याची प्रज्ञा स्थिरावली ।
विषयेच्छा दूरावली । सिद्धी आली त्याचे करीं ॥८६॥
असा हा प्रत्याहार । जो करी तो योगीश्वर ।
विषय असतांही समोर । होती दूर तयातें ॥ ८७ ॥
जरी जिंकिलें मन । एकही इंद्रिय सुटोन ।
जाई बाहेर पळोन । तेंची मनःक्षोभ करी ॥ ८८ ॥
म्हणूनियां सादर । करावा हा प्रत्याहार ।
मग मनाचा जय सुखकर । न लागे उशीर थोडाही८९
मग करावी धारणा । स्थिर करी अंतःकरणा ।
सगुणागुणलक्षणा । द्विविध धारणा म्हणती ती ॥९०॥
आत्मरूपी अभ्यासानें । मन ठेवावें धारणेनें ।
जरी न ठरे विक्षेपानें । यत्नानें तें फिरवावें ॥ ९१ ॥
जरी न ठरे निर्गुणीं । तरी ठरवावें सगुणीं ।
पुनः पुनः यत्न करूनी । लक्ष्यावरी स्थिरवावें ॥ ९२ ॥
अर्जुना मी निर्गुण । असूनी हें सगुण ।
रूप धरिलें सुलक्षण । भक्तत्राण करावया ॥ ९३ ॥
तें हें माझें गोचर । रूप असे सुंदर ।
एक एक अवयव मनोहर । पाहतां नेत्र तृप्त होती॥९४॥
या रूपींच पुनः पुनः । करावी स्थिर धारणा ।
येथें निश्चळ करितां मना । निर्गुणीं धारणा सहज होय॥

मन पळतां वरचेवरी । अंतरीं खेद न करी ।
अभ्यासानें पुनः धरी । जोंवरी स्थिर होय ॥ ९६ ॥
धारणा न साधे ज्यास । ते श्रम केवळ त्यास ।
मग सोडूनी आळस । धारणाभ्यास करावा ॥ ९७ ॥
पूर्वीं ध्यान मग धारणा । ही होय दुर्विचारणा ।
म्हणती उपसमाधी ध्याना । ध्यानविस्मृती समाधी॥
अशी धारणा साधून । मग करावें ध्यान ।
तेंही एक सगुण । एक निर्गुण पूर्ववत् ॥ ९९ ॥
तैलधारा अखंड जशी । ध्यानीं चित्तवृत्ती धरावी तसी ।
विच्छेद न यावा तियेसी । महाप्रयासीं सर्वथा॥१००॥
ध्याता ध्यान आणि ध्येय । ही त्रिपुटी जोंवरी होय ।
ध्यानाचें हें लक्षण होय । योगीवर्य बोलताती ॥१०१॥
जेव्हां अभ्यासें ठरे । मी ध्याता हें विसरे ।
ध्यानालाही न स्मरे । ध्येयाकारें राही मन ॥ १०२ ॥
जेथें वायू मुळीं नसे । तेथें दिवा जसा असे ।
तसें मन जेव्हां वसे । समाधी होतसे तेधवां ॥१०३॥
उडे सर्वथा देहभान । नसे बाह्याभ्यंतरज्ञान ।
तीनी अवस्था[1] जाऊन । उन्मनी होय तेधवां ॥१०४॥
तुटे सर्वाभिमान । कैंचें द्वैतानुसंधान ।
सर्वथा लपे अज्ञान । तुर्यावस्थान होतांची ॥ १०५ ॥

---

१ जाग्रत्-स्वप्न-सुषुप्ति.

आपण आपणा पाहून । जेथें जाई विरोन ।
आत्यंतिक सुख पूर्ण । बुद्धीयोगें योगी घेई ॥ १०६ ॥
समाधी दैवा मारी । धर्मामृतवृष्टी करी ।
धर्ममेघ हें नाम चतुरीं । योजिलें असे यथार्थ ॥१०७॥
अर्जुना असा हा योग । वारी सर्व उद्वेग ।
करी दुःखाचा वियोग । जीवब्रह्मयोग करी ॥ १०८ ॥
इति श्रीमत्परमहंसवासुदेवानंदसरस्वतीविरचिते
श्रीदत्तमाहात्म्ये चतुर्दशोऽध्यायः ॥ १४ ॥
॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

# अध्याय पंधरावा

**श्रीगणेशाय नमः ॥**

ऐकूनियां योगाभ्यास । आनंद झाला अर्जुनास ।
पुनः वंदूनियां गुरूंस । साशंकमानस प्रश्न करी ॥१॥
म्हणे गुरुजी कृपा करून । केलें योगाभ्यासनिरूपण ।
हृष्ट झालें अंतःकरण । परी एक पुसेन तुम्हांला ॥२॥
योगें होतां साक्षात्कार । कासया वाक्यविचार ।
हा संशय करा दूर । ठेविला निर्धार तुम्हांवरी ॥ ३ ॥
ऐकूनी अर्जुनाचें वचन । हर्षें बोले अत्रिनंदन ।
केवळ योगानें नोहे निर्वाण । नसतां ज्ञान योगिया ४
प्राणायामें करून । स्थिर होतां आपुलें मन ।
जें ऐकिलें वाक्यज्ञान । त्याचें मनन करावें ॥ ५ ॥
त्या अर्थां अनुसरून । परमात्म्याचें चिंतन ।
अखंड मनोवृत्ती करून । करणें मनन तेंचि होय ॥६॥
सविकल्प[1] समाधी जाण । तेंचि निदिध्यासन ध्यान ।
विजातीय[2]प्रत्यय टाकोन । सजातीयप्रवाहीकरण जें ॥
जें नामरूप प्रत्यय । तें सर्व विजातीय ।
नित्य शुद्धबुद्धादि प्रत्यय । ते सजातीय जाणावे ॥८॥
निषेध्य आणि विधेय[3] । आत्म्याचें दोन प्रकारचें ध्येय।
गुण असती श्रुतिगेय । हे अभय देती ध्यानानें ॥ ९ ॥

१ जोंपर्यंत ध्यान आणि ध्येय निराळें समजतो तोंपर्यंत सविकल्प समाधी.
२ द्वैतांतील सर्व पदार्थ. ३ हे ईश्वराचे दोन गुण.

अशब्द अस्पर्श अद्वय । अरूप अरस अव्यय ।
अगंध अनादि नित्य । अनंत अभय अभेद ॥ १० ॥
अगोत्र अवर्ण अदृश्य । अचक्षुःश्रोत्र अग्राह्य ।
अपाणिपाद अवेद्य । हे निषेध्य गुण होत ॥ ११ ॥
नित्य शुद्ध बुद्ध मुक्त । सत्य ज्ञान अनंत ।
परब्रह्म आत्मा अच्युत । असंग सदोदित परावर १२
गुण हे विधेय । एवं हें गुणद्वय ध्येय ।
हाचि सजातीय प्रत्यय । हे प्रवाहवत्[1] चिंतावे ॥ १३ ॥
जो वाक्यार्थ निर्णीत । षड्लिंगांनीं अवधारित ।
लक्षणावृत्तीनें लक्षित । तोचि मननांत स्थिर होई १४
तो मी आत्मा परब्रह्म । अखंडैकरसधाम ।
परावर शिवपरम । पुरुषोत्तम मीच असें ॥ १५ ॥
असें होतां मनन । ध्यातृध्यानभाव हरून ।
अंतीं ध्येयाकार होवून । राहे मन निश्चळ ॥ १६ ॥
निर्विकल्पसमाधी हा । हा निवारी अज्ञानांधमोहा ।
उपशमवी प्रारब्धा हा । वासनावना हा जाळी ॥१७॥
चैतन्य जें व्यापक । तें स्वयंप्रकाशक ।
तेंचि प्रगटे सम्यक । सच्चित्सुखमय तेव्हां ॥ १८ ॥
असा होतां साक्षात्कार । योगी न जाणे बाह्याभ्यंतर।
स्वयें चिन्मय निरंतर । निश्चळ अंजस्र[2] सुखरूपी॥१९॥
ब्रह्माकार मनोवृत्ती । अज्ञाना निवारूनी ती ।
निष्कल ब्रह्मातें अंतीं । विषयीं विस्पष्ट करी ती॥२०॥

---

१ अखंड जलधारेसारखे. २ सदोदित.

कार्यासहित अज्ञान । इणें जाई नष्ट होऊन ।
सच्चिदानंदलक्षण । ब्रह्म निरंजन एक उरे ॥ २१ ॥
तूं म्हणसी ही वृत्ती असतां । मग कसी अद्वैतता ।
वृत्तीही हें कार्य होतां । मुरून जाई स्वरूपीं ॥ २२ ॥
निवळीच्या बियेचा कल्क । गढूळ जळांत टाकतां सकळिक ।
गाळ नासूनी स्वयें देख । होई त्यापरी हें ॥ २३ ॥
घट फुटतां घटाकाश । जेंवीं होई महाकाश ।
तेंवी होतां अविद्यानाश । उपाधिनाश होतसे ॥२४॥
उपाधी म्हणती अविद्येस । तीमुळें जीवा क्लेश ।
ती नष्ट होतां स्वयंप्रकाश । होई जीव परब्रह्म ॥ २५ ॥
तूं म्हणशील जें अज्ञात । आणि बाहेर जें असत ।
तें इंद्रियां मना होई विदित । प्रत्यगब्रह्म हें तसें नोहे ॥
इंद्रियांतःकरणाच्या गती । ब्रम्हस्वरूपीं न होती ।
ते असे स्वयंज्योती । कोण जाणती तयातें ॥ २७ ॥
ब्रम्ह तेंची आत्मा होय । तो सर्वां अग्राह्य ।
तो द्रष्टा दृश्य न होय । सत्य होयं सिद्धांत हा॥ २८॥
तरी ऐक वेदमत । आपुलें मुख आपणा न दिसत ।
त्यातें आरसा दाखवित । लोकीं मात असी असे २९
तरी उपाधी आरसा । त्या जडा बोध होई कसा ।
तेव्हां स्वयें स्वरूपा जसा । पाहे तसा हाही न्याय ३०

१ मायारहित.

आरसा असतां मळकट । मुखही दिसे मळकट ।
आरशाला असतां फूट । भासे फूट मुखावरती ॥३१॥
स्वच्छ करितां आरशी । मुखीं स्वच्छता दिसे तसी ।
स्वच्छ करितां बुद्धीसी । स्वरूपासी स्वच्छ पाहे ॥३२॥
आरशावरी मळ आगंतुक । बुद्धीवरी रागद्वेषादिक ।
शास्त्राधारें हें करितां पृथक । होय सम्यक् स्वच्छबुद्धी
जो बुद्धीप्रतिबिंबित । जो जीवनामें विख्यात ।
त्याला व्हावया बाह्य ज्ञात । करिती मदत इंद्रियें ३४
अंधकारीं घडा पाहणें । तरी दिवा[1] नेत्र हे असणें ।
जरी दिवा पाहणें । एका नेत्रानें कार्य होई ॥ ३५ ॥
तेंवीं स्वात्मया पाहतां । बुद्धिवृत्ती पुरे तत्वता ।
इचें नांव वृत्तिव्याप्यता । फलव्याप्यता इतरेंत्र[2] ॥३६॥
बुद्धिबिंबितस्वात्मदर्शन । आपणासच होई जाण ।
म्हणोनी श्रुतीचें हें वचन । इंद्रियें मन न पाहती ३७॥
दिव्या पाहतां दिवा नलगे । तसा स्वयंप्रकाश निजांगें
आत्मा तया पाहतां नलगे । साधन वावुगें कासया ।
अज्ञान मात्र आड असे । तें बुद्धिवृत्तीनें नासतसे ।
तदर्थ श्रवणादिक असे । उपाय नसे दुसरा येथें ॥३९॥
जी ब्रह्माकार वृत्ती । तीही रूपीं मुरे अंतीं ।
तया निर्विकल्प समाधी म्हणती । परमगती हीच जाण

१. दीपक. २ बाह्य विषयाचे ठायी.

जेथें अखंडैकब्रम्ह जाण। जेथें नसे दुजेपण।
तेथें करितां आरोहण। न पुनः पतन कल्पांतींही॥४१॥
निद्रेमाजी स्वरूपज्ञान। तेंच जागृत्स्वप्नीं जाण।
होतसे वृत्तिज्ञान। अज्ञान त्यासी वैर न करी॥ ४२ ॥
जेंवी उन्हानें न जळे तृण। सूर्यकांत आड येतां तत्क्षण।
जळून जाई सर्व तृण। वैरपण येतांची ॥ ४३ ॥
तेंवी सामान्य ज्ञान। वैर न करी अज्ञान।
मी ब्रम्ह असें वृत्तिज्ञान। तें अज्ञानवन जाळी ॥४४॥
जो योग करूं जाई। तया सिद्धी आड येई।
जो धैर्यें सिध्दी सोडून देई। तो घेई मोक्षसुख ॥४५॥
अणिमादि आठ सिद्धी। यांकडे करितां बुद्धी।
जरी होई ऐहिक समृद्धी। मोक्षसिद्धी दुरावे ॥ ४६ ॥
सिद्धिचें नश्वर फळ। मोक्ष असे निश्चळ।
म्हणोनी ज्ञान विमळ। साधावें केवळ प्रयत्नानें॥४७॥
झोंपेंत जातां चित्त। करावें तया जागृत।
विषयीं होतां विक्षिप्त। करावें शांत पुनः पुनः ॥४८॥
असें अभ्यासानें चित्त। होतां निश्चांत दीपवत।
वृत्ती शांत होती समस्त। होई कृतकृत्य योगी ॥४९॥
सर्व कर्में क्षीण होती। हृदयग्रंथी तुटती।
संशयवट फुटती। हटती मागें शोकमोह ॥ ५० ॥
ज्ञानें जळे संचित क्रियमाण। प्रारब्ध भोगी योगी आपण।
मनीं न मानी तो शीण। स्वयें जीवनमुक्त होतां॥५१॥

सर्प जसा अंगावरी । वेगळाली कात धरी ।
तिचे विषयीं अभिमान न करी । त्यापरी शरीरीं मुक्त जाण ॥ ५२ ॥
अर्जुना अभ्यास जोंवरी । दृढ न झाला तोंवरी ।
वागावें अंधबधिरापरी । तरी अंतरीं योग ठसेल ५३॥
स्वयें समर्थ असूनी । विषयांजवळी वसूनी ।
निद्रितापरी वागे मुनी । त्याला जगीं मुग्ध म्हणती ॥
बसतां उठतां किंवा चालतां । ज्याची दृष्टी चार हातां।
सोडून दूर न जाई तत्वतां । तो आंधळा जाणावा ५५
हितकर किंवा अहितकर । मनोहर किंवा शोककर ।
वाक्य ऐकूनी न ऐके नर । योगी तो बधिर जाणावा॥
हितकारक सत्य भाषण । बोले परिमित भाषण ।
जेवतां बरवें वाईट अन्न । नेणे तो जाण अजिव्ह ५७॥
मळमूत्रोत्सर्गार्थ जाणें । भिक्षार्थ ज्याचें फिरणें ।
यावांचुनी फिरूं नेणे । तोचि पंगू जाणावा ॥ ५८ ॥
कुमारी आणि वृद्ध नारी । किंवा तरुणी सुंदरी ।
ह्या समान पाहूनि अंतरीं । जो निर्विकारी तो नपुंसक ॥
यापरी वागूनी । योगचर्या धरूनी ।
जो अंतर्निष्ठ वागे मुनी । तो जनीं वनीं समान॥६०॥
अर्जुना हा जाण योग । तुज म्यां कथिला सांग ।
जो श्रद्धधान विनीत असंग । तया सांग योग हा ६१
जो माझा भक्त होऊनी । सम लोष्टाश्मकांचनीं ।
हिंसा असत्यादि दे सोडुनी । तो आवडे मज योगी॥

राजा तूंही माझा भक्त । माझे ठायीं तुझें चित्त ।
विषयीं असरसी अनासक्त । मुक्तसंग सर्वथा ॥ ६३ ॥
तूं केलेंस याग । शुद्ध केलेंस अंतरंग ।
म्हणोनी कथिला हा योग । करी सांग अभ्यास
तयाचा ॥ ६४ ॥
तें ऐकूनी भगवद्वचन । सगद्गद होउनी अर्जुन ।
दोनी कर जोडून । करी स्तवन श्रीदत्ताचें ॥ ६५ ॥
(अभंग) तुज नमूं देवा ॥ ठेउनियां भावा ॥
केला हा बरवा ॥ उपदेश ॥ ६६ ॥
मोहतम गेले ॥ तापही निवाले ॥
त्वद्रूपीं निवालें ॥ माझें मन ॥ ६७ ॥
ज्ञानसूर्य मनीं ॥ उदित होवूनी ॥
टाकिलें जाळूनी ॥ अंतस्तमा ॥ ६८ ॥
देवा तुझे पद ॥ पाहुनी आनंद ॥
झाला गेला खेद ॥ भेद सर्व ॥ ६९ ॥
आज हें अपूर्व ॥ आलें मोठें पर्व ॥
पाहिलें पद सर्व ॥ प्रेमास्पद ॥ ७० ॥
तूंचि मायबाप ॥ शमविले ताप ॥
घालविले पाप ॥ कोपद्वेषां ॥ ७१ ॥
केला उपशम ॥ माझा सर्व भ्रम ॥
करिशी निष्काम ॥ धाम दिल्हें ॥ ७२ ॥
देवा परानंद ॥ सतत हें पद ॥
दिसो हाची छंद ॥ पूरवी तूं ॥ ७३ ॥

(ओवी) तूंचि माता तूंचि पिता। तूंचि गुरु कुलदेवता।
तूंचि स्वजन बंधु भ्राता। तुजपरता न दुजा मज ॥७४॥
तूं स्वयें देहेंद्रियातीत। सर्वेंद्रिया चालविसी सतत।
तूं दाविली ही मात। गुहाश्रित[1] होवुनी ॥ ७५ ॥
यापरता नाहीं स्वार्थ। दाविला जो हा परमार्थ।
तेणें झालों कृतार्थ। आतां व्यर्थ कां भडकावें॥ ७६ ॥
तूं भक्तिगम्य देव। नव पदीं घेतली धांव।
पुरविला माझा भाव। आनंदा वाव नाहीं आतां॥७७॥
त्वद्रूपीं हें जग भरलें। जेवीं पटीं तंतू ओंविलें।
तें रूप आज ठावें झालें। धालें मन माझें हें ॥ ७८ ॥
या संसारवृक्षीं। जीव ईश हे दोन पक्षी।
जीव हा कर्मफळें भक्षी। ईश्वर निरीक्षी साक्षित्वें ॥७९॥
यावत्फळाची रुची असे। तंव जीव घिरट्या घालितसे।
तंव हें तुझें रूप असें। अंतरीं न ठसे तयाच्या॥ ८० ॥
जो तुझा भक्त केवळ। तो सोडी कर्मफळ।
त्याच्या अंतरींचा झडे मळ। सबळ वैराग्य येउनी ८१
मग तो रिघे तुझे पाठीं। तूं करिसी त्यावरी दृष्टी।
हें म्यां माझे दृष्टीं। पाहिलें आतां स्वानुभवें ॥ ८२ ॥
मन होतां निष्काम। तुझें गोड लागे नाम।
तूंचि सत्य परंधाम। आत्माराम परमार्थ ॥ ८३ ॥

१ बुद्धि.

म्यां करायाचें केलें। मिळवायाचें मिळविलें।
पाहायाचें पाहिलें। मन निमालें त्वच्चरणीं ॥ ८४ ॥
तूं असती अगम्य। परी होसी गुरुगम्य।
कोणाशीं करूं तुझें साम्य। अनौपम्यस्वभाव तूं ८५
असा अर्जुनें स्तवितां दत्त। तत्काळ होवुनी प्रसन्नचित्त।
म्हणे होवुनी अप्रमत्त। ऐकिला योग सर्वही ॥ ८६ ॥
ही येथें असे दरी। इचे आंत प्रवेश करी।
स्थिर बसूनी आसनावरी। करी अभ्यास प्रयत्नें ८७॥
आसनीं सरळ बसूनी। स्वरूपीं दृष्टी लावूनी।
अभ्यास करी एकाग्रमनीं। शमवूनी लय विक्षेपा ८८
जो म्यां उपदेशिला योग। त्याचा अभ्यास करी सांग।
जें अनुभाविसील तें सांग। योगवियोग झाल्यावरी ॥
जा तूं न भी अंतरीं। गुहेमध्यें प्रवेश करी।
असें म्हणोनियां भवारी। त्याचे शिरीं ठेवी कर ९०
राजा रोमांचित होऊनी। श्रीगुरूसी वंदूनी।
आज्ञा शिरसा मानूनी। बैसे जाऊनी गुहेंत ॥ ९१ ॥
घालूनियां दृढासन। अभ्यासानें प्राणापान।
करूनियां समान। श्वास जिंकून स्थिरावला ॥ ९२ ॥
षट् चक्रें भेदितां। कुंडलिनी सरळ होतां।
सुषुम्णेचें द्वार खुलतां। समाहितता पावला ॥ ९३ ॥

---

१ एकाग्र होणें.

समाधी लागली तीन दिवस। पुनः लावी सोडूनी आळस।
पुनः तो बारा दिवस। समाहित होऊनी उठला ९४॥
पुनः करितां अभ्यास। समाधी स्थिरावे तीन मास।
ती खुलतां तयास। वाटे गुरूस भेटावें ॥ ९५ ॥
येऊनी वंदी श्रीदत्तातें। आलिंगूनी तयातें।
वदे दत्त काय तूतें। कळलें तें मातें सांगावें ॥ ९६ ॥
त्वां इतुके दिवस। गुहेमध्यें केला वास।
काय आलें अनुभवास। तें त्वास सांग आतां॥ ९७ ॥
अर्जुन म्हणे अभिनव। काय सांगूं अनुभव।
जेथें त्रिपुटीला नाहीं वाव। तो अनुभव कसा वदूं ९८
जरी तेथें नव्हत्या वृत्ती। तरी होतां आतां अनुवृत्ती[1]।
तर्क येतसे चित्तीं। स्थिर होती मती जेथें ॥ ९९ ॥
जाग्रत्स्वप्नसुषुप्ती। तीनी जेथें नसती।
इंद्रियांच्या चेष्टा न होती। उन्मनी स्थिती मना ये ॥
जें पूर्वीं होतें उद्विग्न। तें मन स्वरूपीं संलग्न।
होतां परमानंद निमग्न। झालें भग्नसंकल्प तें ॥१०१॥
तो आनंद न बोलवे। गुरुजी काय सांगावें।
बोलतसें जीवें भावें। न वर्णवे आनंद तो ॥ १०२ ॥
तेंची तुमचें रूप। सत्यज्ञानानंदरूप।
तें अनुभवितां न पाप ताप। तें हें स्वरूप बाहेरही १०३

१ वृत्तीचें मागाहून समजणें.

हें सुख टाकून। अन्यत्र न जाई माझें मन।
आतां नको राज्यधन। समाधान पावलों ॥ १०४ ॥
दुःख न होईल राज्य टाकितां। सुख न होईल राज्य करितां।
झाली मनाची दृढता। खास आतां भवद्रूपीं॥ १०५ ॥
जो सर्वत्र व्यापून। परमात्मा असे परिपूर्ण।
तोंचि तुमचें रूप निर्गुण। सगुणही तेंच झालें॥ १०६ ॥
ज्ञानपात्र करूनी। मला हातीं धरूनीं।
कृपामृतानें भरूनी। अमर करूनी ठेविला ॥ १०७ ॥
असें म्हणोनी लोटांगण। घालूनियां तो अर्जुन।
भावें चरण वंदून। लीन होवून राहिला ॥ १०८ ॥
इति श्रीमत्परमहंसवासुदेवानंदसरस्वतीविरचिते
श्रीदत्तमाहात्म्ये पंचदशोऽध्यायः ॥ १५ ॥
श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

---

१ योग्य.

# अध्याय सोळावा

श्रीगणेशाय नमः ॥

गुरु म्हणे रे दीपका । जो जगीं दावी कौतुका ।
ज्याचे अनुग्रहें बोले मुका । सच्चित्सुखात्मक जो दत्त ॥
तेणें साक्षात् उपदेशितां । सिद्धी ये अर्जुनाचे हातां ।
कोण मानी या अद्भुता । यन्नाम घेतां भयनाश॥२॥
अर्जुनाचें तें वचन । श्रीदत्तात्रेय ऐकून ।
बोले आतां तुझें मन । काय इच्छी सांगावें ॥ ३ ॥
अर्जुन म्हणे श्रीगुरूसी । आज्ञा होईल जशी ।
वागणूक करीन तसी । नाहीं मानसीं अन्य भाव॥४॥
आज्ञा झालिया गुहेंत । जावूनी बैसेन समाहित ।
अथवा हें स्वरूप पहात । बसतां चित्त सुखावेल ॥५॥
श्रीदत्त म्हणे अर्जुना । आजी करी संध्यावंदना ।
करूनियां भोजना । उद्यां आसनावरी बैस ॥ ६ ॥
तथास्तु म्हणूनी अर्जुन । करी संध्यावंदन ।
गुरुप्रसाद सेवून । घालवी दिन सेवेंत ॥ ७ ॥
दुसरे दिवसीं उठून । नित्यकर्म करून ।
श्रीदत्तातें वंदून । गुहेंत जावून बैसला ॥ ८ ॥
करूनी मनाचें समाधान । सुषुम्णामार्ग धरून ।
ब्रह्मरंध्रीं प्राण नेवून । लीन होवून राहिला ॥ ९ ॥
तीन मास सतत । जाहला समाधिस्थ ।
पुनः षण्मासपर्यंत । समाधिस्थ जाहला ॥ १० ॥

पुनः एक वर्षपर्यंत। अर्जुन राहतां समाधिस्थ।
येवूनीयां श्रीदत्त। म्हणे हा उत्थित न होय ॥ ११ ॥
राहिलें स्वतः उत्थान। म्हणूनी शिरीं कर ठेवून।
समाधी तयाची उघडून। उठविला बळें श्रीदत्तें॥१२॥
प्रयत्नें देहावरी। अर्जुन तो ये जरी।
तयाचीं इंद्रियें अंतरीं। ओढ घेती स्वरूपीं ॥ १३ ॥
अंतःकरण न फिरे। तेव्हां मग योगिवरें।
स्वेच्छेनें फिरविलें सारें। प्राणेंद्रियांतःकरणग्राम॥१४॥
हळू हळू अंगें हालवून। देहावरी आला अर्जुन।
हळूच नेत्र उघडून। करी दर्शन गुरुपदाचें ॥ १५ ॥
होतां पदाचें दर्शन। अर्जुन झाला तल्लीन।
समाधिसुख विसरून। नेत्र ताटून पाहतसे ॥ १६ ॥
माशी जशी गुळावरी। चिकटे तशी चरणावरी।
अर्जुनाची दृष्टी निर्धारीं। चिकटून राहिली निश्चळ१७
जसी कां पतिव्रता नारी। जरी पती निवारी तरी।
न होतसे दूरी। भावें धरी पतिचरणातें ॥ १८ ॥
तसा निवारितां अर्जुना। त्याची दृष्टी फिरेना।
मग हातीं धरूनी गुरुराणा। बैसवी अर्जुना स्वसंनिध
श्रीदत्त म्हणे तूं माझा भृत्य। तुझें राहिलें नाहीं कृत्य।
तूं झालासी कृतकृत्य। हें सत्य न संशय ॥ २० ॥
आतां त्वां नगरा जावें। प्रजेचें पालन करावें।
अनासक्तीनें वागावें। भावें गावें माझें यश ॥ २१ ॥

असें ऐकतां अर्जुन म्हणे । आतां कैचें येणें जाणें ।
खुंटलें अवघें बोलणें । धरणें घेतलें येथेंची ॥ २२ ॥
श्रीदत्त म्हणे अर्जुना । अंगिकारावें माझ्या वचना ।
लावूनी स्वरूपीं मना । बाह्याचरणा करावें ॥ २३ ॥
जरी अवशिष्ट नसे कृत्य । तरी आचारा सेवी अगत्य ।
स्वतःचें नसतांही कृत्य । होईल सत्य परोपकार २४
धर्म आहे सनातन । त्याला न द्यावा सोडून ।
स्वयें धर्म आचरून । जना शिक्षण तें लावावें ॥२५॥
येणें होय परोपकार । नातरी सिद्धा पाहूनी इतर ।
वागतील जरी अनाचार । होईल संहार संकरानें २६
लोकबाधा[1] न व्हावी म्हणून । लोक जातील भुलोन ।
असें दखवावें बाहेरून । विपरीताचरण जनामाजी २७
तूं गृहस्थ असरसी । न टाकी वर्णाश्रमासी ।
करी त्रिविध कर्मासी । सक्ती मानसीं न धरितां २८
जे असती मुक्त । ते कोठेंही न होती सक्त ।
त्याला करी अनुरक्त । असी वस्तु जगीं नाहीं ॥२९॥
सूर्य होतां शीतल । उष्ण होतां चंद्रमंडळ ।
अधोभागीं पसरतां अनल । न मानी नवल जीवन्मुक्त॥
जसी कुग्रामललना । नागरी कांताच्या मना ।
न रमवी तसें मुक्तजना । न रमवी जनामाजी कोणी॥
माझा जो म्हणावा । तो मुळींच न होयी ठावा ।
ज्याचा हा मी म्हणावा । त्याचे गांवा नेणेची ॥३२॥

---

१ लोकांस पीडा.

असा मुक्तांचा सिद्धांत। भीतृपणाची नसे मात।
तसा तूंही सतत। राहे यावत् प्रारब्ध ॥ ३३ ॥
श्रेष्ठ करी जसा आचार। पाहुनी तसा वागे इतर।
जें प्रमाण मानी थोर। वागे इतर तदनुसारें ॥ ३४ ॥
येणें न होय अतिप्रसंग। बालासमान व्हावें असंग।
गुणबुद्धीचा करूनी त्याग। वागतां व्यंग काय होय॥
जो आत्मरती आत्मतृप्त। आत्मरूपीं संतुष्ट।
त्याचें कार्य न अवशिष्ट। हें सर्व शिष्ट जाणती॥३६॥
करितां पुण्य त्याणें। नलगे स्वर्गाप्रती जाणें।
पापही करितां त्याणें। नरकीं जाणें न घडेल ॥ ३७ ॥
तथापी हेंची बरवें। पुण्यमार्गा अनुसरावें।
चित्तीं लक्ष्य धरावें। लोकीं वागावें असंगत्वें॥ ३८ ॥
आतां तूं जा स्वनगरीं। प्रजेचें पालन करी।
यागीं देवां तृप्त करी। पितृतृप्ती करी श्राद्धान्नीं ॥३९॥
गायी भूमी कन्या सुवर्ण। रथ वस्त्र भूषण।
देवूनी तोषवी विप्रगण। करी पालन दीनांधाचें॥४०॥
पुनः पुनः येवून। घेई माझें दर्शन।
राज्य करितां स्मरण। ठेवी अनुक्षण निजचित्तीं ४१
तूं कधीं न भुलसी। माझ्या स्वरूपा न विसरसी।
अंतर्निष्ठ राहसी। बाहेर व्यवहार करितांही ॥ ४२ ॥
प्रवाहपतित कर्म जरी। शुभाशुभ घडेल तरी।
त्याचें फळ तुझे शिरीं। काळांतरीं न येईल ॥ ४३ ॥

यापरी तूं जीवन्मुक्त। प्रारब्ध भोगी अनासक्त।
तूं होसी विदेहमुक्त। हें मदुक्त सत्य सत्य ॥ ४४ ॥
असें परिसुनी वचन। सानंद झाला अर्जुन।
बोले करूनियां नमन। हें वचन शिरसां मानलें॥४५॥
म्हणूनी पायां दृढ धरी। प्रेमाश्रुंनीं क्षालन करी।
हर्ष न मावे अंतरीं। जरी आंवरी पुनः पुनः ॥ ४६ ॥
प्रेमाश्रुधारा नावरती। स्थिती नये देहावरती।
म्हणे हे चरण अंतरती। हीच खंती वाटते ॥ ४७ ॥
श्रीदत्त म्हणे अर्जुना। जा मानूनी माझ्या वचना।
चिंतितां ह्या चरणां। जाती न मनांतूनी तुझ्या ४८
म्हणोनी देती आलिंगन। करिती त्याची बोळवण।
मनीं चिंतूनियां चरण। गेला अर्जुन नगरासी ॥४९॥
नगरीं येतां अर्जुन। समोर येती सर्वजण।
नगर अलंकृत करोन। समारंभें नेती तया ॥ ५० ॥
चंदनोदकाचे सडे। मार्गीं घालिती चहूंकडे।
वाद्यें वाजविती पुढें। द्विजगण पढे आशिर्मंत्रां ॥५१॥
वारांगना नृत्य करिती। भाट बंदी यश गाती।
जयजयकारें गर्जती। जनपंक्ती आनंदें ॥ ५२ ॥
सुभूषित पौरकन्याजन। माडीवरी चढून।
लाह्या शिंपिती[1] हर्षून। गुण गावून अर्जुनाचे॥ ५३ ॥
मोत्यांनीं तोरणें बांधिलीं। गुढियांची पंक्ती उभारिली
शोभवूनी गल्लोगल्लीं। संतोषली सर्व प्रजा ॥ ५४ ॥

१ वर्षती.

सोन्याचे तार्टीं रत्नदीप। घेवूनी सुंदरी आल्या समीप।
पाहुनी अर्जुनाचें स्वरूप। विरहताप घालविती ॥५५॥
सोळा सहस्र अर्जुनाच्या नारी।आल्या रत्नें घेवूनी करीं
ओवाळूनी अर्जुनावरी। रत्नें दूरी टाकिती ॥ ५६ ॥
तीं रत्नें घेवून। धनिक झाले जे दीन।
अशा समारंभेंकरून। अंतरीं[1] अर्जुन पातला ॥ ५७ ॥
सर्वांसी बैसवून। वस्त्राभरणें देवून।
उत्तम गौरव करून। यथाधिकारें बोळवी ॥ ५८ ॥
सप्तद्वीप पृथिवीचें। राज्य असे जयाचें।
एकटा पालन करी सर्वांचें। श्रीदत्ताचें वचन पाळी ५९.
अनेक रूपें घेवून। सर्वत्र करी संचरण।
कुठें काय करी कोण। हें दिसोन येत जया ॥ ६० ॥
स्वच्छंद असे ज्याची गती। कोठेंही कुंठित न होई ती
जसी वायुची गती। तसी गती तयाची ॥ ६१ ॥
असूनी स्वयें ब्रह्मज्ञ। केले दहा हजार यज्ञ।
जेथें आत्रिप्रमुख कर्माभिज्ञ। ऋत्विज प्राज्ञ सर्वही ६२
सोन्याच्या वेदी घालूनी। सुवर्ण मंडप उभारूनी।
देवाला बोलावूनी। समारंभें यज्ञ करी ॥ ६३ ॥
दिव्याभरणें लेवूनी। देवस्त्रिया घेवूनी।
येती विमानीं बैसूनी। देव यजनीं अर्जुनाच्या ॥६४॥
तेथें अप्सरा नाचती। गंधर्व सुस्वरें गाती।
विप्रही वेद पढती। पुरंध्री[2] गाती तत्कीर्ती ॥ ६५ ॥

१ राजमहालांत. २ सौभाग्यवती स्त्रिया.

असे भूप करी याग। देवां यथेच्छ दे हविर्भाग।
ब्राह्मणही वेदपारग। सांग करिती अनुष्ठान ॥ ६६ ॥
भूमी सुवर्ण धनान्न। विप्रां देई कन्यादान।
तृप्त होती द्विजजन। पक्वान्न परमान्न[1] जेवूनी ॥ ६७ ॥
दक्षिणेसी फोडी भांडार। यथेच्छ धन नेती द्विजवर।
रितें न होय कोशागार। सिद्धी सादर रहाती जेथें ॥
रौप्यखुर स्वर्णशृंगी। सवत्स धेनू शोभनांगी।
पयस्विनी नानारंगी। देई सात्विक वृत्तीनें ॥ ६९ ॥
धर्में राज्य करी अर्जुन। अकाळीं कोणा न ये मरण।
न होती उत्पात दारुण। नसे दुर्भिक्ष ज्याचे राष्ट्रीं ॥
यथाकाळीं पडे पर्जन्य। सर्वत्र उत्तम पिके धान्य।
लोक होती वदान्य। मान्य राजा राज्य करितां॥७१॥
कोणी नसती वंध्या नगरीं। फळें पुष्पें असती वृक्षांवरी
विधवा न होई भूमीवरी। न करती चोरी कोणीही ॥
मूषकादि उपद्रव न होती। कोणी अधर्म न करिती।
सकळ लोक धार्मिक होती। कार्तवीर्य राज्य करितां॥
खड्ग चक्र धनुर्बाण। आपुल्या करीं घेवून।
अनेक रूपें धरून। फिरे अर्जुन सप्तद्वीपीं ॥ ७४ ॥
ज्याचा रथ इच्छागमनी। हिंडे सकळ मेदिनी।
अर्जुन त्यावरी बसोनी। पाहे नयनीं सप्त द्वीपें ॥७५॥
क्वचित् कोणी करितां चोरी। स्वयें जावूनी तया धरी।
तो दंड्य होई तरी। ठार मारी धर्मात्मा ॥ ७६ ॥

१ क्षीर, पायस.

दुष्टांचें करी शिक्षण। शिष्टांचें करी पालन।
सर्वांचें अंतःकरण। ओळखी क्षण न लागतां ॥ ७७ ॥
अदंड्या दंड न करी। दंड्या शास्त्रोक्त दंड करी।
क्रोधें लोभें कोणा न मारी। कामारी परी विरक्त जो
भलतें कोणी सांगतां। कानावरी न धरी सर्वथा।
भलती भीड घालितां। न मानी सर्वथा धर्मज्ञ तो ॥
पूज्यांचे ठेवी सन्मान। ब्राह्मणाचा ठेवी बहुमान।
हे भूसुर असे मानून। देई वस्त्रधन तयांसी ॥ ८० ॥
असा राजा जीवन्मुक्त। होवूनीयां अनासक्त।
कधीं न हो विषयासक्त। ठेवी दत्तपदीं मन ॥ ८१ ॥
एके दिवसीं फिरतां। कर्कोटकाच्या सुतां।
देखिलें दुराचार करितां। जाता झाला तत्संनिध ८२
त्यांशीं करूनियां युद्ध। तया केलें बाणविद्ध।
करोनियां तयां बद्ध। त्याचें समृद्ध राज्य घेई ॥८३॥
तेथें पुरी वसवून। हजारों स्त्रिया घेवून।
नर्मदातीरीं येवून। क्रीडा करून राहिला ॥ ८४ ॥
भुजसहस्रे करून। नर्मदेशीं पूल बांधून।
प्रवाह पूर्वेस फिरवून। क्रीडा करून राहिला ॥ ८५ ॥
मनोहर वैजयंती माळा। घालूनियां आपुले गळां।
करूनी स्त्रियांचा गोळा। क्रीडा करूनी राहिला ॥८६॥
देव विमानीं चकित पाहती। किन्नरींच्या निवी सुटती।
अप्सरा भुलोन जाती। क्रीडा पाहतां अर्जुनाची॥८७॥

त्या नर्मदेचा पती । पश्चिम समुद्र जया म्हणती ।
पाहुनी अर्जुनाची क्रीडा ती । कोपें दुर्मती खवळला ॥
राजाच्या अंगावर । एकाएकीं आला समुद्र ।
तया पाहून राजेंद्र । हास्य करूनी राहिला ॥ ८९ ॥
समुद्र होवूनी खळ । अंगावरी येतां चपळ ।
तया करूनी निर्बळ । केला निश्चळ जागोजागीं ॥९०॥
मग तो राजा अर्जुन । हजार बाहू उभारून ।
समुद्रीं उडी टाकून । करी ताडन जोरानें ॥ ९१ ॥
ताडित होतां समुद्र । पलायन करी सत्वर ।
मरोनी जाती जलचर । कांपे थरथरां पाताल ॥ ९२ ॥
समुद्रदेवता येवून । करीं रत्नें घेवून ।
अर्जुनातें पूजून । अभयदान मागतसे ॥ ९३ ॥
शरणागतपालन । करावें हें ज्याचें व्रत पूर्ण ।
तो धर्मात्मा अर्जुन । अभयदान दे तया ॥ ९४ ॥
जया नाहीं विषयाची गोडी । मग कैंची स्त्रियांची आवडी ।
प्रारब्धकर्म देहा ओढी। आसक्ती थोडी सुद्धां न त्याची॥
समुद्र जलें भरला असतां । इच्छा नसोनी नद्या येतां ।
तयां मागें लोटूनी न देतां । घेई स्वांतरीं प्रारब्धयोगें ॥
तसा मुक्तही निष्काम । दैवें येवून मिळतां काम ।
तयां भोगितां इंद्रियग्राम । न क्षोभे उपशम पावला जो
दगडाप्रमाणें संतत । बसणें हे जीवन्मुक्तिव्रत ।
म्हणती ते केवळ अज्ञात । श्रुतिसिद्धांत नेणती ते९८

शास्त्रप्रमाणें प्रबळ ज्ञान। साधका मिळे तें पूर्ण।
अज्ञानतत्कार्यनाशन। करी कर्म हेंची तयाचें ॥९९॥
त्या ज्ञानाचा नाश करी असें। विशेष प्रबळ प्रमाण नसे।
म्हणूनी आत्मज्ञान न नासे। कसें तरी वागतांही १००
नाश करणें प्रारब्धाचा। हा धर्म नसे तयाचा।
नाश करणें आवरणाचा। हा तयाचा धर्म होय॥१०१॥
म्हणूनियां तत्वज्ञानी। प्रारब्ध भोगूनी राहती जनीं।
भोगाचा शिण न घेती मनीं। ते जाणूनी प्रारब्धतत्व॥
ज्ञानी अज्ञानी या दोघांसी। भोग जरी समानेंसि।
तरी काय विशेष तयांसी। म्हणसी तरी ऐक बा१०३
स्वानुसंधान ठेवूनी ज्ञानी। स्वप्नापरी प्रारब्धभोग मानी
म्हणूनी तो न शिणे मनीं। राहे जनीं उदासीन १०४
कदाचित् भोगकालीं। मी मर्त्य ही वृत्ती उदेली।
त्याणें ज्ञानाची हानी झाली। हें त्रिकालीं घडेना१०५
जे रागद्वेषादिक। तीं अज्ञानाचीं चिन्हें देख।
ज्ञानें समूळ रागादिक। नासतां शोक मग कोणा१०६
अज्ञानी हें तत्व नेणे। म्हणोनी दुःखादिकें शिणे।
रागद्वेषयुक्त घालवी जिणें। शोकदुःख भेणें घे सतत॥
हा तयांचा विशेष जाण। ज्ञान्याचें कर्म अशुक्लकृष्ण।
म्हणोनी प्रारब्धें भोगी अर्जुन। उदासीपणें भोग १०८
इति श्रीदत्तमाहात्म्ये षोडशोऽध्यायः ॥ १६ ॥

*

# अध्याय सतरावा

## श्रीगणेशाय नमः ॥

गुरु म्हणे शिष्या ऐक। राजा परम धार्मिक।
असा वागे धरूनी विवेक। अनेक कार्यें करूनियां॥१॥
स्वरूपीं ठेवूनी अनुसंधान। करी यज्ञतपोदान।
ब्राह्मणाचें नित्य पूजन। करी पालन प्रजेचें ॥ २ ॥
जो औरस पुत्रापरी। प्रजेचें पालन करी।
विशेषें यज्ञयागावरी। प्रीती धरी अर्जुन ॥ ३ ॥
श्रीगुरुदत्तप्रीत्यर्थ। अश्वमेध आरंभी यथार्थ।
तो असतां कृतार्थ। स्वर्गार्थ यज्ञ करील कीं ॥ ४ ॥
तो समर्थ जाणूनी। त्याचा अश्व न धरी कोणी।
अश्वमेध सांग होवूनी। जाती म्हणूनी भीती देव ॥५॥
त्याचें अंतःकरण न जाणती। म्हणोनी देव भय पावती।
एकत्र होवूनी सर्व म्हणती। आतां गती काय आमुची॥
आम्हां वाटतो उद्वेग। रायाचे निर्विघ्न होती याग।
आतां तो घेईल स्वर्ग। होतां सांग सयज्ञ ॥ ७ ॥
तरी यासी करावा उपाय। जेणें पडेल अंतराय।
राजाला विप्र असती प्रिय। हा निश्चय ठावा असे॥८॥
यास्तव कोणीतरी। विप्रवेष घेऊनी भूमीवरी।
जावूनियां त्याचे द्वारीं। सत्व हरावें तयाचें ॥ ९ ॥
आम्हांमध्यें सूर्य समर्थ। पुरवील सर्वांचे मनोरथ।
त्यावांचूनियां हा अर्थ। साधाया समर्थ दुजा नसे १०

असा विचार करूनी सुर। सूर्या धाडिती भूमीवर।
सूर्य होउनी द्विजवर। माहिष्मतीसी पातला ॥ ११ ॥
वैश्वदेवसमयीं। अर्जुन बळी टाकूं येई।
सूर्यही त्या समयीं। येई समोर रायाच्या ॥ १२ ॥
पोट पाठीस लागलें। डोळेही खोल गेले।
अडखळती पाउलें। शब्द न खुले बाहेर ॥ १३ ॥
राजा देखूनी विस्मय करी। म्हणे राहे कोण्या देशांतरीं।
असा दीन भूमीवरी। अद्यापवरी न पाहिला ॥ १४ ॥
राजा समोर जाऊन। नमस्कार करून।
म्हणे कुठूनी झालें आगमन। काय आज्ञापन भृत्यासी॥
विप्र म्हणे रायाप्रती। ऐकूनी आलों तुझी कीर्ति।
तुला आतिथेय म्हणती। तुझी ख्याती तीन लोकीं ॥
तू ब्रह्मण्य असससी। परम दयाळू दिससी।
याचकां अभीष्ट देशी। म्हणूनी घरासी आलों तुझ्या
जे असती उदार। ते राज्यधनपुत्रदार।
किंवा नश्वर शरीर। यावर लोभ न धरती ॥ १८ ॥
उदार होसी तूं तरी। माझी आतां तृप्ती करी।
तुजवीण या भूमीवरी। न दिसे अंतरीं निश्चय हा॥१९॥
राजा म्हणे पुरें बोल। तुझी तृप्ती केंवी होईल।
ब्राह्मण माझें दैवत केवळ। देईन सर्वस्व माझ्यासकट॥
विप्र म्हणे रायाप्रती। ही तुझी सप्तद्वीपा क्षिती।
ईचेवरी उद्भिज असती। ते सर्व देतां तृप्ती होईल २१

त्यांहीं मी तृप्त होईन। आणीक न इच्छा याहून।
असें वचन ऐकून। हर्षें अर्जुन मनांत ॥ २२ ॥
निश्चयें नव्हे हा नर। देवही फिरती भूमीवर।
विष्णु गेला बळीच्या द्वारावर। तद्वत् हा अमर कोणी तरी ॥ २३ ॥
हा दिसतो तेजस्वी। तेव्हां असावा हा रवी।
ऐसा तेजस्वी येऱ्हवी। कोण दुसरा असेल ॥ २४ ॥
असें मनीं चिंतून। म्हणे मागितलें देतों दान।
परी सांगा तुम्ही कोण। मग ब्राह्मण बोलतसे ॥२५॥
मी दिवाकर भट। आलों भरावया पोट।
लोकालोका[1]वरूनी वाट। धरिली नीट येथवरी ॥ २६ ॥
ऐकूनी अर्जुन हास्य करी। ह्मणे मी धन्य धरणीवरी।
साक्षात् सूर्य माझे द्वारीं। याचक होऊनी पातला २७
त्याचा धन्य गृहस्थाश्रम। त्याचा सफळ आचारश्रम।
त्याचाची चुकला भ्रम। महात्मा अतिथी घरीं येतां॥
मी दत्तात्रयकृपापात्र। जाणें योग विचित्र।
योगबळें सर्वत्र। पुनः उद्भिज उपजवीन ॥ २९ ॥
असा निश्चय करून। वृक्ष द्यावया अर्जुन।
सिद्ध झाला तंव तपन। दावी प्रगटून निजरूप ॥३०॥
तें स्वरूप पाहून। हृष्ट झाला अर्जुन।
म्हणे दिल्हें वृक्षदान। प्रतिग्रहण करावें ॥ ३१ ॥

१ उदयाचल.

सूर्य म्हणे रायासी। तूं खास उदार असती।
तरी शुष्क करूनी वृक्षांसी। देतां भक्षीन अग्निरूपें ३२
राजा म्हणे जें दान। मागितलें तें देईन।
न करी मी वृक्षशोषण। तूं भक्षण करी सुखें ॥ ३३ ॥
सूर्य म्हणे देतों बाण। त्यांचें करी तूं संधान।
त्यांही वृक्ष जाती वाळून। मग मी भक्षण करीन ३४
असें म्हणून भाते। देई सूर्य रायातें।
राजाही पांचशें धनुष्यांतें। सज्ज करूनी बाण योजी
एका एका बाणापासून। उपजती सहस्र सहस्र बाण।
एकेक हजारों उद्भिज्ज शोषून। शुष्क करती क्षणार्धें ३६
ग्रामी नगरी पर्वतावरी। दुर्गवनीं नदीतीरीं।
वृक्ष होते जे भूमीवरी। ते क्षणांतरीं जळाले ॥ ३७ ॥
ज्या ज्या वृक्षा बाण लागती। ते ते तात्काळ वाळती
अग्निरूपें तयाप्रती। सूर्य जाळी क्षणार्धें ॥ ३८ ॥
तृण गुल्म वृक्ष लता। सर्व हीं भस्म होतां।
तो वसिष्ठ ध्यानस्थ होता। तो उठिला त्या वेळीं ३९
वृक्ष जळती आश्रमस्थ। तें पाहूनी शिष्यां पुसत।
शिष्य सांगति बाणघात। केला अपरिमित अर्जुनें ॥
हें ऐकतां वचन। ध्यानें विचार करून।
होऊनी कोपायमान। निष्ठुर वचन बोले मुनी ॥४१॥
दुर्बुद्धी हा अर्जुन। राज्यभरें मत्त होऊन।
माझा आश्रम टाकिला जाळोन। त्याला शिक्षण
देईन मी ॥ ४२ ॥

बळाचा दर्प असे याला । हा अतिशय मत्त झाला ।
प्रतियोद्धा नाहीं याला । म्हणोनि झाला हा उन्मत्त ॥
अर्जुना गर्व पुरे आतां । जमदग्नीला सुत होतां ।
तो तोडूनी तुझ्या हातां । शिरच्छेद करील ॥ ४४ ॥
असें क्रोधावेशेंकरून । बोले वसिष्ठ शापवचन ।
तपस्व्याचें तें वचन । अन्यथा कोण करील ॥ ४५ ॥
अर्जुन हा ब्राह्मणभक्त । वसिष्ठही अत्यंत शांत ।
तो हा असा शाप देत । येथें कारण भाविदैव ॥ ४६ ॥
होणारी ईश्वरी करणी । निमित्तमात्र होती प्राणी ।
स्वतंत्र नसती कोणी । वेदवाणी असी असे ॥ ४७ ॥
सर्व स्थावर जाळून । सूर्य गेला निघोन ।
अर्जुनें योगबळें करून । केलें वृक्षजीवन पूर्ववत॥४८॥
अति दारुण ब्राह्मणाचा रोष । तच्छाप हें अनिवार्य विष ।
करी प्राणाचा शोष । हा दोष न समवे ॥ ४९ ॥
शाप होतां अर्जुन । तत्काळ उद्धत होऊन ।
स्वर्गावरी जाऊन । देवा जिंकूं म्हणतसे ॥ ५० ॥
त्याचे पुत्र बहुत । तयां नगरीं ठेवित ।
आपण विमानीं बैसत । स्वर्गाप्रत जावया ॥ ५१ ॥
ज्याच्या ऐश्वर्या तुळणा नाहीं । किंकरी सिद्धि त्याही ।
ज्याची गती कुंठित नाहीं । कोणी आज्ञाही न उल्लंघी ॥
स्मृतिगामी उग्रशासन । अनेक देह धरून ।
त्रिभुवनीं करी गमन । सर्वांचें मन ओळखी जो॥५३॥

दिव्य विमानीं बैसून । स्वर्गी चाले अर्जुन ।
चैत्ररथी[1] येऊन । क्रीडा करून राहिला ॥ ५४ ॥
पाहुनी त्या अवसरीं । यक्ष धांवले तयावरी ।
शस्त्रें सोडिती नानापरी । अर्जुन निवारी सर्वांतें ५५
नराचें मुख अश्वाचे देह । अश्वाचें मुख नराचे देह ।
असे किन्नरांचे समूह । यक्षांसह लोटले ॥ ५६ ॥
महाबल अर्जुन । पांचशें धनुष्य सज्ज करून ।
सोडी बाणावरी बाण । यक्षगण मग भ्याले ॥ ५७ ॥
छिन्न भिन्न होता देह । प्राणावरी येतां संदेह ।
यक्षाकिन्नर समूह । पावले मोह त्या युद्धीं ॥ ५८ ॥
ते करिती पलायन । तयां सोडूनी दे अर्जुन ।
शस्त्रांतें सांवरून । स्वर्गभुवना चालिला ॥ ५९ ॥
त्याला पाहूनी देवदूत । जाऊनी इंद्राप्रती सांगत ।
तों अर्जुन पातला अकस्मात । दिसे कृतांतसा देवां ॥
सहस्रबाहू महाशूर । अर्जुन येतां समोर ।
घेवोनियां सर्व निर्जर । शचीवर सरसरला ॥ ६१ ॥
तेथें झालें तुमुल युद्ध । सर्व देव झाले विद्ध ।
आश्चर्य करिती सिद्ध । पाहुनी अर्जुनाच्या पराक्रमा॥
अर्जुनाचे लागतां बाण । देवां अंगींचें गेलें त्राण ।
मग व्याकुळ होती प्राण । पलायन करूं इच्छिती देव॥
मोहनास्त्र टाकूनी । देवां मोहित करूनी ।
अर्जुन येऊनी नंदनवनीं । क्रीडा करूनी राहिला ६४

1 कुबेराचा बगीचा.

शचीसह एके दिनीं । इंद्र विमानीं बैसूनी ।
पुढें ऐरावता चालवूनी । नंदनवनीं पातला ॥ ६५ ॥
तों देखिला अर्जुन । त्यावरी कोपायमान होऊन ।
वज्र वरतें उचलून । सहस्रनयन पुढें झाला ॥ ६६ ॥
तें देखून अर्जुन । हातीं विमान उचलून ।
शचीसहित इंद्रा घेऊन । गर्जना करूनी चालविला ६७
इंद्र करी आक्रांत । धांवा धांवा देवां ह्मणत ।
देवही आले धांवत । अर्जुनाप्रत झुंजाया ॥ ६८ ॥
तेथें युद्ध झालें तुमुल । देवांचें खचलें बल ।
अर्जुनाचा प्रताप विशाल । न टिके काल जयापुढें ६९
जो योगाभ्यासधुरंधर । त्याचा देह वज्रसार ।
त्याला कोण देईल मार । खचले निर्जर मनांत ॥ ७० ॥
कोणी होती विवस्त्र । कोणी टाकून देती शस्त्र ।
कोणी झांकिती नेत्र । कोणी वक्त्र मुरडती ॥ ७१ ॥
कोणी हात जोडिती । त्राहि त्राहि ह्मणती ।
देव असे दीन होती । मग नृपती सोडी तयां ॥ ७२ ॥
सुटतांचि इंद्र तेथून । सर्व देवां घेऊन ।
मेरूवरी येऊन । खिन्न होऊनी वदतसे ॥ ७३ ॥
देवां दिधला स्वर्गलोक । मनुष्यां दिधला मर्त्यलोक ।
ब्रह्मदेवें तया हें दुःख । चला निवेदन करूंया ॥ ७४ ॥
मनुष्य असूनी हा अर्जुन । बळें स्वर्गीं येऊन ।
व्यर्थ आम्हांसीं लढून । स्वर्गभुवन घेतसे ॥ ७५ ॥

ह्या तों बळी अनिवार । श्रीदत्तवरें झाला अमर ।
ह्या आमुचा करील चूर। चला सत्वर ब्रह्मया सांगों॥७६॥
असें हें इंद्रवचन । मान्य करूनी देवगण ।
इंद्रा पुढें करून । ब्रह्मभुवना पातले ॥ ७७ ॥
जेथें वेद मूर्तिमंत । ब्रह्मदेवा वेष्टुनी राहत ।
सनत्कुमारादि ब्रह्मभूत । स्तविती ज्याला सदैव ॥ ७८ ॥
पाहूनियां चतुर्मुखा । देव विसरूनि दुःखा ।
पावले परमसुखा । ज्यांच्या हरिखा पार नाहीं ॥ ७९ ॥
साष्टांग नमन करूनी । देव उभे राहूनी ।
करसंपुट जोडूनी । स्तवन करिती तयाचें ॥ ८० ॥
जयजया कमलासना । जगदुत्पादका चतुरानना ।
जगत्पालका जगज्जीवना । कमलजनना तुज नमो ॥
आह्मी तुझे आज्ञाधारक । आज्ञेनें वागतों जसे सेवक ।
आजपावेतों पावलों सुख । आतां दुःख वोढावलें ॥८२॥
श्रीदत्ताच्या वरानें । उन्मत्त होऊनी अर्जुनानें ।
स्वर्गीं येऊनी बळानें । आह्मां केलें जर्जर ॥ ८३ ॥
तो नावरे सर्वथा । शस्त्रास्त्रें जाती वृथा ।
खुंटला आमुचा पंथा । आह्मीं आतां काय करावें ॥
ब्रह्मा ह्मणे देवांसी । चला जाऊं वैकुंठासी ।
भक्तकैवारी लक्ष्मीविलासी । वैकुंठवासी तारील ॥८५॥
ह्मणोनी सर्व निघती । वैकुंठाप्रती येती ।
मनीं नारायणा स्मरती । प्रेमें गर्जती नामघोषें ॥८६॥

जें वैकुंठभुवन। आनंदाचें मुख्य स्थान।
स्वप्नींही ज्याचें स्मरण। न होई जाण दुर्भगां ॥८७॥
नलगे सूर्यादिकांचा प्रकाश। जें असे स्वयंप्रकाश।
जेथें रोगचिंताक्लेश। लेशमात्रही न राहती ॥८८॥
सर्व काळ सुखावह। जेथें नसे शोकमोह।
पूर्णानंदाचें गृह। गरुडवाहधाम तें ॥८९॥
जे शांत दांत निर्मत्सर। निष्कपटी निरहंकार।
जे अहैतुकीभक्तितत्पर। ते तें पुर पाहती ॥९०॥
जेथें वनें कल्पद्रुमांचीं। वृंदें फिरती कामधेनूचीं।
सरोवरें अमृताचीं। चिंतामण्यांचीं सोपानें ॥९१॥
जेथें सुवर्णाच्या भिंती। रत्नजडित विराजती।
जिवंत चित्रें भासती। कुंठित मती होय जेथें॥९२॥
त्या वैकुंठाप्रती। देवांसह शचीपती।
येवूनीयां द्वाराप्रती। द्वारपाळा जाणविलें ॥९३॥
विष्णुसारिखे द्वारपाळ। चतुर्भुज घननीळ।
जयविजयनामें विमळ। ते कळविती विष्णूते ॥९४॥
विष्णूचे आज्ञेंकरून। देवांसह चतुरानन।
अंतरीं येवूनी जाण। कमळलोचन पाहती ॥९५॥
वामांकीं लक्ष्मी घेवून। पीतांबर पांघरून।
शंकचक्रगदा घेऊन। बैसला मधुसूदन आनंदें ॥९६॥
त्याला घालिती लोटांगण। देव स्तविती कर जोडून।
जयजय जगज्जीवन। नारायणा तुज नमो ॥९७॥

तूं भक्तपाळक कृपाघन। निजभक्तांचें जीवन।
पाहोनियां सुदीन। करिसी मन कनवाळू ॥ ९८ ॥
त्वां अवधूतरूपानें। अर्जुना दिल्हीं वरदानें।
आजि बलात्कारें त्याणें। देवस्थानें घेतलीं ॥ ९९ ॥
आह्मी देव तुझे किंकर। आमुचा तूंची आधार।
करा आतां प्रतिकार। राखावे अधिकार आमुचे १००
असें स्तवितां देवांनीं। विष्णू विचार करी मनीं।
अर्जुना शाप दे मुनी। म्हणोनी तो क्षोभला ॥ १०१ ॥
तो असे जीवन्मुक्त। प्रारब्धें ह्या चेष्टा होत।
त्याला स्वर्गाचा नसे स्वार्थ। व्यर्थ चेष्टा करीतसे ॥
तसें अर्जुनाचें आचरण। काय जाणती अमरगण।
त्याचें प्रारब्धही झालें पूर्ण। घेईल तूर्ण विदेहमुक्ती ॥
ख्यात्याधिकाचे करीं। वध नेमिला मीं जरी।
तया अर्जुना मारी। ब्रह्मांडोदरीं असा नाहीं ॥१०४॥
तरी म्यांच अवतारून। धारातीर्थी देह ठेववून।
द्यावें तया विदेहमुक्तिदान। झाला पावन पूर्वीच तो ॥
असा विचार करून। देवां म्हणे जनार्दन।
मी जमदग्नीपासून। रेणुकानंदन होऊन ॥ १०६ ॥
अर्जुनासी युद्ध करीन। संग्रामीं तयासी जिंकीन।
तुम्ही चिंता सोडून। चला स्वस्थान लक्षूनी ॥१०७॥
ऐकोनी विष्णूचें वचन। देव आनंद पावून।
विष्णूची आज्ञा घेवून। हर्षे स्वस्थाना परतले ॥१०८॥
इति श्रीदत्तमाहात्म्ये सप्तदशोऽध्यायः ॥ १७ ॥
श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

*

# अध्याय अठरावा

## श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः।

गुरु म्हणे दीपकासी। जमदग्नी कोण ऋषी।
रेणुका माता झाली कशी। हृषीकेशाची सांग ॥१॥
विष्णु स्वयें अवतारून। अर्जुनासी कां संग्राम करून।
कसा जिंकी जनार्दन। हें विस्तरून सांगावें ॥ २ ॥
द्विजरूप कां धरी। निजभक्तासी कां मारी।
हें सर्व सविस्तरीं। प्रश्नोत्तरीं निरोपावें ॥ ३ ॥
ऐकून शिष्याचें वचन। वेदधर्मा हर्षोन।
म्हणे ऐक शिष्या सावधान। साद्यंत निरोपितों ॥४॥
जन्मांत देव नेणून। संकटें येतां मी तुझा म्हणोन।
जो एकदांच ये शरण। त्यालाही अभयदान दे देव ५
हा तरी नित्ययुक्त। असे अर्जुन एक भक्त।
केवी टाकील त्याला दत्त। तच्चित्तानुसार वागे जो ६
जीवन्मुक्त अर्जुन। श्रीदत्तापासीं येवून।
विनवी हात जोडून। माझें हनन तुम्ही करा ॥ ७ ॥
क्षात्रियाचा देह बरवा। तो धारातीर्थी पडावा।
तरी हें कार्य न करवेल देवा। मानवाचा काय पाड ॥८॥
हा तो योगी श्रेष्ठ। असे महाबलिष्ठ।
याला मारील असा वरिष्ठ। न दिसे ब्रह्मांड शोधितां
देव म्हणे तयासी। म्यां प्रतिपाळिलें तुजसी।
या हातीं मारावयासी। मती कसी होईल ॥ १० ॥

अर्जुन म्हणे हें जरी । तुला न रुचे तरी ।
मृत्यु न यावा हीनाच्या करीं । रोगादिकें तरी न यावा
तुम्हां सम वरिष्ठ असेल । त्या करीं यावा अंतकाल ।
असा वर मागे भूपाल । देव तो बोल अंगिकारी १२
हें वरदान ठेवूनी अंतरीं । देवांनीं प्रार्थितां मधुवैरी ।
स्वयें हा अवतार धरी । ब्राह्मणाघरीं ख्यात्याधिक[1] ॥
यांत ईश्वरा काय दोष । काय तया असे रोष ।
भक्ताच्या इच्छेनें धरी वेष । प्रळयीं निःशेष मारी जो
जो ईश्वर निजकरीं । उत्पत्ती स्थिती लय करी ।
तो लेप न घे आपल्यावरी । उदासीनापरी वागे॥१५॥
तो असे जनार्दन । बाळापरी क्रीडन ।
तया केवी ये बंधन । नित्यमुक्त असे जो ॥ १६ ॥
जो उपजे भूमीवर । तया मृत्यु बरोबर ।
केवळ पडतां शरीर । जीवां विकार काय होय ॥१७॥
मुक्ताचें शरीर पडलें । तेणें तयाचें काय गेलें ।
पूर्वींच विज्ञानबळें । बाधित[2] केलें शरीर ज्याणें॥१८॥
जशा जळीं लाटा येती । परस्परांवरी आदळती ।
जरी त्या फुटोनी जाती । जळाचा नाश होईल कीं ॥
तसे देह विकारी । हे नष्ट होती जरी ।
स्वरुपा हानी तिळभरी । न पडे हें अंतरीं जाणावें २०
एवं विचारें पाहतां अंतरीं । दोष नये कोणावरी ।
असो आतां बोल भारी । अवधारी पूर्वकथा ॥२१॥

१ श्रेष्ठ. २ मिथ्यात्व निश्चय करणें.

गाधी राजा कान्यकुब्जदेशीं। धर्मात्मा सोमवंशी।
होतां तयाचे कुशीं। दैवें संतान न जाहलें ॥२२॥
तो राजा उदासीन होवूनी। भार्येसह बसे वनीं।
श्रीशंकरा आराधोनी। कन्यारत्न लाधला ॥ २३ ॥
तिचें नाम ठेविलें सत्यवती। रूपलावण्यसंपत्ती।
चातुर्यखाणी महामती। वाढे सुदती ती कन्या॥२४॥
एके दिवशीं ऋचीक ऋषी। गेला पितृदर्शनासी।
भृगुनामें पितयासी। प्रेमें वंदी सद्भावें ॥ २५ ॥
भृगु म्हणे ऋचीकासी। आजपावेंतो केलें तपासी।
आतां माझी आज्ञा धरी शिरसीं। गृहस्थाश्रमासी स्वीकारी ॥ २६ ॥
गृहस्थाश्रम करून। यज्ञें देवा तोषवून।
पुत्रमुख देखून। मग वन सेवी तूं ॥ २७ ॥
असें भृगूचें वचन। शिरसा मान्य करून।
ध्यानें पाहे कन्यारत्न। सत्यवतीसम अन्य न देखे २८
मग गाधीपाशीं येवून। ऋचीक मागे कन्यादान।
गाधी राजा गडबडून। मनीं म्हणे काय करावें ॥२९॥
हा तों तपस्वी मुनी। दरिद्री वास करी वनीं।
याला कन्या देवूनी। काय उपयोग होईल ॥ ३० ॥
माझी एकुलती कन्या हे। नाजूक अति सुकुमारी हे।
वनीं कष्ट केवीं साहे। नोहे योग्य ही तापसासी॥३१॥
फिरवावा जरी मुनी। तरी कोपेल तत्क्षणीं।
शाप देवूनी आम्हां जाळूनी। टाकील हा क्षणार्धें ३२

तरी याला नाहीं न म्हणावें। युक्तीनें मागें फिरवावें।
यापाशीं भलतेंच मागावें। असें योजी मनीं नृप॥३३॥
ऋचीका सत्कारूनी। राजा म्हणे ऐक मुनी।
माझी कन्या पाहूनी। भीड घालूनि मागती राजे३४
मग म्यां एक पण केला। जो सहस्र श्यामकर्ण अश्वाला।
भाग्यवंत देईल तयाला। हे कन्या देईन मी ॥ ३५ ॥
म्यां प्रतिज्ञा केली असी। तुम्हां ती साधेल कशी।
असें ऐकतां वचनासी। ऋचीक नृपासी बोलत॥३६॥
सहस्र श्यामकर्ण। मी आणून देईन।
मला द्यावें कन्यादान। हें वचन न फिरवी ॥ ३७ ॥
असें म्हणूनि करी ध्यान। वरुणापाशीं अश्व पाहून।
आकाशमार्गें गमन करून। येऊन वरुणा भेटला॥३८॥
म्हणे वरुणा मी ऋचीक ऋषी। पाळुनि पितृवचनासी।
साधावया गृहस्थाश्रमासी। उद्युक्त झालों ॥ ३९ ॥
गाधीची कन्या योजिली। परी एक गोष्ट अडली।
जरी ती त्वां ऐकिली। तरी झाली कार्यसिद्धी॥ ४० ॥
रायें केला एक पण। जो दे सहस्र श्यामकर्ण।
तया देईन कन्यादान। तुझे स्वाधीन हें आहे॥ ४१ ॥
स्वस्त्यस्तु ते वरुणा। मला देईं श्यामकर्णा।
ऐकोनी ऋषीच्या वचना। वरुणा भीति वाटली॥४२॥
मनीं चिंती वरुण। हा असे तपःपूर्ण।
याला न देतां शामकर्ण। कोपें पूर्ण शापील हा॥४३॥

तरी अश्वां पाजावी मंदिरा। मग ते न जाती मुनीश्वरा।
योजूनि अशा विचारा। ऋषीश्वरा म्हणे वरुण ॥४४॥
माझे उन्मत्त श्यामकर्ण। यांला वळवी असा कोण।
आवडे तरी दाखवून। देतों तुम्हां अश्व ते ॥ ४५ ॥
ज्यांची वायूप्रमाणें गती। भूमीला पाय न लाविती।
पाहतां मनुष्यां खावूं येती। असे असती उन्मत्त ४६
ऋषी म्हणे दावी मला। मी नेईन तयांला।
मग वरुण ऋषीला। दावी उन्मत्त श्यामकर्ण ॥ ४७ ॥
योगसिद्धी जयापाशीं। तो ऋषी देखे अश्वांसी।
चापल्य सोडूनी तत्क्षणेंसी। शांत झाले ते सर्व॥४८॥
योगसामर्थ्य अचाट। खंखाळ अश्व चालती नीट।
कांहीं न करितां खटपट। अश्वां घेवून चालिला॥४९॥
वरुणा देवूनी आशीर्वचन। सहस्र अश्व घेवून।
ऋषी निघाला जलांतून। पूर्व देशीं पातला ॥ ५० ॥
अश्वा बाहेर काढी जेथून। तें अश्वतीर्थ म्हणून।
लोकीं झालें प्रख्यात पावन। गंगेमध्यें[1] असे ते ॥५१॥
असे ते अश्व घेवून। ऋषी राजाप्रती येवून।
म्हणे आणिले हे श्यामकर्ण। तुझें वचन पाळ तूं ५२
स्वस्त्यस्तु ते भूपाळा। सत्य करीं स्ववाक्याला।
कन्यादान देई मला। आतां कशाला अवकाश ॥५३॥
अद्भुत माहात्म्य तें त्याचें। पाहतां मन गाधीचें।
प्रसन्न झालें योगाचें। सामर्थ्य अचाट न वर्णवे ॥५४॥

१ सहस्रमुखी गगेजवळ.

हा दरिद्री म्हणून । मी करीत होतों अनुमान ।
आतां याचें सामर्थ्य पाहून । कन्यादान द्यावे वाटे ॥
ज्यापाशीं सिद्धी रांगती । त्याला होईल काय खंती ।
देवही अनुकूल होती । उत्तमगती पावेल जो ॥ ५६ ॥
हा जांवई झाल्यावरी । कृतार्थ होईल हे कुमारी ।
हा माझ्याही वंशा उद्धरी । तेव्हां कुमारी द्यावी याला
असा निर्धार करूनी । सुमुहूर्त पाहुनी ।
ब्राह्मविवाहविधी करूनी । मुनीला दे कन्यादान ५८
महोत्सवें विवाह झाला । आनंद झाला सत्यवतीला ।
मुनीही आनंद पावला । राजकन्येला करीं धरितां ५९
देवकन्येची उपमा द्यावी । असी सत्यवती बरवी ।
जिला पाहुनी भुले रवी । तिला तपस्वी ऋचीक वरी ॥
पाहूनी हें इंद्रादिदेव । म्हणती नवल हें अभिनव ।
योगाचें हें वैभव । अपूर्व असे वाटतें ॥ ६१ ॥
असा तो ऋचीक मुनी । गाधिकन्या वरूनि ।
तेथेंचि राहिला संतोषूनी । पावूनी मनीं परमानंद ६२
एके दिनीं गाधिराजा । लागे ऋषीच्या पदांबुजा ।
म्हणे पुढें वंशीं माझ्या । नाहीं प्रजा योगींद्रा ॥ ६३ ॥
लुप्तपिंडोदक पितर । खालीं पडतील निर्धार ।
तुम्हीं समर्थ ऋषीश्वर । करा प्रतिकार प्रयत्नें ॥ ६४ ॥
मला व्हावा सुत । तपस्वी उदार पुण्यवंत ।
त्याची कीर्ती त्रिभुवनांत । आचंद्रार्क पसरावी ॥६५॥

ज्यायोगें होवूनी ऋणमुक्ती । मला मिळेल सद्गती ।
असें म्हणूनी नृपती । ऋषीप्रती नमन करी ॥ ६६ ॥
दयाळू तो ऋचीक । म्हणे आतां राया ऐक ।
तुला होईल एक लेंक । परम सुखदायक जो ॥ ६७ ॥
आतां घेवूनी पत्नीसी । जातों पितृदर्शनासी ।
ऐकूनि राजा तयांसी । बोळवी प्रीती करूनी ॥ ६८ ॥
सत्यव्रतीसी घेवून । ऋचीक मुनी येवून ।
भृगूचें घेवूनी दर्शन । तया निवेदन सर्व करी ॥ ६९ ॥
ऐकून पुत्राची ख्याती । देवीसमान स्नुषा ती ।
पाहूनी ऋषीची मती । अति संतुष्ट जाहली ॥ ७० ॥
तया आशिर्वचन देवून । राहवी आपुले संनिधान ।
सत्यव्रती पातिव्रत्य करून । वागे अनुदिन शांतपणें ॥
ती राजाची नंदिनी । सत्यव्रती मनस्विनी ।
भृगूची शुश्रूषा करूनी । हृष्ट करी अनुदिन ॥ ७२ ॥
तिचा पाहूनी स्वभाव । प्रसन्न झाला मुनिपुंगव ।
म्हणे पाहतां तुझा भाव । आनंदा वाव नसेची ॥७३॥
मी झालों प्रसन्न । देतों इष्ट वरदान ।
मग सत्यवती कर जोडून । नम्र होवून बोलतसे॥७४॥
धर्मीं मती स्थिर व्हावी । वडिलांची सेवा घडावी ।
हीच जोड मिळावी । काय करावी इतर जोड ॥ ७५ ॥
भृगु म्हणे हें सत्य असे । तुझी निष्ठा तसीच असे ।
जें कांहीं मनीं वसे । तसें देईन माग आतां ॥ ७६ ॥

सून म्हणे आहो मामाजी । अपुत्रा दुःखी आई माझी
तशीच स्थिती असे माझी । तुम्हीं राजी व्हावें आतां
होतां तुमची कृपादृष्टी । दुःख कसें राहील गांठीं ।
सुपुत्र येईल पोटीं । ही मोठी गोष्ट नसे ॥ ७८ ॥
आपुला होतां प्रसाद । चारी मुक्ती धरिती पाद ।
मग तेथें तुच्छ खेद । केवी कसा राहील ॥ ७९ ॥
भृगु म्हणे सुनेसी । पुत्र होतील तुम्हांसीं ।
सांगतों उपाय तयासी । एका भावेंसी आचरा ॥८०॥
ऋतुस्नात होवूनी । परब्रह्म चिंतूनी ।
तुवां अश्वत्थापाशीं जावूनी । तया पूजोनी आलिंगावें
तुझ्या मातेनें तेणें परी । आलिंगन द्यावें उदुंबरीं ।
पुत्रकामेष्टी ज्यापरी । कथिली तशी करावी ॥ ८२ ॥
संस्कृत चरू करून । ब्राह्ममंत्रें मंत्रवून ।
विप्र देतील तो प्राशन । निर्धार ठेवूनी करी तूं॥८३॥
ब्रह्मवर्चस्वी ब्राह्मण । तुला होईल पुत्र जाण ।
वेदशास्त्रसंपन्न । घेईल सन्मान तीन लोकीं ॥ ८४ ॥
क्षात्रमंत्रें मंत्रवून । देतील जो चरू ब्राह्मण ।
तो करितां भक्षण । तुझ्या मातेला पुत्र होईल ॥ ८५ ॥
तो क्षत्रिय महाशूर । होईल अति उदार ।
ज्याचा दरारा धरणीवर । होईल थोर निश्चयें ॥ ८६ ॥
असें म्हणूनी भृगु सुता । म्हणे ऋचीका तुवां आतां ।
पत्नीसी घेवूनी तत्वतां । श्वशुरगृहाप्रती जावें ॥८७॥

तुवां ऐकिलें माझें वचन। तसी पुत्रकामेष्टी करून।
करवी चरु प्राशन। वाढेल संतान उभयतांचें ॥ ८८ ॥
ऐकूनी असें वचन। मुनी स्त्रियेसीं घेवून।
श्वशुरगृहीं येवून। पितृवचन सांगे तयां ॥ ८९ ॥
गाधी आणि ऋचीक। पुत्रकामेष्टी करिती सम्यक।
परी व्यंग झालें एक। चरुप्राशनसमयांसी ॥ ९० ॥
कन्येचा चरु माता भक्षी। मातेचा चरु कन्या भक्षी।
ज्ञानचक्षूनें हें निरीक्षी। विश्वसाक्षी भृगु तो ॥ ९१ ॥
मग तेथें भृगु येवून। म्हणे काय केलें हें भुलोन।
व्यत्ययें झालें चरुप्राशन। संतानव्यत्यय होईल ॥९२॥
ऐक सुने तुझा सुत। होईल क्षात्रिय बलवंत।
होईल तुझ्या मातेला सुत। तो विख्यात ब्रह्मर्षी॥९३॥
ऐकोनी सत्यवती नारी। मनीं अत्यंत दुःख करी।
म्हणे मी झालें विप्रनारी। माझे उदरीं क्षात्रिय न हो॥
व्हावा ऋषी वेदनिपुण। तुम्हांसारिखा सर्वाभिज्ञ।
ज्याला मानिती प्राज्ञ। असा सुज्ञ पुत्र व्हावा ॥ ९५ ॥
भृगु म्हणे आतां हें न घडे। पुनः सून पायां पडे।
म्हणे करा येवढें। पुत्र व्हावा ब्राह्मण ॥ ९६ ॥
भृगु म्हणे सुनेसीं। आतां फिरावितां मंत्रासी।
जरी ब्राह्मणत्व ये पुत्रासी। तरी येईल पौत्रासी
क्षत्रियत्व ॥ ९७ ॥
सत्यवती म्हणे श्वशुरा। येवो क्षात्रियत्व पौत्रा।
ब्राह्मणत्व यावें पुत्रा। तुमच्या गोत्रा साजेल हें ॥९८॥

तथास्तु म्हणूनी जाई ऋषी । गाधी म्हणे मानसीं ।
येईना कां ब्राह्मण कुशीं । माझे ख्यातीसी वाढवील ॥
मग दोघी झाल्या गर्भिणी । उत्तम डोहाळे लागूनी ।
बोलती ब्रह्मज्ञान अनुदिनीं । गाधी मनीं तोषला १००
पुंसवनादी संस्कार । यथाकाळीं करिती सादर ।
जातां नवमास बरोबर । प्रसवल्या दोघीही पुत्ररत्नें ॥
मग जातकर्में करिती । ब्राह्मणा धन वस्त्रें देती ।
ब्राह्मण जातक पाहती । म्हणती होतील हे ऋषी १०२
सत्यवतीचा सुत । नामें जमदग्नी प्रख्यात ।
जाहला परम बुद्धिवंत । ज्याला समस्त मानिती १०३
हा साक्षात् शिवशंकर । धरी असा हा अवतार ।
धर्म स्थापावया भूमीवर । गौरीवर प्रगटला ॥ १०४ ॥
पतिव्रता सत्यवती । तिची पाहूनी अति भक्ती ।
प्रसन्न होवूनी उमापती । अवतार धरी ऋषीरूपें॥१०५॥
गाधीचा तो पुत्र । नामें जाहला विश्वामित्र ।
वाढे परम पवित्र । गायत्रीमंत्रद्रष्टा जो ॥ १०६ ॥
क्षत्रियाचे कुशीं आला तरी । चरुसंस्कारें अंतरी ।
ब्राह्मणत्व ठसोनी सुविचारी । करी प्रयत्न विप्र व्हावया ॥ १०७ ॥
सर्व ऋषींसी विनवून । म्हणे मला करा ब्राह्मण ।
ऋषी म्हणती वसिष्ठवचन । आम्ही मानूं सर्वथा १०८
मग वसिष्ठासी विनवून । साठ सहस्र वर्षें तप करून ।
विश्वामित्र तो ब्रह्मऋषी म्हणून।प्रख्यात होवुन राहिला
इति श्रीदत्तमाहात्म्ये अष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥

# अध्याय एकोणिसावा

श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

गुरु म्हणे शिष्य ऐक आतां । शंकरें अवतार धरितां ।
स्वयें अवतरे पर्वतसुता । जाहली सुता रेणुराजाची॥१॥
रेणुका नामें पुण्यखाणी । शिवध्यानाहूनी मनीं न आणी ।
तोचि जमदग्नी जाणूनी । अनुदिनीं चिंती तच्चरण॥२॥
तिचा निर्धार जाणून । रेणु राजा संतोषून ।
जमदग्नीला बोलावुन । कन्यादान देता झाला ॥ ३ ॥
रेणुका साक्षात् पार्वती । धरितां जमदग्नीनें हातीं ।
हृष्ट होऊनी अति प्रीति । सेवा करी तयाची ॥ ४ ॥
मग आश्रम करूनी । जमदग्नी राहिला वनीं ।
अग्निहोत्र घेऊनी । तपा आचरोनी राहिला ॥ ५ ॥
रेणुका ती पतिव्रता । धरूनियां पतीच्या चित्ता ।
अनुकूल वागे सर्वथा । माथा तुकाविती जिला देवी ६
तिला झाले चार पुत्र । सर्वही परम पवित्र ।
झाले पूज्य सर्वत्र । पितृसेवातत्पर ते ॥ ७ ॥
पहिला वसुमंत दुसरा वसु । तिसरा सुषेण चवथा विश्वावसू ।
चौघेही धर्मविश्वासु । वेदशास्त्रपारंगत ॥ ८ ॥
जो देवीं प्रार्थिला हरी । तो ये रेणुकेचे उदरीं ।
स्वयें अवतार धरी । भक्तकैवारी स्वयंभू जो ॥ ९ ॥

वैशाख शुक्ल तृतीयेसी । सिंहलग्नी मध्यान्हसमयासीं ।
अवतार धरी हृषीकेशी । भार्गवराम नामें सहावा जो
भृगुच्या वचनानुसार । क्षात्रियसा झाला परशुधर ।
पढूनियां वेदशास्त्र । ब्रह्मचर्यें वागतसे ॥ ११ ॥
तपश्चर्या करून । शिवाचें मन तोषवुन ।
धनुर्वेद पढून । शस्त्रास्त्रीं निपुण झाला ॥ १२ ॥
शिवाची आज्ञा घेऊन । पितृगृहीं येऊन ।
मातापितरां सेवुन । विनीत होऊन राहिला ॥ १३ ॥
राम हा परम धार्मिक । जो मातापितृसेवक ।
ज्याला मानिती ऋषीलोक । जो विवेकसंपन्न ॥ १४ ॥
जो स्वयें नारायण । पुत्रपणा पावुन ।
सेवा करी अनुदिन । गौरीहररूप मातापितरांची॥१५॥
नित्य वनीं जाऊन । समित्पुष्पफळादि आणून ।
देई सन्निध राहून । आज्ञावचन न उल्लंघी ॥ १६ ॥
जमदग्नी पवित्र । अनुकूल ज्याला कलत्र ।
स्वाधीन वागती चारी पुत्र । अग्निहोत्र नित्य चालवी
रेणुका ती एके दिवशीं । करावया स्नानासी ।
आली एकली नदीतीरासी । चिंती मानसीं पतीतें १८
गंधर्वराजा त्या गंगेत । सवें स्त्रिया घेउनी बहुत ।
आला क्रीडा करीत । मदोन्मत्त गज जेवी ॥ १९ ॥
सर्व स्त्रिया सुकुमारी । भूषणें लेऊनी नानापरी ।
निःशंकपणें जलांतरीं । क्रीडा करिती मदभरें ॥२०॥

सुगंधी पुष्पें घवघवीती । सुगंधी बहुदूर पसरती ।
भ्रमर तेथें धांव घेती । गुंजारव करिती मदभरें २१
गजरे तुरे हार । शोभती ज्यांच्या अंगावर ।
रत्नजडित अलंकार । यांहीं शरीर विराजे ज्यांचें २२
चंदन कस्तूरी लिंपून । उत्तम टिळे चर्चून ।
दिव्य वस्त्रें पांघरून । स्त्रियांशीं रममाण होतसे २३
तसें तें क्रीडाकौतुक । पाहतां रेणुकेला हरिख ।
वाटोनी लावी तिकडे आंख । म्हणे सुख उत्तम ह्यांचें
दैवाची विचित्र गती । मोठेमोठेही भुलती ।
पहा हे परम सती । जगतीमाजी विख्यात ॥ २५ ॥
जिणें आपुलें वस्त्रांतून । पाणी आणितां बांधून ।
न पाझरे त्यांतून । जीवनबिंदू एकही ॥ २६ ॥
पातिव्रत्य जिचें असें । स्वप्नींही परमुखा न पाहतसे ।
ती भुलोनी अवलोकीतसे । तसे ते खेळ परपुरुषाचे ॥
तेणें पातिव्रत्य न्यून झालें । तत्क्षणीं तिचें मन भ्यालें ।
म्हणे म्यां हें काय पाहिलें । कैंवीं झाले वरते नेत्र ॥
आतां खचित माझा पती । मला सोडील हें निश्चिती
आतां माझी काय गती । अंतरती उभय लोक कीं ॥
कटकटा माझ्या दुर्दैवा । कां धरविसी दुर्भावा ।
हरहरा परमेश्वरा देवा । माझ्या धवा कोप न येवो ॥
असी भयभीत होऊनी । मस्तकीं जल घेऊनी ।
परतली रेणुनंदिनी । निजसदनीं पातली ॥ ३१ ॥

तंव द्वारीं जमदग्नी । साक्षात् दिसे जमदग्नी ।
रेणुकेसी पाहुनी मनीं । मनीं सर्व समजे तो ॥ ३२ ॥
म्हणे ही धैर्यापासून । भ्रष्ट झाली म्हणून ।
ब्राह्मी लक्ष्मी जाऊन । अशी दीनमुखी झाली॥ ३३ ॥
मुनी कोपायमान होऊन । नानापरी धिक्कारून ।
म्हणे सुटलें हें सदन । न दावी वदन मला तूं ॥ ३४ ॥
मी तरी दरिद्री ऋषी । राख फांसोनी अंगासी ।
सदा असे वनवासी । वल्कलासी सेवूनी ॥ ३५ ॥
येथें कंदमुळें फळें । आमुचा आहार तुला कळे ।
तो तरी वेळोवेळे । आम्हां न मिळे भक्षावया ॥३६॥
चंपक पुष्पें मालती । सेवंती बकूळ जाती ।
तेथें स्वर्प्नींही न दिसती । वाटेल खंत तुज येथें ॥३७॥
येथें पलंग बिछाने । शिळेचे करून निजणें ।
अंगराज धुळीविणें । कोण जाणे या आश्रमीं ॥३८॥
येथें वास केल्यावरी । तुज कष्ट होतील भारी ।
होमधूम घेतां नेत्रीं । ढळढळां वारी वाहेल ॥ ३९ ॥
कोण हे कष्ट सोसील । तुला जेथें सुख होईल ।
तेथें त्वां जावें खुशाल । नाना ख्याल करावया ॥४०॥
राजाची धरितां पाठ । तुझें नीट भरेल पोट ।
हातीं मिळतील पाटल्या गोठ । डोईवरी मोट न येईल
जरी राजासवें नांदसी । सर्व सुख पावसी ।
सुखानें क्रीडा करिसी । कासया येसी आतां येथें ४२

त्वां जावें माघारां। उलंडूं न देईं ह्या द्वारा।
आतां मला नको तुझा वारा। जाईं जारा लक्षूनी ४३
जायेकरितां जाया। न होतसे प्रिया।
आपुल्या कामा जाया प्रिया। वदे श्रुती या वचनातें॥
नातें आज तें तुटलें। तुझें हें मन विटलें।
माझ्यापासूनी सुटलें। नटलें जें पररंगीं ॥ ४५ ॥
पररंगीं रंगे जी नारी। तिला तत्काळ टाकावी दूरी।
असा विचार चतुरीं। निर्धारिला सत्य तो ॥ ४६ ॥
तेव्हां आतां त्वां जावें। वाटेल त्या पंथा धरावें।
आवडे त्या पुरुषा भजावें। हें समजावें सत्य वचन ॥
असे अवाच्य बोल ऐकूनी। थरथरां कांपे रेणुनंदिनी।
खिन्न झाली भ्याली मनीं। कांहीं न सुचोनी गडबडली
नेत्रीं ढळढळां वाहे पाणी। मुख गेलें वाळोनी।
अंगीं घर्म सुटोनी। भिजोनी गेलें वस्त्र तिचें॥ ४९ ॥
बोलूं जातां शब्द न उमटे। बुद्धी सर्वथा खुंटे।
गहिंवरे गळा दाटे। सुटे वस्त्र अंगावरूनी ॥ ५० ॥
पुढें पाउल न उचले। संतापें अंग जळालें।
सर्वही धैर्य वळलें। सौंदर्य वाळलें तत्काळ ॥ ५१ ॥
लांकुडाची पुतळी जसी। निश्चल राहे तसी।
रेणुका उभी दारासी। जमदग्नी तिसी पुनः वदे॥५२॥
टवळे न जासी येथोन। तरी तुझा घेईन प्राण।
माझा कोप दारुण। नेणसी कठिण मन माझें ॥५३॥

जा जा येथूनी सत्वर। माझा कोप अनिवार।
असें बोलतां मुनीश्वर। मनीं विचार करी नारी ५४
एकदां चुकोन घडला अन्याय। मी पतीचे न सोडीन पाय।
होवो अपाय किंवा उपाय। येथूनी न जाय माघारां॥
जरी पती मारील। तरी पाप जाईल।
दुर्गती पुढें न होईल। असें निश्चळ करी मन ॥ ५६ ॥
पुनः पुनः सांगतां। ती माघारां न फिरतां।
हाक मारी श्रेष्ठ सुता। वसुमंता जमदग्नी ॥ ५७ ॥
पितृवचना ऐकून। आला तेथें वसुमंत।
जमदग्नी तया म्हणत। कोपयुक्त होउनी ॥ ५८ ॥
पुत्रा इणें केलें पाप। त्यामुळें झाला मला ताप।
इची मान शीघ्र काप। कांप आणूं नको अंगीं ॥५९॥
ऐकूनी तातवचन। ताताचे पाय धरून।
म्हणे कोपाचें करा शमन। एवढा कोप न करावा ६०
न मातुः परदैवतं। एवं चेच्छास्त्रसम्मतं।
तर्ह्यस्या हननाच्छाश्वतं। हंत दुर्गतं ह्यनुभवेयं ॥६१॥
असें वदतां तनय। बापा वाटला अनय।
म्हणे याला झाला स्मय। मला न्याय शिकावितो हा
पितुर्जीवतो वाक्यकरणात्। पुत्रस्य पुत्रत्वमिति वचनात्।
अद्य तदुल्लंघनात्। कुर्यां भस्मसात्[1] त्वामहं ॥ ६३ ॥

१ भस्मप्राय.

असें कोपें बोलून । तया म्हणे तूं जा जळून ।
असें बोलून शापवचन । क्रूरलोचन पाहे तया ॥ ६४ ॥
तत्काळ तो गेला जळून । मग वसुला बोलावून ।
म्हणे इचें शिर छेदून । टाकून देई सत्वर ॥ ६५ ॥
वसु म्हणे ऐक ताता । पितुः शतगुणं माता ।
असी असे शास्त्रवार्ता । ती अन्यथा केवी करूं॥६६॥
असें त्याचें वचन । ऐकतां त्यावरी कोपोन ।
म्हणे तूं जा जळून । त्वरें लक्षून अग्रजमार्गासी॥६७॥
असें म्हणतां तो जळाला । तेणें परी विश्वावसूला ।
सुषेणालाही जाळिला । तया वेळा मुनीनें ॥ ६८ ॥
चौघे गेले जळून । परी दुःखित न झालें मन ।
म्हणे परशुराम अजून । वनांतून कां न ये ॥ ६९ ॥
तंव समिधा दर्भ घेऊन । हातीं परशू धरून ।
द्वारीं पातला नंदन । हृदयनंदन केवळ जो ॥ ७० ॥
म्हणे रामा ही तुझी माता । करी महा दुष्कृता ।
इचें शिर तोड म्हणतां । तुझी बंधुता[1] नायके ॥ ७१ ॥
म्यां शाप देऊन । तुझे बंधू टाकिले जाळून ।
तूं पितृभक्त जाणून । तुला सांगतों ऐक आतां ७२॥
हा परशु उचलून । इचें शिर छेदून ।
टाकितां माझें मन । समाधान होईल ॥ ७३ ॥
ऐकतांचि पितृवचन । तत्काळ परशु मारून ।
मातेचें शिर छेदून । टाकी कठोर मन ज्याचें ॥ ७४ ॥

---

१ बंधुसमुदाय.

काय छाती ही तयाची। दगडानें मढविली कीं लोहाची
मान तोड म्हणतां द्रव न येची। म्हणोनि होय तोचि
महाक्रूर ॥ ७७ ॥
पुढें क्षत्रियांचा निरन्वय। करील हें नोहे आश्चर्य।
मातृशिरच्छेदीं त्याचें धैर्य। कधींतरी अस्तमय होय कीं
झटदिशी परशु मारूनी। चटदिशी मान तोडूनी।
पटदिशी टाकिली पाडूनी। खटदिशीं मेदिनीवरी पडे
शिर तुटतां चळचळा। रक्त वाहे भळभळा।
जरी राम पाहे डोळां। ज्याचा गळा न दाटे ॥ ७८ ॥
पाहूनी त्याचें शौर्य। ओळखूनी औदार्य।
ऋषी म्हणे हा न हो अनार्य। परम आर्य पितृभक्त॥
मग शांत होऊनी मुनी। रामातें आलिंगूनी।
म्हणे शाबास तूं पितृवचनीं। पूर्ण विश्वास ठेविशी॥
मातेविषयीं स्नेह न धरिला। पापपुण्याचा विचार न
केला।
तेणें मला आनंद झाला। हो तूं भला त्रिलोकीं॥८१॥
मी झालों प्रसन्न। तुला देतों वरदान।
असें ऐकोनी मुनिवचन। राम वंदून वर मागे ॥८२॥
ताता माता हे उठावी। भ्रातृचतुष्टयी वांचवावी।
मला चिरंजीविता असावी। नसावी स्मृती मातृवधाची
मिळावा सर्वत्र विजय। कधीं न यावा अपाय।
म्यां व्हावें सदा अजेय। दीर्घ आयुष्य असावें ॥८४॥

असें मागतां रामानें । मग तथास्तु मुनी म्हणे ।
तुला कळिकाळाचें न भेणें । चिरंजीवपणें सुखें रहा ॥
तेव्हां आपोआप शिर । जोडतां रेणुका उठे सत्वर ।
पुनः उठले ते बंधु चार । रामा हर्ष जाहला ॥ ८६ ॥
मग राम उठोन । धरी मातेचे चरण ॥
पुत्रस्नेहें आलिंगून । आशीर्वाचन दे माता ॥ ८७ ॥
म्हणे माता ते अवसरीं । रामा त्वां मजवरी ।
ही कृपा केली बरी । खंती अंतरीं न धरी हे ॥ ८८ ॥
ज्या पातिव्रत्या सांभाळिती । त्यांनीं ही गोष्ट ठेवावी चित्तीं ।
जातां अन्यत्र चित्तवृत्ती । ऐसी गती वोढवेल॥ ८९ ॥
ॐ:रे चित्ता कामसक्ता । कां आम्हा बुडविशी संता
तुला धिक्कार असो आतां । घेई शांतता अझून तरी॥
काम ठाईंचा[1] चावटा । भल्याभल्याचा करी तोटा ।
सज्जना बुडवी हा करंटा । मोठा खोटा तीन लोकीं ९१
लुटारू ह्या ऐशा चोरा । केवी देशी चित्ता थारा ।
आतां तरी सारासारा । विचारा करी निश्चयें ॥ ९२ ॥
तुझे ठाईं न उठतां काम । दूर होईल कीं परंधाम ।
तेव्हां तूं होई निष्काम । परंधाम दूर नसे ॥ ९३ ॥
सर्वथा कामा न सोडवे । तरी येवढेंच करी बरवें ।
पतिचरणा आदरी ब्रह्मभावें । एवढा काम[2] राखी तूं ॥

१ कायमचा. २ इच्छा.

मग आपोआप निष्काम । होसील तूं आत्माराम ।
यापरता उपशम । नको धाम हेंच तुझें ॥ ९५ ॥
असें चित्ता वळवूनी । आपुले स्वाधीन करूनी ।
रेणुका लावी पतिभजनीं । अनुदिनीं समरसें ॥ ९६ ॥
पतीचे चरण धरून । म्हणे मी केवळ पापीण ।
दुष्टवासना उठऊन । दुष्ट दर्शन पैं केलें ॥ ९७ ॥
हा घडला महोत्पात । त्यातें तुम्हीं केलें शांत ।
बरवें दिधलें प्रायश्चित्त । हें देहांत पापशोधक ॥ ९८ ॥
हा तुमचा नव्हे कोप । माझा वाढऊनी अनुताप ।
निःशेष घालविलें पाप । आतां निष्पाप झालें मी ९९॥
कोण एवढा दयाळू । कोण येवढा कनवाळू ।
केला माझा सांभाळू । असा प्रतिपाळू कोण जगीं ॥
सद्धर्माचा उपदेश । मूर्खा ऐकतां येई रोष ।
प्रथम वाटे जें विषा अंतीं विशेष अमृत तें ॥ १०१ ॥
आजी केला उपकार । मला ठरविलें धर्मावर ।
जन्मोजन्मीं हाची वर । सेवावे सादर हे चरण॥१०२॥
आम्ही पतिव्रता नारी । पतिविणें आम्हां कोण तारी ।
हा निर्धार आमुचे अंतरीं । उभयलोक हाच एक पती
असी विनंती करून । प्रसन्न केलें पतीचें मन ।
ऋषी बोले सुप्रसन्न । तुझें मन शुद्ध असे ॥ १०४ ॥
मग ती रेणुका आनंदे । पतीशीं प्रेमें नांदे ।
पति ब्रह्म मानी अभेदें । एकमन जयांचें ॥ १०५ ॥

साक्षाद्विष्णु राम । स्वयें वैकुंठधाम ।
असूनियां अकाम । शिवसेवातत्पर राहे ॥ १०६ ॥
अर्जुनाचा वर । सिद्ध करावया लक्ष्मीवर ।
धरी द्विजावतार । नामें परशुधर प्रसिद्ध ॥ १०७ ॥
गाय नेली हें मिष करूनी । अर्जुनासी युद्ध करूनी ।
समरीं त्यासी मारूनी । मोक्षसदनीं पाठवी ॥ १०८ ॥
इति श्रीदत्तमाहात्म्ये एकोनविंशोऽध्यायः ॥ १९ ॥
श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

## अध्याय विसावा

### श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

दीपक म्हणे गुरुप्रती । ज्यापाशीं सिद्धी रांगती ।
जो करी विप्रांची भक्ती । मिती नाहीं ज्याच्या दाना ॥

त्या नृगा विप्राची गाय । नेण्याचें कारण काय ।
हा माझा संशय । दूर करावा ॥ २ ॥

गुरु म्हणे दीपकासी । शाप होतां रायासी ।
फेर पडला मतीसी । म्हणूनी धेनूसी नेली ॥ ३ ॥

प्रत्यहीं याग करी । पूर्ण भक्ती विप्रांवरी ।
धर्मी निष्ठा ठेवी बरी । तरी दैव पुढें आलें ॥ ४ ॥

स्वयें ज्ञानी असून । धर्मात्मा नीतिनिपुण ।
निरिच्छही असून । बळें दैवें वश केला ॥ ५ ॥

दैव हें बळिवंत । हें सर्व विख्यात ।
ब्रह्मादिकां वागवीत । स्वहस्तगत करूनी ॥ ६ ॥

सूर्या नित्य फिरवी । ब्रम्ह्याकरीं सृष्टी करवी ।
विष्णूला अवतारें नटवी । जगा मारवी रुद्रकरें ॥ ७ ॥

कोणा न सोडी दैव । हें सुख दुःख दे सदैव ।
दैवें न सोडिले देव । न सोडी जीवन्मुक्ताही ॥ ८ ॥

ईश्वरें दैव निर्मिलें । त्याला कोणीं न त्यजिलें ।
कुमारशापें[1] पाडिलें । वैकुंठाहूनी जयविजयां ॥ ९ ॥

१ सनत्कुमार.

चंद्रा योजी गुरुभार्येसी । इंद्रा योजी अहल्येशीं ।
ब्रह्मया योजी कन्येशीं । पळवी सीतेसी रावणाकरवीं॥
पूषाचे दांत पाडवी । भगाचे नेत्र फोडवी ।
भृगूच्या मिशा तोडवी । छेदवी जें दक्षशिरा ॥ ११ ॥
नारदादिक दैवातें । न उल्लंघिती तयातें ।
उल्लंघील अशातें । न ऐकिला त्रिभुवनीं ॥ १२ ॥
हें बलिष्ठ असतांही । ज्ञान्याची हानी नाहीं ।
त्याला योजितो देहीं । स्वयें पाही विनोद ॥ १३ ॥
शरीर कां फिरेना । प्रारब्धें कां कष्टेना ।
ज्ञानी तरी ती वेदना । निजमना न आणी ॥ १४ ॥
दैवें झाला हा शाप । म्हणोनी गायी नेई नृप ।
त्याचा मानुनी कोप । तोडी भूपशिरा राम ॥ १५ ॥
एके दिवशीं रथावरी । बैसोनी राजा वनांतरीं ।
फिरोनी येतां माघारीं । जमदग्न्याश्रमा पाहे ॥ १६ ॥
स्वयें चतुरंग दळभार । होती वाद्यांचे गजर ।
बंदी वाखाणिती वारंवार । नृपवरयशातें ॥ १७ ॥
नया आश्रमा पाहूनी । राजा म्हणे आश्रमीं जावुनी ।
मुनींचें दर्शन करूनी । मग जावें नगरासी ॥ १८ ॥
असा विचार करूनी । सैन्य तेथें ठेवूनी ।
दोघे मित्र घेवूनी । मुनीच्या आश्रमीं राजा आला १९
तो राजा पादचारी । मुनीच्या आश्रमीं प्रवेश करी ।
जेथें कोणी न होती वैरी । त्या आश्रमा पाहे तो ॥२०॥

रायें पाहतां आश्रम । निघोनी गेला श्रम ।
म्हणे क्षणभरी करूं विश्राम । साक्षात् धर्म येथें वसे ॥
असें म्हणूनी आश्रमांत । जातां देखला मूर्तिमंत ।
अग्नीच कीं प्रकाशत । भार्गवसुत जमदग्नी ॥ २२ ॥
गौरीहरासमान । रेणुकेसह विराजमान ।
जमदग्नी तपोधन । तया अर्जुन नमन करी ॥ २३ ॥
साष्टांग नमस्कार । नृप करी वारंवार ।
स्तोत्रें करी अपार । हर्षनिर्भर होवूनी ॥ २४ ॥
मस्तकीं अंजली बांधून । उभा राहे अर्जुन ।
जमदग्नी तया पाहून । आशीर्वचन दे प्रेमें ॥ २५ ॥
देवूनियां आसन । नृपा सन्निध बसवून ।
पुसे क्षेम समाधान । मुनी प्रसन्न होवूनी ॥ २६ ॥
राजा आसनीं बसून । जमदग्नीला वंदून ।
सांगे क्षेम समाधान । कुशळ वर्तमान सर्वही ॥२७॥
राजा म्हणे ऐका मुनी । आपलें प्रसादें करूनी ।
सर्वांचें क्षेम असे पत्तनीं । सर्व समृद्धी पूर्ण असती ॥
आपुलें होतां दर्शन । प्रसन्न झालें मन ।
रेणुकामातेचे चरण । पाहतां पावन मी झालों॥ २९ ॥
यज्ञशाला देखिली । तीन्हीं अग्नीची भेटी झाली ।
आजी दैवरेषा उदेली । म्हणूनी झाली तुमची भेटी३०
आम्ही क्षत्रिय दायाद । आम्हां हे तुमचे पाद ।
दर्शन देती परमानंद । श्रीदत्तपाद ज्यापरी ॥ ३१ ॥

आतां कांहींतरी आज्ञा व्हावी । या हस्तें सेवा घ्यावी।
कृतार्थता आमुची व्हावी । म्हणून विनवी राजेंद्र ३२
मुनी म्हणे हंसोन । आम्हां असे काय न्यून ।
आजी तुम्हां द्यावें भोजन । माझें मन असें इच्छी ३३
मग बोले अर्जुन । सर्वं सैन्य घेवून ।
आलों घ्यावया दर्शन । दर्शनपावन जाहलों ॥ ३४ ॥
आज्ञा द्यावी मुनीश्वरा । आतां जावूं नगरा ।
मुनी म्हणे नृपवरा । सैन्यासह प्रसाद घ्यावा ॥ ३५ ॥
मुनीचें तें वचन । राजा मान्य करून ।
सैन्यासह राहून । ध्यान करित बैसला ॥ ३६ ॥
मुनीनें धेनूस प्रार्थून । यथायोग्य सर्वां अन्न ।
दिधलें प्रीतिकरून । बहुमानपुरःसर ॥ ३७ ॥
रंगवल्लिका रचूनी । यथार्ह पात्रें मांडूनी ।
पात्राजवळी दीप ठेवुनी । सुगंधी धूप जाळिले ॥३८॥
रायतीं कर्मटी कोशिंबिरी । शिकरणी लोणचीं नानापरी।
सांडगे पापड पक्वान्नें भारी । वामभागीं वाढली ३९
दशविध शाका पायसान्न । दक्षिणभागीं शोभमान ।
मध्यें साखरभात चित्रान्न । ठेविले द्रोण उपसेचनांचे॥
वेळाकेशरादियुक्त । श्रीखंडादि गव्यघृत।
आलें मिरें हिंग हळदीसहित । षड्रसयुक्त पदार्थ
वाढिले ॥ ४१ ॥

१ सांभारें.

पदार्थ असती प्रतप्त । वास येतसे घवघवीत ।
पाहतां नेत्र होती तृप्त । असे पदार्थ वाढिले ॥ ४२ ॥
दाणा चंदी उत्तम घांस । दिधला गजाश्वादिकांस ।
प्रार्थूनियां मुनी सर्वांस । सावकाश जेवा म्हणे॥४३॥
सर्वही जेवूं बैसती । यथेच्छ पक्वान्नें खाती ।
घृत पायस यथेच्छ पीती । मनीं मानिती परमानंद ॥
जेवितां चतुर्विधान्न । सर्वांचें तृप्त झालें मन ।
पात्र राहिलें भरून । सर्व अन्न संपवेना ॥ ४५ ॥
सर्वही पदार्थांची । घेती अलौकिक रूची ।
गोडी तया पक्वान्नांची । न वर्णवे सर्वथा ॥ ४६ ॥
सर्वही यथेच्छ जेवून । उठोनी करिती हस्तक्षाळण ।
कस्तूरी चंदन देवुन । करशोधन करविलें ॥ ४७ ॥
नाना परींची फळें । अमृतोपम सुगंधी जळें ।
सुवासार्थ दिलीं कमळें । विडे वेळेसहित ॥ ४८ ॥
वारा येतसे शीतळ । पसरला सुगंधपरिमळ ।
वाटे तो थाट सकळ । केवळ देवलोकींचा ॥ ४९ ॥
असें तें पवित्र अन्न । भक्षितां ते सर्वजण ।
पावोनियां समाधान । आपणा पावन मानिती॥५०॥
जरी रायापाशीं सर्व सिद्धी । मागें फिरती नवनिधी ।
जो असतां सुधी । त्याची बुद्धी पालटली ॥ ५१ ॥
राजाचें प्रारब्ध संपलें । म्हणोनी मनीं भलतें आलें ।
धरोनी मुनीचीं पाउलें । राजा बोले त्या वेळीं॥ ५२ ॥

म्हणे जी तूं दरिद्री । संपत्ती नसतां तुझे घरीं ।
आजी कसें येणेंपरी । सर्वां भोजन त्वां दिधलें ॥५३॥
मी सार्वभौम जरी । असें अन्न आमुचे घरीं ।
न मिळे यथार्थ कुसरीं । सर्व समृद्धी असतांही ॥५४॥
तूं तरी कौपीनधारी । वनांतरीं निर्धारी ।
जरी संपत्ती नसतां घरीं । तरी हे बरी आयती केली॥
याचें सांग कारण । राजाचें असें भाषण ।
ऐकोनी मुनी तत्क्षण । म्हणे कारण धेनू हे ॥ ५६ ॥
ही माझी होमधेनू । ही असे कामधेनू ।
इची शक्ती काय वाणूं । जाण हे चिंतामणी ॥ ५७ ॥
चिंतावें जें जें मनीं । तें तें पुरवी तत्क्षणीं ।
इच्या प्रसादेंकरूनी । वनीं इच्छाभोजन देतों ॥ ५८ ॥
राजा म्हणे नवनिधी । माझेपाशीं अष्ट सिद्धी ।
असती समृद्धी । परी असी कामधेनू नाहीं ॥ ५९ ॥
तरी आतां करी प्रसाद । पुरवी हा माझा छंद ।
लागला मनीं वेध । कामधेनूपद घरीं असावें ॥ ६० ॥
देवूं हजारों गोधन । किंवा सुवर्णरत्नधन ।
जें इच्छी तुझें मन । तें मी जाण देईन ॥ ६१ ॥
अथवा देवूं राष्ट्र एक । किंवा दासदासी सेवक ।
हें ऐकोनी मुनी म्हणे ऐक । तूं विवेक आण मनीं ॥
तुझा गुरू दत्तात्रेय । त्याचे चित्तीं चिंतीसी पाय ।
त्यापुढें कायसी ही गाय । हा अन्याय करूं नको ॥

जरी मी आप्तकाम। तरी नित्य देतों होम।
होमधेनू इचें नाम। करी होम इच्या दुग्धें॥ ६४॥
जा तूं आतां स्वनगरीं। विवेक धरी अंतरीं।
वेदविद्या असतां पदरीं। कोकशास्त्री कां रमावें॥६५॥
घरीं असतां सती स्वनारी। स्वाधीन वागे सुंदरी।
तिला सोडून रंडेवरी। दृष्टी करी तोची मूर्ख॥ ६६॥
काय करावें धन। कासया पाहिजे दासीजन।
कासया रत्न गोधन। कामधेनू दवडून हे ॥ ६७॥
असा नानापरी। मुनी जरी बोध करी।
तो न घे अंतरीं। न निवारी दुर्वासना॥ ६८॥
हा शांत असे सुशील। धेनू नेतां काय करील।
येथें धन ठेवूनी विपुल। धेनू खुशाल न्यावी हे॥६९॥
असा निर्धार करूनी। सेवकां बोलावूनी।
म्हणे हे धेनू सोडूनी। घेवूनी चला नगरांत ॥ ७०॥
असें राजाचें वचन। ऐकतां ते सेवक जन।
त्या धेनूतें सोडून। नगरीं घेवून चालती ॥ ७१॥
बहु धन गोधन। मुनिसन्निध ठेवून।
मुनीप्रती वंदून। नगरा अर्जुन चालिला ॥ ७२॥
वत्स करी आक्रंदन। तिकडे न देई मन।
असा तो राजा अर्जुन। कठोर मन करी दैवें॥ ७३॥
ठेविलें जें धन गोधन। त्याचा अंगीकार न करून।
अथवा शापवचन। न बोले मन शमवूनी ॥ ७४॥

न करी त्यावरी कोप। मनीं न मानी ताप।
म्हणे देतां शाप। तपोलोप होईल ॥ ७५ ॥
हा असे धार्मिक। नेईना कां धेनू एक।
चित्तीं आणूनी विवेक। पुनः आणून देईल ॥ ७६ ॥
असा विचार करूनी। शाप न देतां जमदग्नी।
शांती आणूनी मनीं। ध्यान लावूनी बैसला ॥ ७७ ॥
तों इतुक्या अवसरीं। राम गेला होता वनांतरीं।
तो फिरूनी आला घरीं। समिधा डोईवरी घेऊनिया॥
वत्स आक्रंदतसे। राम तिकडे पाहतसे।
म्हणे आज कां असें। ओरडतसे हा वत्स ॥ ७९ ॥
बंधू म्हणती रामासी। राजा आला आश्रमासी।
राहविलें तयांसी। जेवावयासी प्रार्थिलें ॥ ८० ॥
मग सैन्यासहित राजासी। जेवविलें संतोषीं।
राजा पुसे मुनीसी। समृद्धी कसी ही झाली ॥ ८१ ॥
मग मुनीनें सर्व सांगतां। राजा म्हणे हे धेनू द्या आतां
मुनीनें नाहीं म्हणतां। बलात्कारें नेता झाला ॥८२॥
असें ऐकतां भ्रातृवचन। राम कोपला तत्क्षण।
दिसे जसा ज्वलन। त्रैलोक्य दहन करितो कीं ॥८३॥
पितयातें न पुसोन। राजावरी कोपोन।
म्हणे दुष्ट हा अर्जुन। यांचें कंदन करीन मी ॥ ८४ ॥
मला कोप आलिया। मी जाळीन त्रैलोक्या।
पराक्रमा माझीया। हा भूप नेणतो कीं ॥ ८५ ॥

माझा कोप अनिवार । करीन ब्रह्मांडाचा संहार ।
माझ्यापुढें काय सुरासुर । समरीं धीर धरतील ॥
आतां शम न घेईन मी । हा राजा असे कामी ।
हा असे उन्मार्गगामी । याला कां मी न दंडावा ॥
पहा हो माझें बळ । मी केवळ प्रळयानळ ।
जाळीन क्षत्रियांचें कुळ । खळशिक्षक मी असें ॥८८॥
ब्रह्मद्वेषी हा नृप । यावरी कां न करावा कोप ।
याचें उदेलें पाप । म्हणोनी ताप दे हा द्विजा ॥ ८९ ॥
दैव याचें कांहीं होतें । म्हणूनी शाप न दिधला तातें ।
आतां तरी मीच यातें । यमसदनातें धाडितों ॥९०॥
छेदीन त्याचे बाहु सकळ । संहारीन सर्व बळ ।
जो असे महाखळ । त्याचें कुळ न ठेवावें ॥ ९१ ॥
राम असें बोलूनी । तानालाही न पुसोनी ।
हातीं परशु घेवून । त्वरा करूनी चालिला ॥ ९२ ॥
गजांची श्रेणी पाहून । जसा धांवे पंचानन ।
तसा राम गर्जून । त्वरा करूनी चालिला ॥ ९३ ॥
जसा कां प्रळयकालीन । उठे सांवर्तक घन ।
सहाय होतां पवन । करी गर्जना तयांपरी ॥ ९४ ॥
आधींच रामाचा महाप्रताप । त्यांत उपजला कोप ।
म्हणे केव्हां भेटेल भूप । मारीन कधीं तयासी ॥९५॥
धांवे वायुप्रमाणें । पायीं भूमी दणाणे ।
भूपाचा प्राण घेणें । केला त्याणें हा निश्चय ॥ ९६ ॥
रामाची त्वरित गती । मार्गी लोक चमकती ।
म्हणती लोक कल्पांतीं । रुद्र मूर्ती असी धरी कीं॥९७॥

रामाला पाहून । तर्क करिती सर्व जन ।
आज हा रुद्र अवतारून । जगाचें हनन करितो कीं ॥
असा तो राम चाले । तों पुढें सैन्य देखिलें ।
राम गर्जोनियां बोले । रेरे चोरा मागें फिर ॥ ९९ ॥
तूं ठायींचा चोरटा । कुळा लाविला बट्टा ।
आतां तुझ्या कंठा । छेदीन थट्टा हे नव्हे ॥ १०० ॥
असा गर्जना करून । येतां राम धांवून ।
मागें वळोनी अर्जुन । पाहोनी भृगुनंदन आला म्हणे॥
राजा म्हणे हा तेजस्वी । प्रतापी दिसतो जेवी रवी ।
ही विष्णुमूर्ती असावी । मजवरी एव्हवीं कोण येईल॥
मज असे वरदान । ख्यात्याधिक करील हनन ।
हा असे ब्राह्मणनंदन । मजहून ख्यात्याधिक॥ १०३ ॥
सरला प्रारब्धाचा खेळ । आला देहाचा अंतकाल ।
म्हणूनी ब्रह्मस्वाची इच्छा केवळ । आज उपजली निश्चयें
मी ब्रह्मण्य असून । घडलें हें धेनुहरण ।
याला प्रारब्ध कारण । याला शरण रिघावें कीं॥१०५॥
जरी जावें याला शरण । तरी हा राखील प्राण ।
मग कोणासी करूं रण । मग कोण मारील मज १०६
आज हा सुदिन । योग हा आला घडोन ।
हा देह पडोन । जावो आतां निश्चयें ॥ १०७ ॥
असा विचार करून । जीवन्मुक्त तो अर्जुन ।
सैन्य मागें फिरवून । रामा पाहून राहिला ॥ १०८ ॥
इति श्रीदत्तमाहात्म्ये विंशोऽध्यायः ॥ २० ॥
श्रीगुरुदेवदत्त ॥ श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

# अध्याय एकविसावा

श्रीदत्तात्रेयाय नमः ॥

वेदधर्मा म्हणे दीपकातें । राम पाहूनी सैन्यातें ।
गर्जना करूनी अर्जुनातें । मागें फिरऊनि पुढें आला ॥१॥
राम म्हणे क्षत्रियाच्या पोरा । धेनू पळविसी कां चोरा ।
आतां तूं धरी धीरा । माझा दरारा नेणसी कीं ॥२॥
तूं म्हणविसी विवेकी । हें क्षत्रियां उचित कीं ।
आतां माझ्या बळा विलोकी । लोकीं असा दुजा नाढळे ॥३॥
भूपानें द्यावें गोदान । द्विजांचें करावें प्रतिपालन ।
हा धर्म सनातन । तूं उलंडून जाशी दुष्टा ॥ ४ ॥
काय हा तुझा अधर्म । केवीं घेशी इहपर शर्म ।
आतां तुझें तोडितों वर्म[1] । तुझें दुष्कर्म उदेलें हें ॥५॥
अशी निर्भर्त्सना ऐकून । रामाप्रति बोले अर्जुन ।
राजे करूनी यत्न । रत्न भांडारीं आणिती ॥ ६ ॥
हे धेनू गोरत्न । म्यां देखिलें नूतन ।
देऊनियां गोधनरत्न । घेऊनि जातों नगरासी ॥ ७ ॥
ही मी पुनः न देईन । जरी तूं अससी बळपूर्ण ।
करी मजसीं रण । अन्यथा जाण न मिळे ही ॥ ८ ॥
राम म्हणे हें तुझें दुर्वचन । ब्राह्मण विकती कीं गोधन ।
कोणीं तुझें घेतलें रत्नधन । बलात्कार करून आलासि तूं

---

१ चिलखत.

या कामधेनूवरून । ब्रह्मांड टाकावें ओवाळून ।
तीबद्दल रत्नें ठेऊन । जासी घेऊन तूं करंटा ॥ १० ॥
आतां करूनी समर । तुझें तोडितों शिर ।
तरीच मी रेणुकाकुमार । चांडाळीचा पोर नातरी ११
असी प्रतिज्ञा करून । हातीं परशु धरून ।
राम कराया कदन । सरसरून पुढें आला ॥ १२ ॥
सज्ज देखूनि रामातें । राजा आज्ञा दे सैन्यातें ।
राम करून अन्यायातें । येतो यातें ठार मारा ॥ १३ ॥
बोलतो अबद्ध भाषण । हा असेना कां ब्राह्मण ।
समरीं याचा घेतां प्राण । अन्याय कोण म्हणेल॥१४॥
अशा राजाचिया वचना । ऐकोनियां ती सेना ।
करावया कदना । भृगुनंदनावरी लोटे ॥ १५ ॥
कोणी बाण सोडिती । कोणी खड्गी तोडूं इच्छिती ।
कोणी गदा झुगारिती । मुद्गर फिरविती वारंवार १६
रामही समरधीर । उभा राहोनी समोर ।
युद्ध करी परशुधर । एकटा वीर बलाढ्य ॥ १७ ॥
कोणाचीं कवचें फोडी । कोणाचीं धनुष्यें तोडी ।
कोणाचे मुकुट फोडी । तोडी चरण कित्येकांचे ॥१८॥
कित्येकांचे हात । तोडोनी करी घात ।
कित्येकांचे फोडिले रथ । सारथी मारिले कित्येकांचे ॥
गजांचीं गंडस्थळें फोडी । अश्वांचीं शिरें तोडी ।
असी सेना उडाउडी । राम धाडी यमसदना ॥ २० ॥

ज्याचा परशू अतितीक्ष्ण । लागतां तत्काळ घेई प्राण ।
सर्वांचे गळलें त्राण । कोण जिंकील तयातें ॥ २१ ॥
कोणी मेले तत्काळ । कोणी पडले घायाळ ।
सर्व झाले व्याकुळ । वाटे काळ राम तो ॥ २२ ॥
जसा एकटा केसरी । अनेक गजांतें मारी ।
तसा एकटा संहारी । राम वैरीसैन्यातें ॥ २३ ॥
सैन्य निःशेष मारिलें । रक्ताचे पूर चालिले ।
शव वाहूं लागले । आश्चर्य केलें देवांनीं ॥ २४ ॥
रक्ताच्या नद्या दिसती । केश शैवाल भासती ।
हात सर्पसे दिसती । भासती कलेवर जलचर ॥ २५ ॥
ज्या ढाला फिरती । ते भोंवरे भासती ।
मांसाचे चिखल होती । आंत रुतती गजाश्व ॥ २६ ॥
जसा गरुड एकला । संहारी सर्पकुला ।
तसा राम एकला । मारिता झाला सर्व सैन्य ॥ २७ ॥
राम हा वडवानळ । प्रज्वळला प्रबळ ।
अर्जुनसैन्यसमुद्र केवळ । जाळी सकळ क्षणार्धे ॥२८॥
राम हा अगस्ती क्षोभला । सैन्यसागर शोषिला ।
रायाचा संशय फिटला । उठला मग तत्क्षणीं ॥ २९ ॥
राजा म्हणे हा नोहे नर । होय साक्षात् विश्वंभर ।
अन्यथा हा सैन्यसागर । कोण पामर शोषिता ॥३०॥
सूर्य जसा अंधकार । क्षणें करितो दूर ।
तसा याणें सैन्यभार । निःशेष सत्वर उडविला ३१

सुर किंवा असुर । न टिकती माझ्यासमोर ।
मला जिंकी असा शूर । ब्रह्मांडीं असेना ॥ ३२ ॥
तेथें बापुडा नर । मजसी करील कीं समर ।
तरी हा नोहे द्विजकुमार । लक्ष्मीवर ख्वास असे ॥३३॥
तरी याशीं युद्ध करून । क्षात्रधर्मे तोषवून ।
समरीं देह ठेऊन । आद्यस्थान घ्यावें तें ॥ ३४ ॥
असा निश्चय करून । महात्मा तो अर्जुन ।
रामासमोर राहून । म्हणे कदन करी आतां ॥ ३५ ॥
तूं तों असशी ब्राह्मण । मी क्षत्रिय दारुण ।
माझें स्वरूप भीषण । कठिण बाण माझे हे ॥ ३६ ॥
तूं तरी सुकुमार । तपस्वी ऋषिचा कुमार ।
नित्य भक्षण फळाहार । केंवि धीर धरसील ॥ ३७ ॥
व्यर्थ जाशील मरोनी । शोक करील तुझी जननी ।
तुवां मागें फिरोनी । जावें सदनीं सुखानें ॥ ३८ ॥
अंगा डसतां मच्छर । तुम्हां वाटती कष्ट फार ।
लोहाग्र हे तीक्ष्णशर । झोंबतां धीर धरवेल कीं ॥३९॥
राम म्हणे माझी खंती । न करी तूं काकुळती ।
शस्त्रें उचलोनी घे हातीं । शब्दतती आतां पुरे ॥४०॥
मग राजा काय करी । श्रीदत्ता स्मरे अंतरीं ।
पांचशें धनुष्यें करीं । सज्ज करी त्वरेनें ॥ ४१ ॥
गर्जोनियां सिंहापरी । बाणांची वृष्टि करी ।
रामातें आच्छादित करी । राम वारी तद्बाणां ॥४२॥

जसा मेघ पर्वतावरी। हजारों धारांनीं वृष्टी करी।
त्याप्रमाणें रामावरी। राजा करी शस्त्रवृष्टी ॥ ४३ ॥
देव विमानीं बैसून। अंतरिक्ष राहून।
तें युद्ध पाहून। हर्षे मान तुकाविती ॥ ४४ ॥
रथारूढ अर्जुन। प्रतापी दुर्दर्शन।
सहस्रकर भीषण। वाटे अरुण दुसरा कीं ॥ ४५ ॥
वेळोवेळ पांचशें बाण। सोडूनियां दारुण।
रामा टाकी झांकून। करी गर्जना हरीसा ॥ ४६ ॥
ज्याचें हस्तलाघव अचाट। ज्याचें शस्त्र न जाय फुकट।
ज्याचा मार तिखट। राहे निकट धीट तो ॥ ४७ ॥
पाहूनी हस्तलाघव त्याचें। मन संतुष्ट झालें रामाचें।
म्हणे हस्तलाघव याचें। या वाचे न वदवे ॥ ४८ ॥
कार्तवीर्य हा महाशूर। महावीर समरधीर।
याला न मारतील सुरासुर। कायसा नर यापुढें॥४९॥
अशी प्रशंसा करूनी। बाणजाल तोडूनी।
साश्वासारथी मारूनी। रथ फोडूनी टाकिला ॥ ५० ॥
वृक्षाचे खांदे कसे। तोडिती वेगें जसे।
तोडी अर्जुनाचे भुज तसे। परशूनें परशु-धर ॥ ५१ ॥
जे जे भुज तुटती। तेथें भुज नवे फुटती।
रामा मारूं उठती। न हटती मागें ते ॥ ५२ ॥
राम त्वरा करोनी। भुजां टाकी तोडूनी।
तरी पुनः नवीन फुटूनी। रामातें ताडिती ॥ ५३ ॥

पर्वत झाले भुजांचे । मन खचलें रामाचें ।
म्हणे काय कारण याचें । मजला सर्वथा कळेना ।
जों भुजांचा नाश न होईल । तों याचें शीर न तोडवेल ।
जरी हा न मारवेल । व्यर्थ जाईल प्रतिज्ञा ती ॥५५॥
राम झाला नाउमेद । मनामध्यें करी खेद ।
मती जाहली मंद । म्हणे छंद न पुरेल कीं ॥ ५६ ॥
रेणुका पतिव्रता । ही माझी माता ।
जमदग्नी माझा पिता । गुरुदेवता श्रीशंकर ॥ ५७ ॥
यांचा अनुग्रह असेल । तरी यश मिळेल ।
हा मम करें मरेल । प्रतिज्ञा होईल सत्य माझी ॥५८॥
असें राम बोलत । तों तेव्हां अकस्मात् ।
आकाशवाणी बोलत । रामाप्रत संबोधूनी ॥ ५९ ॥
श्रीदत्तप्रसादेंकरूनी । भुजांचें बीज उरस्थानी ।
आहे तें पूर्वी शोषुनी । मग तोडूनी टाकी भुज॥६०॥
असें रामें परिसूनी । आग्नेयास्त्र सोडूनी ।
उरस्थल फोडूनी । भुजबीज शोषून घेतलें ॥ ६१ ॥
दोन भुज राहिले । ते अभेद्य झाले ।
रामाला ते न तोडवले । भलें झालें म्हणे राम ॥६२॥
तेव्हां समजला अर्जुन । म्हणे आयुष्य गेलें सरून ।
आतां होईल शरीरपतन । एक क्षण न लागतां॥६३॥
धन्य माझा गुरुदेव दत्त । माझें हृष्ट केलें चित्त ।
पुरविला माझा मनोरथ । त्याला समस्त वोपिलें॥६४॥

तद्रूप मी अभेद। असें सच्चिदानंद।
असा तो परमानंद। अभेद झालों समरसें ॥ ६५ ॥
स्वस्वरूपीं दृढ लक्ष धरी। इंद्रियांचा प्रत्याहार करी।
त्यां मनामध्यें लीन करी। मनाचा लय करी प्राणामध्यें
तेजामध्यें प्राणलय। करी तेजाचा परदैवतीं लय।
असा होवोनियां अद्वय। ब्रह्ममय तो झाला ॥ ६७ ॥
नाडीद्वारें लखलखीत। उजेड पडला हृदयांत।
सुषुम्णामार्ग धरीत। प्राण ऊर्ध्वगत झाला ॥ ६८ ॥
तंव अर्जुनाचें शिर। रामें तोडिलें सत्वर।
दणदणोनी पडे कलेवर। जयजयकार देव करिती ६९
रायाचें मस्तक फुटलें। दत्तरूपीं प्राण गेले।
रायें सायुज्य घेतलें। अलभ्य जें देवादिकां ॥ ७० ॥
स्मरण करी जन्मवरी। श्रीदत्त ज्याचे अंतरीं।
त्याला कोण मारी। निमित्तमात्र हो राम ॥ ७१ ॥
श्रीदत्ताचा पूर्ण भक्त। सर्वसंगपरित्यक्त।
पूर्वीच होता जीवन्मुक्त। विदेहमुक्त आतां झाला ॥
स्वर्गी देव हृष्ट होती। जयजयकारें गर्जती।
रामावरी पुष्पें वर्षती। हर्षा मिती नाहीं ज्यांच्या ॥
स्वर्गीं दुंदुभी वाजती। गंधर्व सुस्वरें गाती।
अप्सरा नृत्य करिती। यश गाती रामाचें ॥ ७४ ॥
देव म्हणती पुरुषोत्तमा। जयजया भार्गवरामा।
तूं अससी मंगलधामा। नाहीं सीमा पराक्रमाची ॥

जो जिंकी यक्षकिन्नरां। जो नावरें देवासुरां।
जो बळें बांधी वीरां। तया बरा मारिला ॥ ७६ ॥
अशी स्तुती करिती। कल्पवृक्ष पुष्पें वर्षिती।
रामही आनंदला चित्तीं। प्रतिज्ञा ती सफळ होतां॥
घेऊनियां धेनूसी। राम आला आश्रमासी।
वंदूनी सांगे पितयासी। म्यां राजाशीं मारिलें ॥७८॥
आजी युद्ध करून। सर्व सैन्य मारून।
रायाचे भुज तोडून। शिरच्छेदन केलें म्यां ॥ ७९ ॥
तें वचन ऐकूनी। अनुतापला मुनी।
म्हणे जा येथूनी। पातक करून आलास ॥ ८० ॥
जो वारी प्रजेचें दुःख। ज्याला भीति तिनी लोक।
जो सर्वां दे सुख। तो पुण्यश्लोक वधार्ह कीं ॥ ८१ ॥
हा असतां भूप। निर्विघ्न होई आमुचें तप।
तो प्रजेचा मायबाप। त्यावरी कोप कां केला ॥ ८२ ॥
जरी त्याणें विनोदें। धेनू नेली स्वच्छंदें।
तरी मी शाप न दें। त्वां हें काय केलें रे ॥ ८३ ॥
जो अमित गोदानें देई। सिद्धी निधी ज्याचे पायीं॥
लागती तया हे गाई। सांग कशाला पाहिजे ॥ ८४ ॥
त्याणें हा विनोद केला। हा तुला न कळला।
त्वां व्यर्थ शिरच्छेद केला। शिरीं घेतला पापपर्वत॥
दशश्रोत्रियसम। राजा असे असा आगम।
त्या मारितां घडे अधर्म। त्वां हें कर्म निंद्य केलें॥८६॥

ज्याचे शिरीं अभिषेक। होई त्याला वंदी लोक।
हा तरी पुण्यश्लोक। जोडिलें पातक तद्वधें ॥ ८७ ॥
ऐकूनी पितृवचन। राम अनुताप पावून।
पितृचरण वंदून। बोले दीन होवूनी ॥ ८८ ॥
ताता मी नेणून। पाप केलें दारुण।
तुजवांचून कोण। माझें रक्षण करील ॥ ८९ ॥
हो शरण शरण। तूं करी परित्राण।
धरिले तुझे चरण। उद्धरण करावें ॥ ९० ॥
असा राम कळकळे। निजचित्तीं हळहळे।
लोळे भरूनी डोळे। मग वळे मुनी तो ॥ ९१ ॥
जरी पाप केलेंस थोर। तरी आतां सत्वर।
विश्वास ठेवी माझेवर। तूं कर तीर्थयात्रा ॥ ९२ ॥
होऊनियां अनुतप्त। जीं या भरतखंडांत
तीर्थें असती समस्त। सेवी स्नानपानें तूं ॥ ९३ ॥
गंगेची कावड घेऊन। दक्षिणेस जाऊन।
समुद्रीं सोडून। समुद्रदर्शन करूनियां ॥ ९४ ॥
वाळूची कावड घेऊन। गंगातीरीं आणून।
गंगास्नान करून। गंगेमध्यें सोडी ती ॥ ९५ ॥
चार धाम पाहे पुत्रा। ज्योतिर्लिंगें बारा।
सात पुरी पवित्रा। यांचें दर्शन करावें ॥ ९६ ॥
राम ऐसें ऐकूनी। पितृवचन मानूनी।
पितयाते नमूनी। मात्राज्ञा घेऊन निघाला ॥ ९७ ॥

स्वपाप उच्चारून। पश्चात्तापा पावून।
यात्रासंकल्प धरून। कार्पटिक होउनी निघाला॥९८॥
ब्रह्मनिष्ठ तात। जसें जसें आज्ञापित।
राम तसें आचरित। भक्तियुक्त होऊनी ॥ ९९ ॥
राम हा विश्वरूप। त्यासी कैसा कोप।
न शिवेल त्याला पाप। अनुताप मग कैसा॥ १०० ॥
जो असे अज्ञानी। तो वेष्टिजेल कामांनीं।
पाप केलें हें मनीं। अहंकारोनी घेईल तो ॥ १०१ ॥
राम हा विष्णवतार। त्यासी कैचा अहंकार।
लोकशिक्षणार्थ निर्धार। हा व्यापार तयाचा ॥१०२॥
बद्रिकाश्रमीं जाऊन। नारायणा वंदून।
गंगेची कावड घेऊन। तीर्थयावन करीत ये ॥ १०३ ॥
यमुना क्षिप्रा नर्मदा। तापी पयोष्णी गोदा।
कृष्णा कावेरी नंदा। देखे पुण्यदा ताम्रपर्णी ॥ १०४ ॥
दक्षिणेसी जाऊन। समुद्रस्नान करून।
तेथें सेतू भरून। कार्तिकेयदर्शन करी पुनः ॥ १०५ ॥
शिवकांची विष्णुकांचीसी। पाहुनियां गिरीसी।
पूजूनी मल्लीकार्जुनासी। विरूपाक्षासी वंदितसे॥१०६॥
गोकर्णासी जाऊन। कोल्हापुरा येऊन।
त्रिंबकेश्वरा वंदून। सोमनाथा जातसे ॥ १०७ ॥

सिद्धपुरी येऊन। पुष्करीं स्नान करून।
प्रयागासी पाहून। सेतुविसर्जन करीतसे ॥ १०८ ॥
काशीस जाऊन। तीर्थयात्रा संपवून।
पितयातें भेटून। सर्व सांगे ॥ १०९ ॥

इति श्रीदत्तमाहात्म्ये एकविंशोऽध्यायः ॥ २१ ॥

श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

# अध्याय बाविसावा

श्रीदत्तात्रेयाय नमः ॥

गुरु म्हणे दीपकासी । रामें वधिलें गयासी ।
हें तयाच्या पुत्रांसी । कळतां त्यांसी दुःख झालें ॥१॥
पुत्र म्हणती हाय हाय । हा ईश्वर कोपला काय ।
जो नित्य प्रतापसूर्य । तो अस्तमय झाला कसा ॥२॥
ज्याचा त्रिभुवनीं दरारा । जो दंडी सुरासुरां ।
काळाच्याही शरीरा । कंप ये थरथरा यत्स्मरणें ॥ ३ ॥
तो ऋषीच्या पोराचे करीं । कसा पडला धरणीवरी ।
हा भ्रम झाला कीं ये अवसरीं । किंवा स्वप्नांतरीं
पाहिलें हें ॥ ४ ॥
खद्योतें सूर्य झांकळला । किंवा जंबूकें ऐरावत गिळिला
किंवा गांयंडोळे[1] शेष गिळिला । कीं मेरू पाडिला मूषकें
कीं खिवडानें करूनी फडा । बळें झडपिलें गरुडा ।
किंवा बाळकें मारूनी खडा । उडविलें चंद्रमंडळ ॥६॥
हें कदाचित् घडेल । परी त्याहूनी मुष्कील ।
तें घडलें हा बोल । सत्य मानवेल कीं आम्हां ॥ ७ ॥
असा शोक करून । सर्व पुत्र जमून ।
रणस्थानीं येऊन । पितृशव पाहून गहिंवरती ॥ ८ ॥
नानापरी शोक करिती । बापाचे गुण आठविती ।
सर्वही मूर्छित होती । शोकें विसरती देहभान ॥ ९ ॥

१ गांडूळ, निर्विष सर्प.

असा शोक करून । बोलती प्रतिज्ञावचन ।
पितृहंत्यासी मारून । टाकूं तेव्हां ऋणमुक्ती ॥ १० ॥
अशी प्रतिज्ञा करून । पितृदेहा नेऊन ।
यथाविधी संस्कारून । और्ध्वदेहिक करिते झाले॥११॥
रामाचा शोध घेती । चहूंकडे धुंडती ।
तंव आश्रमाप्रती । राम आला[१] हें कळलें ॥ १२ ॥
सर्वें सैन्य घेऊन । अर्जुनाचे नंदन ।
जमदग्न्याश्रमा येऊन । वेढा देऊन राहिले ॥ १३ ॥
तत्पूर्वी बांधवासहित । राम गेला वनांत ।
तंव पश्चात् आश्रमांत । अर्जुनसुत प्रवेशले ॥ १४ ॥
इकडे तिकडे फिरती । रामातें धुंडिती ।
येऊनी यज्ञशाळेप्रती । तेथें देखती मुनीतें ॥ १५ ॥
जेवीं गाय देखूनी यवन । येती धांव घेऊन ।
तयांपरी ते दुर्जन । जाऊन धरिती मुनीतें ॥ १६ ॥
अंतकाळीं यमदूत । तसे दिसती अर्जुनसुत ।
रेणुका होऊनी भयाभीत । म्हणे हे घात करितील कीं
व्याघ्र धरी धेनूस । तसे ते धरती मुनीस ।
रेणुका पावूनी त्रास । प्रार्थी तयांस दीनपणें ॥ १८ ॥
ऐका ऐका हो कारुणिक । कां करितां पातक ।
मनीं धरा विवेक । उभय लोक मिळतील ॥ १९ ॥
तुम्ही दाते जाणून । मागतें पदर पसरून ।
मला द्यावें सौभाग्यदान । करा सन्मान आमुचा २०

---

१ तीर्थयात्रा करून.

मी तुमची बहीण। तुम्हां घालतें आण।
पतिप्राणरक्षण। तुम्ही करा आतां ॥ २१ ॥
तुम्ही धनीक श्रीमंत। आम्ही तुमचे आश्रित।
एवढें दान मागत। पतिप्राण वांचवा ॥ २२ ॥
माझा दूर करा दर। पसरितें मी पदर।
सौभाग्यदान द्या सादर। न करा अनादर माझा २३॥
पुत्रापराधाकरितां। जरी तुम्ही कोप करितां।
तरी एकदां आतां। प्रसन्नता होऊं द्या ॥ २४ ॥
असें नानापरी। रेणुका प्रार्थी जरी।
ते दुर्बुद्धि वैरी। अंतरीं न द्रवती ॥ २५ ॥
दीनवाणी होऊनी। बोले जमदग्नि मुनी।
माझा आशीर्वाद घेऊनी। संतोषोनी मागें चला २६
तुम्ही ऐका माझ्या बोला। स्वीकारूनी शांतीला।
सुखें मागें चला। कुला राखा आपुल्या ॥ २७ ॥
ब्रह्महत्यादोष। हा असे विशेष।
जाळील कुल निःशेष। तेव्हां रोष टाका तुम्ही॥२८॥
आम्ही गुरु तुम्हांस। तुम्ही शिष्य खास।
तरी अशा हिंसेस। शिवूं नका सर्वथा ॥ २९ ॥
मुनी असा नानापरी। तयां उपदेश करी।
दुर्मती ते वैरी। अंतरीं न धरिती ॥ ३० ॥
करीं घेऊनी तरवारी। माराया उठतां वैरी।
रेणुका मान पुढें करी। म्हणे आधीं मला मारा॥३१॥

वांचवा पतिप्राण। किंवा आधीं तोडा माझी मान।
असी रेणुका वदून। आक्रंदोन पडली ॥ ३२ ॥
जरी अशा गोष्टी। ऐकत असतां खाटी।
तरी द्रवूनी पोटीं। पाठी सरता ॥ ३३ ॥
त्याहूनी हे पामर। न द्रवती निष्ठुर।
तिला झुगारूनी दूर। मुनीचें शिर छेदती ॥ ३४ ॥
(पद) हाय हाय हाय काय हा अपाय ये ॥
ह्या प्रसंगिं कां न तनय नयविधेय ये ॥ ध्रु० ॥ ३५ ॥
भूपतनय त्यजुनि विनय अनय हा असा।
करिति अदयहृदय काय प्रळय हा असा।
हाय हाय करूं काय तनय तो कसा।
येत नसे ओरडतसे मी बळें भयें ॥३६॥
रामा रामा रामा म्हणतां राम येईना।
राम आजि लाज माझि कांहो राखिना।
काय करूं काय धरूं धीर त्याविना।
हरि हरि हे मारिती हे ह्यां दया न ये ॥ ३७ ॥
(ओवी) येणें परी ती सती। आक्रंदे करूनी खंती।
तें मनीं न आणिती। नृपतीचे पुत्र दुष्ट ॥ ३८ ॥
पापा न भीतां ते वीर। तोडिती मुनीचें शिर।
पुरा जाती सत्वर। महाक्रूर पापिष्ठ ॥ ३९ ॥
म्हणती राम राहे लपोन। पुनः उद्यां येऊन।
घेऊं रामाचा प्राण। ऋणमुक्त व्हावया ॥ ४० ॥

असें म्हणोन दुष्ट ते। मनीं मानूनी आनंदातें।
कृतार्थ मानूनी आपणांतें। नगरातें पातले ॥ ४१ ॥
इकडे रेणुका करी विलाप। म्हणे माझें कैचें पाप।
उदेलें जें देई ताप। नाहीं मार जयाला ॥ ४२ ॥
हाय हाय मी करूं काय। म्हणूनी आपटी पाय।
उरा शिरावरी घाय। देई माय रामाची ॥ ४३ ॥
ऐकोनि तिचा शोक। तेथें आले तापस लोक।
नानापरी सांगती विवेक। न शमे शोक तियेचा ४४
देती लोक आश्वासन। तरी तिचें खिन्न मन।
म्हणे मी झालें दीन। अजूनी नंदन कां न ये॥ ४५ ॥
रामा तूं अंतरलासी। हा संधी लाधला शत्रूंसी।
त्वा यावें त्वरेंसी। कैची वांचूं सांग आतां ॥ ४६ ॥
शून्य झालें हें सदन। एकदां दावी तूं वदन।
मी तुला अवलोकून। प्राण सोडूनी जाते रे ॥ ४७ ॥
दुष्टें सौभाग्य लुटलें। माझें कपाळ फुटलें।
दैवें विपरीत केलें। गेलें माझें जीवन ॥ ४८ ॥
आतां कांसया वांचावें। कोणीं विरहदुःख अनुभवावें।
म्यां पतीमागें न राहावें। सवें जावें हा निर्धार ॥४९॥
रामा ये रे ये त्वरें। किती बाहूं तुज बरें।
माझें आयुष्य सरे। अंतीं गोजिरें रूप दावी ॥ ५० ॥
मार्गीं वाट पाहे पती। आतां प्राण न राहती।
यास्तव भेट देई अंतीं। विलापे ती सती असी॥५१॥

इकडे राम वनीं । अपशकुन पाहूनी ।
भयभीत होवूनी । धरी मनीं नाना तर्क ॥ ५२ ॥
म्हणे हे मृग कां उलट जाती । ह्या दिशा धुंद दिसती
आलू कां हे पुढती । भुंकोन येती कां कळेना ॥ ५३ ॥
छिद्र दिसे सूर्यमंडळा । धडकी भरे कां ये वेळा ।
निमित्तावांचोनियां गळा । कां वाळला कळेना॥५४॥
डावा भुज आणि नयन । कां पावतो स्फुरण ।
याचें काय कारण । दुःख दारुण येईल वाटे ॥ ५५ ॥
असा विचार करून । मनीं खिन्न होऊन ।
परशू करीं धरून । त्वरा करून परतला ॥ ५६ ॥
राम वनांतून । त्वरें आश्रमीं येऊन ।
सर्व अनर्थ ऐकून । होऊनी दीन शोक करी ॥ ५७ ॥
राम म्हणे हा हा ताता । आम्हां वनीं टाकूनी आतां।
कोठें गेलास नाथा । आम्हां अनाथां कां सोडिशी ॥
हा हा ताता मन्निमित्त । हा झाला तुझा घात ।
मी केवळ तुझा अहित । नोहे सुत निश्चयें ॥ ५९ ॥
आठवूनी मुनीचे गुण । रामा शोक होय दारुण ।
म्हणे आतां माझें कोण । बापा रक्षण करील ॥ ६० ॥
गेला माझा आधार । आतां न धरवे धीर ।
म्हणूनी राम शरीर । भूमीवर टाकी तो ॥ ६१ ॥
अश्रुनें भरले डोळे । गडबडा धरेवरी लोळे ।
म्हणे आतां ये वेळे । तोंड काळें झालें हें ॥ ६२ ॥

मनीं अतिशय घाबरे । पितृशोक नावरे ।
म्हणे मरण येतां बरे । तरीच नुरे लोकापवाद ॥ ६३ ॥
असा शोक करूनी । मग नेत्र पुसोनी ।
म्हणे शत्रुपुरा जावूनी । तया मारूनी येईन ॥ ६४ ॥
त्याला जरी मारीन । तरी पितृऋणापासून ।
म्वास मी मुक्त होईन । अन्यथा पडेन नरकांत ॥६५॥
असें बोलून भृगुनंदन । हातीं परशु घेऊन ।
करावया शत्रूचें कदन । बाहेर निघोन चालला ॥६६॥
तसा त्याला पाहूनी । बंधू आणि जननी ।
निवारिती तयालागुनी । तें कानीं मनीं न घे तो॥६७॥
राम धावे त्वरेनें । ब्रह्मांड गाजवी हाकेनें ।
इकडे तिकडे नेत्रानें । न पाहे जोरानें चालतां ॥ ६८ ॥
मनोवेगें करून । माहिष्मतीस येऊन ।
शत्रूंला बोलावून । म्हणे रण करा आतां ॥ ६९ ॥
मी नसतां आश्रमांत । तुम्ही येऊनी केला घात ।
व्यर्थ मारिला माझा तात । काय यांत मिळविलें॥७०॥
तुमच्या पितयासी । म्यां मारिलें बळेंसी ।
जरी सूड घेणें तुम्हांसी । मजसीं युद्ध कां न केलें॥७१॥
निरपराधी महामुनी । त्याचा वध करूनी ।
चोरापरी पळूनी । आलेंत म्हणूनी मी आलों ॥ ७२ ॥
जें बळ घेऊनी । तुम्ही वधिला मुनी ।
तें बळ पुढें करूनी । मजसीं रण करा आतां ॥ ७३ ॥

असें कठोर बोलून। हातीं परशू धरून।
तो कोपें भृगुनंदन। करी कंदन शत्रूचें ॥ ७४ ॥
कित्येकांचे हात तोडी। कित्येकांचे डोळे फोडी।
कित्येकांचीं पोटें फाडी। कित्येकां पाडी भूमीवर ॥
असा करून समर। सैन्याचा करून चूर।
अर्जुनाचे सर्व पोर। शिर छेदूनी मारिले ॥ ७६ ॥
तटबंदी फोडून। राजवाडे मोडून।
ध्वज पताका मोडून। टाकी झोडून रक्षकां ॥ ७७ ॥
सर्व वीरां मारून। पुर शून्य करून।
पुनः मागें फिरून। निजसदना पातला ॥ ७८ ॥
राम सांगे मातेसी। ह्मणे ज्यांनीं पितयासी।
मारिलें तयां दुष्टांसी। यमसदनासी धाडिलें ॥ ७९ ॥
सर्व बळ मारिलें। शत्रूचें पुर फोडिलें।
अजुनी मन न धालें। क्षत्रकुळ राहिलें म्हणूनी॥८०॥
असें म्हणूनी त्या अवसरीं। तो राम प्रतिज्ञा करी।
कोणाचें वचन कानावरी। न धरी क्रोधें व्याप्त जो ॥
ह्मणे एकवीस वेळ। फिरोनी हें भूमंडळ।
निःक्षत्रिय करीन सकळ। निजबळयोगानें ॥ ८२ ॥
क्षत्रियां निर्बीज करून। त्यांचे शोणितें करून।
पांच तळीं भरून। तेथें तर्पण करीन मी ॥ ८३ ॥
तेव्हां पितृऋणापासून। मी मुक्त होईन।
अशी प्रतिज्ञा करून। राम गर्जून बोलला ॥ ८४ ॥
ती प्रतिज्ञा ऐकून। रेणुका बोले वचन।
साधु साधु तूं नंदन। बोलिलें वचन सत्य करी ॥८५॥

भर्तृमार्ग लक्षून । मी करूनी सहगमन ।
परलोकीं जाईन । हा धर्म जाण आमुचा ॥ ८६ ॥
सहगमन झालियावरी । अंत्येष्टी क्रिया करी ।
मग क्षत्रियांतें संहारी । सत्य करी प्रतिज्ञा तूं ॥८७॥
अर्जुन हा दत्तभक्त । त्याचा त्वां केला घात ।
जरी कोपेल श्रीदत्त । तुझा अंत करील ॥ ८८ ॥
तो असे महाबळ । त्यापुढें कोण जाईल ।
तो असे भक्तवत्सल । ऐक बोल माझा तूं ॥ ८९ ॥
श्रीदत्ताचा प्रसाद । झाल्याविना तुझा छंद ।
न पुरेल हा निर्विवाद । अर्थवाद नव्हे हा ॥ ९० ॥
तरी मी युक्ती करून । रामा तुला करवीन ।
श्रीदत्ताचें दर्शन । पुरुषार्थसाधन देईन जें ॥ ९१ ॥
श्रीदत्तप्रसादेंकरून । तुला दत्ताचे पदरीं घालीन ।
मी करीन सहगमन । मग तूं वचन सत्य करी ॥९२॥
असें अंगिकारशील । तरी विघ्न न येईल ।
ना तरी फसशील । बालबुद्धी करूनी ॥ ९३ ॥
होतां प्रसाद दत्ताचा । गळा तोडशील काळाचा ।
मग ह्या निर्बळांचा । क्षत्रियांचा काय पाड ॥ ९४ ॥
त्वां कावड करूनी । एकीकडे मुनिदेह ठेवूनी ।
दुसरीकडे मला ठेवूनी । ती कावड घेउनी जाई तूं ॥
असें आम्हां घेऊनी । दक्षिणमार्ग लक्षूनी ।
जेथें ऐकसी आकाशध्वनी । तेथें उतरोनी क्रिया करी॥
तेथें योगनिष्ठ ब्राह्मण । योग्य आचार्य मिळोन ।
यथासांग सहगमन । घडेल माझें निश्चयें ॥ ९७ ॥

असें वचन ऐकून । राम तें मान्य करून ।
एक कावड करून । ठेवी तयां सादरें ॥ ९८ ॥
पितृशव तैलद्रोणींत । तो ठेवी एका पारड्यांत ।
दुसरेकडे बैसवीत । रेणुकेतें राम तो ॥ ९९ ॥
ती कावड उचलोन । खांद्यावरी घेऊन ।
कान्यकुब्ज देशांतून । चाले दक्षिण दिशेसी ॥ १०० ॥
पाहूनी नानास्थानें । नानातीर्थें आयतनें ।
तापसाश्रम नानारण्यें । नानातीर्थें पाहे तो ॥ १०१ ॥
धर्मज्ञ तो पितृभक्त । पितृवचनीं आसक्त ।
उल्लंघूनी अनेक पर्वत । सह्याचलीं पातला ॥ १०२ ॥
तो तेथें अकस्मात । आकाशवाणी गर्जत ।
भो रामा त्वां येथ । पितृसंस्कार करावा ॥ १०३ ॥
योग्य आचार्य मिळेल । इष्ट कार्य साधेल ।
तुज जय मिळेल । पूर्ण होईल मनोरथ ॥ १०४ ॥
अशी आकाशवाणी । रामें ते ऐकूनी ।
म्हणे माते त्वां कानीं । ही ऐकिली असेल ॥ १०५ ॥
तरी आतां येथें उतरून । तुझ्या वाक्याप्रमाणें करून ।
करितों जसें आज्ञापन । नाहीं अनुमान मच्चित्तीं ॥
असें रामें बोलतां । रेणुका म्हणे तूं आतां ।
आम्हां उतरोनी चालतां । ब्रह्मनिष्ठा पाही बा॥१०७॥
मग राम आश्रमासन्निधान । ती कावडी उतरोन ।
आश्रमीं तापस पाहून । परमानंद पावला ॥ १०८ ॥
इती श्रीदत्तमाहात्म्ये द्वाविंशोध्यायः ॥ २२ ॥
॥ श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

# अध्याय तेविसावा

श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

गुरु म्हणे शिष्या सावधान । ऐके रेणुकाख्यान ।
राम आकाशवाणी ऐकून । कावड उतरून पाहतसे ॥१॥
तुलसी उदुंबराश्वत्थ । पलाश बिल्व शमी वट ।
यांहीं आश्रम घनदाट । फलपुष्पलतावेष्टित जो ॥२॥
तंव तेथें आश्रमांत । देखिला एक अवधूत ।
तेजःपुंज मूर्तिमंत । वाटे साक्षात् अग्नी कीं ॥ ३ ॥
जटाजूट विराजमान । आजानुबाहु कमळनयन ।
प्रफुल्ल कमळसें दिसे वदन । वाटे सदन तें लक्ष्मीचें ४
ज्याचा गळा शंखापरी । छाती दिसे कपाटासरी ।
भोंवऱ्याप्रमाणें नाभीवरी । भक्तकैवारी श्रीदत्त जो ५
राम तया पाहून । अत्याश्चर्या पावून ।
तंव पुढें येवून । देखे मंडन[1] अद्भुतसें ॥ ६ ॥
मांडीवरी स्त्रीरत्न । दिसतसे विराजमान ।
जिच्या नखाग्रावरून । अप्सरा कुर्वंडूनी टाकाव्या ७॥
जिचें मुख पाहून । लाजे तो मृगलांछन ।
जिचे नेत्र देखून । मृगीगण चमकती ॥ ८ ॥
अधर बिंबा लाजविती । दांत हिरे चमकती ।
पाहुनी तिच्या नासिकेप्रती । शुक लपती लाजोनी ९

१ शोभा.

कंठें शंख लाजविला। स्तनीं गजघटांचा गर्व हरिला।
गंभिरावर्ता[1] तुच्छ केला। नाभिमंडळें जियेच्या॥१०॥
जिची कटी पाहून। सिंह जाती लाजोन।
जिचें देखूनी गमन। गजाचें मन थक्क झालें ॥ ११ ॥
जिच्या कराग्रा पाहूनी। पल्लव जाती वाळूनी।
जीच्या नितंबा पाहूनी। गौरव[2] सांडूनी दे पर्वत १२॥
वाटे कोटी कंदर्प गाळून। ओंतिलें कीं हें स्त्रीरत्न।
वाटे पहिलेंच हें पूर्ण। सृष्टिमंडन विधात्याचें ॥ १३ ॥
रोमरोमीं वसे कीं रवी। असीं तिची भासे छबी।
मेघमंडळीं बिजली जेवी। तेवी देवी दत्तांकीं दिसे१४
असी ललना अंकीं घेऊन। प्रेमें देई चुंबन।
कंठीं मिठी घालून। दृढ आलिंगन देतसे ॥ १५ ॥
परस्पर हावभाव। दाविताती अभिनव।
जेथें नाहीं भिन्नभाव। द्वैता वाव तेथें कैंचा ॥ १६ ॥
असा हा मायेचा थाट। पाहतांही जो होई धीट।
मनीं मानेल वीट। तोची नीट जाई धामा ॥ १७ ॥
असी होतां त्यांची क्रीडा। तव राम आला पुढा।
त्याची न धरितां व्रीडा[3]। राहे नागडा पुढें दत्त ॥१८॥
राम पुढें येऊन। साष्टांग नमन करून।
दोनी हात जोडून। नम्र होवूनी बोलतसे ॥ १९ ॥
माझा पिता पावला मरण। माता करिते सहगमन।
आपण आचार्य होऊन। विधी सांगून द्यावा जी २०

१ खोल पाण्याचा भोंवरा. २ थोरपणा. ३ लाज.

जमदग्नी माझा पिता । रेणुका माझी माता ।
माझें राम नाम तत्वता । आपण जाणतां सर्व हें २१
माता कान्यकुब्जदेशांतून । करावया आली सहगमन
आकाशवचनेंकरून । आपलें दर्शन घडलें हें ॥ २२ ॥
दत्त म्हणे मी नेणें विधी । अथवा ठावा नसे उपाधी ।
मी अस्पृश्य अभाव्य आधीं । न शिवें कधीं धर्मातें ॥
असें ऐकतां उत्तर । राम झाला निरुत्तर ।
तथापी बोले धीर । तूं योगेश्वर जगत्प्रभू ॥ २४ ॥
तूं कर्ता हर्ता अनंत । सदानंद गुणातीत ।
धर्माधर्माची मात । तुजपाशीं ती वसेल कीं ॥ २५ ॥
दत्त म्हणे तूं शहाणा । परी तुझा हा दिसे मूर्खपणा ।
नेणसी अपवित्राच्या ह्या खुणा। गुणावगुणा नेणसी कीं
मी अबलासक्त अस्पृश्य । धर्माधर्मातीत अभाव्य ।
असें पराधीन अवश्य । पश्य पश्य योगं मे ॥ २७ ॥
असें ऐकतां वचन । निवांत राहिला भृगुनंदन ।
मग तुलास्थ रेणुका ते परिसून । बोले वंदून श्रीदत्ता॥
म्हणे हें तुमचें वचन । गोड लागे अमृताहून ।
हे नारिकेलफलासमान । फोडून करीन विशद हें २९
तीनी गुणां वाव जेथ । विधी निषेध राहती तेथ ।
तेथेंच सरसरती शास्त्रग्रंथ । नाना पंथ दावूनी ॥३०॥
तुम्हीं स्वयें असंग । अबलेशीं न घडे तुमचा संग ।
अबला म्हणजे माया चांग । शशशृंगतुल्य ती॥३१॥

तुह्मीं तीन गुणातीत। नित्य उपाधीनिर्मुक्त।
तीनी देही साक्षीभूत। पिंडीं ब्रह्मांडीं ख्यात तुह्मी॥
शब्दस्पर्शादि विषय। होती इंद्रियाला ग्राह्य।
तुम्ही तरी अविषय। अस्पृश्य अभाष्य सत्य हें ॥
जो मायागुणा मोहून। अध्यासानें घे अभिमान।
त्याला धर्माधर्मनिरूपण। करी जाण श्रुति हे ॥ ३४ ॥
तुम्ही तरी वशमाय। तुह्मां अभिमान केवि होय।
धर्माधर्मरूपद्वय। दूर होय तुह्मांपासूनी ॥ ३५ ॥
तुम्ही स्वतंत्र ईश्वर। कार्य[1] कारणें[2] करण[3] पर।
परि हा एक थोर। दिसे चमत्कार खरोखर ॥ ३६ ॥
स्वयें असूनी स्वाधीन। भक्तीनें भुकेजून।
होतसां भक्तपराधीन। वश्यपण सोडूनी ॥ ३७ ॥
भक्तकाजी जे दिसत। ते तुमचें रूप कल्पित।
कल्पितानें देतां अकल्पित। तेव्हां अस्पृश्य अभाष्य हें सत्य ॥ ३८ ॥
जरी तुमच्या प्राप्तीला। वेद शब्द प्रमाण बोलिला।
तरी परोक्षपणें भला। त्या बोला मानित्यें ॥ ३९ ॥
श्रवणाचें जें मनन। त्याचें जें निदिध्यासन।
त्याणें साक्षात्कार पूर्ण। होई आवरण भंगूनी ॥ ४० ॥
तेव्हां अस्पृश्य अभाष्य। या शब्दाचें असेंची भाष्य[4]।
जें वर्तमान भूत भविष्य। त्याला अविषय रूप तुमचें ॥

१ देह. २ कर्म. ३ इंद्रियें. ४ सूत्रस्थं पदमादाय पदैः सूत्रानुसारिभिः स्वपदानि च वर्ण्यंते भाष्यं भाष्यकृतो विदुः ॥ १ ॥

तुम्हीं स्वसंवेद्य[१] । स्वयंप्रकाश अभेद्य ।
कारणत्वें सर्ववंद्य । सर्व आद्य परब्रह्म ॥ ४२ ॥
असें रेणुकेचें वचन । श्रीदत्तानें ऐकून ।
प्रेमें हास्य करून । तिचें स्तवन आरंभिलें ॥ ४३ ॥
माते तूं विश्वाकारा । प्रणवरूपिणी परावरा ।
जो हा दिसतो पसारा । सारा हा तूंच होसी ॥४४॥
आदिमाया तूंचि होसी । ब्रह्मा विष्णु शिव रूपें घेसी।
उत्पत्ति स्थिती संहार करिसी । परी अससी अलिप्त॥
तूं एक असोनी । भाससी अनेक रूपांनीं ।
तुला नेणती अज्ञानी । चिद्रूपें सर्व व्यापितांही ॥४६॥
हें नाम रूपात्मक । तुझें दृश्य रूप एक ।
दुसरें अलक्ष्य रूप सच्चित्सुख । अज्ञ लोक केवी जाणे॥
देहेंद्रिय मनः प्राण । बुद्धि अहंकार याहून ।
साक्षित्वें तूं विलक्षण । चिद्रूपत्वें असती ॥ ४८ ॥
साक्षित्वही म्हणजे गौण । मुळींच साक्ष्य आहे म्हणे कोण ।
साक्ष्य नसतां साक्षिपण । कोण कसें सिद्ध करी॥४९॥
म्हणोनियां निराधारा । तुला म्हणती एकवीरा ।
अध्यासन्यायें तूं सर्वाधारा । सर्वांतरा तूं एक ॥५०॥
असो आतां हे स्तुती । तुझा पती महामती ।
ज्याला मुनी वंदिती । ज्याची ख्याती त्रिभुवनीं॥५१॥

१ आपलें आपण जाणणारा.

नाम घेतां जयाचें। मन भिये काळाचें।
काय वासाणूं वाचें। तयाचें तप तें ॥ ५२ ॥
अशा समर्थ मुनीसीं। मृत्यू कवणेपरी ग्रासी।
याच्या मृत्यूसी। कारण काय घडलें वद ॥ ५३ ॥
असें वचन ऐकून। रेणुका धरी मौन।
राम पुढें होऊन। म्हणे क्षत्रियांनीं मारिला ॥ ५४ ॥
अकस्मात आश्रमीं येवूनी। नसतां घाला घालूनी।
बलात्कारें क्षत्रियांनीं। मुनीचें शिर तोडिलें ॥ ५५ ॥
असें रामाचें वचन। ऐकतां अत्रिनंदन।
कोपायमान होऊन। शापवचन बोलत ॥ ५६ ॥
ह्मणे ब्रह्मद्वेषी हे क्षत्रिय। भूमिवरी करिती अपाय।
यांचा होवो कुळक्षय। विशेष समय न लागतां॥५७॥
मृग मीन ब्राह्मण। तृण जळ संतोष सेवून।
राहतां लुब्धक धीवर दुर्जन। निष्कारण छळिती ॥
ब्राह्मणाची संतोषवृत्ति। धनमदें नृप मत्त होती।
पापाची गणती न करिती। त्याला मृती शीघ्र येवो ॥
असें ऐकून शापवचन। रेणुकेनें खुणाविला नंदन।
मग राम हात जोडून। निःशंक होऊन बोलतसे॥६०॥
राम म्हणे मी आश्रमीं येऊन। ऐकून पितृहनन।
दुःखावेशें शापवचन। बोलिलों अवधारण करा तें ॥
एकवीस वेळ फिरून। करीन क्षत्रियांचे दळण।
पांच रक्तडोह करून। पितृतर्पण करीन मी ॥ ६२ ॥

तेव्हांच मी होईन । पितृऋणापासूनी उत्तीर्ण ।
हें माझें शापवचन । भवच्चरण सिद्ध करतील ॥६३॥
श्रीदत्त म्हणे रामास । जी तूं प्रतिज्ञा केली खास ।
ती यथार्थ आम्हांस । मानिली खास निर्धारें ॥ ६४ ॥
तूं माझ्या तेजें होशी प्रबळ । संहारिसील क्षत्रियकुळ ।
जिंकिसील भूमंडळ । बहुकाळ न लागतां ॥ ६५ ॥
राम म्हणे अर्जुन । गेला आमुची धेनू घेऊन ।
त्याशीं मी युद्ध करून । केलें हनन तयाचें ॥ ६६ ॥
त्याचेच पुत्र येवून । सवें क्षत्रिय घेऊन ।
त्याचें केलें कंदन । कोपावेशें अविचारें ॥ ६८ ॥
अर्जुन हा ब्रह्मण्य । आपुला शिष्य वरेण्य ।
पुण्यश्लोक अग्रगण्य । महापुण्य योगनिष्ठ ॥ ६८ ॥
त्याचें केलें हनन । घडला अपराध मजकडून ।
याचें असावें क्षमापन । म्हणोनी चरण धरिले हे॥६९॥
श्रीदत्त म्हणे रामासी । तसाची वर म्यां दिधला तयासी ।
निमित्तमात्र तूं झालासी । अपराध तुजपासीं नाहीं हा ।
हीं मनीं नको खंती । तूं साक्षात् मद्विभूती ।
तूं माझा सखा निश्चिती । करि क्षिती निःक्षत्रिय ७१
राम म्हणे गुरू दत्ता । आतां विलंब न करावा सर्वथा ।
पितृसंस्कारा करितां । आचार्य आतां तुम्ही व्हा ७२
श्रीदत्त तथास्तु म्हणूनी । तिळ दर्भादिक घेवूनी ।
तयां ठेवूनी स्मशानीं । काष्ठें शेणी जमविलीं ॥ ७३ ॥

दत्त म्हणे रामा तूं समर्थ । बाण मारूनी सर्व तीर्थ ।
आणि येथें मातृस्नानार्थ । लोकहितार्थ होती जेणें ७४
मग रामें बाण सोडून । भूमंडळ फोडून ।
पाताळापर्यंत जावून । सर्व तीर्थें आणिलीं ॥ ७५ ॥
श्रीदत्ताच्या आज्ञेनें । प्रथम स्नान केलें रामानें ।
तदनंतर मातेनें । यथाविधी स्नान केलें ॥ ७६ ॥
श्रीदत्त संकल्प सांगती । माता रेणुका स्नान करी ती
मग त्या तीर्थांची झाली ख्याती । मातृतीर्थ[1] म्हणती लोकांत ॥७७॥
मग प्रायश्चित्त करवून । त्रेताग्नी सिद्ध करून ।
करविती प्रेताधान । यथाविधान त्या वेळीं ॥ ७८ ॥
पीतांबर नेसून । सर्वाभरणें लेवून ।
हळदी कुंकुम लावून । माता सहगमना सिद्ध झाली ॥
डोळां काजळ भरून । भांगीं सिंदूर घालून ।
सूर्या नमस्कार करून । अग्निकुंडीं पातली ॥ ८० ॥
देव विमानीं बैसोनी । आपल्या स्त्रिया घेवूनी ।
वेगें पातले तत्क्षणीं । सहगमन पहावया ॥ ८१ ॥
रेणुका जातां सती । तेथें उर्वशी अप्सरा येती ।
ओंट्या घेवूनी मुनीच्या सती । तेथें येती प्रेमानें ८२
सप्त ऋषि प्रमुख मुनी । येती स्त्रियांसी घेऊनी ।
रेणुकेशी विलोकूनी । सर्व मुनी आनंदती ॥ ८३ ॥

---

१ वऱ्हाडांत प्रसिद्ध मातापुर तरसोपंतांचे नेहराजवळ.

मग ऋषीच्या सती । रेणुकेसी वंदिती ।
हळदी कुंकुमें देती । ओटया भरती प्रेमानें ॥ ८४ ॥
संकल्प करुनी रेणुकेनें । दंपतींस दिधलीं वाणें ।
सर्वां गौरविलें प्रसन्नमनें । धन वस्त्र भूषणें देऊनी ८५
श्रीदत्ताचार्यां पूजून । अग्नीसी प्रदक्षिणा करून ।
म्हणे रामा ऐक वचन । दत्ताधीन राहे तूं ॥ ८६ ॥
गोब्राह्मणांचें करी पालन । प्रतिज्ञा सत्य करून ।
कश्यपा देई भूमिदान । चिरंजीव सुखी हो ॥ ८७ ॥
आम्हां आली बोळवणी । पतीसह जानें स्वस्थानीं ॥
दुःख नको करूं मनीं । विवेक करूनी सुखी रहा ॥८८॥
दत्तात्रेया म्हणे माता । राम हा तुमचा आतां ॥
हात ठेवूनी त्याच्या माथां । करा याचा प्रतिपाळ ८९
असी रेणुका बोलून । श्रीदत्तातें वंदून ।
अग्नीसी प्रदक्षिणा करून । अग्निप्रवेश करी ती ॥९०॥
रमणी जैशा उत्सुक मनीं । जाती रतिसुखभुवनीं ।
तसी मनीं प्रसन्न होऊनी । रेणुका वन्हिप्रवेश करी ॥
पतिस्वरूप चिंतूनी । एकजीव एकमन होउनी ।
अग्निमाजी पतिशयनीं । राहे नंदिनी रेणूची ॥ ९२ ॥
देव ऋषी[1] मुनीश्वर[2] । करती जयजयकार ।
पुष्पें वर्षती सुरवर । वाद्यगजर करूनी ॥ ९३ ॥
सतीस्पर्शें अग्नि प्रकाशे । सहस्त्रसूर्यांपरी दिसे ।
दिङ्मंडळ सतीच्या यशें । भासे श्वेतसें लोकांना ९४

१ त्रिकाळज्ञानी. २ मनन करणारे.

रेणुका ही पतिव्रता। सहगमनीं पतीसवें चालतां।
एक एक पाउलें अश्वमेधसुकृता। जोडी माता धन्य ती ॥ ९५ ॥
एका एका रोमाप्रती। पतिसह ऋषिमंडळी[1] ती।
कोटी कोटी वर्षें वस्ती। संपादिती झाली धर्में ॥९६॥
साडेतीन कोटी केश। धर्में[2] दिधले अग्नीस[3]।
त्या पुण्याच्या संख्येस। जाण खास पार नाहीं॥९७॥
मुनिपत्नी म्हणती हे माता। धन्य धन्य पतिव्रता।
अंत नाहीं जिच्या सुकृता। इला असो नमस्कार ९८
एक आपुलें मातृकुळ। दुसरें तें पितृकुळ।
तिसरें हें भर्तृकुळ। केलें विमल पावन इणें ॥ ९९ ॥
लक्षूनियां पतीतें। देह ओपिला अग्नीतें।
परंधाम घेतलें तें। पुनरावृत्तीते न येईल ही ॥ १०० ॥
असीच सर्व स्त्रियांप्रति। परमेश्वर देवो मती।
पतीच स्त्रियांची गती। सर्वांची मती असीच होवो॥
जरी कां सतीचा पती। असेल पापी दुर्मती।
तया घेउनी स्वर्गाप्रती। जाईल ती पतिव्रता ॥१०२॥
धिक्कार असो दुर्भगेला। जी तिनी कुळांला।
पोंचवी अधोगतीला। यम तिला शिक्षा करी॥१०३॥
सर्वपापप्रशमन। असें असे सहगमन।
नाहीं याग यासमान। म्हणोनी नमन करिती त्या॥

१ ऋषिलोक म्हणून एक लोक आहे. २ पातिव्रत्य. ३ दग्ध केलें.

सर्व जयजयकार करीत । जाती रेणुकेसी ।चिंतीत ।
रामाप्रती म्हणे दत्त । माता तुझी धन्य हे ॥ १०५ ॥
असें म्हणतां तत्क्षण । आठवून मातेचे गुण ।
राम करी रुदन । देह टाकून धरणीवरी ॥ १०६ ॥
दत्त म्हणे तयासी । जी पावली सद्गतीसी ।
व्यर्थ तिचा शोक करिसी । मोहित होसी कां व्यर्थ ॥
ऐकून श्रीदत्तवचन । विवेकधैर्यें मन सांवरून ।
बोले दत्ताप्रती शोक सोडून । क्रियाचरण करावें आतां
इति श्रीदत्तमाहात्म्ये त्रयोविंशोध्यायः ॥२३ ॥
श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

# अध्याय चोविसावा

श्रीदत्तात्रेयाय नमः ॥

गुरु म्हणे दीपका । मनीं आणूनी विवेका ।
निवारूनियां शोकां । कर्म करी मातेचें ॥ १ ॥
श्रीदत्त मुनिवर्य । ज्या नमिती आर्य ।
ज्यांना ध्याती योगिवर्य । स्वतः आचार्य ते झाले ॥ २ ॥
करविती मृत्तिकास्नान । वर्धमानें[1] अंजलिदान ।
अवयवपिंडदान । यथाविधान करविती ॥ ३ ॥
सर्व क्रिया करवून । रामा म्हणे अत्रिनंदन ।
माता पिता हे दोघेजण । कुठें गेले जाणसी कीं ॥ ४ ॥
राम म्हणे ते मेले । या क्रियेनें उद्धरिले ।
तुम्हीं तयां तारिलें । नेलें उत्तमलोकाप्रती ॥ ५ ॥
धन्य माझी माता । धन्य माझा पिता ।
आपण क्रिया करवितां । यापरता काय मोक्ष ॥ ६ ॥
दत्त म्हणे रामासी । तूं देखोदेख भुलसी ।
कीं प्रत्यक्षप्रमाणासी । मानसी मानसीं वाटतें ॥ ७ ॥
जे सृष्टि स्थिती संहार । करिती ते गौरीहर ।
उपजले भूमीवर । मुनीश्वरवेषानें ॥ ८ ॥
ईश्वरी जी जगदंबिका । ती तुझी माता रेणुका ।
ईश्वर जो तारी लोकां । हो का पिता जमदग्नि ॥ ९ ॥

---

१ क्रमानें रोज वाढणाऱ्या.

भूमीवरी अवतरून । नाना धर्म स्थापून ।
कृतकार्य होऊन । अंतर्धान पावले ते ॥ १० ॥
ते येथें जन्मले । अथवा मरण पावले ।
अथवा स्वर्गा गेले । हें फोल बोलणें ॥ ११ ॥
जे सर्वत्र असती । ते येती ना जाती ।
ते येथें आतां कीं नसती । व्यापून असती सर्व जे १२
जरी तूं इच्छिसी । तरी दाविलों तयांसी ।
राम म्हणे दत्तासी । दावा तयांस पाहीन ॥ १३ ॥
असें जंव दोघे बोलती । तंव ते दोघे दिसती ।
दत्त म्हणे रामाप्रती । पाहें हे माता तात तुझे॥ १४ ॥
पद्मासन घालून । अंगीं भस्म चर्चून ।
जटाजूट बांधून । बसे समाधान जमदग्नि ॥१५॥
कंठीं रुद्राक्ष शोभती । गोमुखी धरूनी हातीं ।
दृष्टी करूनी वरती । एकाग्रचित्तीं ध्यान करी ॥ १६ ॥
रुद्राक्ष कुंडलें कानीं । रुद्राक्षभूषणें लेवूनी ।
वल्कलांबर नेसूनी । आजिन पांघरूनी बैसला॥ १७ ॥
वामभागीं रेणुका माता । सर्वाभरणभूषिता ।
दिव्य कांती लावण्यसरिता । सौभाग्यभूषिता विराजे
सुटे सुगंध अंगाचा । तेथें जमाव झाला भ्रमरांचा ।
पुंज दिसे तेजाचा । अंधकाराचा नाश करी जो॥१९॥
नखें दिसती अर्धचंद्रापरी । दंत झळकती हिऱ्यांपरी ।
तिच्या लावण्याची सरी । कोण करी जगांत ॥ २० ॥

रेणुका सुहास्यवदन । पहातसे पतीचें वदन ।
जें सुखाचें सदन । कीं भुवन सुकृतांचें ॥ २१ ॥
याप्रमाणें तयां । राम तो पाहूनियां ।
पावला अत्याश्चर्या । आलिंगाया धांवला ॥ २२ ॥
राम तेथें येऊन । धरूनी दृढ चरण ।
रडे स्फुंदस्फुंदोन । देहभान सोडूनी ॥ २३ ॥
म्हणे कां मज सोडूनी । तुम्ही राहतां लपोनी ।
माझा प्राण तुम्हांवांचूनी । कसा वांचेल सांगा हो ॥
असा प्रेमाश्रू टाकून । राम घेई लोळण ।
तंव ते दोघेजण । गुप्त होऊन राहिले ॥ २५ ॥
जातां ते लपून । राम मनीं झाला खिन्न ।
दरिद्र्यांचें धन । हरवतां प्राण कळवळे जसा ॥ २६ ॥
दत्त म्हणे रामासी । अविचारें या मोहासी ।
तूं कां व्यर्थ कळवळसी । भूल कसी घेसी हे ॥ २७ ॥
कवण रे तुझी माता । बोल रे कोण तुझा पिता ।
तूं ओळखी आपणा आतां । मोह,ममता सोडूनी २८
म्हणे राम हें वचन । यथार्थ मानी माझें मन ।
परी मातृस्नेहबंधन । तोडील कोण कवणेपरी ॥ २९ ॥
देतां ब्रह्मांडदान । एक घडीचें स्तनपान ।
सर्वथा नोहे समान । विशेष याहून काय बोलूं ॥३०॥
असें बोलुनी दुःख । राम टाकी अधोमुख ।
तंव रेणुकेचें मुख । भूमी भेदुनी प्रगटलें ॥ ३१ ॥

राम अश्रु पुसोन । पुढें करी वदन ।
मुख दे रामा चुंबन । राम समाधान पावला ॥ ३२ ॥
दत्त म्हणे ही माता हा सुत । ज्याच्या स्नेहा नाहीं अंत ।
काय करावा निःस्नेहसुत । केवळ जंत होतसे ॥ ३३ ॥
अद्यापी सर्व लोक । पूजिती रेणुकेचें मुख ।
जें दर्शनें वारी दुःख । परम सुख देई जें ॥ ३४ ॥
मातापुरीं जाऊन । मातृतीर्थीं न्हाऊन ।
रेणुकामुखदर्शन । करितें पावन उभयलोकीं ॥ ३५ ॥
दत्त म्हणे रामासी । सत्य करी प्रतिज्ञेसी ।
जिंकी अधार्मिकांसी । विजय घेसी मत्प्रसादें ॥ ३६ ॥
मग राम भृगुनंदन । श्रीदत्ता वंदून ।
प्रणीतेमध्यें[1] स्नान करून । संकल्प करिता झाला ॥३७॥
हातीं परशू घेऊन । क्षत्रियांचें करी हनन ।
मार देई तीक्ष्ण । कठोर मन जयाचें ॥ ३८ ॥
कुरुक्षेत्रीं भूपातें । बोलावूनी युद्धातें ।
बळें संहारी सर्वांतें । रोषावेशेंकरूनी ॥ ३९ ॥
धनुर्विद्याप्रवीण । शस्त्रास्त्रीं निपुण ।
तेही करितां रण । टाकिती प्राण धाकानें ॥ ४० ॥
क्षत्रियांच्या कुटुंबिनी । जरी कां असती गर्भिणी ।
रामाची गर्जना ऐकूनी । गर्भ टाकूनी ऐकती धाकें४१

१ नदी आहे.

असें एकवीस वेळ । युद्ध करूनी प्रबळ ।
क्षत्रियांचें सर्व कुळ । मारी दळभारेंसी ॥ ४२ ॥
असें क्षत्रियां मारूनी । त्यांच्या रक्तेंकरूनी ।
पांच तळीं भरूनी । तर्पण करी राम तो ॥ ४३ ॥
त्या कालापासूनी । स्यमंतपंचक म्हणुनी ।
कुरुक्षेत्रीं प्रसिद्ध होऊनी । असती दर्शनीं उद्धारक४४
मग रोष सोडून । शांतचित्त होऊन ।
सर्व शस्त्रें धुवून । भेटला येऊन दत्तात्रेया ॥ ४५ ॥
श्रीदत्ता वंदून । म्हणे तुमच्या तेजेंकरून ।
क्षत्रियांचें केलें हनन । आतां समाधान पावलों॥४६॥
कोप हा अनिवार्य । यामुळें नेणवे कार्याकार्य ।
डोळां न दिसे आर्यानार्य । पहा अनार्यपणा हा॥४७॥
म्यां घ्यावया एकाचा सूड । क्षत्रियांचें तोडिलें बूड ।
हा मी केव्हढा मूढ । कोपारूढ व्यर्थ झालों ॥ ४८ ॥
एका राजाचा कारितां घात । तीर्थयात्रा समस्त ।
मजकरवीं करवी तात । तें मनांत न आणलें ॥ ४९ ॥
राजे किती तरी मारिले । तें पाप मज लागलें ।
चित्तीं असे खोचलें । म्हणोनी धरिले चरण हे ॥५०॥
मी आलों शरण । मला करावा पावन ।
म्हणोनी करी नमन । मनीं खिन्न होऊनी ॥ ५१ ॥
दत्त म्हणे दुष्ट नृप । मारिले त्यांचा अनुताप ।
कां करिसी हें पाप । नोहे ताप मानूं नको ॥ ५२ ॥

दुष्टांचें केलें त्वा हनन । केलें साधूंचें रक्षण ।
केलें धर्माचें स्थापन । हें पाप न तव शिरीं ॥ ५३ ॥
जरी मनीं मानसी शीण । तरी ऐक माझें वचन ।
ब्रह्मर्षींला बोलावून । करी यज्ञ यथाविधी ॥ ५४ ॥
तुझें पाप जाईल । देव संतृप्त होतील ।
विप्रही सुख पावतील । कीर्ती होईल जगीं तुझी॥५५॥
त्वां मारिलें क्षत्रियांला । स्वबळें विजय घेतला ।
हस्तगत केलें भूमंडळा । भला झालास यशस्वी ५६
आतां यज्ञ करून । सर्वस्व दे दक्षिणा ।
कश्यपा दे भूदान । होसी पावन तूं खास ॥ ५७ ॥
असें वदे अत्रिनंदन । तें रामानें अंगिकारून ।
ऋषिमुनी बोलावून । श्रद्धेनें यज्ञ आरंभिला ॥ ५८ ॥
मरीची आत्रि मुनी श्रेष्ठ । अंगिरा ऋतु वासिष्ठ ।
पुलस्त्य पुलह वरिष्ठ । जे प्रेष्ठ परमेश्वरा ॥ ५९ ॥
भरद्वाज विश्वामित्र । कश्यप वामदेव पवित्र ।
अगस्त्य गर्ग भृगु तत्पुत्र । जाबाल सुहोत्र गौतम६०
हे प्रमुख असती । शिष्यप्रशिष्यांसह येती ।
यज्ञाचा आरंभ करविती । श्रद्धाभक्तिपुरःसर ॥ ६१ ॥
भगवान श्रीदत्तात्रेय । असती मुख्य आचार्य ।
तेथें न्यून पडेल काय । सादृगुण्य होय सर्वही ॥६२॥
प्रमादात्कुर्वतां कर्म असें । स्मृतिवाक्य प्रसिद्ध असे ।
यत्स्मरणें सांग होत असे । तो स्वयें होतसे आचार्य॥

तेथें प्रत्यक्ष देव येती । आपुला हविर्भाग घेती ।
अत्यंत तृप्ती पावती । देव म्हणती धन्य आम्ही ॥६४॥
नित्य होतसे षड्रसान्न । अमित होतसे द्विजभोजन ।
राम देई वस्त्रें धन । द्विजजन तृप्त झाले ॥ ६५ ॥
चातुर्होत्रविधान । करूनियां भृगुनंदन ।
कश्यपाचे पाय धुऊन । करी पूजन श्रद्धेनें ॥ ६६ ॥
संकल्प करून । देई कश्यपा भूदान ।
दक्षिणार्थ धनरत्न । देई नंदन रेणुकेचा ॥ ६७ ॥
स्वर्णवस्त्रधनेंकरून । करी दत्ताचार्याचें पूजन ।
श्रीदत्तें तें सर्व धन । दिधलें जाण ब्राह्मणांला ॥ ६८ ॥
जो दत्त भक्तभावन । त्यासी कासया आचार्यपण ।
काय कीजे दक्षिणा धन । एक सुमन[1] मानी जो ॥६९॥
सर्वां आनंद झाला । दत्त वदे रामाला ।
तूं जगीं हो भला । पुरुषार्थ केला हा मोठा ॥ ७० ॥
तूं बाल असून । दुर्जय क्षत्रिया मारून ।
सर्व लोक सुखी करून । केलास यज्ञ यथाविधी ॥७१॥
हें तुझें यश गातील । ते लोक पवित्र होतील ।
तूं झालास विमल । विपुल पुण्य जोडूनी ॥ ७२ ॥
नसतां पाठबळ । अरि असतां विपुळ ।
परी एकटा तूं सकळ । मारिसी खळ निजबळें ॥ ७२ ॥
असें अन्य करील कोण । तेव्हां तूं साक्षात् नारायण ।
म्हणोनी केलेंस तुमुल रण । भूप दुर्जन मारिले ॥७३॥

---

१ पुष्प किंवा चांगलें मन.

अतएव तूं शूर । असती त्वास रणधीर ।
केवळ विष्णू उदार । म्हणुनी संहार झाला हा ॥७५॥
राम म्हणे मी कायसा । प्रसाद हा आपुला असा ।
आपुला अनुग्रह जसा । विजय तसा हा झाला॥७६॥
असें ते परस्पर बोलती । मुनी जयजयकार करिती ।
हात जोडून म्हणती । तुमची गती तुम्हीच जाणा ॥
तुम्ही आम्हां दिसता भिन्न । परी एकरूप एकमन ।
करावया लोक पावन । करितां अवतरून ह्या लीला ॥
असें म्हणूनी वंदिती । आज्ञा घेऊन सर्व जाती ।
असी रामें केली ख्याती । जगती पावन करावया ॥
श्रीदत्ताचें सख्य करून । राम राहिला संनिधान ।
श्रीदत्त प्रसन्न होऊन । सांगे ज्ञान तयासी ॥ ८० ॥
व्हावया स्वरूपज्ञान । त्रिपुरा[१]रहस्य निरूपण ।
करी रामा उद्देशून । दत्त स्वजन उद्धरावया ॥ ८१ ॥
ज्याचें करितां श्रवण । होई भ्रमनिरसन ।
कळून ये स्वरूप पूर्ण । उपनिषद्गणरहस्य जें ॥ ८२ ॥
दत्त म्हणे रामासी । तूं माझा सखा झालासी ।
मला चिंतूनी मानसीं । जाई तपासी यथेष्ट क्षेत्रीं ८३
तुझें ठायीं ठेविलें जाण । तें तेज मी पुनः ।
अवतारोनी घेईन । मग तूं ब्राह्मण होशील ॥ ८४ ॥
वैवस्वत मन्वंतर । हें सरे तंववर ।
धरूनी सागरतीर । राहे विप्र होऊनी ॥ ८५ ॥

१ एक ग्रंथ.

सावर्णिकमन्वंतरीं । होसी महर्षी निर्धारीं ।
मग महाकल्पावरी । मुक्ती बरी घेशील ॥ ८६ ॥
असें दत्तवचन । परशूरामें ऐकून ।
कांहीं काळ राहून । करी सेवन श्रीदत्ताचें ॥ ८७ ॥
जेणें एकवीस वेळ । निःक्षत्र केलें भूमंडळ ।
ज्याचें न गणवे बळ । ज्याला खळ कांपती ॥ ८८ ॥
तो राम दक्षिणसागरीं । जाऊनियां तप करी ।
तेथें जाति विप्र दरिद्री । मागती दान तयापाशीं ८९
राम म्हणे तयांसी । सर्वस्व दिधलें द्विजांसी ।
भूमि दिधली कश्यपाशीं । आतां मजपाशीं कांहीं नाहीं ॥ ९० ॥
द्विज म्हणती रामासी । जरी भूमि दिली कश्यपाशी ।
तरी तूं येथें कां बससी । उपभोग घेसी कीं दानाचा ॥
असें ऐकूनी विप्रवचन । बाणें समुद्र शोषून ।
तेथें राहिला गुप्त होऊन । चिपळोन म्हणून स्थान जेथें ॥ ९२ ॥
लांबी चारशें कोस । रुंदी बारा कोस ।
अशा कोंकणपट्टीस । निर्माण केली रामानें ॥ ९३ ॥
तीही घेतली ब्राह्मणांनीं । पुढें दाशरथीराम होउनी ।
परशुरामाचें तेज आकर्षूनी । विवाह करूनी जाता घेई ॥
त्या दिवसापासून । राम चिपळोनीं गुप्त राहून ।
करी तप अनुष्ठान । पुढें महर्षी होणार तो ॥ ९५ ॥

रेणुका हीपार्वती । या विषयीं नको भ्रांती ।
एकदां ब्रम्ह्यासी वेदविस्मृती। दैवगतीनें जाहली॥९६॥
ब्रह्मा दत्तापाशीं येऊन । म्हणे गेलों वेद विसरून ।
दत्त म्हणे रेणुकेचें स्मरण । करितां वेद स्फुरण होईल॥
मग ब्रह्मा चिंती एकवीरेंसी[1] । तंव ती धरूनी रूपासी।
प्रगटली तत्क्षणेंसी । ब्रह्मा तयेसी वंदितसे ॥ ९८ ॥
तंव तिच्या अंगापासून । वेद झाले उत्पन्न ।
ब्रम्ह्योंन ते घेवून । म्हणे धन्य झालों मी ॥ ९९ ॥
असा जीचा प्रभाव । पाहुनी रेणूचा भाव ।
जी पावली पुत्रीभाव । केवळ भावगम्य जी॥ १०० ॥
ती अद्यापी माहुरीं । साक्षात् निवास करी ।
निजभक्तांते तारी । जी निवारी संकटा ॥ १०१ ॥
अनुसूया अत्रीचें असे वेश्म । श्रीदत्ताचा आश्रम ॥
रेणुकादेवीचें धाम । दर्शनें कामपूरक ॥ १०२ ॥
कृष्णामलकीचें[2] दर्शन । जे करिती जाऊन ।
ते जाणावे पुण्यजन । होती पावन निर्धारें ॥ १०३ ॥
घेऊनी रेणुकेचें दर्शन । मातृतीर्थी करिती पिंडदान ।
त्यांचे पितर उद्धरून । जाती निर्वाणपदासी ॥१०४॥
चांध्रकांचे[3] पितर । नरकयातना भोगिती घोर ।
मग चांध्रीक द्विजवर । मातृतीर्थी पिंड देई ॥ १०५ ॥
त्याचे पितर तत्काळ । मुक्त झाले सकळ ।
असें मातृतीर्थाचें फळ । मिळे तत्काळ निश्चयें ॥१०६॥

१ रेणुका. २ काळी आवळी. ३ नांवाचा ऋषी.

पद्मतीर्थ सर्वतीर्थ । हीं दोनीही आति समर्थ ।
कन्याकामदूषित । सूर्यही जेथें पवित्र झाला ॥ १०७ ॥
वेदधर्मा म्हणे शिष्यासी । दत्तें त्या स्थानीं अर्जुनासी
योगोपदेश करून त्यासी । परमधामासी पाठविला ॥

इति श्रीदत्तमाहात्म्ये चतुर्विंशोऽध्यायः ॥ २४ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

# अध्याय पंचविसावा

श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

गुरु म्हणे दीपकासी । पुत्रानें असें पितयासी ।
अर्जुनाख्यान विस्तारेंसी । कथिलें दत्तकथान्वित ॥१॥
पुत्र म्हणे ऐक ताता । अलर्क नामें राजा होता ।
तोही शरण येऊनी दत्ता । योगसाम्राज्यता पावला २
पिता म्हणे रे सुता । अलर्क हा कोण होता ।
केंवी शरण आला दत्ता । योगसाम्राज्यता कशी घे ३
दत्ताचें यश पावन । ऐकाया लावी मी कान मन ।
तृप्ती नोहे अजून । सांग विस्तारून आणीकही ॥ ४ ॥
स्वयें असूनी निराकार । जो जाहला नराकार ।
ज्याचा हा अवतार । करी निराकार निजभक्तां ॥५॥
दत्तकथामृतपान । पुरे पुरे म्हणेल कोण ।
घेतां भरूनी श्रवण । वाटे अजून पाहिजे ॥ ६ ॥
ऐसें ताताचें वचन । त्या पुत्रानें ऐकून ।
मग केलें निरूपण । अलर्काख्यान पावन जें ॥ ७ ॥
तें मीही तुजप्रती । सांगतों ऐक निगुती ।
सोमवंशीं नृपती । शत्रुजित नामें एक होता ॥ ८ ॥
शिवप्रसादेंकरून । त्याला झाला एक नंदन ।
सर्वगुणसंपन्न । दिसे शोभन स्वरूपें ॥९॥
असा तो गुणखाणी आत्मज । त्याचें नाम ठेविलें
ऋतुध्वज ।
केवळ पुण्याचा पुंज । तेजें विराजमान जो ॥ १० ॥

त्याचें होतां व्रतबंधन । करी सर्व विद्याध्ययन ।
झाला धनुर्वेदाभिज्ञ । ज्याला प्राज्ञ मानिती ॥ ११ ॥
राजपुत्र महाशूर । शरणागतांचा आधार ।
नीतिशास्त्रीं सादर । जो उदार कीर्तिमंत ॥१२॥
असा जो राजकुमार । युवराज होऊनी सादर ।
वागे तंव एक विचित्र । नवल घडलें ऐक तें ॥१३॥
रेवातीरी गालवमुनी । राहे आश्रम करूनी ।
जो सादर स्वानुष्ठानीं । राहे ध्यानीं निमग्न जो ॥१४॥
पर्वकाळीं ऋषीश्वर । श्रद्धेनें आरंभी अध्वर ।
पातालकेतु असुर । महाक्रूर विघ्न करी ॥ १५ ॥
आरंभितां होम । दिसूं लागतां धूम ।
येऊनी दैत्य महाभीम । होमविध्वंस करीतसे ॥ १६ ॥
अस्थि मांस रक्त । टाकी यज्ञशाळेंत ।
करी यज्ञ दूषित । मुनी त्रस्त जाहला मग ॥ १७ ॥
मुनी म्हणे करावें काय । दैत्य करिती अंतराय ।
मला न सुचे उपाय । करूं काय मी आतां ॥ १८ ॥
जरी करूनी कोप । दुष्ट दैत्या द्यावा शाप ।
तरी भंगेल तप । लागेल पाप निश्चित ॥ १९ ॥
म्हणे देवा परमेश्वरा । धर्मपाळका दयाकरा ।
कां उपेक्षिसी उदारा । भक्ताधारा दीनबंधू ॥२० ॥
दैत्यें मज गांजिले । यज्ञयाग राहिले ।
माझें कर्म लोपलें । कां उपेक्षिलें आम्हांसी ॥ २१ ॥

आम्हां तुझा विश्वास। दैत्यें आम्हां दिला त्रास।
याचा करी तूं नाश। आम्हां निराश करूं नको ॥२२॥
असा दीन होऊनी। ईश्वरा प्रार्थी मुनी।
ईश्वर प्रसन्न होऊनी। आकाशवचनीं अभय दे॥२३॥
मुनीच्या समीप अकस्मात। दिव्य अश्व उतरत।
मानी आश्चर्य मनांत। ऐकत तंव आकाशवाणी॥२४॥
हा दिव्याश्व घेऊनी। शत्रुजिताचे सदनीं।
मुने त्वां जाऊनी। निजरक्षणीं पुत्र मागे ॥ २५ ॥
ऋतुध्वज या अश्वावर। बसूनी मारील असुर।
मग तुवां सादर। करावा अध्वर निर्विघ्नपणें ॥ २६ ॥
असी आकाशवाणी। पडतां मुनीच्या कानीं।
तया अश्वा घेऊनी। राजसदनीं पातला ॥ २७ ॥
म्हणे राजा मी गालव। करी रेवातीरीं याग उत्सव।
विघ्न करी दैत्यपुंगव। आजी देव प्रसन्न झाला॥२८॥
अश्व उतरला अकस्मात। तंव आकाशवाणी बोलत।
ऋतुध्वजा हा अश्व देतां। दिनिजसुता तो मारील॥
असी आकाशवाणी ऐकून। आलों अश्व घेऊन।
आतां दे पुत्रदान। तुझें कल्याण होईल ॥ ३० ॥
क्षत म्हणजे दुःख जाण॥ त्यापासूनी करी त्राण।
म्हणोनी क्षत्रिय हें नाम तुम्हां जाण। करा रक्षण आमुचें ॥ ३१ ॥
मुनीचें वचन ऐकून। राजा प्रसन्न होऊन।
म्हणे पुत्रा अश्वारूढ होऊन। करी हनन दैत्यांचें॥३२॥

असतां मुनीचा अनुग्रह। अनुकूल होती सर्व ग्रह।
मग यासीं कोण करील विग्रह[1]। तयां[2] मोहन पडेल॥
असें ताताचें वचन। तो ऋतुध्वज मानून।
मायबापां वंदून। आशीर्वचन घेतसे ॥ ३४ ॥
अंश्वा घेऊनी राजसुत। ऋषीश्वरा समवेत।
येऊनी त्याच्या आश्रमांत। म्हणे आतां यज्ञ करी ॥
दावीं कोठें असे असुर। मी करीन त्याचा संहार।
मग म्हणे मुनीश्वर। आतां अध्वर आरंभितों ॥३६॥
होमधूम पाहून। दैत्य येईल धांवून।
मग दावीन तत्क्षण। करी हनन तयाचें ॥ ३७ ॥
दैत्य असे मायावी। रूपें पालटी नवीं नवीं।
नानापरी माया दावी। ठेवी बरवी हुशारी ॥ ३८ ॥
तया म्हणे राजपुत्र। तुम्ही आम्हां छत्र।
आम्ही भवद्दर्शनें पवित्र। दितिपुत्र आम्हां कायसे ॥
होतां तुमची कृपा मात्र। आम्हीं होऊं जयपात्र।
साधूं आम्ही इहपरत्र। नाहीं अत्र संशय ॥ ४० ॥
असें ऐकतां त्याचें वचन। गालव आरंभी यज्ञ।
कर्मसंकल्प करून। अन्वाधान करितां झाला ॥ ४१ ॥
तंव होमधूम उठला। तो दैत्यानें पाहिला।
दैत्य धांवत आला। वराहरूप धरूनियां ॥ ४२ ॥
दंष्ट्रा बाहेर दिसत। घुरु घुरु शब्द करित।
केश उभारून अकस्मात। त्या आश्रमांत पातला ४३

१ युद्ध. २ शत्रूला

मुनी सांगे राजसुता । हा दैत्य पातला आतां ।
तूं ठेवी सावधानता । घे विजयता सत्वर ॥ ४४ ॥
मुनीवचन ऐकून । त्या वराहा पाहून ।
अश्वावरी बसून । नृपनंदन त्या वेळीं ॥ ४५ ॥
वराहहृदय लक्षून । सोडी अति तीक्ष्ण बाण ।
हृदयीं गेला तो भेदून । परी तो मरण न पावला॥४६॥
जोंवरी आयुष्य असे । तंववरी कोण मारितसे ।
आयु मर्मैं रक्षितसे । म्हणोनी वांचतसे संकटीं॥४७॥
विद्ध केला तरी । वराह पळे त्वरें दुरी ।
ऋतुध्वज अश्वावरी । बसोनी लागे पाठीस ॥ ४८ ॥
डुकर जाउनी वनीं । गुहेमध्यें राही लपोनी ।
ऋतुध्वज पाहूनी । गुहेमधूनी चालतसे ॥ ४९ ॥
अश्वाची गती विलक्षण । जेथें अन्धकार गहन ।
तेथें प्रवेश करून । पाताळीं जाऊन राहिला ॥ ५० ॥
तेथें रत्नजडीत सदन । राजपुत्र पाहून ।
अश्व तेथें बांधून । म्हणे सदन पाहूं हें ॥ ५१ ॥
रत्नजडित गोपुरें । दिसती लखलखीत द्वारें ।
सुवर्णाचीं शिखरें । गगनचुंबित दिसताती ॥ ५२ ॥
रत्नांचीं सोपानें । सभोंवती उपवनें ।
जेथें सूर्यकिरणें । न करिती प्रवेश ॥ ५३ ॥
तोरणें मोतियांचीं । भिंत दिसे इंद्रनीलाची ।
पाहतां राजपुत्राची । बुद्धि थक्क झाली ॥ ५४ ॥

---
१ आयुष्य मर्मांना रक्षितें.

तंव तेथें पाहे कुमारी । देवीसमान सुंदरी ।
कंदुक घेऊन करीं । बैसली द्वारीं एकटी ॥ ५५ ॥
राजा ये तिचे समोर । ती तेथून उठे सत्वर ।
चढोनी जाई माडीवर । राजकुमार मागे चाले ॥५६॥
राजा हें पाहे अंतरीं । रत्नखचित पलंगावरी ।
बैसली एक सुकुमारी । चिंता अंतरीं करीत ॥ ५७ ॥
तंव अकस्मात रायासीं । पाहतां मूर्च्छा आली तियेसी।
खालीं पडे तत्क्षणेंसी । सखी तिसी सांवरी ॥ ५८ ॥
निर्जीव होऊनी घटिकाभरी । निचेष्टित पडली नारी ।
मान टेंकी भूमीवरी । राजा अन्तरीं खिन्न झाला ५९
म्हणे हे मज पाहून । कां पडली पलंगावरून ।
असा विस्मित होऊन । उभा राहून पाहे तो ॥ ६० ॥
म्हणे हें घर सुंदर । दिसतसे मनोहर ।
परी येथें न दिसे कोणी नर । असती सुंदर स्त्रिया दोघी ।
एकांतीं स्त्रिया बसती । तेथें जाता दोष लागती ।
तेव्हां फिरावें मागुती । हेच नीती यथार्थ ॥ ६२ ॥
म्हणोनी तो मागें मुरडत । तंव ती उठोनी रडत ।
पुनः नृपा पाहूनी पडत । सखी म्हणतसे नृपासी ६३
तुम्ही कोण आलां कोठून । कां जातां फिरून ।
क्षणभरी बसून । समाधान पावावें ॥ ६४ ॥
राजपुत्र म्हणे तियेसी । नरवर्जित स्थळीं कसी ।
करावी विश्रांतीसी । मूर्च्छा इसी कां आली ॥ ६५ ॥

तुम्ही कोणाच्या कोण । कां धरिलें शून्य स्थान ।
हें सांगा विस्तारून । मग समाधान वाटेल ॥ ६६ ॥
असें नृपाचें वचन । त्या कन्येनें ऐकून ।
सुचवी सखीस तत्क्षण । माझें वर्तमान सांग म्हणूनी॥
असें म्हणोनी कासावीस । होऊनी सोडी तीक्ष्ण श्वास
पुनः पाहूनी नृपास । मूर्च्छा विशेष पावतसे ॥ ६८ ॥
सखी तिला सावरून । मंद मंद वारा घालून ।
सावधान करून । राजनन्दनाप्रती बोले ॥ ६९ ॥
आपण सुखरूप असून । येथें आपोआप येऊन ।
इला दिधलें दर्शन । तुम्हां भुलोन हे पडे ॥ ७० ॥
इच्या मोहासी कारण । खचित झालां तुम्ही जाण ।
दर्शनें कामक्षोभ होऊन । मूर्च्छा येऊन पडली॥ ७१ ॥
विश्वावसू गंधर्व थोर । त्याची ही कन्या सुंदर ।
पातालकेतू असुर । पळवून आणि इयेतें ॥ ७२ ॥
मदालसा इचें नाम । केवळ लावण्याचें धाम ।
दैवयोगें आपुला आगम । होऊनी संगम झाला येथें ॥
दैत्य वरूं इच्छी इसी । इची इच्छा नाहीं तसी ।
येथें आणितांच इसी । भोगायासी प्रवर्त झाला॥७४॥
तो वेळ टाळावयासी । इणें सांगितलें त्यासी ।
विवाह न होतां आमुचे वंशीं । पुरुषासी न भोगिती॥
विवाह न होतां जरी । तूं स्पर्श करसील तरी ।
मी प्राण त्यजीन निर्धारीं । हें अंतरीं साच मान ७६

मग इचें वचन मानून। विवाह करावा म्हणून।
शुक्राचार्या बोलावून। लग्नशोधन पैं केलें ॥ ७७ ॥
उदयीक त्रयोदशीला। मुहूर्त असे जो योजिला।
दैत्य वर नावडे इला। म्हणूनी प्राणाला त्यजूं पाहे७८
कालचे दिनीं येथून। दैत्य गेला निघून।
तो संधी पाहून। ही प्राण सोडाया उठली ॥ ७९ ॥
तंव कामधेनू येऊन। म्हणे मदालसे न सोडी प्राण।
एक वीर दैत्या भेदून। उद्यां येऊन भेटेल ॥ ८० ॥
तो असे सुंदर। तो तुला योग्य वर।
त्याचा धरी तूं कर। नको शरीर टाकूं हें ॥ ८१ ॥
गोलोकापासून। मी आल्यें दया करून।
कामधेनू असें सांगून। गुप्त होऊन जाती झाली॥८२॥
आज तसेंही घडलें। दैत्यें वराहरूप धरिलें।
त्याला कोणी वेधिलें। दुःख झालें फार त्याला॥८३॥
तो पातालीं गेला लपून। आपुलें पश्चात् झालें आगमन।
तेव्हां निश्चयें माझें मन। समाधान पावलें ॥ ८४ ॥
तुम्हींच वेधिला असुर। असा झाला माझा निर्धार।
वाटे तुम्ही अमर। दिधला धीर या समयीं ॥ ८५ ॥
कुंडला नाम माझें असे। मी तापसाची कन्या असें।
हिमाचळीं बसतसें। योगाभ्यासें करूनी ॥ ८६ ॥
जेथें गंधर्वकन्या क्रीडती। तेथें इसी घडली दोस्ती।
ज्या वेळीं दैत्यपति। आकाशपंथीं इला नेई ॥ ८७ ॥

तो आर्तस्वर ओळखून । म्यां इचें हित करावें म्हणून।
त्या दैत्या प्रार्थून । सांगितलें तें ऐक ॥ ८८ ॥
ही असे माझी सखी । माझ्याविरहित होईल दुःखी ।
तरी मलाही ने तुझ्या लोकीं । मग ही सुखी होईल॥
हें दैत्यें अंगीकारिलें । मलाही बरोबर आणिलें ।
तें सख्य आजी फळलें । मज कळलें भवद्दर्शनीं॥९०॥
हें म्यां सर्व कथिलें । आपुलेंही दर्शन झालें ।
आम्हां कृतार्थत्व आलें । आपुलें नाम सांगा ॥ ९१ ॥
असें सखीचें वचन । ऐकून बोले नृपनंदन ।
मी अमर नोहें जाण । असें राजन्य[1] भूतळींचा ॥९२॥
सोमवंशी राजा शत्रुजित । त्याचा असे मी सुत ।
ऋतुध्वज नामें ख्यात । पितृभक्त असें मी ॥ ९३ ॥
गालवयज्ञरक्षणार्थ । मजला योजी तात ।
येऊनी मुनीच्या आश्रमांत । वेधिला दैत्य वराहरूपी॥
तो न मरतां पळाला । म्यां पाठलाग केला ।
तों या दरींत घुसला । मी आलों त्याला शोधावया॥
त्या मारावा म्हणून । ऋषीचें असे आज्ञापन ।
येथें तुमचें झालें दर्शन । सर्व कळोन येईल आतां ९६
कुंडला म्हणे ऐक तूं । श्रेष्ठ बंधू पातालकेतू ।
कनिष्ठ बंधू तालकेतू । लोकदुःखहेतु दोघे दैत्य ॥९७॥
ते येथें वास करिती । आज ते घेऊन भीती ।
पाताळीं लपले असती । ते तुझ्या हातीं येतील॥९८॥

---

१ राजपुत्र.

एक असे विनंती। हे कन्या पवित्र निश्चिती।
इला धरावी हातीं। तुम्ही कीर्ती वाढवील ही।। ९९ ।।
हे गंधर्वाची कन्या। आहे ही योगिमान्या।
इच्या समान न मिळे अन्या। ही होईल धन्या तुम्ही
वरितां।। १०० ।।
क्षत म्हणजे दुःख। त्या वारूनी रक्षी लोक।
म्हणूनी क्षत्रिय नाम चोख। तुम्हां लोक देतात १०१
तेव्हां इचें दुःख वारितां। सार्थकता होईल क्षत्रता।
रक्षावें शरणागता। तुमचा हा मुख्य धर्म ।। १०२ ।।
तुम्ही मर्त्य असतां। देवकन्या तुम्हां मिळतां।
जगीं येईल श्लाघ्यता। तेव्हां आतां वरा इला।।१०३।।
हा सिंहाचा भाग जाणावा। हा कोल्ह्यानें न पळवावा।
तरीच होईल वाहवा। हें चित्तीं ठेवा यथार्थ।। १०४ ।।
इला हें असें दुःख झालें। तें सर्व तुम्हां निवेदिलें।
ही धरिते तुमचीं पाउलें। आतां अव्हेरिलें न पाहिजे।।
मी इची सोय करून। माझा मार्ग धरून।
पुनः हिमाचळीं जाऊन। तप करीन निश्चित ।। १०६ ।।
जरी तुम्ही न वराल। तरी तो मिथ्या जाईल।
कामधेनूचा बोल। मग ही सोडील प्राणातें।। १०७ ।।
यत्नें देह टाकील। दैत्याधीन न होईल।
हा इचा निश्चय निश्चल। पुरे बोल आतां हा ।। १०८।।
असी कुंडला होऊन दीन। म्हणे इला न्या वरून।
दैवें तुम्हां हें दिल्हें दान। म्हणून चरण धरी त्याचे ।।

इति श्रीदत्तमाहात्म्ये पंचविंशोऽध्यायः ।। २५ ।।

---

# अध्याय सव्विसावा

॥ श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

गुरु म्हणे दीपकासी । कुंडला प्रार्थी नृपासी ।
तरी नृपाचे मानसीं । न ये इसी वरावें हें ॥ १ ॥
तोचि जितेंद्रिय जाणावा । तोचि धर्मभीरु म्हणावा ।
कामिनीनें गांठितां ज्याच्या स्वभावा । विकार किमपि न पडेची ॥ २ ॥
राजा म्हणे सर्व ऐकिलें । जरी इणें मला इच्छिलें ।
तरी माझ्या मना न आलें । साशंकित झालें मन माझें
मी असे धर्मशील । मजपासूनी अधर्म न घडेल ।
इचें दान कोण करील । केवी होईल माझी पत्नी ॥४॥
द्विजदेवाग्निसमीप । कन्येला वरती भूप ।
एकांतीं वरितां लागेल पाप । मग अनुताप होईल॥५॥
कुंडला वदे हा काय विचार । कन्येनें करूनी स्वयंवर ।
धरितां इष्टपतीचा कर । कोण पामर दोष दे ॥ ६ ॥
इचा पिता गंधर्व । इणें विवाह गांधर्व ।
करितां मानतील सर्व । न दवडा अपूर्व रत्न हें ॥ ७ ॥
तुम्ही पहा तुमच्या कुळा । मेनकाकन्या शकुंतला ।
धरिलें तिच्या करकमला । गांधर्वविधीनें दुष्यंतें ॥८॥
सोमवंशीं आणि सूर्यवंशीं । करितात स्वयंवरासी ।
तेव्हां हे गुणराशी । स्वयंवरासी योग्य असे ॥ ९ ॥

तुम्हां साक्षी पाहिजे तरी । गुरुशी आणितें क्षणांतरीं।
परी इचा कर धरी । शंका अंतरीं न ठेवावी ॥ १० ॥
राजा म्हणे गुरु येतां । मग इचा कर धरितां ।
समाधान वाटेल चित्ता । तसें होतां बरवें असे ॥११॥
असें राजाचें वचन । कुंडलेनें ऐकोन ।
पावूनियां समाधान । गुरुचें ध्यान आरंभिलें ॥ १२ ॥
तंव तत्काळ गुरु आले । कुंडलेनें सर्व कथिलें ।
गुरु म्हणे बरें लग्न आलें । ये वेळे अनायासें ॥ १३ ॥
षष्ठाष्टद्वादशस्थानीं । वास केला खलग्रहांनीं ।
केंद्रत्रिकोणलाभस्थानीं । शुभ ग्रहांनीं वास केला १४
एक सप्तम शुभ दुर्बल । तो कदाचित शोक देईल ।
तरी इतर ग्रह सबळ । शोक वारितील निश्चयें ॥१५॥
गुरु असें बोलूनी । यथाविधी करूनी ।
योजकाग्नी स्थापूनी । पाणिग्रहण करविलें ॥ १६ ॥
कर धरितां मदालसेला । परमानंद जाहला ।
आशीर्वाद देऊनी त्यांला । गुरु चालिला स्वस्थाना १७
मदालसा म्हणे कुंडलेसी । ह्या तुझ्या उपकारासी ।
तुलना नसे निश्चयेंसी । प्रत्युपकारासी काय देऊं १८
न योजी आतां प्रत्युपकार । हा माझे ठायीं जिरो उपकार ।
कुंडला म्हणे ईश्वर । आजी करुणाकर प्रसन्न झाला ॥
मनासारखें साधलें । आतां माझें मन धालें ।
तुज पतीचे करीं दिधलें । आतां मी चालिलें तपासी॥

आपुलें मन सांवरूनी । धर्म धैर्य धरूनी ।
पातिव्रत्यें करूनी । सुखी होऊनी तूं राहे ॥ २१ ॥
मदालसा गहिंवरें । म्हणे माता पिता अंतरे ।
परि तूं हें खरें । केलें बरें हित माझें ॥ २२ ॥
असें म्हणूनी मिठी घाली । कुंडलाही गहिंवरली ।
म्हणे तुझी उदेली । हे भली दैवदशा ॥ २३ ॥
तूं नको करूं चिंता । धरी पतिच्या चित्तवृत्ता ।
मी तपा जातें आतां । म्हणोनी त्वरिता निघाली २४
ती हिमाचळीं येवून । राहिली तप करून ।
इकडे भार्येस घेऊन । अश्वारोहण करी नृप ॥ २५ ॥
तंव सैन्य घेऊन । पातालकेतु येऊन ।
पुढें बोले गर्जून । माझें स्त्रीरत्न नेसी चोरा ॥ २६ ॥
मी नसतां येऊन । माझे घरीं घुसोन ।
माझी स्त्री चोरून । घेऊन जासी चोरा रे ॥ २७ ॥
मी दैत्य प्रबळ । मला नेणसी तूं खळ ।
न लागतां एक पळ । तुझें कुळ संहारीन ॥ २८ ॥
राजा म्हणे चोर कोण । पोटा लागतां बाण ।
राखावया कीं प्राण । त्वां पलायन कां केलें ॥ २९ ॥
गंधर्वाची कन्या चोरून । आपण चोर होऊन ।
दुसऱ्याला चोर म्हणवून । बोलतां लाज़ न वाटे कीं॥
इणें मजसीं केलें स्वयंवर । याविषयीं साक्षीदार ।
असती ब्राह्मण वैश्वानर । तूं असूर काय करसी ३१

असें राजाचें वचन। ऐकतां दैत्य कोपून।
म्हणे युद्ध करून। माझें स्त्रीरत्न घेईन मी ॥ ३२ ॥
असें म्हणूनी भूपावर। सैन्य लोटी तो असुर।
रायें सोडूनी शर। जर्जर केलें तें सैन्य ॥ ३३ ॥
किती पडले किती मोडले। किती वीर घायाळ झाले।
कित्येक मेले मूर्च्छित झाले। किती पळाले जीव घेऊनी
सोडूनी तीक्ष्ण बाण। पातालकेतुचा शोषिला प्राण।
देऊनी दुष्टा शिक्षण। राजनंदन चालिला ॥ ३५ ॥
पातालकेतुचा सहोदर। तालकेतु नाम असुर।
सोडूनियां समर। लपूनी गेला पाताळीं ॥ ३६ ॥
मदालसेस घेऊन। अश्वावरी बसोन।
गालवाश्रमीं येऊन। वर्तमान सर्व सांगे ॥ ३७ ॥
गालव प्रसन्न होऊन। देई आशीर्वचन।
म्हणे आतां निर्विघ्न। सर्व यज्ञ होतील ॥ ३८ ॥
त्वां माझें केलें हित। आतां त्वां जावें स्वस्थ।
म्हणूनी तया बोळवीत। प्रेमभरित होऊनी ॥ ३९ ॥
पुत्र आला जय घेऊन। हें राजासी कळलें वर्तमान।
नगर अलंकृत करून। बळ घेऊन समोर ये ॥ ४० ॥
पाहोनी सुनेचें मुख। राजासी झाला हरिख।
सोडूनी विरहदुःख। महासुख पावला ॥ ४१ ॥
वाद्यगजरें करून। नगरीं पुत्र आणून।
कुवलयाश्व हें नांव ठेवून। वांटी धन विप्रांसी ॥४२॥

सर्वां झाला आनंद थोर । नागरिक करती जयजयकार।
नगरीं वाटली साखर । हर्षोद्गार न मावे ॥ ४३ ॥
मदालसेसहीत । नृपा वंदीतसे सुत ।
सविस्तर सांगे समस्त । राजा मात मानी ती॥ ४४॥
म्हणे देवलोकींचें कन्यारत्न । मिळालें न करितां यत्न।
हें भूमंडळीं नूत्न । आज एक नवल झालें ॥ ४५ ॥
असा राजा हृष्ट झाला । मदालसा गंधर्वबाला ।
पतिव्रता सुशीला । वागे धर्माला अनुसरूनी ॥ ४६ ॥
मानी पतीस देवता । धरी त्याच्या चित्तवृत्ता ।
प्रेम ठेवूनियां अश्रांता[1] । जीची शांतता न वर्णवे ४७
त्या परस्परांचें प्रेम । वाढलें असे निःसीम ।
तें केवळ निरुपम । चक्रवाकासम न म्हणवे ॥ ४८ ॥
असें असतां प्रेमभरित । वनीं एकला राजसुत ।
गेला मृगया हिंडत । तें जाणत शत्रु तो ॥ ४९ ॥
पातालकेतुचा सोदर । समोर झुंजाया मानी दर ।
परी राहे सादर । सहोदरऋण फेडावया ॥ ५० ॥
तो वनीं येतो असें देखून । मायेनें तपोवन ।
तेथें तत्काळ कल्पुन । मौनी होऊनी आपण बसे॥ ५१॥
जटाजूट बांधूनी । अंगीं भस्म चर्चूनी ।
हातीं गोमुखी घेऊनी । नासाग्रनयनीं जप करी ॥५२॥
जसा कंवडळाचा रंग । बाहेर दिसे चांग ।
जसें गोजिरें दिसे सोंग । अंतरंग नेणवे ॥ ५३ ॥

१ न थकतां, निरंतर.

तसा तो दैत्य कपटी। होऊनियां जटी।
राहे साधुसा मठीं। कपट पोटीं ठेवूनी ॥ ५४ ॥
राजा चालतां मार्गावर। आश्रम देखे मनोहर।
म्हणे कोण नवा ऋषेश्वर। करी सुंदर आश्रम हा॥५५॥
श्वापदें शांत फिरती। वैर नथे कोणाप्रती।
सर्व वृक्ष फळित दिसती। झरे वाहती सर्वत्र ॥ ५६ ॥
पाहावें आंत जाऊन। मुनीचें दर्शन घेऊन।
मग निघावें येथोन। असें म्हणून राजा आला॥५७॥
पाहूनियां मुनीतें। हर्ष झाला रायातें।
भावें वंदूनी तयातें। म्हणे मातें कृतार्थ केलें ॥ ५८ ॥
झालें आपुलें दर्शन। सफल झालें जीवन।
मला केलें पावन। कृपावलोकन करूनी ॥ ५९ ॥
म्हणोनी नमन करी। कपटी म्हणे त्या अवसरीं।
तूं या वनांतरीं। कोण कोठून आलास ॥ ६० ॥
तया म्हणे नृपसुत। जो राजा शत्रुजित।
कुवलयाश्व मी त्याचा सुत।मृगया करितां येथें पातलों॥
धन्य आजिचा सुदिन। झालें आपुलें दर्शन।
कपटी म्हणे एक सांगेन। तें वचन अवधारीं ॥ ६२ ॥
म्यां आरंभिला यज्ञ। नाहीं दक्षिणेसी धन।
दक्षिणेविण तामसयज्ञ[1]। असें प्राज्ञ बोलती ॥ ६३ ॥

---

१ विधिहीनमसृष्टान्नं मंत्रहीनमदक्षिणं। श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते ॥ १ ॥

राजा म्हणे नगरांत । मिळेल धन बहुत ।
मी बरोबर वनांत । धनरहित पातलों ॥ ६४ ॥
आपली आज्ञा झाल्यावरी । मी जाऊन नगरीं ।
द्रव्य आणीन निर्धारीं । कृतार्थ करी मजला तूं ॥६५॥
कपटी म्हणे तयास । कां करवावा सायास ।
मी निरपेक्ष त्वास । नाहीं सोस धनाचा ॥ ६६ ॥
तुझे गळां कंठी असे । ती मिळतां सर्व भागतसे ।
विशेष मी न मागतसें । तुज वाटतसें तसें करी॥६७॥
कुमार म्हणे काय शाश्वत । द्यावी कंठी हे निश्चित ।
असें म्हणोनी त्वरित । कंठी तया देतसे ॥ ६८ ॥
कंठी हातीं घेऊन । म्हणे मी शीघ्र जाऊन ।
वरुणाचें दर्शन । घेऊन येतों लवकर ॥ ६९ ॥
तंवर तूं येथें राहून । करी यज्ञाचें रक्षण ।
भूप तथास्तु म्हणून । तेथें बसून राहिला ॥ ७० ॥
कपटी नगरी जाऊन । मदालसेस बोलावून ।
राजाच्या सन्निधान । हाहाकार करूनी बोलत॥ ७१ ॥
कुवलयाश्व वनीं गेला । तें कळलें तालकेतुला ।
त्याला पाहूनी एकला । दैत्य आला युद्धार्थ ॥ ७२ ॥
म्हणे माझ्या बंधूस मारून । आलास नारी घेऊन ।
आतां करीन कदन । म्हणोन युद्ध आरंभिलें ॥ ७३ ॥
कुवलयाश्व पडला । दैत्य अश्व घेऊनी गेला ।
मी पातलों त्या काळाला । राजा मला बोलावी॥७४॥

मी त्याचे अंतकाळीं। गेलों त्याचे जवळी।
ही कंठी त्या वेळीं। देऊन बोलिला तें ऐक: ॥ ७६ ॥
ही कंठी मदालसेला। देई आश्वासन हें तिला।
असें सांगोनि तो मेला। तया जाळिला वनस्थानीं ॥
हें कळवावया तुम्हांसी। मी आलों त्वरेंसी।
पुनः जातों वनासी। कंठी तुम्हांसी देऊनी ॥ ७७ ॥
असें कपटी बोलूनी। कंठी तेथें ठेवूनी।
पुनः आला परतोनी। त्याच वनीं दुरात्मा ॥ ७८ ॥
पुत्रवार्ता ऐकोनी। राजा रडे भुंकोनी।
शिर घे आपटोनी। आठवून पुत्रगुण ॥ ७९ ॥
मदालसा धडफोडी। उंच स्वरें हंबरडी।
आतां थारा नसे ब्रह्मांडीं। अग्नींत उडी द्यावी ह्मणे॥
पतिचे गुण आठवून। ती रडे गळा फोडून।
ह्मणे मला सोडून। प्राणजीवन कोठें गेला ॥ ८१ ॥
मासा जसा जळावीण। तसी मी पतीवीण।
येथें आतां तडफडोन। मरोन जाईन सर्वथा ॥ ८२ ॥
काय करावें लावण्यसंपत्ती। काय करावे पत्ती[1] हत्ती।
प्राणेश्वर माझी गती। कासया संपत्ती विपत्ती हे ८३
पतीसवें साम्राज्य। पुत्रासवें धर्मराज्य।
इतरांसवें यमराज्य। जें प्राज्य कष्ट दे ॥ ८४ ॥
नको नको रांडपण। पदोपदीं जें दे शीण।
विरहदुःख दारुण। आतां तें कोण सोसील ॥ ८५ ॥

---

१ पायदळ.

आतां करावें सहगमन । तेणें कुळ होईल पावन ।
पतीशीं परलोकीं जाऊन । मी पावेन परमानंद ॥८६॥
असा निर्धार करोनी । चित्तीं पती आठवूनी ।
हातीं कंठी घेऊनी । अग्निप्रवेश केला तीणें ॥ ८७ ॥
तें पाहूनी सासरा । म्हणे आतां या असारा ।
देऊं सोडूनी संसारा । मी खरा अभागी ॥ ८८ ॥
ज्याची बाळपणीं मरे माता । तारुण्यीं मरे कांता ।
वृद्धपणीं मृति ये सुता । यापरता पापी नाहीं ॥८९॥
लेंक सून गेले मरून । आतां काय वांचून ।
मीही जाईन मरून । कासया जीवन दुःखरूप ॥ ९० ॥
पुत्राचे गुण सकळ । आठवूनि तो नृपाळ ।
फोडी आपुलें कपाळ । पडे व्याकुळ होऊनी ॥ ९१ ॥
इकडे कपटी आश्रमासी । येऊनी म्हणे रायासी ।
राजपुत्रा तूं धन्य होसी । उदार अससी महात्मा ९२
माझें त्वां कार्य केलें । मनोरथ सिद्ध झाले ।
सर्व हेतू पुरले । मन धालें माझें आतां ॥ ९३ ॥
तुझी इच्छा असेल तरी । तूं येथें निवास करी ।
राजा म्हणे त्या अवसरीं । आतां नगरीं जातों मी ९४
मी आलों एकला । येथें बहु विलंब लागला ।
आतां आज्ञा द्यावी मला । जाऊनि ताताला भेटेन ॥
कपटी म्हणे धन्य तूं । पुरविला माझा हेतू ।
आतां नगरा जा तूं । आशीर्वाद घेऊनी ॥ ९६ ॥
राजा कपट नेणून । तयाप्रती वंदून ।
सोडूनियां वन । निजभवन लक्षीतसे ॥९७॥

समोर ओरडती दिवाभीत । राजाचें चित्त झालें भीत ।
वामांग असे स्फुरत । म्हणे उत्पाद येतो कीं ॥ ९८ ॥
माझा पिता असो सुखी । म्हणोनी हरिनाम घे मुखीं
मार्गी चाले एकाकी । तो विवेकी राजपुत्र ॥ ९९ ॥
नगर तें शून्य दिसे । मार्गही घोळत नसे ।
कोठें उत्सव न होतसे । दुःख करितसे कुवलयाश्व१००
असा तो दुःख करीत । वेगें पातला राजवाड्यांत ।
तंव ऐकूनी आकांत । तेथें धांवत पातला ॥१०१॥
तातापुढें येऊन । धरी तयाचे चरण ।
तेणें पुत्रा पाहून । दृढ आलिंगन घेतलें ॥१०२॥
मनीं म्हणे हें काय । हा भूत होऊनी आला काय ।
किंवा हें स्वप्न होय । नकळे अभिप्राय यथार्थ ॥१०३॥
किंवा मद्दुःख जाणुनी । शंकरें दिधला परतोनी ।
किंवा कपटी आला कोणी । मुनी होउनी भलताची॥
जरी कपटी म्हणों मुनी । तरी कंठी आणिली कोठूनी
हा संशय माझे मनीं । होऊनी आश्चर्य वाटतें॥१०५॥
जरी हा खरा पुत्र । तरी याचें जळालें कलत्र ।
जें सतीरत्न पवित्र । तें दुःख कसें सांगावें ॥१०६॥
असा चिंतातुर तात । तयासी बोलतसे सुत ।
म्हणे बापा तुझें चित्त । कां दुःखित जाहलें ॥ १०७ ॥
राजा म्हणे सुता । तुझा वियोग होतां ।
दुःख झालें तें आतां । तुज पाहतां निवालें ॥ १०८ ॥

इति श्रीदत्तमाहात्म्ये षड्विंशोऽध्यायः ॥ २६ ॥

॥ श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

# अध्याय सत्ताविसावा

**श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥**

गुरु ह्मणे दीपकासी । कुलवयाश्व भेटला पितयासी ।
दुःग्व सांगावया तयासी । खेद रायासी वाटला ॥१॥
अंतरीं दुःग्वित जाणून । नृपा पुसे पुनः नंदन ।
ह्मणे ताता तुझें मन । वाटे ग्विन्न जाहलें ॥ २ ॥
कोणी तुझा अपमान । केला तरी दे सांगून ।
मी तोडीन त्याचा मान । अनुमान न करीन मी ॥३॥
किंवा दंडाई सोडावा । किंवा कोणा रक्षावा ।
दरिद्यासी धनिक करावा । अथवा लुटावा दुष्ट धनिक।
काय तुझ्या मनांतून । तें सांग उघड करून ।
मनीं नको अनुमान । बोलतों आण वाहूनी ॥ ५ ॥
माझी जी कां प्राणप्रिया । मदालसा गंधर्वतनया ।
तिला जरि कां दवडूनियां । दे ह्मणसी तरी देईन ॥६॥
नाम ऐकतां मदालसेचें । मन भ्यालें रायाचें ।
मुख पाहूनी तनयाचें । ह्मणे तीचें नाम कासया ॥७॥
हा हा पुत्रा तुझी कांता । तुझी ऐकोनी वाईट वार्ता।
गेली परलोकीं आतां । काय सुना सांगावें ॥ ८ ॥
हा ! हा ! मदालसे । त्वां पतिला सोडिलें कसें ।
नृपें दुःग्व करितां असें । पुत्र पुसे काय वार्ता ॥ ९ ॥
मग नेत्र पुसोनियां । ह्मणे नृप ऐक तनया ।
तूं वनीं गेलिया । आला या सदनीं तापसी ॥१०॥

जटाजूट महामुनी । शोकें आक्रंदोनी ।
कंठी पुढें ठेवूनी । वर्तमान विपरीत बोलिला ॥११॥
तें ऐकतां ते वेळीं । तत्काळ गंधर्वाची बाळी ।
पेटवूनी ज्वाळामाळी । जाळी आत्मा कंठीसह ॥१२॥
हा घडला अनर्थ । सून माझी जळाली व्यर्थ ।
मुनी कोण किमर्थ । आला यथार्थ न कळलें तें ॥ १३ ॥
राजपुत्र ह्मणे ताता । मी एकला वनीं जातां ।
मुनीचा आश्रम देखिला होता । तेथें होता मुनी एक॥
त्यानें दक्षिणेसाठीं । मागीतली माझी कंठी ।
म्यां तो न ओळखिला कपटी । दिधली कंठी तयासी॥
त्यानें हा अनर्थ केला । आतां म्यां ओळखिला ।
पूर्वी जो म्यां उपेक्षिला । तालकेतू दैत्य जो ॥१६॥
जो पराक्रमी पुरुष । तेणें शत्रू मारावे निःशेष ।
अग्निशेष ऋणशेष । शत्रूशेष न राखावा ॥१७॥
हें वचन सत्य कळलें । माझें कुटुंब जळालें ।
आतां हें दुःख झालें । मन पोळलें विरहाग्नीनें ॥१८॥
आतां तिच्या ऋणापासून । मुक्त व्हाया संकल्प करीन
या जन्मीं तिचे वांचून । न भोगिन इतर नारी ॥१९॥
जो पांघुरे शालजोडी । त्याला देतां घोंगडी ।
तिची ठेवील कीं आवडी । तेवी न गोडी इतर
स्त्रियांची ॥ २० ॥
असा संकल्प करून । मग होई उदासीन ।
म्हणोनी नगर सोडून । वनीं जाऊन वसतसे ॥ २१ ॥

अश्वतरनागाचे सुत। दैवें तेथे आले फिरत।
दिसती जेवी वानप्रस्थ। राजसुत तयां वंदी ॥२२॥
ते म्हणती रायासी। आम्ही आलों क्रीडेसी।
तूं सात्विक दिससी। तुजशीं सख्य करूं आम्ही २३
ऐकूनी तयांचें वचन। बोलतसे राजनंदन।
म्हणे होतां तुमचें दर्शन। मी पावन जाहलों॥ २४ ॥
जरी सख्य कराल। तरी आमुचें कुल।
सर्वही उद्धरेल। हें नवल नोहेची ॥ २५ ॥
दृष्टी पडतां साधूची। होळी होई पापाची।
मग कैंची वार्ता तापाची। नलगे मोक्षाची गरज २६
मग ते त्याचे मित्र होती। त्या स्थानासी नित्य येती।
यथेच्छ क्रीडा करिती। पुनः जाती अस्तमानीं ॥२७॥
बुद्धीनें बृहस्पतिसमान। विक्रमें इंद्रासमान।
स्वरूपें कामासमान। नृपनंदन त्यां मानला ॥२८॥
ते तापससुत मानून। राजा रमे अनुदिन।
राजाला तयांवांचून। न पडे चैन घडीभरी ॥ २९ ॥
एके दिवशीं नागसुत। राजाचे नेत्र आरक्त।
पाहूनी विनोद करीत। प्रेमभरित बोलती ॥३०॥
आजी वहिनीनें जागर। करविला वाटतो फार।
म्हणोनी आरक्त नेत्र। दिसती आम्हां वाटतें ॥३१॥
ऐकोनी त्याचें वचन। शोक करी राजनंदन।
म्हणे ही वार्ता सोडून। करा क्रीडन यथेच्छ ॥३२॥

मग ते दुःखित होऊनी । म्हणती आम्हां लागुनी ।
ही वार्ता विस्तारूनी । यथार्थ सांगावी ॥ ३३ ॥
जें होई दुःख । त्याचा भाग मित्र एक ।
घेतो सांगूनी विवेक । जेणें शोक नष्ट होतो ॥ ३४ ॥
मग रायें सर्व कथिलें । नागांच्या मना दुःख झालें ।
ते उठोनी चालिले । दुःखें पातले निजसदना ॥ ३५ ॥
मित्रदुःखा आठवूनी । तेही दुःखी होऊनी ।
एकांतीं जाऊनी । भोग सोडूनी बैसले ॥ ३६ ॥
त्यांचें म्लान मुख झालें । मग पिता तयां बोले ।
तुम्हां काय दुःख झालें । कोणी दुखविलें मन तुमचें ॥
तयाप्रती सांगती सुत । सोमवंशीं शत्रुजित ।
कुवलयाश्व त्याचा सुत । तो सुहृत आमुचा ॥ ३८ ॥
त्याला झालें दुःख । म्हणोनी वाळलें आमुचें मुख ।
मना केवी होईल सुख । मित्रदुःख पहात ॥ ३९ ॥
नाग म्हणे सुतांसी । दुःख काय झालें त्यासी ।
तें सांगा आम्हांसी । त्यासी उपाय करवेल ॥ ४० ॥
मित्रानें मित्रावर । अवश्य करावा उपकार ।
अत एव कळता सविस्तर । करूं प्रतिकार तयाचा ४१
ऐकोनी नागाचें वचन । बोलती ते नंदन ।
मदालसा म्हणोन । त्याची पत्नी होती एक ॥ ४२ ॥
ती होती योगिमान्या । ती गंधर्वाची कन्या ।
येथें तत्समान अन्या । नसे कन्या ब्रह्मांडीं ॥ ४३ ॥

वनीं जातां राजनंदन। मागें कपटी दैत्य येऊन।
तुझा भर्ता मेला म्हणून। सांगून गेला वनांतरीं ४४
ऐकतां तें वचन। अग्निप्रवेश करून।
ती गेली जळून। म्हणोन राजा खिन्न झाला ॥ ४५ ॥
मी दुसरी न भोगिन अबला। हा संकल्प तेणें केला।
तो विरहदुःखें पीडला। तें आम्हांला न सोसवे॥४६॥
आत्मा सर्वेंद्रियनिधान।तो पूर्वीं भोग भोगून।
मग पावे समाधान। नातरी हो निदान दुःखाचें॥४७॥
कार्य हें मित्राचें। अशक्य बोलतां वाचें।
समाधान तयाचें। आमुचे हातीं नोहे ॥ ४८ ॥
मग नाग बोले वचन। मी प्रयत्न करीन।
तुमच्या मित्राचें मन। प्रसन्न करीन सर्वथा ॥ ४९ ॥
असी प्रतिज्ञा करून। कंबलनागा घेऊन।
हिमाचळीं येऊन। करी अनुष्ठान अश्वतर ॥ ५० ॥
जें तीर्थ प्लक्षावरण[1]। तेथें आसन देऊन।
प्राणायाम करून। करी अनुष्ठान श्वेताश्वतर ॥ ५१ ॥
आहारही जिंकून। घालूनियां दृढासन।
मन एकाग्र करून। करी ध्यान सरस्वतीचें ॥ ५२ ॥
म्हणे बालवाक्यापरी। हे स्तुती अवधारी।
समुद्रा देती जेवी वारी। तयापरी हे स्तुती ॥ ५३ ॥
समुद्राचें जीवन। समुद्रा देतां दान।
किंवा सूर्या दिवा दावून। करिती निराजन[2] तद्वत हें॥

१ पायीर पिंपरी. २ शोभा आणणें, प्रकाशित करणें.

तूं जसी देसी स्फूर्ती । तसी घडेल तुझी स्तुती ।
तूं असती भारती । सरस्वती प्रख्यात ॥ ५५ ॥
जें हें दिसतें जग । तें सर्व तुझें अंग ।
मी भिन्न कसा मग । हें सांग तूं माते ॥ ५६ ॥
जड जग तो क्षर । भोक्ता जीव तो अक्षर ।
तूं सोडूनी क्षराक्षर । असती परसाक्षित्वें ॥ ५७ ॥
जलावर बुद्बुद जसे । त्वद्रुपीं जीव तसे ।
जीवेश्वर हा भेद भासे । उपाधिवशें त्वद्रूपीं ॥ ५८ ॥
तूं ओंकाररूपिणी । तीनी गुणांची स्वामिनी ।
तूं अर्ध मात्रा होऊनी । विकार सोडूनी राहसी ॥ ५९ ॥
यज्ञ[1]संस्था सात । सोमसंस्था सात ।
पाकसंस्था सात । हीं होत तुझीं अंगें ॥ ६० ॥
तुझ्या वांचूनी नोहे याग । तूंच देसी सर्व भोग ।
करूनी स्वरवर्णसंग । व्यवहार सांग चालविसी ॥ ६१ ॥
तूं सर्वां प्रकाश करिसी । तूं सर्व विद्या देशी ।
तूं कारण सर्वांसी । तूं आम्हांसी आधार ॥ ६२ ॥
जें सर्वव्यापक । तें तुझें रूप एक ।
जो तुझा परम सेवक । तो एक जाणें तें ॥ ६३ ॥
जे भोग इहलोकीं । अथवा असती परलोकीं ।
ते सोडूनी पुरुष विवेकी । अंतरीं विलोकी त्वद्रूपा ६४

१ यज्ञाचे प्रकार.

पद ॥ ( चाल सद्गुरुची कोठवरी ॥ )

देवो मती जी सद्गती ती सरस्वती ।
श्रुति गाती जीचि कीर्ति तीच भारती ॥ ध्रु० ॥ ६५ ॥
चिन्मय तूं वाङ्मय तूं. अससी भारती। करविसि
तूं वदविसि तूं तूं जगद्गती ॥ ६६ ॥
ये धावुनी स्तुति परिसुनी भो सरस्वती । मति देवुनि
जाडय हरुनि तारि भारती ॥ ( ओवी ) ॥ ६७ ॥

अशी स्तुती ऐकून । सरस्वती झाली प्रसन्न ।
येई स्वरूप प्रगटून । म्हणे वरदान घे नागा ॥ ६८ ॥
नाग पाहे नेत्र उघडून । तंव हंसावरी बसोन ।
वीणा वरदंड माळा धरून । चतुर्भुज होऊन पुढें दिसे॥
श्वेतवस्त्र नेसली । श्वेतकमळीं बैसली ।
श्वेतांगी पाहिली । सरस्वती माउली नागानें ॥ ७० ॥
नाग तीस वंदून । म्हणे झालीस प्रसन्न ।
जरी देसी वरदान । तरी गानशक्ति दे ॥ ७१ ॥
माते देई मजला । आणि ह्या कंबला ।
उत्तमोत्तम गायनकला । कोमलालापांसहित ॥ ७२ ॥
गावूं यावें सुस्वर । कोमल मंजुल मधुर ।
जेणें प्रसन्न होय हर । देईल वर अभीष्ट ॥ ७३ ॥
सरस्वती म्हणे नागा । उठविसील सांग रागा ।
गाणें ऐकतांच भुजगा । भुजगाभरण वर देईल॥ ७४ ॥
तुह्मां दिलें नादरहस्य । ऐकतां शंभु सोडून लास्य ।
हर्षें करील हास्य । वरतें आस्य[1] करूनी ॥ ७५ ॥

---

१ तोंड.

असा वर देऊन । ती गेली गुप्त होऊन ।
दोघे नाग मग येऊन । कैलासोपवनप्रांतीं गाती ॥७६॥
गाणें ज्यांचें सुस्वर । रागरागिणी मधुर ।
ताल काल साधती सुंदर । लय बरोबर करूनी ॥७७॥
आलाप करिती मंजुळ । ध्वनी वाटे कोमळ ।
असे गाती विमळ । वाद्यांचा मेळ जमवूनी ॥ ७८ ॥
तंत्रीं लया योजुनी । तीनी काळ साधूनी ।
असें गातां नागांनीं । शंभूच्या कानीं तें भरे ॥ ७९ ॥
हृदयीं गाणें खोंचलें । शिवाचें चित्त प्रसन्न झालें ।
तेथें येऊन डोले । मग बोले भोळानाथ ॥ ८० ॥
अहो हो शाबास शाबास । गोड लागलें हें कानास ।
खोंचलें माझ्या मनास । गाणें तुमचें सुरस ॥ ८१ ॥
सर्वां हरी म्हणोनी हर । तो गाण्यानें वेधिला हर ।
हो हो करूनी सादर । परिसतां शंकर तोषला ॥८२॥
म्हणे आतां अश्वतरा । तुला देतों अभीष्टवरा ।
तूं माझ्या अंतरा । केला बरा आनंद ॥ ८३ ॥
नाग पाहती नेत्र उघडूनी । तंव नंदीवरी बसूनी ।
वामांगी पार्वती घेऊनी । हास्यवदनी राहिला ॥ ८४ ॥
सोमसूर्याग्निलोचन । गौरवर्ण पंचवदन ।
सर्वायुधें घेऊन । कृत्तिवसन शोभतसे ॥ ८५ ॥
भाळीं अर्धचंद्र भासे । शिरीं गंगा वाहतसे ।
नीलकंठ शोभतसे । शिव दिसे सर्पभूषित ॥ ८६ ॥

१ आकर्षण करितो सर्वांस मारतो म्हणून हर म्हणतात. २ हत्तीचे चर्मवाला.

असें रूप पाहून । नाग करिती वंदन ।
जरी होसी प्रसन्न । तरी वरदान दे आतां ॥ ८७ ॥
कुवलयाश्वाची सती । मदालसा नामें होती ।
दैत्यांनीं फसवितां ती । अग्नीमध्यें देह सोडी ॥ ८८ ॥
ती व्हावी माझी दुहिता । रूपाकारबुद्धी न सोडितां ।
धरूनी पूर्वशीलवृत्ता । पतिव्रता ब्रह्मवादिनी ॥८९॥
व्हावी योगिनी योगमाता । क्षमाशांतिगुणीं भूषिता ।
ब्रह्मनिष्ठा पतिव्रता । माझी सुता व्हावी ती ॥ ९० ॥
जरी हें इतरा दुष्कर । तरी तें प्रभो तुम्हा सुकर ।
मी याहून इतर । न वरी वर स्मरहरा ॥ ९१ ॥
ऐकोनी नागवचन । म्हणे शिव सुप्रसन्न ।
तसेंच दिधलें वरदान । अनुमान न होई ॥ ९२ ॥
तूं घरीं जाऊन । करी श्राद्धविधान ।
मध्यम पिंड घेऊन । दे पत्नीला भक्षावया ॥ ९३ ॥
तिच्या स्वरूपा चिंतून । करितां पिंड प्राशन ।
तत्काळ ती प्रगटून । दिसेल श्वसनमार्गानें ॥९४॥
असें म्हणूनी हर । गुप्त होई सत्वर ।
नाग करूनी नमस्कार । जाती रसातलासी ॥ ९५ ॥
निजपुरीं जाऊन । विधिनें श्राद्ध करून ।
श्रीशंकरा वंदून । पिंडाचें भक्षण करविलें ॥ ९६ ॥
ऐकिलें रूप जसें । ध्यानीं आणून तसें ।
श्रद्धेनें पिंड भक्षीतसे । नागपत्नी ते वेळा ॥ ९७ ॥

पिंड भक्षिल्यावर । श्वास चालती अपार ।
मग श्वासाबरोबर । बाहेर एक गोळा पडला ॥ ९८ ॥
तो तेजःपुंज दिसे । पाहतां तें शरीर भासे ।
मदालसेचें रूप जसें । तसेंच तें वाटलें ॥ ९९ ॥
पूर्वी दिसे अंगुष्ठाकार । जातां जातां क्षणांतर ।
तें होई थोर थोर । क्रमानें शीघ्र पूर्ववत ॥ १०० ॥
तीचि बुद्धि तोच आकार । तेंच रूप तोचि वर्णस्वर ।
घेवूनी प्रगटे सत्वर । घे बरोबर तीच स्मृति ॥१०१॥
देह केला दहन । हें नसे तिला स्मरण ।
आठवूनी पतीचें स्मरण । आपटी चरण दुःखानें १०२
म्हणे हा हा प्राणनाथा । मज कां सोडतां वृथा ।
चरणीं ठेवितें माथा । अपराध आतां क्षमा करा १०३
शीघ्र तुम्ही येऊन । मला द्या आपुलें दर्शन ।
नातरी कंठीं घेऊन । अग्निप्रवेश करीन मी ॥ १०४ ॥
असा आलाप करूनी । अग्निप्रवेश करीन म्हणूनी ।
उठली मदालसा योगिनी । नाग मनीं थक्क झाला ॥
म्हणे दहनाचें स्मरण । इला नसे म्हणून ।
करावया सहगमन । सिद्ध झाली निश्चित ॥ १०६ ॥
असें म्हणूनी समाधान । करूनी तिला घेऊन ।
अंतःपुरांत ठेवून । करी रक्षण नानापरी ॥ १०७ ॥

इति श्रीदत्तमाहात्म्ये सप्तविंशोऽध्यायः ॥ २७ ॥

॥ श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

# अध्याय अठ्ठाविसावा

श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

गुरु म्हणे शिष्यासी । असी मदालसेसी ।
मिळवूनि नागपुत्रांसी । म्हणे रायासी घेऊनिया ॥१॥
युक्तीनें या स्थानीं । यावें भूपा घेवूनी ।
येथील वर्तमान तयालागूनी । पूर्वीं न सांगोनी ल्यावें हें
त्याचे दर्शनाची लालसा । असे आणि मदालसा ।
तया द्यावी निरालसा । झाला काल सानुकूल ॥ ३ ॥
मग ते नागसुत । तापसवेषें भूपाप्रत ।
जाऊनियां सांगत । तुम्हां तात बोलावीतसे ॥ ४ ॥
आमच्या आश्रमा जाऊन । ताता द्यावें दर्शन ।
सवें येऊं परतोन । आतां अनुमान न करावा ॥ ५ ॥
असें मित्रांचें वचन । ऐकोनी नृपनंदन ।
तया तथास्तु म्हणून । प्रेमें उठोनी चालिला ॥ ६ ॥
नृप म्हणे मित्रांसी । न तोडवे प्रीतीसी ।
म्हणूनी तुमच्या आश्रमासी । निश्चयेंसी जाऊं या ७
ददाति प्रतिगृह्णाति । गुह्यमाख्याति पृच्छति ।
भुंक्ते भोजयते चैव । षड्विधं प्रीतिलक्षणं ॥ ८ ॥
हें प्रीतिलक्षण । मी मनीं आणून ।
आतां आलों उठोन । असें म्हणोन चालती ॥ ९ ॥
येऊनी गोमतीतीरीं । नृपा धरती ते करीं ।
नेऊं इच्छिती जलांतरीं । नृप अंतरीं चमकला ॥१०॥

हे वानप्रस्थाचे सुत । नृप तोंवरी मानीत ।
साशंक होऊनी राजसुत । ह्मणे इत्थंभूत सांगा आधीं
ते हसोनी बोलती मग । पाताळीं जो कंबलनाग ।
ईश्वरीं ज्याचा अनुराग[1] । सर्वयोग जाणे जो ॥१२॥
त्याचे आम्ही सुत । तुला नेऊं पाताळांत ।
भीति न आणी मनांत । घडेल तातदर्शन ॥ १३ ॥
असें तया सांगोन । योगप्रभावें करून ।
तया पाताळीं नेऊन । पितृदर्शन करविती ॥ १४ ॥
पाहून पाताळरचना । पाहूनी दिव्यभवना ।
घेऊनी नागाच्या दर्शना । ह्मणे स्वर्गभुवना आलों कीं
सुत ह्मणती नागासी । आणिलें ह्या मित्रासी ।
अश्वतर म्हणे रायासी । माझ्या इच्छेसी पूर्ण केलें १६
म्हणोनी दे आलिंगन । त्याचें मस्तक हुंगोन ।
देई आशीर्वचन । सुखें जीवन होवो तुझें ॥ १७ ॥
राजा म्हणे तयासी । हें अपूर्व दर्शन आम्हांसी ।
माझ्या धन्यपणासी । बोलतां वाचेसी शक्ती नसे १८
मित्रयोगें करून । ह्या पाताळीं येऊन ।
घेतलें आपुलें दर्शन । झालों पावन आज मी ॥ १९ ॥
मातीकरितां खाणितां । जेवी निधान ये हातां ।
तेवी झालें हे आतां । कृतार्थता काय बोलूं ॥ २० ॥
नाग म्हणे तुझें दर्शन । व्हावें म्हणूनी माझें मन ।
उत्सुक होतें बहुदिन । आजी समाधान वाटलें ॥२१॥

१ भक्ति, प्रीति.

पुत्रांनीं जे जे तुझे गुण । केले होते निरूपण ।
ते ते दिसती पूर्ण । सर्वगुणसंपन्न तूं ॥ २२ ॥
जो मागसी वर । तो देईन सत्वर ।
तया म्हणे नृपकुमार । असो मजवर कृपादृष्टी ॥२३॥
तुमच्या प्रसादे करून । नगरीं सर्व असे पूर्ण ।
धर्मी राहो माझें मन । पितृसेवन घडावें ॥२४॥
नाग ह्मणे तूं धार्मिक । अससीं पितृसेवक ।
तुला मानिती लोक । उभयलोक घेसील तूं ॥ २५ ॥
जें इष्ट असे मानसीं । तें माग मजपासीं ।
मग राजा लाजोनी मानसीं । मित्रमुखासी विलोकी ॥
मग ते ह्मणती नागासी । मदालसेवांचून मानसीं ।
इष्टपदार्थ दिवानिशी । प्रिय यासी न वाटे ॥ २७ ॥
नाग म्हणे ती जळाली । जरी तीची इच्छा झाली ।
मायेची करूनी बाहुली । दावितों आतां सत्वर ॥२८॥
असें तया सांगून । मदालसेसी आणून ।
नाग दावी दूरोन । राजा पाहून भुलला ॥२९॥
अहा प्रिये ह्मणून । राजा जाई धावून ।
नाग तया सांवरून । म्हणे भुलोन जाऊं नको ॥३०॥
हे म्यां केली मायेची नारी । माया पाहणें तरी ।
पहावी राहून दूरी । न दिसे करीं धरितां ती ॥३१॥
तूं असूनी विचारशील । कां मायेशी घेसी भूल ।
माया असे चंचल । होई तत्काल अदृश्य ॥ ३२ ॥

असें नाग सांगे तरी । तो व्याकुळ झाला अंतरीं ।
ह्मणे प्रियेला धरीन करीं । न करि विघ्न तूं आतां ३३
मग वल्लभे म्हणून । पडला तो राजनंदन ।
नाग तया उठवून । ह्मणे मन सांवरी ॥ ३४ ॥
ही तुझी मदालसा । शिवाचा हा प्रसाद असा ।
ह्मणोनी दाविली मदालसा । ह्मणे सुखी असावें तुह्मीं॥
मग नाग संतोषून । विधीनें देई कन्यादान ।
अमूल्य रत्नाभरण । देऊनी नृपनंदन गौरविला ॥३६॥
अनुग्रह सरस्वतीचा । प्रसाद श्रीशंकराचा ।
सांगोनी नाग म्हणे आमुचा । हेतू पूर्ण जाहला ॥३७॥
असें नाग बोलूनी । कांहीं काल राहवोनी ।
त्यांची करी बोळवणी । पुण्यखाणी अश्वतर ॥ ३८ ॥
राजा म्हणे हा उपकार । यासी नसे प्रत्युपकार ।
याचा पडतां विसर । कृतघ्नत्व येईल ॥ ३९ ॥
स्वल्पमप्युपकारं यो न वेत्ति मनुजाधामः । कृतघ्नः
स तु विज्ञेयो ब्रह्मघ्नादतिरिच्यते ॥ ४१ ॥
असें राजा बोलून । पत्नीसह अमृतपान ।
तेथें राजा करून । नागां वंदून चालिला ॥ ४१ ॥
सवें घेऊनी मित्र दोन । पत्नीसह नृपनंदन ।
पुरासमीप येऊन । कळवी वर्तमान पितयासीं ॥४२॥
ऐकतां राजा हर्षला । पौरांसह चालिला ।
त्वरें येऊन भेटला । म्हणे आला पुत्र सत्य ॥ ४३ ॥

पाहुनी मदालसेसी । आश्चर्य वाटलें सर्वांसी ।
म्हणती पुनः ही आली कसी । जशीच्या तसी मागुती
रूप तेंची वय तेंची । आकार तोची शब्द तोची ।
भासतो स्वभाव तोची । आश्चर्य हेंचि वाटतें ॥ ४५ ॥
राजा म्हणे जी जळाली । ती मागुती कैसी आली ।
हे कोठें मिळाली । किंवा बाहुली मायेची ॥ ४६ ॥
असें राजा म्हणोन । पुत्रा देई आलिंगन ।
प्रेमाश्रु टाकून । कंठ भरून रडतसे ॥ ४७ ॥
म्हणे पुत्रा तूं धन्य । तुझें अपार पुण्य ।
तूंची होसी लोकमान्य । नसे अन्य तुजसमान ॥४८॥
देवाची कन्या वरिली । ती दैवें नष्ट झाली ।
पुनः तीच मिळविली । कीर्ती ही भली पसरेल ॥४९॥
सर्व पौरलोक येती । मदालसेसी पाहती ।
त्यांच्या हर्षा नाहीं मिती । ह्मणती ईश्वर पावला ५०
सर्व नगर शोभविलें । ध्वज उंच उभारिले ।
मार्गीं चंदनाचे सडे दिधले । समोर आले सर्वजण ५१
भेरी दुंदुभी वाजती । कन्या लाह्या टाकिती ।
पुष्पांचे वर्षाव करिती । प्रेमें नृपती सुतावरी ॥५२॥
असा उत्सवें नगरीं । राजपुत्र प्रवेश करी ।
सर्वांचे सत्कार करी । हर्ष अंतरीं पावूनी ॥ ५३ ॥
करी पित्यासी नमस्कार । प्रेमें तो राजकुमार ।
सांगे मित्राचा उपकार । म्हणे उदार हे नाग ॥५४॥

दुःखें वास करितां वनीं । नागपुत्रांनीं मैत्री करूनी ।
माझें दुःख जाणूनी । पितया जाऊन कळविलें ॥५५॥
तत्पिता अश्वतर । तप करी हिमाचळीं घोर ।
सरस्वती आणि शंकर । ह्यांपासून वर संपादिला ५६
ज्या वरें करून । मदालसा झाली उत्पन्न ।
ती मला दिली दान । नागानें मानपुरःसर ॥ ५७ ॥
असें तें पुत्राचें वचन । साद्यंत ऐकोन ।
म्हणे हें नवल पूर्ण । माझें मन हृष्ट झालें ॥ ५८ ॥
पूर्वीं दक्षकन्या होऊन । सती शिवाला वरून ।
दक्षयागीं जळून । पर्वतापासून पुनः झाली ॥ ५९ ॥
पुनरपि ती पार्वती । शिवाला करी पती ।
तेवी हे मदालसा सती । पुनः पती तोच करी ॥६०॥
धन्य ईचें तपोबल । उद्धरिलें आमुचें कुळ ।
इचें पाहतां शीळ । गंगाजळसम वाटे ॥ ६१ ॥
असें राजा बोलूनी । मनीं आनंद पावूनी ।
म्हणे मी वृद्ध होऊनी । नृपासनीं अयोग्य झालों ६२
कुवलयाश्वा तूं विनीत । अससी औरस सुत ।
आतां राज्य करी निश्चित । मी वनांत जाईन ॥ ६३ ॥
क्षत्रियांचा हा धर्म । येणें सफळ होय कर्म ।
मिळवावें मोक्ष शर्म । आतां नर्म कासया ॥ ६४ ॥
असें पुत्रा सांगोन । सामग्री मिळवून ।
राज्यीं पुत्रा अभिषेकून । नृप समाधान पावला॥६५॥

राजा वनीं जाऊन। संपादूनी साधन।
मिळवूनीयां ज्ञान। घे निर्वाण शाश्वत ॥ ६६ ॥
कुवलयाश्व राज्य करी। अधर्माते न करी।
प्रजा पाळी पुत्रापरी। राजी सर्व प्रजा ज्याला ॥६७॥
शिववरें करूनी। मदालसा ब्रह्मवादिनी।
आत्मनिष्ठ होऊनी। राहे सदनीं अनासक्त ॥ ६८ ॥
जीचें न लोपलें पूर्व स्मरण। शिवप्रसादें झालें ज्ञान।
तथापि पतीच्या चित्ता धरून। करी आचरण लोक-
संग्रहार्थ ॥ ६९ ॥
(अंजनीगीत) । ऋतुध्वज राज्य करी।
तया मदालसा नारी। संभोग दे स्वयें जरी। ब्रह्मनिष्ठा॥
दैवें तिला पुत्र झाला। उपजतां सांगे त्याला।
कां रडसी तूं कोणाला। आतां व्यर्थ ॥ ७१ ॥
जातां मार्गें भूल घेसी। म्हणूनी या चौऱ्याऐंशी।
योनी कष्टें धुंडिल्यासी। निजकर्मे ॥ ७२ ॥
करितासी देवध्यान। तप्तलोहस्त्र्यालिंगन।
न येतें रे पोरा मन। सांवरीं हें ॥ ७३ ॥
वैराग्यानें खातां भीक। तोंडीं येतां न नरक।
रूपा न भुलतां आंख। न फुटते ॥ ७४ ॥
नानायोनी त्वां धुंडितां। तेथें मार्ग न ये हातां।
मार्गावरी तूं रे आतां। पातलासी ॥ ७५ ॥
नको रडूं उगी राहे। बुडसील मिथ्या मोहें।
तुझा मार्ग तूंच पाहे। विचारानें ॥ ७६ ॥

जन्ममरणा रडसी। तरी त्याच्या संबंधासी।
कदापी तूं न शिवसी। निर्विकार ॥ ७७ ॥
जो मातेच्या विटाळांत। भेटतां रक्तरेत।
विष्ठामूत्रीं झाला मूर्त। तो तूं कसा ॥ ७८ ॥
हाडामांसाच्या देहासी। मूर्खपणें भूललासी।
त्याच्या योगें संबंधासी। घेसी व्यर्थ ॥ ७९ ॥
कोण माता कोण पिता। कोण तुझी कांता सुता।
अविचारें ही ममता। कां धरीसी ॥ ८० ॥
हाडामांसावरी कात। विष्ठा मूत्र त्याचे आंत।
त्याला मी मी ऐसी भ्रांत। येऊं न दे ॥ ८१ ॥
जड प्राण रजोगुणी। कर्मेंद्रियां कवळूनी।
खातो पितो हे त्याहूनी। तूं वेगळा ॥ ८२ ॥
ज्ञानेंद्रियांची मेळणी। मन पळे क्षणोक्षणीं।
त्याचा साक्षी तूं त्याहूनी। निश्चळ रे ॥ ८३ ॥
ज्ञानेंद्रिया आंत धरी। मी कर्ता हा गर्व करी।
निज उठे ती रे दूरी। बुद्धी तुला ॥ ८४ ॥
प्रियमोदप्रमोदानें। जो भासे त्या आनंदानें।
न घे भोक्तृत्वाला ध्यानें। पाहे स्वात्मा ॥ ८५ ॥
असें जरी हें करसी। तरी बारे न फससी।
नाहीं तरी फेरी घेसी। ऐसी पुनः ॥ ८६ ॥
तीनी देहांचा मी साक्षी। तीनी अवस्था निरीक्षी।
निरंतर असें लक्षी। व्यापकत्वें ॥ ८७ ॥

असा रोज वारंवार। माय करी बोध फार।
द्वैतवार्ता करी दूर। कळवळे कळकळीने ॥ ८८ ॥
(ओवी) । पुत्रा देई दुग्धपान। प्राण वांचावा म्हणून।
गाण्याचें मिष करून। वेदांतनिरुपण करीतसे ॥८९॥
माता म्हणे सुतासी। प्रमादें[1] मृत्यु सहवासी।
असें म्हणूनी कीं जरी रडसी। तरी तुजशी न शिवेल तो
तूं उताणा राहूनी। कां रडशी आक्रोशोनी।
काय उपयोग रडूनी। आतां हें मनीं विचारी तूं ९१
तूं शुद्ध असती। तुला दुःखवार्ता कसी।
जरी रडसी देहासी। कासया अशुद्धासी रडावें ९२
देह असे जायाचा। तो ग्वचीत जायाचा।
स्नेह सोडून जायाचा। इजा याच्या अभिमानें ये ९३
तूं असोनी असंग। तुला ये कीं देहाचा संग।
देहनाशें तुझा न भंग। रडावें कां मग देहासी॥९४॥
विश्वाचा जनक। तुझे पोटीं सर्व लोक।
तूं कोणाचा कसा लेंक। मानिसी दुःख अविचारें हें॥
पंचभूतांचा समूह। अन्नमय हा देह।
हा दुःखशोकावह। महामोहगेह हें कीं ॥ ९६ ॥
हा प्रत्यक्ष दिसतसे। हा तों अत्यंत जड असे।
त्याला चैतन्य म्हणावें कसें। नश्वर असे हा खास ९७
तूं म्हणसी हा वाढतो। सुखदुःखा जाणतो।
शीतोष्णादि ओळखतो। मग तो कसा जड ॥ ९८ ॥

१. अवधान नसणें, नजरचूक.

तरी ऐक विशद । जें ब्रह्म सच्चिदानंद ।
तें न घटे न वाढे निर्विवाद । तें आनंदकंद सदा असे॥
इटा डाळता[1] भिंत । असे जशी वाढत ।
तसा अन्नानें हा वाढत । असे सच्चिदनुग्रहें ॥ १०० ॥
जो सुखदुःखसाक्षात्कार । तो मनाचा व्यापार ।
मन व्यापी शरीर । सुखदुःखाचा विचार तयासी ॥
तेंही जड असून । चैतन्याभासयुक्त होऊन ।
सुखी दुःखी भासे हेंही अज्ञान । ज्ञानशक्ति ब्रह्माची॥
मनोद्वारा त्वगिंद्रिया । व्यापितां त्या आत्मया ।
शीतोष्णादि निश्चया । करवे अन्या नोहे हें ॥ १०३ ॥
माझा देह म्हणसी । मग तूं देह कसा होसी ।
तूं असंग अससी । तुझी या देहासी व्याप्ति ।
कशी बोल बरें ॥ १०४ ॥
अध्यासानें हा भ्रम घेसी । अहंता ममता वागविशी।
यामुळें व्यर्थ फससी । तरी भ्रमासी दूर करी ॥१०५॥
तूं अससी अत्यंत शुद्ध । चैतन्यरूपीं प्रबुद्ध ।
रक्तमांसात्मक देह अशुद्ध । जाण तूं ॥ १०६ ॥
असा बोध वारंवार । माता करी निरंतर ।
द्वैतवार्ता कानावर । येवूं नेदी सर्वथा ॥ १०७ ॥
इति श्रीदत्तमाहात्म्ये अष्टाविंशोऽध्यायः ॥ २८ ॥
॥ श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

[1] रचितां.

# अध्याय एकोणतिसावा

श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

गुरु म्हणे शिष्यासी । असी माता सुतासी ।
बोध करी तों पितयासी । दासी सांगती पुत्र झाला॥
तें ऐकोन राव । करी पुत्रजन्मोत्सव ।
मिळवोनी द्विजपुंगव । ते म्हणती भाव बरे असती ॥
राजा करी जातकर्म । बरवा करी दानधर्म ।
तया विक्रांतवर्म । असें नाम ठेवी राव ॥ ३ ॥
नाम ठेवितां असें । सर्वां आनंद होतसे ।
मदालसा हांसतसे । तसें नाम परिसूनी ॥ ४ ॥
राजा झाला खिन्न मनीं । म्हणे पूर्वी इजला न पुसोनी।
नाम ठेविलें म्हणूनी । हास्य करी वाटतें ॥ ५ ॥
जरी विचारावें कारण । हसतील हे जन ।
असें मनीं आणून । राजा मौन धरीतसे । ॥ ६ ॥
पुत्र जसजसा वाढतसे । त्याला बोध तसतसा ठसे ।
पुत्र जरी ज्ञानी असे । तरी दिसे मूढसा ॥ ७ ॥
अंतरीं बोध असे । परि जडमूढसा भासे ।
पिता चिंता करीतसे । म्हणे असें कसें झालें ॥ ८ ॥
माझी प्रिया पतिव्रता । सुशीला धमरता ।
मीही धार्मिक असतां । सुता मूढता केवीं ये ॥ ९ ॥
असा पिता करी शोक । परी हा ज्ञानी लेक ।
असा नोहे विवेक । म्हणूनी दुःख करीतसे ॥ १० ॥

पुत्र झाला आत्मनिष्ठ। साक्षात् ब्रह्मविद्वरिष्ठ।
त्याला प्रवृत्तिनिष्ठ। कोण कसा करील ॥ ११ ॥
आजन्म बोध करूनी। मातेनें पुत्र केला ज्ञानी।
दे प्रवृत्ति सोडूनी। हें आश्चर्य मनीं न वाटे ॥ १२ ॥
कृपावलोकनेंकरून। साधु वारिती अज्ञान।
मग सहवास करून। देतां ज्ञान काय चित्र ॥ १३ ॥
पुनः दैवेंकरून। मदालसा गर्भिणी होऊन।
प्रसवली पुत्ररत्न। राजाचें मन हृष्ट झालें ॥ १४ ॥
तया नाम सुबाहु असें। पिता प्रेमें ठेवितसे।
नाम ऐकतां तें तसें। हंसतसे मदालसा ॥ १५ ॥
मनीं खिन्न होवूनी। राजा गेला उठोनी।
तया पुत्रा उचलुनी। माता कानीं सांगतसे ॥ १६ ॥
जें हाडांनीं उभारिलें। ठाईं ठाईं नाड्यांनीं बांधिलें।
मांसानें जें लेपिलें। जें माखिलें रक्तानें ॥ १७ ॥
कावळे कुत्रे येऊनी। मांस नेतील पळवोनी।
म्हणूनी त्वचा वरी घालूनी। ईश्वरें झांकून ठेविलें जें॥
ज्याचे आंत मळमूत्र। तें कसें होई पवित्र।
तरी सर्वथा अपवित्र। न धरी मीपणा तयाचा ॥१९॥
व्यर्थ घेऊं नको मोह। तूं न होसी देह।
तुझा नोहे हा देह। फसूं नको सहवासें तूं ॥ २० ॥
देहेंद्रिय मनः प्राण। बुद्धि अहंकार हे जाण।
ह्यांला आत्मा म्हणेल कोण। हें विचारून पाहे तूं ॥

जो ज्याला पाहतो । तो त्याहूनि वेगळा असतो ।
तेव्हां ह्यांचा द्रष्टा जो तूं तो । अससी आत्मा परंज्योती
तूं जन्मा न आलासी । मग तूं कसा मरसी ।
तूं विकारा न घेसी । मग कसी घे वर्णाश्रमता ॥२३॥
तुला नसती माता पिता । तूं आनंदरूप असतां ।
कासया पाहिजे कांता । हें आतां निर्धारी ॥ २४ ॥
तूं सर्वदेवपूज्य । तुला सुख असे प्राज्य ।
कासया पाहिजे राज्य । सर्वां ईड्य[1] अससी तूं ॥२५॥
तूं अससी एक । आत्मा हा तुझा लोक ।
कासया पाहिजे लेंक । काय सुख देतील ते ॥ २६ ॥
तूं हा घेतां सुविचार । नको तुला आचार ।
तूं अससी परात्पर । हें वारंवार चिंती तूं ॥ २७ ॥
असा उल्लाप[2] करूनी । पुत्रा केलें ज्ञानी ।
तोही जडसा होऊनी । राहे पडून भूमीवरी ॥ २८ ॥
तया पुत्रा पाहूनी । जड झाला असे जाणुनी ।
राजा खिन्न होउनी । झुरे मनीं अहोरात्र ॥ २९ ॥
मदालसा गर्भिणी झाली । पुनः पुत्रा प्रसवली ।
भूपा ती मात कळली । आला तेथें सत्वर ॥ ३० ॥
म्हणे ज्योतिषियांसी । आतां तरी या समयासी ।
ग्रह असती कसे यासी । होईल राज्यासी योग्य कीं॥
ज्योतिषी म्हणती हा चतुर । होईल बुद्धिमत्तर ।
याच्या विद्येचा पार । न लावी नर सामान्य ॥ ३२ ॥

१ अर्चन करण्यास योग्य. २ बोलणें.

याच्या आयुष्या नसे मिती । परी उच्चग्रह नसती ।
मग म्हणे भूपती । पुरे येवढा योग तरी ॥ ३३ ॥
भूपकुळीं उपजतां । बुद्धिमत्ता आणि आयुष्यता ।
हीं उत्तम असतां । साम्राज्यता सहज ये ॥३४ ॥
भूप असें म्हणून । जातकर्म करून ।
तया शत्रुमर्दन । हें अभिधान योजिलें ॥ ३५ ॥
प्रियेसी पुसोन । ठेवावें पुत्रा अभिधान ।
असा निश्चय करून । असतां भुलोन गेला नृप ॥३६॥
तेव्हां मदालसा हंसे । राव मनीं लाजतसे ।
म्हणे दरखेपेस असें । करितसे हास्य ही ॥ ३७ ॥
आतां पुढें पुत्र झालिया । मी नाम न ठेवीन तया ।
असा निश्चय करूनियां । नृप स्वकार्या चालिला॥३८॥
तया पुत्रा घेऊनी । माता सांगे क्षणोक्षणीं ।
त्या बाळाचे कर्णीं । म्हणे कोठूनी आलासी ॥ ३९ ॥
तूं कोणाचा कोण । कां करिसी रोदन ।
कोणीं तुला घातलें मोहन । करी विवेचन बा आतां॥
जरी पूर्वीं तूं नव्हतासी । आतांचि नवीन झालासी ।
तरी उपजतांच थानासी । चोखूनि पीसी दूध कसें ॥
हें शिक्षण कोणी । तुला दिलें दे सांगूनी ।
तूंचि पूर्वसंस्कारेंकरूनी । चेष्टा करूनी राहसी ॥४२॥
पूर्वार्जितकर्में हा । देह लाधला न हा ।
ऐहिक कर्में रचिला पहा । तुझ्याहूनि हा वेगळा॥४३॥

जरी अहंता ममता धरिसी । त्रिविध कर्मं करिसी ।
तरी पुनः फेरी घेसी । चौऱ्यायशी लक्षवार ॥ ४४ ॥
जो साक्षी निर्विकार । तो मी आत्मा परात्पर ।
असे अज अविकार । असा निर्धार नित्य करी ॥४५॥
सर्व भूतें माझे ठायीं । मी सर्व भूतांचे ठायीं ।
असें ध्यानीं नित्य घेई । द्वैता देई सोडूनी ॥ ४६ ॥
स्वस्वरूपा भुलोन । कामक्रोधलोभां आदरून ।
विषयासक्त होऊन । राहे तो जाण आत्महा[1] ॥ ४७ ॥
काम क्रोध लोभ हे चोर । हेचि नरकाचें द्वार ।
येथें पडतां घोर । पावसी दुर्धर यातना ॥ ४८ ॥
विषय मृगतृष्णेपरी । त्यांची वार्ता न करी ।
जे चिंतितां विषापरी । भेदूनी शरीरीं फैलतील ॥४९॥
तूं हेंचि व्रत करी । स्वरूपीं दृष्टी धरी ।
व्रतभंग करिसी तरी । यातना बरी भोगसील ॥५०॥
पाहें या लोकीं एक । नारी नांवाचा नरक ।
त्याला पाहतां ये दुःख । तिकडे पराङ्मुख होत जा ५१
काष्ठाची असे बाहुली । किंवा चित्रीं लिहिली ।
तिलाही पाहतां ये भुली । म्हणूनी न पाहिली पाहिजे
काष्ठाची बाहुली पाहतां । गजालाही ये बद्धता ।
मग मांसमयी पाहतां । अधःपाता जाशील ॥ ५३ ॥
लाल शुभ्र पिंवळी माती । तिला तांबें रुपें सोनें म्हणती
ती जरी धरिशी हातीं । तुला दुर्गती चिकटेल ॥५४॥

---

१ आपल्या आत्म्यास मारणारा.

तेव्हां तूं धरी तुझें व्रत । मिळालिया खाई अयाचित ।
भूशय्येवरी पडे अनिद्रित । दिगंबर पांघरून ॥ ५५ ॥
जी निशा सर्व भूतांची । तीचे ठायीं जागृती ठेवी साची
जेथें जागृती भूतांची । तेथें निद्रेची वेळ तुझी ॥५६॥
असा वागे निरंतर । ना तरी ये कष्ट घोर ।
अशी माता वारंवार । करी हुशार पोरास ॥ ५७ ॥
तोही ज्ञानी होऊनी । सर्व संग सोडोनी ।
जड मूढ होवूनी । राहे पडूनी भूमीवरी ॥ ५८ ॥
मृगतृष्णोपम जग । मानूनि झाला तो निःसंग ।
ज्याच्या ज्ञाना नये भंग । अंतरंग दृष्टी ज्याची॥५९॥
राज्ञी पुनः गर्भिणी झाली । चवथ्या पुत्रा प्रसवली ।
पांच ग्रह त्या काळीं । उच्च स्थलीं राहिले ॥ ६० ॥
जोशी सांगती राजासी । आतां चिंता नको मानसीं ।
पांच ग्रह या समयासी । उच्च स्थानासी पातले॥६१॥
जे आजपावत । तुला जाहले सुत ।
तयां असे उच्चस्थ । ग्रह नव्हते आलेले ॥ ६२ ॥
भाग्यशाली हा सुत । होईल राजा विख्यात ।
उद्धरील निश्चित । हें जाण तूं ॥ ६३ ॥
जाहले शुभ शकुन । राजा हर्ष पावून ।
जातकर्म करून । वांटी धन आनंदें ॥ ६४ ॥
राजा म्हणे प्रियेसी । नाम ठेवितां पुत्रासी ।
बोल तूं कां हंससी । पुत्रासी नाम काय द्यावें ॥६५॥

मदालसा तें ऐकून। बोले मंद हंसून।
म्हणे हेतु सांगेन। चित्त देऊन ऐकावें ॥ ६६ ॥
क्रांती म्हणजे गती। परिच्छिन्ना[1] घडे ती।
आत्म्याची सर्वत्र व्याप्ती। कोठें गती करील तो॥६७॥
तेव्हां ह्या आत्मया। गती नाहीं म्हणूनियां।
विक्रांत नाम वायां। म्हणूनियां हंसे मी ॥ ६८ ॥
आत्मा निरंश असे। त्याला आकार नसे।
मग भुज असती कसे। सुबाहु असे नाम का मग ६९
मुळीं आत्मा एकला। स्वगतभेद नाहीं त्याला।
अतएव सुबाहु नामाला। निरर्थना जाणावी ॥ ७० ॥
जरी आत्मा एक असे। तरी सजातीय विजातीय भेद नसे।
मग शत्रु कोठुनी कसे। येती नया आत्मया ॥ ७१ ॥
तुम्ही म्हणाल जरी। कामादि आंतरवैरी[2]।
असती आत्म्या निर्धारीं। तरी ऐका सांगेन ॥ ७२ ॥
कामादि बुद्धिविकार। आत्मा असे बुद्धीपर[3]।
बुद्धिसाक्षी परात्पर। त्याला शत्रु तर नाहींत॥ ७३ ॥
शत्रु नसतां शत्रुजित। म्हणतां लज्जा वाटत।
तेव्हां हें शत्रुजित। नाम असत् मला वाटे ॥ ७४ ॥
असें प्रियेचें वचन। तो राजा ऐकून।
क्रुद्ध झाला तें पाहून। प्रिया वचन काय बोले॥ ७५ ॥

१ मर्यादित. २ अंतस्थ. ३ पलीकडे.

जो आसनावरून । न जाई उठोन ।
तो दिगंतरीं जाऊन । विक्रांताभिधान मिरवील कीं ॥
बाहुबळें जिंकी जरी । सुबाहु नाम तरी ।
शोभतें याला निर्धारीं । हा तरी तसा नसे ॥ ७७ ॥
माशा आंगावरी । बसतां जो न वारी ।
तया शत्रुजित नाम काय करी । हें अंतरीं येतां हंसे ॥
यांचें भविष्य जाणून । हंसों आलें तत्क्षण ।
असें हें प्रियावचन । राजा ऐकून बोलतसे ॥ ७९ ॥
तूं भविष्य जाणशी । म्हणूनी जरी हंससी ।
तरी आतां या सुतासी । अन्वर्थक नाम ठेवी तूं ८०
मदालसा म्हणे भूपासी । व्यवहारार्थ देह्यासी ।
नामें देणें तरी ह्यासी । अलर्क नाम योजी तूं ॥ ८१ ॥
दैवें पिसळे जो श्वान । अलर्क हें त्याचें अभिधान ।
तत्तुल्य हा विषयीं पिसळेल म्हणून । अलर्काभिधान ह्या द्यावें ॥ ८२ ॥
अल भूषणीं आहे हें जाणून । पुढें वैराग्य होऊन ।
हा ज्ञानभूषित होईल म्हणोन । अलर्काभिधान ह्या द्यावें ॥ ८३ ॥
असें राजा ऐकून । अलर्क नाम ठेवून ।
नामकरण करून । विप्रां धन वांटितसे ॥ ८४ ॥
पाहूनी तीनी लेंक । राजा करी बहु दुःख ।
उपाय केले अनेक । परी लेंक न सुधारले ॥ ८५ ॥

म्हणे तो पुत्र होती वेडे। कसें कर्म हें कुडें।
आतां पुढें वंश खंडे। असा रडे अज्ञानें ॥ ८६ ॥
कुळीं ब्रह्मनिष्ठ लेंक। दैवयोगें होतां एक।
सर्वां देतो ब्रह्मलोक। हें व्यावहारिक लोक नेणती ८७
ओळखावया साधुपणा। स्वयें घ्यावा साधुबाणा।
साधूंच्या ज्या गुह्य खुणा। त्या भोंदू जाणती कीं ८८
नेणोनी राजा दुःखी होतसे। एकदां पाहतसे।
विक्रांत विष्ठेंत लोळतसे। म्हणे कसें दैव याचें ॥८९॥
राजकुळीं उपजून। राहावें भोग भोगून।
तरी सफळ जीवन। नातरी जनन व्यर्थ तें ॥ ९० ॥
असें पित्याचें वचन। ऐकतां हंसे नंदन।
राजा तें पाहून। म्हणे जाणून हंसतो हा ॥ ९१ ॥
मग तया उचलून। म्हणे वेडा होऊन।
कां रहासी लोळून। जाणून हें कां वेड घ्यावें ॥ ९२॥
विद्या पढूनी राज्य करी। नारी वरी स्वयंवरीं।
भोग भोगी नानापरी। यज्ञ करी मोक्षार्थ ॥ ९३ ॥
तरी होसी लोकमान्य। तुला म्हणतील धन्य।
होवोनियां वदान्य। रक्षावे अन्यलोक तुवां ॥ ९४ ॥
ऐकून पित्याचें वचन। विक्रांत बोले हंसून।
म्हणे म्यां केलें अध्ययन। मातेपासूनी सर्वही ॥९५॥
निवृत्तिस्त्रियेसी विवाह केला। स्वात्मराज्यीं अभिषेक झाला।
आतां कांहीं मला। नावडे हें निश्चित ॥ ९६ ॥

करावयाचें तें केलें। मिळायाचें मिळालें।
तिघे बंधू भले झाले। चौथा चाले याच पंथें ॥ ९७ ॥
असें वाक्य तयाचें। भूपाळाला तें न रुचे।
जेंवी आचार साध्वीचे। नावडती कुलटेला ॥ ९८ ॥
मग कोपून बोले राज्ञीला। त्वां हा वंशनाश आरंभिला
खोटा उपदेश हा मुलांला। कां केला मूढपणें ॥९९॥
खरा प्रवृत्तिमार्ग हा। देवपितृनरा हा।
दे उपभोग तसा पहा। दुजा न हा जा क्लेशकर॥१००॥
राज्य गजाश्व स्त्री धन। भोगशक्ती हे देव दे दान।
ज्या भाग्यवंता जाण। त्याणें सर्व तें भोगावें॥१०१॥
अन्यथा तो होई देवद्रोही। ही सामग्री ज्यापासी नाहीं
त्या दुर्भाग्याकरितां पाही। निवृत्ती ही निर्मिली १०२
जरी निवृत्ती घे नर। त्यास आमुचेंच द्वार।
मग कां हें घरदार। सोडूनी दूर जावें गे ॥ १०३ ॥
ह्या उपदेशेंकरून। कसें होईल कल्याण।
धर्म जातां लोपून। अधःपतन होईल ॥ १०४ ॥
जे पितर पितृलोकांत। किंवा तिर्यक्योनींत।
किंवा झाले भूत प्रेत। क्षुधाभिभूत होतील ॥१०५॥
पापी किंवा पुण्यवंत। ते श्राद्धान्नानें होती तृप्त।
ही वृत्ती ब्रह्मा देत। ती तुला ज्ञात नसे कीं॥ १०६ ॥
नर पितर देव। भूतप्रेत कीटादि जीव।
गृहस्थाच्या योगें जीव। वांचवीती हें निश्चित॥१०७॥

हा धर्म सनातन । याला स्वयें नारायण ।
सत्य असे प्रमाण । मग कोण दोष देईल ॥ १०८ ॥
पुत्राविणें परलोक । न साधे हा श्रुतिलेख ।
मूढे न ऐकिलासी तरी ऐक । हा एक लेंक तरी तरो ॥
भ्रष्ट केलेस तीन लेंक । ते हे पावती दुःख ।
अजूनी तरी ऐक । हा अलर्क भ्रष्ट न होवो ॥ ११० ॥

इति श्रीदत्तमाहात्म्ये एकोनत्रिंशोऽध्यायः ॥ २९ ॥

श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

# अध्याय तिसावा

## श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः

गुरु म्हणे शिष्यासी । असा कोपोनी पत्नीसी ।
राजा बोले अविचारेंसी । प्रवृत्तिमार्गनिरत जो॥ १ ॥
तें तसें त्याचें वचन । मदालसा परिसून ।
म्हणे कान देऊन । ऐकावें भाषण माझें हें ॥ २ ॥
हा उपदेश केला उचित । यानें पितर समस्त ।
निश्चयें होतील मुक्त । हें वेदमत खास असे ॥ ३ ॥
पंथा नाहीं याहून । मोक्षा जावया दुजा जाण ।
अतएव हाच श्रेष्ठ म्हणून । वेदवचन ऐकिलें ॥ ४ ॥
पितृभूतादि जे असती । ते स्वकर्मे बांचती ।
काय जीवित मनुष्याचे हातीं । केवळ भ्रान्ति घेती नर॥
जरी स्त्रीधनादि भोगावें । तरी वैराग्यानें वागावें ।
या वेदवचना दोष द्यावे । मग पाखंड व्हावें वेदबाह्य[1]॥
जो वेदमार्गें जाई । तो कसा देवद्रोही होई ।
तोचि तरोनि जाई । तोचि घेई कैवल्य ॥ ७ ॥
वैराग्यें संन्यास घेतां । भिक्षार्थ परद्वारीं जातां ।
कैंवी येईल हीनता । संतोष धरितां काय क्षीण ॥८॥
जरी पूर्वी येथें क्लेश वाटे । तरी पुढें सुख होईल मोठें।
प्रवृत्तिमार्गी जरी सुख वाटे । तरी मोठें दुःख पुढें॥९॥

१ मग पाखंड पत्करावें, अंगीकारावें.

आत्मा हाची मुख्य लोक । हा मिळावया नको लेंक ।
प्रबोधपुत्र होतां एक । मिळे आत्मलोक[१] निश्चयें ॥१०॥
तेव्हां मीं केलें उचित । हें जरी तुम्हां वाटे विपरीत ।
तरी आतां प्रवृत्तिनिरत । चौथा सुत होईल हा ॥११॥
मी सर्व विद्या सांगतसे ह्यासी । जरी विश्वास वाटे तुम्हांसी ।
तरी हा असो मजपासीं । नातरी ह्यासी तुम्हीं न्यावा ॥
असें वचन ऐकून । म्हणे तूं करवीं अध्ययन ।
पुनः येऊन पाहीन । ठेवीन ग्वात्री झालिया ॥ १३ ॥
असें सांगूनी जाई राजा । माता म्हणे ह्या आत्मजा ।
पुढें उद्धरीं अधोक्षजा । अत्रिजा हा तुझ्या वांट्याचा ॥
याला पांच उच्चग्रह आले । म्हणोनी हें विघ्न आलें ।
आतां माझा उपाय न चाले । कर्म आलें आड याचें ॥
कोण अनादरील ग्रहां । सहासष्ट हजार वर्षें हा ।
राज्य भोगितां सोडील मोहा । तंव न हा विरक्त होय ॥
याचें दैव असें म्हणुनीयां । हा म्यां अर्पिला तुमच्या पायां ।
ह्यावरी मग दत्तात्रेया । करावी दया निश्चयें ॥ १७ ॥
असी दत्ता प्रार्थूनी । मग अलर्का बोलावूनी ।
वेदशास्त्र पढऊनी । करी ज्ञानी व्यवहारी ॥ १८ ॥
धर्मार्थकामसाधन । वर्णाश्रमाचरण ।
षड्विधराजनीतिलक्षण । प्रजारंजनकर्म सांगे ॥ १९ ॥

१ ब्रह्म.

धनुर्विद्या सांगून। केला व्यवहारनिपुण।
तया चतुरा पाहून। भूपाचें मन हृष्ट झालें ॥ २० ॥
मग अलर्क स्वयंवरीं। अनेक कन्या वरी।
प्रख्यात झाला भूमीवरी। धनुर्धारी धुरंधर ॥ २१ ॥
राजा पाहूनी पुत्रासी। हृष्ट झाला मानसीं।
यौवराज्य देई त्यासी। स्वयें वनासी चाले तो॥ २२ ॥
मदालसा म्हणे रायासी। मी येतें वनासी।
असतां समागमासी। होईल मनासी आनंद ॥ २३ ॥
राजा तथास्तु म्हणे। मग निघतां ती म्हणे।
अलर्का राज्य करी धर्मानें। पुत्राप्रमाणें प्रजा पाळी॥
सहासष्ट हजार। वर्षें घेसी भूभार।
अलर्का मग या उपर। शत्रु उठेल दुर्धर ॥ २५ ॥
तेव्हां तुझें व्हावया हित। मी ठेवितें हें लिखित।
तंववर पेटींत ठेवी गुप्त। जंववरी शत्रू न उठतील २६
तंववरी करी जतन। नित्य ठेवी पूजन।
शत्रू उठतांची स्मरून। हें वाचून पाहे तूं ॥ २७ ॥
तेव्हां हें वाचून। तसें करितां आचरण।
शत्रू जातील मित्र होवून। साम्राज्य पावून सुखी होसी
असें अलर्का सांगून। आशीर्वचन देऊन।
माता करी प्रयाण। चरण धरून पुत्र रडे ॥ २९ ॥
माता म्हणे सुता। तूं मागें उलट आतां।
मी धरूनी पतीच्या व्रता। सार्थकता करीन ॥ ३० ॥

सदा एकत्र सहवास । घडे नित्य जीवांस ।
कर्माधीन त्यास । असे निवास जाण बा ॥ ३१ ॥
आतां तुमचा योग सरला । म्हणोनी हा वियोग झाला
काय उपाय याला । आपुल्या मनाला सांवरावें ॥३२॥
असें तयासी सांगून । माता जाई निघोन ।
पतीसह वनीं येऊन । राहिली समाधान पावुनी॥३३॥
मग अवसर पाहुनी । पतीस बोध करूनी ।
पूर्ण विज्ञान ठसवूनी । धन्य मानी आपणासी॥ ३४ ॥
असी धन्य ती सती । पतीला देई सद्गती ।
आपण घे विदेहमुक्ती । देव मानिती आश्चर्य ॥ ३५ ॥
मदालसा धन्य सती । स्वयें सेवूनी जीवन्मुक्ती ।
पुत्रा देई सद्गती । दे सद्गती पतीला जी ॥ ३६ ॥
संती चूडाला जसी । तारी निजपतीसी ।
मदालसाही तसी । नारी असी विरलची ॥ ३७ ॥
प्रातःकाळीं उठोन । ज्याचें करितां कीर्तन ।
सर्व पाप जाऊन । अंतःकरण शुद्ध होईल ॥ ३८ ॥
असो इकडे अलर्क । प्रतापाचा जो अर्क ।
न वर्णवे ज्याचा तर्क । अधर्मसंपर्क न करी जो ॥३९॥
करी प्रजारंजन । न दुखवी लोकांचें मन ।
ज्याला खुषी प्रजाजन । नित्य दान दे विप्रां ॥ ४० ॥
नाम घेतां ज्याचें । चित्त कांपे शत्रूचें ।
अलंघ्य शासन ज्याचें । करी दुष्टांचें खंडन ॥ ४१ ॥

जो धर्में दंड्या दंडी। अदंड्याते न दंडी।
लोभें क्रोधें द्रव्य न जोडी। धर्म जोडी सदैव॥ ४२ ॥
करी शिष्टांचें पालन। दीनां देई धन।
पंग्वंधांचें रक्षण। करी सदय मन ज्याचें ॥ ४३ ॥
अर्थें धर्म संपादी। धर्में अर्थ संपादी।
कोणा न करी भेदी। राहे आनंदी सदैव ॥ ४४ ॥
धर्मार्थाविरोधेंकरून। करी काम पूर्ण।
सदा राहे प्रसन्न। ज्याचें मन खिन्न नसे ॥ ४५ ॥
तो करी सांग याग। कधीं न होती व्यंग।
परी वाढे ज्याचा राग। तया विराग न होईल ॥४६॥
ऋतुकाळीं भार्यागमन। यज्ञशेष मद्यमांससेवन।
हें अपूर्व वेदवचन। असें मानून वागे तो ॥ ४७ ॥
असा तो राजवर्य। नेणें विधीचें[1] तात्पर्य।
मानी स्वर्ग ऐश्वर्य। कार्याकार्य न विचारी ॥ ४८ ॥
मद्यमांसभक्षण। आणि स्वभार्यागमन।
हें सर्वां मनापासून। आवडे पूर्वसंस्कारें ॥ ४९ ॥
फिरावें यापासून। निवृत्ति व्हावी म्हणून।
वेदें संकोच[2] करून। हें विधान सांगितलें ॥ ५० ॥
सर्वकाल सर्व स्त्रियांतें। भोगितील म्हणूनी नरातें।
ऋतुकालीं स्वस्त्रीतें। सेवावें असें वेद वदे ॥ ५१ ॥

१ विधी—अपूर्व, नियम, परिसंख्या पहा—भागवत ११ स्कंद, अ० ५.
२ नियमानें संकुचित करणें; उ० स्त्री भोगावी परंतु विवाहित असावी, ऋतुकाळीं मात्र वगैरे.

वर्जितां इतर स्त्रियांसी । भोगितां स्वस्त्रियेसी ।
हा एक संकोच नरासी । वेद दावी निश्चयें ॥ ५२ ॥
माझी स्त्री म्हणोन । अहोरात्र करितील गमन ।
ऋतौ भार्यामुपेयात् म्हणोन । दुसरा संकोच केला हा
भय वाटावें म्हणून । शास्त्रें केलें शासन ।
ते उल्लंघितां दारुण । नरकभय येतसे ॥ ५४ ॥
(श्लोक)॥ येऽपि गच्छंति रागांधा नरा नारीं रजस्वलां ।
पर्वण्यप्सु दिवा श्राद्धे ते वै नरकगामिनः ॥ ५५ ॥
जरी द्वेषादिकेंकरून । किंवा अप्रीती मानून ।
न करी भार्यागमन । तया दोष वदे शास्त्र ॥ ५६ ॥
(श्लोक)॥ ऋतुस्नातां तु यो भार्यां संनिधौ नाधिगच्छति
घोरायां भ्रूणहत्यायां पच्यते स न सशंयः ॥ ५७ ॥
ही केली व्यवस्था । हा अपूर्व विधी नसतां ।
मूढ तत्त्व नेणतां । आसक्तता ठेविती ॥ ५८ ॥
मद्यमांसमैथुनापासून । निवृत्त व्हावा जन ।
असें शास्त्राचें प्रतिपादन । भूपनंदन नेणे तो ॥ ५९ ॥
अनेक स्त्रिया वरून । ऋतुकालीं करी गमन ।
पशुसंस्था करून । मांस भक्षण करी तो ॥ ६० ॥
अग्निष्टोमादि करून । नित्य करी सोमपान ।
म्हणे मी अमर होऊन । स्वर्ग भोगीन निरंतर ॥६१॥
असी ज्याची कुबुद्धी । नोहे तयाची शुद्धी ।
वांया जोडी उपाधी । जाणे सुधी सुबाहु[1] हें ॥ ६२ ॥

१ अलर्काचा वडील बंधु.

सुबाहू म्हणे भ्राता । संसारीं बुडाला आतां ।
याला काढावा वरता । तरीच बंधुता साजेल ॥ ६३ ॥
हा न्यायें राज्य करी । यज्ञ याग दान करी ।
धर्में वागे जरी । तरी बहिर्निष्ठ सर्वथा ॥ ६४ ॥
पशुभोग्य जे विषय । ते सुख देतील काय ।
तरी ही भ्रांती होय । याला उपाय करावा ॥ ६५ ॥
अनर्थ करवी धन । विषय भोगवी धन ।
गर्व ताठा करवी धन । एक धन घात करी ॥ ६६ ॥
तरी आतां ध्यान सोडावें । त्याच्या समीप जावें ।
त्याचें धन लुटावें । मग विरागी होईल हा ॥ ६७ ॥
असा निश्चय करून । जडमूढता सोडून ।
सुबाहू नगरीं येऊन । बोले वचन राजाप्रति ॥ ६८ ॥
म्हणे मी ज्येष्ठ भ्राता । मी राज्य करीन आतां ।
हें नये तुझ्या चित्ता । तरी वांटा दे मला ॥ ६९ ॥
अलर्क म्हणे तयाला । पितयानें राज्य दिल्हें मला ।
तें मी न देईन तुला । तूं जा तपाला वनांतरीं ॥ ७० ॥
भूतळीं राजा मी एक । तुला देवूं काय भीक ।
तुला जड म्हणती लोक । राज्यालायक तूं न होसी ७१
जरी तूं क्षात्रिय अससी । तरी युद्ध करी मजसी ।
घेई आपुल्या भागासी । नातरी तपासी चाल वनीं ॥
तुम्ही कपटी कळलें आतां । हेंचि पूर्वीं कळतां ।
तुमची बरीच व्यवस्था । करितां येती यथार्थ ॥ ७३ ॥

तुम्ही दीन म्हणून । करीत होतों पाळण ।
हें तुमचें कपटी मन । आतां कळोन आलें मज ॥७४॥
तूं आतां येथून । शीघ्र जा निघोन ।
असें निर्भर्त्सवचन । सुबाहू ऐकून फिरला ॥ ७५ ॥
काशिराजापाशीं जाऊन । तया सर्व सांगून ।
सुबाहू म्हणे साह्य करून । द्या मिळवून माझा भाग ॥
आम्ही एकापासून । चार झालों उत्पन्न ।
आम्हां तिघां अव्हेरून । राहे राज्य करून एकला ७७
मागतां माझाही । मला भाग देत नाहीं ।
याला शिक्षाही । द्यावी मही हिसकूनी ॥ ७८ ॥
तरी तूं सहाय करी । मी होतो पुढारीं ।
तूं किमपि अंतरीं । भय न धरी सर्वथा ॥ ७९ ॥
मी योगी असें । मनीं आणीन जसें ।
सिद्धीस नेईन तसें । जय वसे बरोबर ॥ ८० ॥
तया म्हणे काशीराजा । मी मांडलीक राजा ।
सार्वभौम बंधू तुझा । तेथें माझा काय पाड ॥ ८१ ॥
सुबाहु म्हणे तयासी । साह्य करावें दीनासी ।
हा धर्म तुम्हांसी । दिला असे ईश्वरें ॥ ८२ ॥
तो धर्म स्वीकारितां । जरी धर्मयुद्ध करितां ।
रणीं ये पंचता । तरी मुक्तता मिळेल ॥ ८३ ॥
युद्धीं शत्रु जिंकितां । सर्व राज्य ते हातां ।
स्वर्ग मिळे रणीं मरतां । उभयतां तोटा नाहीं ॥८४॥

मला राज्य मिळतां । तुला न विसरेन सर्वथा ।
असें तया सांगतां । म्हणे आतां ऐक सुबाहो ॥८५॥
पूर्वी मी जाऊन । अलर्कासी भेटेन ।
बुद्ध्या शिष्टाई करीन । भाग घेई मागून ॥ ८६ ॥
जरी तो न ऐकेल । भाग तुझा न देईल ।
तरी युद्ध होईल । हा बोल आवडे कीं ॥ ८७ ॥
मग सुबाहु बोले । हें मज आवडलें ।
मग दोघे चालिले । चतुरंग सेना घेऊनी ॥ ८८ ॥
पूर्वी काशीराजा जाऊन । त्या अलर्का भेटून ।
शिष्टाई करून । म्हणे भागून दे राज्य ॥ ८९ ॥
अलर्क म्हणे युद्धावांचून । न दे राज्य भागून ।
असें वचन ऐकून । ये परतून काशीराजा ॥ ९० ॥
सुबाहूसी कळवून । युद्धाचा निश्चय करून ।
चतुरंग सेना घेऊन । नगरा वेढून राहिला ॥ ९१ ॥
अलर्क तें पाहून । स्वयें ये सेना घेऊन ।
म्हणे करीन कंदन । मी बांधीन दोघांस ॥ ९२ ॥
अचाट सामर्थ्य योग्याचें । स्वल्प सैन्य काशीराजाचें।
परी पाहतां अलर्काचें। मन खचे सर्वथा ॥ ९३ ॥
वाटे समुद्र लोटला । अलर्क मनीं खचला ।
म्हणे हा नावरेल मला । पूर्वीच झाला अविचार ॥
या वेळीं आतां । याला शरण रिघतां ।
तरी जाईल श्लाघ्यता । उपहास्यता होईल ॥ ९५ ॥

आतां मागे न हटावें । यावरी सैन्य लोटावें ।
यत्नें सैन्य मारावें । मग धरावे हे शत्रु ॥ ९६ ॥
असा निश्चय करून । पुढें सैन्य लोटून ।
अलर्क करी दारुण । त्याशीं रण जोरानें ॥ ९७ ॥
दृष्टी पडतां सुबाहुची । सेना काशीराजाची ।
परवा न धरी शत्रूंची । गणना बाणांची न करी ॥ ९८ ॥
अलर्काची सेना । धाडिली यमसदना ।
सर्व मुकती प्राणा । नसे कोणा सामर्थ्य ॥ ९९ ॥
सर्व किल्ले फोडून । खंदक भरून ।
तटबंदी तोडून । दरवाजे मोडून टाकिले ॥ १०० ॥
राजवाडे पाडून । रक्षकां झोडून ।
सैन्यांतें दवडून । ध्वज तोडून टाकिती ॥ १०१ ॥
कित्येक भेदानें फोडिले । कित्येक दानें वळविले ।
कित्येक सामें मेळविले । धाकें पळविले कित्येकां १०२
योगाचें सामर्थ्य अचाट । फोडविले किल्लेकोट ।
घाली कोशांची लूट । पाडूनी फूट सुबाहू ॥ १०३ ॥
जे जे आपुले मानिले । ते ते सर्व उलटले ।
अलर्काचें मन भ्यालें । म्हणे हें झालें विपरीत ॥ १०४ ॥
(श्लोक) ॥ विपाको दारुणो राज्ञां शत्रुरल्पोप्यरुंतुदः[1] ॥
उद्वेजयति[2] सूक्ष्मोऽपि चरणं कंटकांकुरः ॥ १०५ ॥
जो आपुल्या पदरचा । काशिराजा मानिला साचा ।
तो मित्र हा शत्रूचा । केला आमुचा विश्वासघात ॥

१ अरुंतुद, मर्मभेदी. २ दुःख देतो.

सेनाही तिकडे वळली। ही वार्ता मला कळली।
माझी शक्ती गळली। मर्यादा टळली सत्याची १०७
प्रधानादिक फुटले। सर्व कोश लुटले।
आतां बळ खुंटलें। मन विटलें आतां माझें ॥ १०८ ॥
ह्रा आला कर्मांचा भोग। हा मोठाच हृद्रोग।
रणीं होतां भंग। कासया मग रहावें ॥ १०९ ॥
संभावितांची अपकीर्ती ॥ होतां जाणावी तीच मृती।
अलर्क म्हणे आतां स्थिती। होतां भीती वाटते ११०
इति श्रीदत्तमाहात्म्ये त्रिंशोऽध्यायः ॥ ३० ॥

॥ श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

# अध्याय एकतिसावा

श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

गुरु म्हणे दीपकासी। पराजय होतां अलर्कासी।
विषम लागलें मनासी। म्हणे वनासी आतां जावें १
असें त्याचें मन। सुबाहू ओळखून।
म्हणे अलर्क जातां निघून। कोणीं रोखून न ठेवावा २
असें सर्वां सांगून। मार्ग ठेवी खुलोन।
रात्रौ अश्वावरी बसून। अलर्क निघून चालिला ॥३॥
चिंताग्रस्त होऊन। वनीं एकला जाऊन।
एक आश्रम पाहून। तेथें जाऊन बैसला ॥ ४ ॥
सुख आठवून चित्तीं। नानापरी करी खंती।
म्हणे प्रारब्धाची गती। येथें मती खुंटली ॥ ५ ॥
असें म्हणोनि भूप। करीतसे विलाप।
म्हणे हें कैचें पाप। जें दे ताप अत्यंत ॥ ६ ॥
माझी माता असती। तरी ऐसी हे स्थिती।
मला कदापि न येती। आतां गती काय पुढें ॥ ७ ॥
आठवितां मातेसी। स्मरण झालें त्यासी।
म्हणे जातां वनासी। या भविष्यासी जाणे माता ८
तिनें दिली खूण। त्याची झाली आठवण।
आतां प्रातःकाळीं न्हाऊन। तें पाहीन लिखित मी ९
असा विचार करून। म्हणे कां सूर्य अजून।
मला नये दिसून। रात्रीमान किती हें ॥ १० ॥

अशी चिंता करितां। उदया आला सविता।
राजा झाला आठविता। तेव्हां माताचरणातें॥ ११ ॥
करूनी प्रातःस्नान। केलें पेटीचें पूजन।
पत्र बाहेर काढून। पाहे वाचून अलर्क ॥ १२ ॥
(श्लोक) त्याज्यः सर्वात्मना संगः स चेत्त्यक्तुं न शक्यते।
सद्भिः सह स कर्तव्यः संतो दुःसंगभेषजं ॥ १३ ॥
कामः सर्वात्मना हेयो हांतुं[1] चेच्छक्यते न सः।
मुमुक्षां प्रति कर्तव्यः सैव कामार्ति[2]भेषजं ॥ १४ ॥
संग सोडावा सर्वथा। हें न घडे तत्वता।
तरी साधूचा संग धरितां। भवव्यथा नासेल॥ १५ ॥
टाकावा सर्वथा काम। हें न करवे जरी काम।
मुमुक्षेचा करावा काम। मिळेल धाम अनायासें॥१६॥
असें मातेचें लिखित। वाचूनी जाणिलें हृद्गत।
म्हणे कोठें वसे संत। मला विदित नसेची ॥ १७ ॥
त्या आश्रमीं जाऊन। एका ऋषीला वंदून।
म्हणे अलर्क कर जोडून। संत दाखवून द्यावा मला॥
मी त्याला सेवून। माझें दुःख घालवीन।
असें त्याचें वचन। ऋषी ऐकून बोलतसे ॥ १९ ॥
म्हणे दक्षिणेसी सह्यागिरी। श्रीदत्त राहती त्यावरी।
तूं त्यांचें दर्शन करी। कृपा तुजवरी करितील॥ २० ॥
प्रसिद्ध जें मातापुर। तेथें रेणुकाश्रम सुंदर।
असे त्याचे समोर। गिरिशिखर श्रीदत्ताचें ॥ २१ ॥

१ त्यक्तुं. २ इच्छार्ति.

अनसूयेचा सुत । नाम ज्याचे श्रीदत्त ।
योगियांचें दैवत । ज्याला संत वंदिती ॥ २२ ॥
घेतां त्यांचें दर्शन । होईल भवभंजन ।
ऐकतां असें वचन । अलर्काचें मन द्रवलें ॥ २३ ॥
अलर्क त्वरित निघाला । सह्याचळीं पातला ।
श्रीदत्ताश्रम देखिला । तेथें चालिला एकला तो ॥२४॥
आश्रमीं जाऊन । श्रीदत्ता पाहून ।
भावें नमन करून । करी प्रश्न भूपती ॥ २५ ॥
म्हणे जी भक्तवत्सला । अपार दुःख झालें मला ।
अनुग्रह होतां आपुला । मी कुशला पावेन ॥ २६ ॥
आपुली होतां कृपादृष्टी । दुःख राहील कीं पोटीं ।
म्हणूनी काढी हिंपुटी । म्हणे शेवटीं हेच पाय ॥२७॥
त्याचें वचन ऐकून । मनीं म्हणे अत्रिनंदन ।
हें मदलसागर्भरत्न । येथें यत्न नलगेची ॥ २८ ॥
असें मनीं चिंतून । श्रीदत्त बोले हंसून ।
म्हणे दे दाखवून । दुःखस्थान मज आतां ॥ २९ ॥
दुःखाचें स्थान सांग । तयावरी देऊं डाग ।
आधीं तूं कोण सांग । वारूं मग दुःख तुझें ॥ ३० ॥
असें वचन ऐकूनी । झाला विवेकी तत्क्षणीं ।
पाहे विचार करूनी । नृप मनीं मी कोण हें ॥ ३१ ॥
म्हणे हा स्थूल देह जड । यासीं भुतांची सांगड ।
नाना विकारांची धाड । पडे यावरी निर्धारें ॥ ३२ ॥

आत्मा सर्वगत पूर्ण । हा दिसे परिच्छिन्न ।
हा मी चिदात्मा त्याहून । असें भिन्न सद्रूपीं ॥ ३३ ॥
बळें इंद्रियां चाळवी । झोंपेमाजी जाड्या दावी ।
मी तो प्राण होईन कैंवी । साक्षीभूत असून ॥ ३४ ॥
क्षणोक्षणीं मन जाई । हा मी विभु राहें ठायीं ।
त्याचा संशय न येई । माझ्या डोईवरी ख्वास॥ ३५ ॥
देहा व्यापी जागेपणीं । झोंपेमाजी जाई जी लपोनी ।
ती बुद्धि विज्ञान म्हणोनी । माझ्याहूनी भिन्न असे ॥
त्रिगुणी जड अहंकार । मी तयाहून पर ।
शुद्ध बुद्ध मी अमर । नर नोहें सर्वथा ॥ ३७ ॥
असा मी माझा केला निर्धार । आतां करूं दुःखाचा विचार ।
होऊनिया सादर । जेणें दर दुरावेल ॥ ३८ ॥
नखापासूनी केशांत । ह्या देहाच्या बाहेर आंत ।
शोधितां न दिसे दुःख येथ । त्याचें आंत पाहावें ३९
प्राण भुके तान्हेविणें । असें दुःख कधीं नेणें ।
इंद्रियें भृत्यपणें । माझ्या सत्तेनें वावरती ॥ ४० ॥
रागद्वेषाचें हें मूळ । मन स्वभावें चंचल ।
सुखदुःखाचा सांभाळ । सर्वकाळ करी हें ॥ ४१ ॥
हें मन अन्नमय असे । विकारानें भ्रमतसे ।
परकी तें त्याचें कैसें । दुःख डसेल मजला ॥ ४२ ॥
असा विचार करून । दुःखकारण जाणून ।
अलर्क बोले हंसून । म्हणे शोधन केलें म्यां ॥ ४३ ॥

आकाश वायु तेज जळ। पृथ्वी हीं भूतें जड केवळ।
यांहूनि मी विमळ। असें निश्चळ सच्चिदात्मा॥४४॥
ज्ञानकर्मेंद्रिय प्राण। चतुर्विध अंतःकरण।
हे भौतिक विकार जाण। यांहूनि भिन्न निर्गुण मी॥
संघातही मी नोहें। असा निश्चयें पाहें।
जो संघाभिमान घे मोहें। तो वाहे ह्या दुःखा॥४६॥
गुरुजी असें म्यां चाचपलें। माझें रूप ओळखिलें।
आतां हें दुःख मना झालें। हें मी बोलें अनुभवें ४७
दुर्बोध हा विचार। ज्याला धुंडिती मुनीश्वर।
तुम्ही मला दिधला सत्वर। प्रश्नमात्र करूनी॥ ४८॥
मी सदोदित असूनी। न पाहें माझी वृद्धि हानी।
जें दुःख भासतसे मनीं। त्याचा अभिमानी मी कसा
जे असती भौतिक। ते देहेंद्रियादिक।
तेथें जें भासे सुख। वृद्धिक्षयादिक मायिक तें॥ ५० ॥
त्याचा संबंध नाहीं मज। मी नित्य एकरूप अज।
मला नाहीं करणीचें काज। तेजःपुंज निर्धूम मी॥५१॥
मी परिणामातीत। सर्वसंगविनिर्मुक्त।
शुद्ध बुद्ध अनंत। सुखदुःखाची मात कोण जाणें ५२
पंचभूतांचा समूह। हा जड स्थूल देह।
सूक्ष्मभूतसमूह। सूक्ष्मदेह भौतिक हे ॥ ५३ ॥
मृद्घट आपणा न जाणे। तो परा काय जाणे।
तसें हें शरीरद्वय नेणें। आप पर भेदातें। ॥ ५४ ॥

कफ वात पित्त । ह्या धातू स्थूळ देहांत ।
ह्या होतां कुपित । हो ज्वरित स्थूळ देह ॥ ५५ ॥
परी मी ज्वरित । तेही नेणे मात ।
ज्याला हें कळत । साक्षीभूत तो पर ॥ ५६ ॥
कामादिक उठतां । सूक्ष्मदेहा ज्वर येतां ।
त्याणें ज्वरित होय कीं ज्ञाता । हें आतां मी जाणें ५७
सर्वदुःखाचें कारण । म्हणोनी म्हणती कारण ।
तेथें वसे अज्ञान । तें सुज्ञा न शिवेची ॥ ५८ ॥
विचार करितां असा । दुःख दिसे माणसा ।
मी जशाचा तसा । मग कसा दुःखी होईन ॥ ५९ ॥
तादात्म्यानें दुःख भासलें । म्हणोनी तुम्हां पुसलें ।
आतां तें दुःख समजलें । नाहीं झालें मला तें ॥६०॥
परक्याच्या दुःखें करून । मी कसा दुःखी होईन ।
तेव्हां मींच केला प्रश्न । त्याचें प्रतिवचन मीच देतों॥
सुख दुःख स्वप्नोपम । मन हें तयाचें धाम ।
मी असें आत्माराम । पूर्णकाम भूमरूप ॥ ६२ ॥
असा रायाचा सिद्धांत । ऐकूनी पुसे दत्त ।
त्वां हें केलें निश्चित । तरी सांग यथार्थ ॥ ६३ ॥
आतां तुला पाहिजे विजय । किंवा पाहिजे राज्य ।
किंवा न व्हावा अपाय । हें अमाय[1] सांग तूं ॥ ६४ ॥
राजा म्हणे भगवंता । आतां कायसी चिंता ।
आतां माझ्या चित्ता । नावडे सर्वथा राज्यादिक ६५

---

१. निष्कपट.

बंधूनें राज्य करितां । तें मी केलें तत्वता ।
त्याची इच्छा नाहीं आतां । गुरुदत्ता शपथ वाहे॥६६॥
जरी देह असती भिन्न । अंतर्यामीं आत्मा अभिन्न ।
तेव्हां भ्रातृराज्येंकरून । राज्यवान् मी न होई कीं ६७
श्रीदत्त म्हणे राजासी । असें जरी मानसी ।
तरी लोकानुभवासी । तूं दिससी रंकापरी ॥ ६८ ॥
मग तुझ्या मागें पुढें । चालतील कीं हत्ती घोडे ।
किंवा भालदार पुढें । राहूनी खडे पुकारतील कीं ६९
व्यर्थ जातील मनोरथ । बसाया न मिळे रथ ।
अलर्क म्हणे वाहतों शपथ । मनोरथ पूर्ण झाले॥७०॥
मला हात पायाचा जरी । संबंध नाहीं मग तरी ।
हे रथ अश्व करी । संबंध करी यांचा कोण ॥ ७१ ॥
मी असें असंग । देहादिकांचा संग ।
अश्वरथादिक मग । अंगोपांग कोणाचें ॥ ७२ ॥
स्वतः सिद्ध मी असें । आतां हत्ती घोडे कायसे ।
मला कांहीं इच्छा नसे । हें बोलतसें यथार्थ ॥ ७३ ॥
दातांनीं जिव्हा चावितां । कोण बळें पाडी दांतां ।
हातानें हाता मारितां । कोण हातां तोडील ॥ ७४ ॥
माझे हात माझे दांत । हें जाणतां कोण घात ।
करील कीं तसें येथ । कळतां अद्वैत कोण रिपु॥ ७५ ॥
आतां मला शत्रू नाहीं । आतां राज्याची इच्छा नाहीं
दुःखही मला नाहीं । न पडें मोहीं मी आतां ॥ ७६ ॥

चित्तीं असतां भ्रम । अनिवार्य उठे काम ।
होतां आत्माराम । सुखधाम स्वयें असे ॥ ७७ ॥

माझा गेला भ्रम । आतां झालों निष्काम ।
मीच आतां आत्माराम । आप्तकाम सर्वथा ॥ ७८ ॥

एक आकाश जसें । घटमठोपाधीनें नाना दिसे ।
देहोपाधीनें हें तसें । जीव अनेकसे भासती ॥ ७९ ॥

आकाशाचा खरा भेद । जसा नसे निर्विवाद ।
तसा आत्मयाचा भेद । नाहीं परिच्छेदरहित तो ८०

हें न कळे जंववरी । दुःख वाटे तंववरी ।
ज्ञान होतां तदुपरी । कोण करी मग दुःख ॥ ८१ ॥
जोंवरी असे अहंता । तोंवरी असे ममता ।
जोंवरी असे अज्ञता । राहती तोंवरी काममलोभ॥८२॥
आतां हे मजवरी । आपण कृपा केली बरी ।
अहंता ममता गेली दुरी । उजळतां अंतरीं ज्ञानदीप॥
कोणी छीः थूः करितां । किंवा वाईट म्हणतां ।
झोंबे तत्काळ चित्ता । हे अहंता तरतरे ॥ ८४ ॥
मांजरानें उंदीर खाता । दुःख न वाटे सर्वथा ।
मांजरानें शुका धरितां । वाटे सर्वथा वाईट ॥ ८५ ॥
आपुल्या पोरा ज्वर येतां । वाटे आपुल्याला ती व्यथा
शत्रूचीं पोरें मरतां । ती व्यथा न वाटे ॥ ८६ ॥
हा ममतेचा खेळ । एवं ममताऽहंताची केवळ ।
सर्व अनर्थांचें मूळ । हें निर्मूळ केलें आजी ॥ ८७ ॥

आतां झालों विवेकी। मी न सुखी न दुःखी।
कोणी कांहीं म्हणोत लोकीं। चित्तीं न लेखी मी तें हो
निर्मम निरहंकार। प्रकृतीहूनी पर।
मी असें हा निर्धार। कळला साचार मजलागीं॥८९॥
श्रीदत्त म्हणे भूपा। होतां माझी कृपा।
त्वां ओळखिलें निजरूपा। पुण्यपापातीत होऊनी ९०
मी म्हणतां ये संबंध। संबंधें घडे बंध।
शोक दे नित्य संबंध। हृदया वेध करूनी ॥ ९१ ॥
(श्लोक)॥ यावतः[1] कुरुते जंतुः संबंधान् मनसः प्रियान्।
तावंतोस्य निखंन्यंते[2] हृदये शोकशंकवः ॥ ९२ ॥
ममतेनें ये बंध। ममता तुटतां तुटे बंध।
मग कैंचा संबंध। होई निर्बंध विवेकी ॥ ९३ ॥
(श्लोक)॥ द्वे पदे बंधमोक्षाय न ममेति ममेति च।
ममेति बध्यते जंतुर्न ममेति विमुच्यते ॥ ९४ ॥
तुझी माता वरिष्ठा। सर्वदा ब्रह्मनिष्ठा।
जी मान्य योगानिष्ठा। तपोनिष्ठा वंद्य जी ॥ ९५ ॥
तियेचें दुग्धपान। तुवां केलें म्हणोन।
जाहलें शुद्धांतःकरण। ज्ञान झालें क्षण न लागतां ९६
ही मात साधुसंगाची। कोण तुळणा करील त्याची।
नोहे क्षण सत्संगाची। आणि स्वर्गसुखाची बरोबरी॥
सत्संग घडला म्हणून। वैराग्य बाणलें पूर्ण।
करितां एकची प्रश्न। आत्मज्ञान जाहलें ॥ ९८ ॥

१ जितके. २ ठोकले जातात.

आत्मज्ञानेंकरून । ममताऽहंता दिली दवडून ।
जेवी वेगें पवन । दे उडवून शाल्मलीतूल ॥ ९९ ॥
ज्याचें बीज अज्ञान । अहंकार अंकुर जाण ।
ममता शाखा विस्तीर्ण । गृहक्षेत्रधन विशाखा[1] १००
आप्त स्त्री पुत्र पल्लव जाण । पुण्यापुण्य प्रसून ।
सुख दुःख हीं दोन । फळें जाण तयांचीं ॥ १०१ ॥
हा संसारवृक्ष ऐक । मोक्षमार्गव्यापक ।
हा केवळ मायिक । येथें सुख कैचें रे ॥ १०२ ॥
असंग शस्त्र घेऊनी । हा वृक्ष मुळापासूनी ।
तोडूनी टाकिला ज्यांणीं । मार्ग त्यांणीं मिळविला ॥
तेची परपदीं जाऊन । सुखें विश्रांत घेऊन ।
अद्वितीय होऊन । राहती जाण निश्चयें ॥ १०४ ॥
राज्य भूतेंद्रियग्राम । जें दिसे स्थावर जंगम ।
हें सर्व रूप नाम । मायेचें कर्म अगाध ॥ १०५ ॥
जें हें देहेंद्रियादिक । तें क्षेत्र मायिक ।
याहूनी क्षेत्रज्ञाचा विवेक । करी एक धन्य जगीं १०६
जेंवी मशक उदुंबराहून । कीं जळाहूनी मासा भिन्न ।
तेवी जडक्षेत्राहून । क्षेत्रज्ञ भिन्न तूं जाणिला ॥१०७॥
असाच शिष्य मिळावा । दृष्टीं पडता कृतार्थ व्हावा ।
अन्यथा घ्यावया सेवा । गुरुशिष्यभावा गणावें १०८
इति श्रीदत्तमाहात्म्ये एकत्रिंशोऽध्यायः ॥ ३१ ॥
॥ श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

१ विविध.

# अध्याय बत्तिसावा

## श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

दीपक म्हणे गुरूस । कृतार्थ केलें अलर्कास ।
मग पुढें तयास । काय विशेष निरोपिलें ॥ १ ॥
गुरु म्हणे दीपका । श्रीदत्तानें एका ।
प्रश्नें बोधिलें अलर्का । ज्ञानार्का उदित केलें ॥ २ ॥
अलर्क म्हणे भगवंता । पूर्ण प्रसाद केला आतां ।
झाली खास कृतार्थता । उद्वेग चित्ता न येची ॥ ३ ॥
स्वात्मरूपाह्वन । अहंकाराचें पृथक्करण ।
करावया मुनिगण । तप आचरण करितात ॥ ४ ॥
कल्पकोटी जातां । जो नये मूर्खांच्या हातां ।
तया आत्मया आतां । अभिन्नपणें दाविलें ॥ ५ ॥
जयजया जगन्नाथा । तुझ्या पायीं ठेवूं माथा ।
प्रार्थना असे एक आतां । ती समर्था ऐकावी ॥ ६ ॥
जें हें जाहलें ज्ञान । तें राहावें स्थिर होऊन ।
येथें पसरलें वासनावन । चित्तपवन आंत[1] चाले ॥७॥
याच्या जोरानें तत्वज्ञान । न जाणों जाईल कीं उडोन ।
तरी उपाय सांगोन । स्थिर करून द्यावें हें ॥ ८ ॥
घडल्याही दुर्जनाचा संग । याचा न व्हावा वियोग ।
म्यां व्हावें निःसंग । असा योग सांगावा ॥ ९ ॥

१ त्या वनांत.

जन्म मिळतां मनुष्याचें। हेंच कर्तव्य तयाचें।
अन्यथा साफल्य न तयाचें। विषयांच्या सेवनानें १०
नाना योनी फिरोन। दैवयोगें करून।
मनुष्यजन्मा पावून। न करी पावन आपणा जो ११
नरकीं जे भोगिले भोग। तेच येथें भोगितो भोग।
जो तयांचा करी वियोग। जो विराग न धरी ॥ १२ ॥
जो न होई निःसंग। त्याचें सर्व व्यंग।
त्याचा तो भवरोग। सदा अभंग जाणावा ॥ १३ ॥
हें सर्व समजून। बरवेपणीं उमजून।
म्यां केला हा प्रश्न। कृपावलोकन करा आतां॥ १४ ॥
असा अलर्काचा प्रश्न। ऐकूनियां अत्रिनंदन।
म्हणे उत्तम केला प्रश्न। समाधान पावलों ॥ १५ ॥
(श्लोक) शृणुष्वावहितो[1]ऽलर्क मुक्तये कारणत्रयं।
तत्वज्ञानं मनोभंगो वासनाक्षय एव च ॥ १६ ॥
अलर्का मुक्तीचें कारण। पहिलें तत्वज्ञान।
दुसरें मनाचें शमन। तिसरें जाण वासनाक्षय ॥१७॥
स्ववर्णाश्रमोचित। फलाभिमानरहित।
कर्मैं करितां सतत। शुद्धचित्त होय नर ॥ १८ ॥
उपयोग काय कर्मांचा। असा कुतर्क मनाचा।
न करावा तयांचा। उपयोग साचा सांगतों ॥ १९ ॥
(श्लोक) महापापवतां नृणां ज्ञानयज्ञो न रोचते।
प्रत्युत[2] ज्ञानयज्ञस्तु प्रद्वेष्यो भासते स्वतः ॥ २० ॥

---

१ सावधान होऊन. २ उलट.

(अर्थ) पदरीं पुंज असतां पापांचे। तया नरा ज्ञानयज्ञ न रुचे।
एवढेंच नोहे त्यांचें। ज्ञानयज्ञासी द्वेषी मन ॥ २१ ॥
स्ववर्णाश्रमोचित। करितां कर्में ईश्वरार्पित।
तेणें होय शुद्ध चित्त। मग हो सतत श्रवणरुची॥२२॥
(श्लोक) रुचिद्वारोपकुर्वंति कर्माण्यात्मविमुक्तये।
अज्ञानस्याविरोधित्वान्न साक्षादात्मबोधवत् ॥ २३ ॥
अविद्याया न चोच्छित्तौ ज्ञानादन्यदपेक्षते।
ज्ञानोत्पत्तौ तु नैवान्यच्छमादिभ्यो ह्यपेक्षते ॥ २४ ॥
शमाद्युत्पत्तये नान्यच्चित्तशुद्धेरपेक्षते।
चित्तशुद्धौ च नित्यादिकर्मभ्यो नान्यदिष्यते ॥ २५ ॥
पारंपर्येण कर्मैवं ज्ञानार्थैवोपयुज्यते।
चित्ताशुद्धेरनुदयाच्छमादेर्न विमुच्यते ॥ २६ ॥
(ओवी) रुचिद्वारें कर्में तीं। ज्ञानाला उपयुक्त होती।
अज्ञानासी विरुद्ध नसती। म्हणूनी साक्षाज्ज्ञानवत मुक्ती न देती ॥ २७ ॥
होतां अविद्येचा नाश। मुक्ती मिळे ख्यास।
ज्ञानानें अविद्यानाश। होतो ख्यास जाणावा॥ २८ ॥
मिळतां शमादिक। ज्ञान मिळे सम्यक।
तेही शमादिक। चित्तशुद्धीनें मिळती ॥ २९ ॥
चित्तशुद्धी कर्में होते। असें परंपरेनें कर्म तें।
ज्ञानाला उपयुक्त होतें। म्हणूनी तें आदरावें॥ ३० ॥

चित्तशुद्धी होतां । संन्यास करावा तत्वतां ।
करूनी दृढ चित्ता । सद्गुरूला शरण जावें ॥ ३१ ॥
गुरुशुश्रूषा करून । करावें वेदांतश्रवण ।
अन्वय[1] व्यतिरेकें[2] जाणून । करावें मनन श्रवणाचें ॥ ३२ ॥
जें होय वाक्यज्ञान । तें हा अभ्यास करून ।
स्थिर करितां भंगे मन । वासनानाश होईल ॥ ३३ ॥
प्राकृत[3]गुणासी वियोग । परब्रह्मासी योग ।
इचें नांव मोक्ष चांग । होतां निःसंग मिळेल ॥ ३४ ॥
वैराग्यानें संग तुटे । ज्ञानें वैराग्य भेटे ।
विवेकें ज्ञान उमटे । सदसद्विचारें विवेक हे ॥ ३५ ॥
देहेंद्रिय मनःप्राण । अहंकार अंतःकरण ।
हे भौतिक सगुण । हे सविकार निश्चित ॥ ३६ ॥
पराक् असती असत[4] । जरी होतां संयुक्त ।
तरी ते संहत[5] असत । ते परार्थ जाणावें ॥ ३७ ॥
ते स्वतः जड असुनी । अन्योन्याध्यासें करूनी ।
येती चेतनसे दिसूनी । अग्निसंयोगें लोह जसें ॥ ३८ ॥
देहादिक जड असूनी । आत्मसान्निध्येंकरूनी ।
येती चेतनसे दिसूनी । हें अज्ञानी नेणती ॥ ३९ ॥
प्रत्यगात्मा[6] तयांहूनी । वेगळा साक्षी असूनी ।
अध्यासे विपरीत भासूनी । ये अज्ञानी जनाला ॥ ४० ॥

---

१ यत्सत्वे यत्सत्व, माळेच्या सूत्राप्रमाणें व्यापून असणें, मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव. २ यदभावें यदभावः; व्याप्ति नसणें. ३ प्रकृतीचे गुण सत्व, रज, तम. ४ खोटें. ५ समुदायानें झालेलें. ६ अंतरात्मा आंत बाहेर व्यापून राहणारा.

मग उठे अहंकार। मग कर्मं करिती सादर।
कर्मं बंध पडे घोर। तेणें वारंवार भ्रमण होय॥ ४१ ॥
अज्ञानें अविवेक गहन। अविवेकें अभिमान।
अभिमानें रागादिक उठोन। त्रिविध कर्म घडून ये ॥
कर्मं उपजे शरीर। कर्मं सुख दुःख घोर।
एवं ही वारंवार। परंपरा चालेल ॥ ४३ ॥
होतां अपरोक्षज्ञान। नष्ट होई अज्ञान।
नष्ट होतां अज्ञान। नष्ट होई अविवेक ॥ ४४ ॥
होतां अविवेकाचा नाश। होतो अभिमानाचा नाश।
होतां अभिमानाचा नाश। रागादिनाश होतसे॥४५॥
कर्मनाशें शरीर न होई। मग सुख दुःख जाई।
असा बोध जेव्हां होई। मग येई मोक्षसुख ॥ ४६ ॥
तेव्हां ज्ञानावांचून। नोहे कधीं समाधान।
मनोनाश होतां जाण। ज्ञान पूर्ण बाणें तें ॥ ४७ ॥
मनोनाशाकरितां। योगाभ्यास करावा तत्वता।
मग वासनाभंग होतां। विदेहकैवल्य मिळेल॥ ४८ ॥
म्हणोनी सांगतों योगाभ्यास। सांगोपांग तूं परिस।
एकाग्र करोनी चित्तास। मग खास निवशील ॥४९॥
होता मनाची समता। योग ये आपुल्या हाता।
मग ती मुक्तता। ये हाता अनायासें ॥ ५० ॥
अलर्क पुसे गुरूसी। चंचळत्व असे मनासी।
मग समता तयासी। येईल कसें सांगावें ॥ ५१ ॥

(श्लोक)॥ युज्यते वेष्टनं वायोराकाशस्य च खंडनं ।
ग्रंथनं च तरंगाणां नास्था मनसि युज्यते ॥ ५२ ॥
(ओवी)॥ असें अलकाचें वचन । ऐकोनि बोले अत्रिनंदन।
म्हणे तुझें सत्यवचन । चपळ मन दुर्जय ॥५३॥
वैराग्य किंवा अभ्यास । हे जयोपाय तयास ।
वैराग्य होतां त्यास । ये मनास निश्चळता ॥ ५४ ॥
दोषदृष्टी विषयांवरी । १मग जिहासा तयावरी ।
पुन्हा आठवतां वीट भारी । येतां बरी विरक्ती हो ॥
किंवा अभ्यासाचा योग । तो असे अष्टांग ।
हा करी दुःखवियोग । दुःसंग तोडुनी ॥ ५६ ॥
यमनियमीं देह शोधून । आसनीं स्थैर्य पावून ।
प्राणायामीं दोष शोषून । पिंडशोधन होतसे ॥ ५७ ॥
प्रत्याहारें इंद्रियजय । धारणेनें पापक्षय ।
ध्यानानें मनःस्थैर्य । एकत्व होय समाधीनें ॥ ५८ ॥
जसें सुवर्ण मलीन होतां । अग्नीचा ताव देतां ।
तया ये पूर्वरूपता । मळ मळतां निश्चयें ॥ ५९ ॥
तैसें योगाभ्यासें । मनोमळ जळतसे ।
पूर्वरूप येतसे । बोलतसे असें वेद ॥ ६० ॥
प्राणापाननिरोधन । तोचि प्राणायाम जाण ।
त्याचे त्रिविध लक्षण । लघुमध्योत्तमभेदें ॥ ६१ ॥
घर्म ये लघुप्राणायामें । कंप उठे मध्यमप्राणायामें ।
ब्रह्मरंध्रीं उत्तमप्राणायामें । प्राण जाई निश्चित ॥६२॥

---

१ टाकण्याची इच्छा.

वामहातीं टाळीं देऊन। तया करावी प्रदक्षिण।
हें मात्रेचें प्रमाण। किंवा श्वासोच्छ्वास निद्रिताचा॥
किंवा तर्जनी फिरवून। जानूसी करावी प्रदक्षिण।
एक चुटकी वाजवून। मात्रामान मानावें ॥ ६४ ॥
बारा मात्रांसी सम। कनिष्ठ प्राणायाम।
चोविसांनीं मध्यम। उत्तम अठ्ठेचाळिसांनीं ॥ ६५ ॥
श्वास घेणें तो पूरक। धरणें तो कुंभक।
सोडणें तो रेचक। मिळोनी एक प्राणायाम ॥ ६६ ॥
तया पुरकाहून। कुंभक तो चतुर्गुण।
रेचक साधावा द्विगुण। उत्तरोत्तर जाण वाढवावा॥
जोरानें रेचक करितां। शीघ्र येई दुर्बळता।
सोईसोईनें सोडितां। ये अरोगता निश्चित ॥ ६८ ॥
हळुहळू करितां अभ्यास। जिंकवेल प्राणास।
जसा सोईनें सिंहास। वश्य ग्वास करवेल ॥ ६९ ॥
बळें वश्य करितां। कधीं न ये हातां।
हळूहळू अभ्यासितां। होय वश्य निश्चयें ॥ ७० ॥
वश्य करितां जसा हरी। छू करितां मृगा धरी।
वश्य करितां तयापरी। प्राण मळातें ॥ ७१ ॥
वश्य होतां सिंह। न तोडी धन्याचा देह।
वश्य प्राणें देह। नोहे पीडित ॥ ७२ ॥
चालतां अभ्यासक्रम। नासे शुभाशुभ कर्म।
ईचें[1] ध्वंसती नाम। योगी विश्वास पावती ॥ ७३ ॥

१ शुभाशुभ कर्मांचा नाश.

जे लोभमोहात्मक । सर्वकाम ऐहिक ।
तसेच पारलौकिक । हे सकाळिक नष्ट होती ॥ ७४ ॥
शांत होय चित्तवृत्ती । होई सुखाची प्राप्ती ।
इला प्राप्ती म्हणती । योगी डुल्लती जियेनें ॥ ७५ ॥
वाढे ज्ञानसंपत्ती । त्रैकालिक अर्थ कळती ।
ही प्राणजयाची स्थिति । इला म्हणती संवित्त ॥७६॥
इंद्रियें होती प्रसन्न । मन पावे समाधान ।
ही प्रसाद म्हणून । अवस्था जाण चवथी ॥ ७७ ॥
ह्या अवस्था चार । साधी तो योगीश्वर ।
त्याला ईश्वर नाहीं दूर । त्याच्या बरोबर प्रत्यक्ष वसे॥
असें व्हावया साधन । अभ्यासक्रम सांगेन ।
ऐक तूं मन देऊन । समाधान पावशी ॥ ७९ ॥
पद्मासनीं बैसोन । शरीर करोनी समान ।
दांतां दांत न लावून । दृष्टी ठेवून नासाग्रीं ॥ ८० ॥
हालवितां अंग । शीघ्र न साधे योग ।
म्हणूनी ताठूनी अंग । धरितां योग साधेल ॥ ८१ ॥
आळस निद्रा भ्रांती । ह्या तमोगुणाच्या वृत्ती ।
त्या जिंकूनी पुढती । योगाभ्यास करावा ॥ ८२ ॥
काम क्रोध लोभ यत्न । या रजोगुणवृत्ती जाण ।
या विक्षेपें न घडे ध्यान । म्हणूनी ह्या सोडाव्या ८३
वैराग्य शमदमादिक । या सत्ववृत्ती सम्यक ।
ह्या धरितां साधक । पावे सुख अभ्यासीं ॥ ८४ ॥
जो केवळ कुंभक । न साधे सम्यक ।
तोंवरी पूरक रेचक । धरूनी कुंभक साधावा ॥ ८५ ॥

न घेतां न सोडितां। उगी स्तब्ध राहतां।
प्राण न हो खालता। अथवा वरता योग्यां ॥ ८६ ॥
योगी न हो घाबरा। वायू कोंडे बरा।
केवळ कुंभक तो खरा। तो साधावा यत्नानें ॥ ८७ ॥
असा प्राण जिंकावा। मग प्रत्याहार करावा।
तेणें मग जीवा। समाधान वाटेल ॥ ८८ ॥
जसा कूर्म अंगें आवरी। तसा जेव्हां इंद्रियां सांवरी।
तेव्हां प्रत्याहार होय तोंवरी। ना वारिजेल बाह्य भान
होता प्रत्याहार। शब्द नये कानावर।
स्पर्शे नेणें शरीर। घडतें बाहेर काय तें ॥ ९० ॥
विषय ठावे न होती। इंद्रियें स्थिर राहती।
ही प्रत्याहाराची स्थिती। योगी जाणती आत्मनिष्ठ॥
प्रत्याहार झाल्यावरी। धारणा करावी बरी।
नाभ्यादि देशावरी। चित्तस्थिरीकरण व्हावें ॥ ९२ ॥
ही धारणा साधतां। दोष जाती सर्वथा।
योगिया ये स्वस्थता। उद्विग्नता न येईल ॥ ९३ ॥
मग करावें ध्यान। चित्तैकाग्र्य होऊन।
होई परम समाधान। हें साधन उत्तम ॥ ९४ ॥
हें ध्यान विसरतां। जेव्हां ध्येयाकारता।
आपोआप ये चित्ता। हे समाधी जाणावी ॥ ९५ ॥
न हाले न चाले मन। ध्येयाकार होऊन।
निश्चल राहे अनुदिन। हे जाण समाधी ॥ ९६ ॥
आपण आपणा पाहून। राहे संतोषून।
हालावया तेथून। न होय भान सर्वथा ॥ ९७ ॥

हेंचि निरुपाधिक। जाणावें नित्य सुख।
याहूनी नसे अधिक। त्रिभुवनीं सुख सर्वथा ॥ ९८ ॥
ह्या सुखाचें लक्षण। वर्णून सांगेल कोण।
हें आपुलें आपण। जाणावें पूर्णपणानें ॥ ९९ ॥
हा सर्व रसांचा रस। याहून जे रस।
ते यापुढें विरस। तयां रस कोण म्हणेल ॥ १०० ॥
इतर जे रस। ते ठावें इंद्रियांस।
हा अतींद्रिय रस। बुद्धिवृत्तीस घेववेल ॥ १०१ ॥
विषयरस नश्वर। असती क्षणभंगुर।
तेणें विरहताप थोर। ते निरंतर न मिळती ॥ १०२ ॥
विषयरस सोपाधिक। हा रस निरुपाधिक।
हेंचि स्वरूपसुख। नसे अधिक याहून ॥ १०३ ॥
हें सुख स्वाधीन। इतर तें पराधीन।
येथें होता लीन। सर्व शीण उतरे ॥ १०४ ॥
अलर्का याहून। मोक्षाचें साधन।
सुगम नसे आन। म्हणोनी योग करी तूं ॥ १०५ ॥
अभ्यासाचे गुणदोष। जाणावे ते निःशेष।
तरीच होय तोष। ना तरी त्रास होई ॥ १०६ ॥
गुण दोष न जाणून। करितां योगध्यान।
योगी पावे समाधान। नातरी विघ्न येईल ॥ १०७ ॥
इति श्रीदत्तमाहात्म्ये द्वात्रिंशत्तितमोऽध्यायः ॥ ३२ ॥
॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

# अध्याय तेहतिसावा

## श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

गुरु म्हणे शिष्यासी । परिसूनी गुरुवचनासी ।
राया पुसे भावेंसी । श्रीगुरुसी वंदूनी ॥ १ ॥
अभ्यासाच गुण दोष । म्हणे सांगा निःशेष ।
जेणें होय विशेष । हा निर्दोष अभ्यास ॥ २ ॥
ऐकून त्याचें वचन । बोले मुनिनंदन ।
भूपा ऐक सावधान । दोष निरूपण करितों ॥ ३ ॥
जाणूनी गुणदोष । करितां योगाभ्यास ।
सिद्धी मिळे खास । हा विश्वास धरावा ॥ ४ ॥
पीडित अथवा क्षुधित । किंवा व्याकुळ चित्त ।
क्रोधभरें व्याप्त । किंवा अशान्त हो जरी ॥ ५ ॥
त्याणें करितां अभ्यास । उपशम न ये चित्तास ।
तेव्हां वारूनी हे दोष । मग अभ्यास करावा ॥ ६ ॥
जवळी असतां दुर्जन । न करावें अभ्यसन ।
विघ्न होय दारुण । यास्तव दुर्जन वर्जावा ॥ ७ ॥
होतां अतिशीतकाळ । किंवा अतिउष्णकाळ ।
किंवा अतिवृष्टिकाळ । वर्जावा तो वेळ अभ्यासा ॥ ८ ॥
अति वात उठतां । किंवा पुढचें भय कळतां ।
अभ्यासीं न योजावें चित्ता । ध्याना विघड पडेल ॥ ९ ॥
अभ्यास न करावा नदीतिरीं । किंवा स्मशानांतरीं ।
शुष्कवृक्षातळीं जरी । करी तरी अनर्थ ये ॥ १० ॥

आड नसतां जरी । उघड्या जागीं जप करी ।
तरी विघ्न ये निर्धारीं । हें अंतरीं धरावें ॥ ११ ॥
हें जरी न मानून । अशा ठायीं बसून ।
मूढ करी अभ्यसन । त्याला व्यसन ओढवेल ॥१२॥
तया स्मृतिलोप होईल । आणि बाधिर्य येईल ।
किंवा मुका होईल । किंवा होईल आंधळा ॥ १३ ॥
किंवा जडत्व येईल । उचकी श्वास उठेल ।
किंवा वायू होईल । किंवा क्षोभेल कफपित्त ॥ १४ ॥
अलर्क म्हणे गुरूसी । जरी मूढपणेंसी ।
केलें असेल दोषासी । विघ्न तयासी येईल ॥ १५ ॥
तरी त्या दोषावर । काय करावा प्रतिकार ।
ज्याणें दोष जाईल दूर । होईल क्षिप्र आरोग्य ।
असा सांगा उपाय । जेणें हटे अपाय ।
असें म्हणोनी पाय । धरी राय गुरूचे ॥ १७ ॥
ऐकोनी त्याची विनंती । श्रीगुरु तयाप्रती ।
प्रेमभरें सांगती । ऐके नृपती एकाग्रें ॥ १८ ॥
भलते ठायीं जरी । योगी अभ्यास करी ।
मग दोष उठती जरी । तरी उपाय हा असे ॥ १९ ॥
अर्धपाव साळीचे तांदूळ । सहापट घालावें जळ ।
मंदाग्नीवरी सुवेळ । पाक करावा ॥ २० ॥
याला यवागु म्हणती । योगी याला सेविती ।
सर्वदोष घालविती । ही युक्ती बरी असे ॥ २१ ॥
(श्लोक) यवागूः षड्गुणजले रचिता विरलोदना ॥ २२ ॥

असें युवागूचें[1] लक्षण । वैद्यकीं योग्य असे निरूपण ।
हें उत्तम साधन । प्रत्येका अनुपान भिन्न असे ॥ २३ ॥
हें अनुपान । स्वबुद्धी योजून ।
करितां यवागूसेवन । दोषोपशमन होईल ॥ २४ ॥
उष्णं[2] यवागू घेऊन । त्यांत घृत घालून ।
तें मिश्र करून । त्याचें प्राशन करावें ॥ २५ ॥
यवागू पिऊन । दोषाकडे लक्ष्य देऊन ।
बसावें समाधान । दोषशमन होईल ॥ २६ ॥
ज्या ठायीं वातादिक । तेथें चित्त लावावें एक ।
चिंतिता सम्यक् । वातादि जातील ॥ २७ ॥
अंग राहे कांपोन । तरी यवागू पिऊन ।
चित्तीं पर्वत आणून । राहतां कंप नष्ट होईल ॥ २८ ॥
दोषें ऐकूं न येतां । कर्णीं लावावें चित्ता ।
मग बाधिर्य जातां । ऐकूं येईल ॥ २९ ॥
जरी बोलूं न येतां । वचनीं चित्त लावितां ।
यवागूनें मूकता । जाई वक्तृत्वता ये नरा ॥ ३० ॥
जन्माचे जे दोष । ते न जाती निःशेष ।
अभ्यासें येती जे दोष । ते निःशेष जातील ॥ ३१ ॥
आपुलें दोषस्थान । बरवें ओळखून ।
यवागू पिऊन । त्या स्थानीं मन लावावें ॥ ३२ ॥

१ यवागु किती बाकी राखावी किंवा फक्त चोथा घ्यावा काय. २ दोष-निवृत्तीसाठीं पातळ कणेरीसारखी खावी आणि रोजचे अभ्यासासाठीं यवागूचा चोथा खावा.

अशी धारणा करितां। दोष जाई सर्वथा।
देहीं दाह होतां। शीतचिंता करावी ॥ ३३ ॥
देहीं शीत होतां। सूर्यध्यान करितां।
परिहरे शीतता। ये उष्णता शरीरीं ॥ ३४ ॥
करितां वाताग्निध्यान। भूत जाती पळोन।
घ्यावापृथ्वीचें ध्यान। पळे विघ्न बारा वाटा ॥ ३५ ॥
जरी लक्ष्य चुकोन। भलतेकडे जाई प्राण।
किंवा ब्रह्मरंध्रांतून। न उतरे कांहीं केलिया ॥ ३६ ॥
उठतां दोष हे। स्वयें परिहार नोहे।
जरी तसाची राहे। तरी नोहे बरवें ॥ ३७ ॥
सन्निध असे जो जन। त्याणें हें धोरण।
ठेवून करावा यत्न। प्राण यावया स्थानावरी ॥ ३८ ॥
स्निग्धद्रवेंकरून। करावें टाळूचें मर्दन।
वरी काष्ठ ठेवून। करावें ताडन काष्ठानें ॥ ३९ ॥
असें ताडितां हळू हळू। प्राण उतरे तत्काळ।
न होई व्याकूळ। न हो निर्बळ या उपायें ॥ ४० ॥
अथवा उभय भाग गळयाचे। लेपन करूनी स्निग्ध द्रव्याचें।
मर्दन करितां योग्यांचे। प्राण येई जाग्यावर ॥ ४१ ॥
अथवा शृंगी घेऊन। दक्षिणकर्णसन्निधान।
हळू हळू वाजवितां प्राण। येई स्थान लक्षूनी ॥ ४२ ॥
हें मळकट शरीर। परी असे मोक्षद्वार।
त्याच्या रक्षणीं सादर। योगीश्वर राहती ॥ ४३ ॥

जरी कां हें शरीर। असे खास नश्वर।
तरी ध्रुव जें परात्पर। तत्प्राप्तिद्वार हेंच एक ॥ ४४ ॥
योगयागादिक। किंवा करणें श्रवणादिक।
तरी द्वार हें एक। नृशरीर चोख न दुजें ॥ ४५ ॥
असें राखून शरीर। अभ्यास करावा सादर।
मग विघ्न पळे दूर। सिद्धी ये लवकर योगाची ॥४६॥
होतां चित्त प्रसन्न। सुस्वर अग्निदीपन।
इंद्रियचापल्य जाऊन। होई आरोग्य शरीरीं ॥ ४७ ॥
विष्ठामूत्र अल्प होई। अंगीं सुगंध येई।
दृष्टी स्वच्छ होई। पहिलें लक्षण सिद्धीचें ॥ ४८ ॥
शरीर कृश होई। अंतरीं आनंद होई।
अंगावरी कांती येई। हें दुसरें लक्षण सिद्धीचें ॥४९॥
शीतोष्णादि न कळती। मलामध्यें न ये भीती।
दृढ होई स्थिती। हें तिसरें लक्षण सिद्धीचें ॥ ५० ॥
सिद्ध होऊं येतां योग। तेव्हां येती उपसर्ग।
अभ्यास टाकी योगी मग। करी व्यासंग सिद्धीचा ॥
जरी सिद्धीकडे फिरे। तरी योग अंतरे।
मग ध्यान नुरे। व्यर्थ फिरे योगी तो ॥ ५२ ॥
अलर्क म्हणे गुरूसी। ते उपसर्ग योगियासी।
विघ्न करिती ते आम्हांसी। विस्तारेंसी निरोपावे ५३
श्रीदत्त म्हणे पार्थिवा। उपसर्ग ऐकावे तुवां।
अभ्यास न आवडे देवा। ते हे उपसर्ग दाविती॥५४॥

तया उपसर्गांची। योगिया लागतां लालुची।
रूची उडे योगाची। इच्छा भोगाची उपजे तया॥५५॥
तया काम्यकर्मांची। बरवी लागे रूची।
आवडी धरी अनुष्ठानाची। देती देव त्यांचीं फळें शीघ्र
मग तयासी द्रव्याची। बरीच लागे लालुची।
द्रव्य मिळतां भोगांची। इच्छा साची धरी तो॥५७॥
देव होती सानुकूळ। द्रव्य देती विपुल।
सुंदरी होती अनुकूळ। मिळे भोगबळ तेंही ॥ ५८ ॥
नाना काम उठती। देव ते ते पुरविती।
ऐहिक भोग मिळती। मिळती तया दिव्य भोग॥५९॥
लक्ष्मी मिळे इच्छितां। फळ ये संकल्प करितां।
विद्या मिळे यत्न न होतां। जय ये हाता अनायासें॥
साधे तया इंद्रजाळ। मंत्रजाळ तंत्रजाळ।
सफळ होई यंत्रजाळ। यश विपुळ मिळे तया ॥६१॥
राज्यही इच्छी मग। देवत्वा करी याग।
ते सर्व होती सांग। नोहे व्यंग कदापी ॥ ६२ ॥
इच्छा होई स्वामित्वाची। आणि रसायनक्रियेची।
चाड धरी किमयांची। त्याची सिद्धि होत जाय॥६३॥
मला लोकीं मानावा। मला लोकीं पुजावा।
मोहें धरी अशा भावा। म्हणे व्हावा लाभ मज ६४
किंवा तो भोजन। उत्तरोत्तर करी न्यून।
लोकां दे कळवून। मी अनशन असें कीं ॥ ६५ ॥

इच्छी आकाशगमन। भूत भौतिक वशीकरण।
इच्छी स्वैर गमन। सर्वांचें मन ओळखाया ॥ ६६ ॥
देवतामंत्रसिद्धी। नवीन कर्मांची प्रसिद्धी।
बरीच चालवी बुद्धी। योगसिद्धीबळानें ॥ ६७ ॥
भूत भविष्य ज्ञान। सांगून दे वर्तमान।
लोकीं मिळावा मान। असें मन होतसे ॥ ६८ ॥
हें सर्व विघ्न जाण। योगनाशकारण।
यां देतां सोडून। योगसाधन होतसे ॥ ६९ ॥
हे उठती उपसर्ग। जरी मिळतां नाना भोग।
तरी निष्फळ होई योग। तपोभंग होतसे ॥ ७० ॥
जो असेल ज्ञानी। मनीं विचार करूनी।
यांचें भय मनीं। तो ध्यानीं रत होईल ॥ ७१ ॥
ईश्वरीं ठेवितां भाव। होई विघ्नांचा अभाव।
त्याचा प्रवृत्तिस्वभाव। फिरे भावबळानें ॥ ७२ ॥
योगसिद्धी हाता येतां। ये वेदशास्त्रज्ञता।
करूं येई कविता। शिल्पनिपुणता होतसे ॥ ७३ ॥
सर्व येई भासून। ही प्रातिभा[1] म्हणून।
सिद्धी मानिती योगीजन। हें विघ्न मोठेंच ॥ ७४ ॥
होई सर्व शब्दार्थज्ञान। ऐके शब्द दुरोन।
हिचें नाम श्रवण। योगविघ्न करी सिद्धी हे ॥ ७५ ॥
श्रवणसिद्धी होतां। तया दिसती देवता।
योगविध्वंसता। करी तत्वता सिद्धी हे ॥ ७६ ॥

१ सिद्धीचें नाम.

निरालंबें फिरे। पाहिजे तसा वावरे।
तेणें योग अंतरे। विभ्रमनामक सिद्धी ये ॥ ७७ ॥
होई सर्वज्ञान। न खुंटे कोठें मन।
हें विघ्न दारुण। आवर्तकसंज्ञक सिद्धी हे ॥ ७८ ॥
देव ह्या सिद्धी देती। योगी तयां भुलती।
ते संकटीं पडती। तया गती न होय ॥ ७९ ॥
जातां राजदर्शना। पाहतां पदार्थ नाना।
तेथें रमवितां मना। राजदर्शना मुकती ॥ ८० ॥
येथेंही तेच गती। जे सिद्धी पाहती।
तेथें जरी भुलती। ते मुकती आत्मदर्शना ॥ ८१ ॥
इकडे तिकडे न पाहे। तो न फसे मोहें।
तो न घे सिद्धीफळ हें। तो पाहे स्वात्मया ॥ ८२ ॥
ईश्वरावर भरंवसा। ठेवूनी करितां अभ्यासा।
तो न फसे तसा। अभक्त जसा फसतो ॥ ८३ ॥
अभ्यासें प्रत्याहार। योगियानें साधिल्यावर।
अभ्यास धारणेवर। वारंवार ठेवावा ॥ ८४ ॥
ठेवितां पृथ्वीधारणा। तद्रूप मानी आपणा।
घेई पंचगुणा। स्थूलपणा सोडूनी ॥ ८५ ॥
पादादि जानुपर्यंत। चतुरस्त्र[1] पीत।
लं बीजानें युक्त। हे योगिसंमत भूधारणा ॥ ८६ ॥
जान्वादिनाभिपर्यंत। धनुराकार उदकश्वेत।
वं बीजानें युक्त। हे योगिसंमत आपधारणा ॥ ८७ ॥

१ चौकोनी.

नाभ्यादि हृदयपर्यंत । अग्नी त्रिकोण रक्त ।
रं बीजानें युक्त । हे संमत अग्निधारणा ॥ ८८ ॥
हृदयादि भ्रूमध्यपर्यंत । ध्वजाकार धूम्रवात ।
यं बीजानें युक्त । हे संमत वातधारणा ॥ ८९ ॥
भ्रूमध्यादि ब्रह्मरंध्रांत । नीलवर्ण आकाशवृत्त ।
हं बीजानें युक्त । हे संमत आकाशधारणा ॥ ९० ॥
ह्या धारणा करितां । योग्या ये सूक्ष्मता ।
मग निर्विकारता । ये सहज योगिया ॥ ९१ ॥
ह्या पांच धारणा होतां । मग चंद्रदेवता ।
धारणेनें मना ध्याता । निर्गुणता येतसे ॥ ९२ ॥
बृहस्पती जिची देवता । जिला निश्चयात्मता ।
त्या बुद्धीतें चिंतितां । संकल्प विकल्पता न उठे ॥ ९३ ॥
ह्या सात धारणा । करितां योगिराणा ।
सोडी सूक्ष्मपणा । विरागपणा पूर्ण ये ॥ ९४ ॥
विषयासक्ती जाय । होई योगी जितेंद्रिय ।
सर्व दैव सुखमय । निरामय होय तो ॥ ९५ ॥
ह्या करितां धारणा । गंधादिकांच्या वासना ।
नाठविती त्याच्या मना । तो जनाहूनी विलक्षण ९६
जया गंधादिकांची आसक्ती । तया ये पुनरावृत्ती ।
तया न मिळे गती । योगी सेविती जियेतें ॥ ९७ ॥
ह्या धारणा होतां । संगती न करी सर्वथा ।
तयाची वशीकार विरक्तता । निर्विघ्नता सिद्धी घे तो

ह्या करितां धारणा । मुक्तसंग योगीराणा ।
स्वच्छंदें धरी प्राणा । देव तच्चरणा वंदिती ॥ ९९ ॥
तो न होई अहंवादी । मग कैसा अनृतवादी ।
तया म्हणतील अतिवादी । ब्रम्हानंदीं निमग्न हो१००
धारणेनें सौक्ष्म्य कळतां । सहज ये वशता ।
मग ध्यानीं बसतां । त्याच्या चित्ता स्थैर्य ये ॥१०१॥
तयानें जिंकिलें आसन । त्याणेंच जिंकिला प्राण ।
त्याचाच प्रत्याहार सुगुण । ज्याणें केल्या धारणा ह्या
म्हणूनी धारणा सात । अभ्यासाव्या सतत ।
सिद्धी त्याचे हस्तगत । होईल स्थितप्रज्ञ तो ॥१०३॥
जरी जिंकेल आसन । स्वाधीन केला पवन ।
तरी सिद्धी पाहून । योगी फसून जातसे ॥ १०४ ॥
विलासी पुरुष जसा । विलासिनीला भुले तसा ।
सिद्धी पाहतां योगी सहसा । भुले अभ्यासा सोडूनी
विश्वामित्रमुनी । जसा मेनका पाहूनी ।
भुलला तसा सिद्धी पाहूनी । योगी भुलोन जातसे ॥
तरी सावधान होऊन । सिद्धी ह्याच्या सोडून ।
आपलें जें ध्यान । तें साधन अचूक राखावें ॥१०७॥
सिध्दीचें जें फळ । तें असें निष्फल ।
म्हणूनी चित्त करूनी विमल । ध्यानीं निश्चल असावें।

इति श्रीदत्तमाहात्म्ये त्रयस्त्रिंशतितमोऽध्यायः ॥३३॥

॥ श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

# अध्याय चौतिसावा

श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

गुरु म्हणे शिष्यासी । सद्‌गुरु गुणराशी ।
हातीं धरितां शिष्यासी । यत्नें तयासी तारितसे॥१॥
स्वार्थी कळकळे माता । ती नोहे पुत्राकरितां ।
शिष्याच्या हिताकरितां । गुरुदेवता कळकळे ॥ २ ॥
कितीकही करितां प्रश्न । गुरु नोहे उदासीन ।
म्हणे कोणत्याही प्रकारें करून । होवो समाधान
शिष्याचें ॥ ३ ॥
असा कृपाळु दत्त । सांगे अलर्का हित ।
पुनः जोडोनी हात । मदालसासुत पुसतसे ॥ ४ ॥
म्हणे जी सद्‌गुरुनाथा । सिद्धी ज्या उद्देशिल्या आतां
ज्यांहीं ये योगभ्रंशता । त्या किती कशा असती॥५॥
त्यांचीं लक्षणें कळतां । त्या ओळखूनी तत्वता ।
मी सोडीन तत्वता । म्हणोनी माथा ठेवी पदीं ॥६॥
ऐकूनी शिष्याचें वचन । होऊनियां प्रसन्न ।
बोले अत्रिनंदन । म्हणे सावधान ऐक तूं ॥ ७ ॥
पहिली अणिमा दुसरी महिमा । तिसरी होय गरिमा ।
चवथी सिद्धी लघिमा । देहसिद्धी ह्या चार ॥ ८ ॥
प्राप्ती पांचवी प्राकाम्य सहावी । ईशता सिद्धी सातवी ।
वशिता जाण आठवी । बरवी विघ्नसंपत्ती आठवी हे

आपुल्या देहाहून। जे सूक्ष्म सूक्ष्म म्हणून।
अणुपर्यंत जाण। शरीर आपुलें तसें करवे ॥ १० ॥
जेवढें रूप पाहिजे। तेवढें सूक्ष्म चिंतिजे।
आपुलें शरीर जें। तेणेंच होय तेव्हढा ॥ ११ ॥
आणिमा सिद्धी हे जाण। शरीर होय लहान।
जसें लंकेंत हनुमान। करी लहान स्वशरीर ॥ १२ ॥
तसेंच महत्पदार्थांचें। चिंतन करी तयाचें।
मोठें शरीर होई त्याचें। महिमा सिद्धीचें फळ हें १३
तसें जड पदार्थांचें। चिंतन करी तयाचें।
पर्वतवत् जड त्याचें। हो शरीर गरिमेचें फळ हें॥१४॥
किंवा इच्छी जें थोरपण। पूज्याचें करितां चिंतन।
तत्समान ये पूज्यपण। हेही महिमासिद्धिफळ ॥१५॥
सर्वांचा जो गुरु। जाणावा परमेश्वरु।
तच्चिंतनीं होई सर्वगुरु। गरिमेचें फल हेंही ॥ १६ ॥
जें लघु कापसासारखें। तच्चिंतनें शरीर हो हलकें।
लघिमाफल हें ऐके। ह्या चार देहसिद्धि ॥ १७ ॥
थोडा पदार्थ असून। पाहिजे तितुक्याला वांटून।
न व्हावा सर्वथा न्यून। प्राकाम्यसिद्धीचें फल हें १८
दूरच्या पदार्थां स्पर्श करणें। किंवा दूरचा पदार्थ आणणें
हें प्राप्तिसिध्दीनें घडणें। चंद्रा शिवे अंगुलीनें कीं १९
भूतभौतिकाचें ईशन। घडे इच्छामात्रें करून।
ईशत्वसिध्दीचें लक्षण। ईश्वरपणा येतसे ॥ २० ॥

१ रक्षण, ईश्वर रक्षणकर्ता.

भूत म्हणजे भूम्यादिक । मनुष्यादिक भौतिक ।
वश्य होती हे सकळिक । ही वशिता सिध्दी ॥ २१ ॥
वाघा सिंहाचें वाहन । करी सर्पांचें भूषण ।
अग्नीचा तुरा खोवून । दाखवी जाण वशितेनें ॥२२॥
चाले उदकावरून । खेळे अग्निप्रवेश करून ।
राहे जडा चालवून । वशितेचे जाण खेळ हे ॥ २३ ॥
ह्या अष्ट महासिध्दी । दहा असती उपसिध्दी ।
ह्या वायांच उपाधी । येथें बुध्दी न ठेवावी ॥२४॥
आकाशांतून गमन । परकायाप्रवेशन ।
इत्यादि उपसिध्दी जाण । येथें मन न लावी तूं ॥२५॥
पक्षी उडती गगनांतून । मासे पळती जळांतून ।
ही जन्मतः सिध्दी जाण । तीही मिळे योगानें ॥२६॥
अंगीं औषधी लावून । अग्नीनें न जळे जाण ।
हेही ये योगें घडून । औषधीसिध्दी म्हणती जिला ॥
तप करोनि व्यासादिक । जे दाविती कौतुक ।
तेंही योगें साधे ऐक । अशी शक्ती योगाची ॥२८॥
जे विश्वामित्रादिक । मंत्रें दाविती कौतुक ।
तेही सकळिक । योगसिध्दी देतसे ॥ २९ ॥
वाटे जसें जसें स्वयें व्हावें । किंवा वाटे जसें जसें करावें
योगें तें तें साधावें । परि जाणावें विघ्न तें ॥ ३० ॥
धारणा झाल्यावरी । ध्यान करावें अंतरीं ।
जें सर्व दोष वारी । तारीं भवाब्धींतून ॥ ३१ ॥

प्रथम करावें सगुण। इष्टदेवाचें चिंतन।
तें स्थिर करून। मग निर्गुण चिंतावें ॥ ३२ ॥
म्हणे मदालसानंदन। मला सांगा सगुणध्यान।
जेथें माझें मन। स्थिर होऊन राहील ॥ ३३ ॥
श्रीदत्त म्हणे राया। ध्यानीं सगुण रूपा या।
तूं धरी माझिया। अभया देईल हें ॥ ३४ ॥
मी अज अविकार। मी निर्गुण परात्पर।
मी विभू सर्वाधार। परी झालों कुमार ऋषीचा॥३५॥
साधू रक्षावयासी। दुष्टा दंडावयासी।
धर्मा स्थापायासी। या देहासी धरिलें म्यां ॥ ३६ ॥
भक्तांचें घडावें भजन। म्हणून आलों अवतरून।
स्वप्रकृती घेऊन। अवतरलों मायेनें ॥ ३७ ॥
षोडश कला नसून। कलावत् ये भासून।
तें हें माझें रूप जाण। सच्चिदानंदघन एकरस ॥३८॥
जो कोणी स्नेहानें। अथवा द्वेषानें।
किंवा चिंती भयानें। भावानें माझें रूप ॥ ३९ ॥
त्याला मिळे सद्गती। हे तो वस्तुशक्ती।
ती न पाहे मती। हें चित्तीं तूं जाण ॥ ४० ॥
जरी कां नेणून। अग्नीवरी पडे चरण।
तो न करी दहन। कालत्रयीं न घडे असें ॥ ४१ ॥
जलबुद्धीनें जरी। अमृतप्राशन करी।
तरी तो न मरे निर्धारी। त्यापरी हें जाण ॥ ४२ ॥

पतिपुत्रादिक जरी । ब्रह्मरूप असती तरी ।
अज्ञानावरण तयावरी । असें निर्धारीं जाणावें ॥ ४३ ॥
त्याचें होतां ध्यान । न तुटे भवबंधन ।
मी असें निरावरण । निर्विकार म्हणून मज ध्यावें ४४
ह्या पायांपासून । करावें चिंतन ।
अनुक्रमें करून । स्वरूपध्यान करावें ॥ ४५ ॥
ध्यान स्थिर झाल्यावरी । चित्त ठेवावें मुखावरी ।
मग केवळ हास्यावरी । वृत्ती बरी धरावी ॥ ४६ ॥
ध्यानें तन्मय होतां । इतर चिंता न उठतां ।
ये परमानंदता । ध्येयाकारता होवोनी ॥ ४७ ॥
हें ध्यान पूर्वी जरी । सगुण वाटलें तरी ।
स्थिर होतां अंतरीं । निर्गुण करी हेंचि अंतीं ॥ ४८ ॥
ध्येय ध्याता ध्यान । ह्या त्रिपुटीचें भान ।
जोंवरी असे जाण । तोंवरी ध्यान म्हणती ॥ ४९ ॥
मी ध्याता हें ध्यान । हें न राहे भान ।
ध्येयाकार होऊन । राहे मन निश्चळ ॥ ५० ॥
न उठे अन्य वृत्ती । जेंवी दीप निवातीं ।
तेंवी ध्येयाकारवृत्ती । स्थिर राहे ती समाधी ॥ ५१ ॥
साधिता ही समाधी । चेष्टा सोडी बुद्धी ।
मनासह इंद्रियें तधीं । स्वरूपामधीं लपती ॥ ५२ ॥
होतां ही समाधी । जाती सर्वोपाधी ।
तया न बाधिती कधीं । आधि[१]व्याधी निश्चयें ॥ ५३ ॥

१ मानसिक रोग, पीडा.

येणें मनोभंग होई। वासनाक्षयही होई।
संशयसमूह जाई। हातां येई जीवन्मुक्ती. ॥ ५४ ॥
मग नोहे जनन। किंवा वर्धन।
तया न ये मरण। पुनर्जनन मग कैसें ॥५५॥
ह्याचा परिणाम नोहे। भूतभौतिकसंबंध नोहे।
तो संसारीं न राहे। न मोहें व्यापिजे तो ॥ ५६ ॥
तो न भिजे जलानें। न जळे तो अनलानें।
न शोषिजे अनिळानें। शस्त्रानें न तोडिजे ॥ ५७ ॥
कल्पाचे कल्प मोडिती। किंवा नवे घडती।
असे कितीही होतां पुढती। ह्याची उत्पत्ती मृती न होई ॥ ५८ ॥
तयांचा सुटे बंध। शब्दादिक जे विविध।
तयांचा नोहे संबंध। राहे शुद्ध स्वरूपीं तो ॥ ५९ ॥
ह्याला कोणी न भक्षी। ह्याला कोणी न लक्षी।
कोणाचा नोहे पक्षी। सर्वसाक्षी निर्विकार ॥ ६० ॥
तयाचा एकपणा। न मोडवे कवणा।
अशी ही धारणा। जन्ममरणा निवारी ॥ ६१ ॥
पेटतां योगानल। रागद्वेषादिक मल।
दग्ध होती तात्काळ। होई विमल पूर्ववत ॥ ६२ ॥
जे मळ जळती। ते पुनः न मिळती।
सर्व कर्में टळती। दूर पळती शोक मोह ॥ ६३ ॥
ब्रह्मस्वरूपीं मिळे। तो पुनः न ढळे।
ऐक्य पावे निश्चयें। बेचाळीस उद्धरूनी ॥ ६४ ॥

नदीजळ समुद्रीं मिळे । कीं घटाकाश आकाशीं मिळे ।
तसा ऐक्यें ब्रह्मीं मिळे । तयाचा वेगळेपणा न होई ॥
ज्ञानी तपस्वी यांहून । योगी हा श्रेष्ठ जाण ।
तो केवळ ब्रह्म पूर्ण । तत्समान कोण असे ॥ ६६ ॥
संसारारण्यदाव । असे योगप्रभाव ।
करी द्वैताचा अभाव । म्हणूनी भाव ठेवी तूं ॥ ६७ ॥
आतां तूं भूपवर्या । सोडूनी इतर कार्या ।
जाणूनी योगचर्या । योगाभ्यास करी तूं ॥ ६८ ॥
अलर्क म्हणे गुरुवर्या । योगवित्तमाचार्या ।
मला सांगे योगचर्या । जी आर्या मानिली ॥ ६९ ॥
ऐकोनी अलर्काचें वचन । म्हणे अत्रिनंदन ।
लावूनियां मन । योगचर्यालक्षण ऐक तूं ॥ ७० ॥
योगचर्या जाणतां । चित्ता नये खिन्नता ।
येऊनी स्वस्थता । सिद्धी मिळे अनायासें ॥ ७१ ॥
प्रीति वाढवी मान । उद्वेग करी अपमान ।
असें मूर्खजन । पाहती अज्ञानवेष्टित ॥ ७२ ॥
योगी जरी विपरीत । हें घेई मनांत ।
सिद्धी तयाचे हातांत । ये निश्चित जाणावें ॥ ७३ ॥
अमृतदृष्टीनें मान । विषदृष्टीनें अपमान ।
मानी जयाचें मन । तया बंधन येईल ॥ ७४ ॥
म्हणोनी योगीजन । विषदृष्टीनें मान ।
अमृतदृष्टीनें अपमान । मानिती जाण सर्वथा ॥ ७५ ॥
योगियानें सन्मान । मानावा विषासमान ।
होतां अपमान । अमृतासमान मानावा ॥ ७६ ॥

योगसिद्धी तरीच होय । उलट घेतां बंध होय ।
म्हणूनी तुझें हृदय । धरो ही सोय उत्तम ॥ ७७ ॥
(श्लोक)॥ दृक्पूतं विन्यसेत्पादं वस्त्रपूतं पिबेज्जलं ।
शास्त्रपूतं वदेद्वाक्यं चित्तपूतं च चिंतयेत् ॥७८॥
नेत्रें पवित्र पाहून । मग ठेवावा चरण ।
वस्त्रें उदक गाळून । मग पान करावें ॥ ७९ ॥
शास्त्रशुद्ध जाणून । मग बोलावें वचन ।
जेणें शुद्ध होय मन । त्याचें ध्यान करावें ॥८०॥
विषयांचें चिंतन । सदा देई बंधन ।
करितां ईश्वराचें ध्यान । चित्त पावन होतसे ॥८१॥
आवडी ठेविती तेथें न जावें । श्राद्धगृह वर्जावें ।
रजस्वलागृहीं न जावें । भिक्षेसाठीं योग्यानें ॥ ८२ ॥
होतां यज्ञोत्सव । किंवा देवयात्रोत्सव ।
जेथें बहु जमाव । तेथें भिक्षेसी न जावें ॥ ८३ ॥
स्त्री प्रसूत होतां । किंवा सूतक येतां ।
किंवा संस्कार होतां । तेथें भिक्षेसी न जावें ॥ ८४ ॥
पुत्र होतां एक मास । कन्या होतां चाळीस दिवस ।
रजस्वला होतां चार दिवस । तेथें भिक्षेस न जावें८५
पिता मरता एक वर्ष । माता मरतां साहा मास ।
त्रिपुरुषा तीन मास । एक मास गोत्रज मरतां ॥८६॥
मौंजी विवाह गर्भाधान । झालिया सोळा दिन ।
नांदीश्राद्ध होतां एक दिन । तेथें भिक्षेसी न जावें ८७

बाहेर धूम न दिसतां । अग्नी शांत होतां ।
लोकही जेवितां । मग भिक्षेसी निघावें ॥ ८८ ॥
ह्या घरीं अधिक मिळे । ह्या घरीं उणें मिळे ।
ह्या घरीं सत्कारें मिळे । ह्या घरीं मिळे असत्कारें ८९
असें मनीं न आणावें । सव्यापसव्य न फिरावें ।
फिरतां घर न टाकावें । रागद्वेषें करूनी ॥ ९० ॥
मोठ्यानें ओरडूं नये । कवाड लोटूं नये ।
छिद्रानें पाहूं नये । थोडें म्हणूं नये कदापि ॥ ९१ ॥
न सांगावे आपुले गुण । न दाखवावी खुण ।
एकदां जातां फिरून । मग परतून न यावें ॥ ९२ ॥
सात दिवस ज्या घरीं । भिक्षा न मिळे त्या घरीं ।
न जावें चांडाळापरी । तें घर वर्जावें ॥ ९३ ॥
निर्वाहापुरती तीन घरीं । मिळतां माधुकरी ।
तेवढी पुरी करी । अधिक घेतां चोरी होय ॥ ९४ ॥
तीन पांच सात घरीं । करावी माधुकरी ।
नित्य नित्य त्याच घरीं । न जावें बहु घरें असतां ॥ ९५ ॥
स्वधर्म न सांडावा । अपमान घडावा ।
असा देह वागवावा । न करावा पुष्ट तो ॥ ९६ ॥
भिक्षा मागोनी अग्निहोत्र । करिती त्याची भिक्षा पवित्र
पंचयज्ञ न होतां अपवित्र । हें सर्वत्र जाणावें ॥ ९७ ॥
जो यायावर दांत । ती भिक्षा प्रशस्त ।
जे वैदिक शांत । त्यांची भिक्षा मध्यम ॥ ९८ ॥

---

१ प्रत्यही भिक्षा मागणारा, रोज मागणारा भात.

अधम यानंतर । करावे माधूकर ।
एका घरीं भरपूर । भिक्षा ती न घ्यावी ॥ ९९ ॥
यवागूभैक्ष्य कण । सत्तु यावक अन्न ।
कंद मूल फळ पक्क जाण । दूध ताक आणावें ॥१००॥
दिवसा एक वार आणून । देवा नैवेद्य करून ।
गोडी रूची न पाहून । औषधसमान जेवावें ॥ १०१ ॥
अर्ध पोट भरून । जेवावें पथ्य अन्न ।
त्याचे निम्में जळ पिऊन । चौथा भाग खुला ठेवावा॥
प्राणधारणार्थ आहार । त्याची रूची स्वाद बरोबर ।
न पाहतां सत्वर । करावा आहार विचक्षणें॥ १०३ ॥
रात्रीं किंवा उद्यासाठीं । न ठेवावें बांधोनी गांठीं ।
न आणावें परासाठीं । न कराव्या गोष्टी भिक्षेच्या ॥
अहिंसा त्याग ब्रह्मचर्य । गुरुसेवा शांति अस्तेय ।
लघ्वाहार शौच विनय । स्वाध्याय हे सिद्धि देती ॥
सारभूत तें घ्यावें । बहु शास्त्र न पढावें ।
संग्रहीं मन न लावावें । जनीं असावें उदासीन॥१०६॥
लोटतांही कल्पांत । सर्व विद्या हस्तगत ।
न होती म्हणूनी सारभूत । घेऊनी चित्त शमवावें ॥
योगचर्या ही जाण । येथें ठेवी तूं मन ।
येणें साधे ध्यान । होसी पावन राया तूं ॥ १०८ ॥

इति श्रीदत्तमाहात्म्ये चतुस्त्रिंशोऽध्यायः ॥ ३४ ॥

श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

---

## अध्याय पसतिसावा

**श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः**

गुरु म्हणे दीपकासी । श्रीगुरु सांगती अलर्कासी ।
धरूनी योगचर्येसी । योगाभ्यासीं रत व्हावें ॥ १ ॥
उपद्रव नसे जेथें । अभ्यास करावा तेथें ।
एकांतीं समीप जल जेथें । तेथें अभ्यास करावा ॥२॥
वनीं निकुंजांत । किंवा बसूनी गुहेंत ।
पवित्र स्थळीं देवालयांत । अथवा शून्य गृहांत बसावें
योग हा मनोदंड । मौन होय वाग्दंड ।
निरिच्छता[1] देहदंड । हें अखंड असावें ॥ ४ ॥
हातीं घेती वेणुदंड । जे होती पाखंड ।
किंवा होती भंड । त्यांचें तोंड न पहावें ॥ ५ ॥
काया वाचा मनोदंडी । जाणावा तो त्रिदंडी ।
बासानें न होई दंडी । जो न सोडी रागद्वेषां ॥ ६ ॥
जो नेणे भेदाभेद । ज्याच्या चित्ता नये खेद ।
जो नेणे कधीं स्वाद । तो निर्वाद ब्रह्मभूत ॥ ७ ॥
आपुले ठायीं सर्व पाहे । सर्वांठायीं आपण पाहे ।
शत्रु मित्र उदासीन हे । भेद न पाहे सर्वथा ॥ ८ ॥
त्याला मग कोण प्रिय । तया कोण अप्रिय ।
तो जाणावा अद्वितीय । समदृष्टी होय जयाची ॥ ९ ॥

---

१ अन्नस्वादाविषयीं उदास.

जो लोष्टाश्मकांचन । यां पाहे समान ।
ज्याचें शुद्ध मन । तो योगवान् म्हणावा ॥ १० ॥
केवळ जो ब्राह्मण । वेदपाठक तयाहून ।
असे श्रेष्ठ जाण । सेवितां पावन करी तो ॥ ११ ॥
त्याहूनी श्रेष्ठ जापक । त्याहून श्रेष्ठ याज्ञिक ।
त्याहून श्रेष्ठ ऐक । परोक्षज्ञानसंपन्न ॥ १२ ॥
त्याहूनी ध्यान करी तो । ब्राह्मण श्रेष्ठ होतो ।
त्याहूनी अनुभव घेतो । श्रेष्ठ होतो निश्चयें ॥ १३ ॥
निर्विकल्पसमाधिस्थ । तो ब्राह्मण अतिश्रेष्ठ ।
जो ईश्वरभक्त प्रेष्ठ । ब्रह्मविद्वरिष्ठ तो जाण ॥ १४ ॥
त्याहून नाहीं अधिक । जरी झाला वैदिक ।
नेणें अद्वितीय जें एक । तो शोकभागी होय ॥ १५ ॥
(श्लोक) ॥ चतुर्वेदोऽपि यो विप्रः सूक्ष्मं ब्रह्म न विंदति
वेदभारभराक्रांतः स स्याद्ब्राह्मणगर्दभः ॥ १६ ॥
अलर्का असें जाणून । सर्व प्रयत्नें करून ।
करावें नित्य ध्यान । तरीच पावन निश्चयें ॥ १७ ॥
जरी हा योग वाटे कठीण । तरी ऐक सुगम साधन ।
काम क्रोध जिंकून । संग सोडून बसावें ॥ १८ ॥
अंगुष्ठांनीं कान । तर्जनींनीं नयन ।
मध्यमीं नासा धरून । धरावें आनन चौं अंगुलींनीं ॥
आपुले उजवे कानीं । जो उमटे ध्वनी ।
तिकडे मन लावूनी । एकाग्र मनीं ऐकावें ॥ २० ॥

घबराट होतां त्या समयास। सोडावें वाम नासापुटास।
पुनः धरूनी तयास। उजव्यानें श्वास सोडावा ॥२१॥
असें पुनः पुनः करावें। नादीं लक्ष्य लावावें।
सूक्ष्मनाद ऐकावे। स्थूल सोडावे सर्वथा ॥ २२ ॥
दशविध नाद होती। ते भरती चित्तीं।
ये उन्मनी स्थिती। सर्व वृत्ती वारूनी ॥ २३ ॥
येणें होई समाहित। राही योगी प्रसन्नचित्त।
होई एकांतभक्त। हा विमुक्त जाणावा ॥ २४ ॥
एकदां होतां समाहित। बाह्याभ्यंतरवर्जित।
त्याचा करावया घात। कोणी जगांत नसेची ॥ २५ ॥
जो मुक्तस्थितीला। गुरुप्रसादें आला।
भ्रष्ट करावया तयाला। कळिकाळालाही शक्ति नसे ॥
असेंही ध्यान न घडे। प्रतिबंधें विघ्न घडे।
अभ्यास तोही पुढें। न वाढे जयाचा ॥ २७ ॥
ज्याचें पाप प्रबळ। त्याचें मन हो चंचळ।
तें कराया निश्चळ। योगी व्याकुळ होई तो ॥ २८ ॥
तेणें विष्णूचें ध्यान। करावें अनुदिन।
मग पाप जाऊन। स्थिर मन होईल ॥ २९ ॥
ज्याचे पाद सहस्र। ज्याचे हात सहस्र।
ज्याचे नेत्र सहस्र। शिरें सहस्र जयाचीं ॥ ३० ॥
ज्याचे पोटीं ब्रह्मांड। त्रैलोक्य हा ज्याचा पिंड।
ज्याचा आनंद अखंड। तेज उदंड जयाचें ॥ ३१ ॥

सर्व प्राण्यांचीं जीं शिरें । तीं तयाचीं शिरें ।
एवं सर्व गात्रें । तयाचीं चतुरें जाणावीं ॥ ३२ ॥
पादाधोभाग अतल । पादोर्ध्वभाग वितल ।
गुल्फ हे सुतल । महातल जंघा[1]देश ॥ ३३ ॥
ढोंपरें तलातल । मांड्या रसातल ।
कमर पाताल । एवं सप्तपाताल अधोभाग ॥ ३४ ॥
बेंबी भूलोक । पोट भुवर्लोक ।
हृदय स्वर्लोक । महर्लोक कंठ ज्याचा ॥ ३५ ॥
मुख जनलोक । भ्रुकुटी तपोलोक ।
मस्तक सत्यलोक । एवं सप्तलोक ऊर्ध्वभाग ॥ ३६ ॥
जड वातावरण । हे जयाचे प्राण ।
पृथ्वी देह जाण । चौदा भुवनें शरीरीं ॥ ३७ ॥
नक्षत्रें दांत ज्याचे । माया हास्य जयाचें ।
निमिषोन्मेष जयाचे । दिवारात्री म्हणती ॥ ३८ ॥
कटाक्ष हे सृष्टी । कुक्षी समुद्र म्हणती ।
सर्व नद्या नाड्या होती । केश म्हणती वृक्षौषधी ३९
वृष्टी ज्याचें रेत । हाडें हीं पर्वत ।
बळ ज्याचें वज्र हस्त । कोप ज्याचा श्रीरुद्र ॥४०॥
दिशा ज्याचे कान ज्याची त्वचा पवन ।
सूर्य ज्याचा नयन । जिव्हा वरुण जयाची ॥ ४१ ॥

१ ऊरु मांडी, जानु ढोंपर, जंघा पोटऱ्या, गुल्फ टेणी, पार्ष्णी टाच, पादतल तळवा पादोर्ध्व.

ज्याचें घ्राण अश्विनीकुमार। हीं ज्ञानेंद्रियें साचार।
आतां कर्मेंद्रियें चतुर। ध्याती तीं सादर ऐक तूं ४२
वाचा अग्नी निश्चित। इंद्र ज्याचे हात।
पाय ज्याचे अच्युत। निर्ऋती गुद जयाचें ॥४३॥
प्रजापती लिंग जयाचें। चंद्र मन जयाचें।
नारायण चित्त जयाचें। बुद्धि बृहस्पती जाणावी॥४४॥
ज्याचा अहंकार रुद्र। असा ज्याचा आकार।
जो त्रिभुवनाधार। विश्वेश्वर ध्यानमूर्ती ॥४५॥
ज्या ध्यातां ये महोत्सव। ज्याचा वाचक प्रणव।
तयाचे तीन अवयव। अकार उकार मकार ॥ ४६ ॥
ह्या मात्रा तीन। ऋषी देवादि जाणून।
करावें तयाचें ध्यान। पापा जाळून टाकी जें ॥४७॥
एकांतीं बसून। घाळूनी दृढासन।
दीर्घ उच्चार करून। भावें प्रणव जपावा ॥ ४८ ॥
अकार उकार मकार। ह्या तीन मात्रा निर्धार।
जिचा नोहे उच्चार। सूक्ष्मतर अर्ध मात्रा ती ॥ ४९ ॥
ही मात्रा योगी जाणती। जसी भुंगीची गती।
तसी मस्तकी ती। घुमे सूक्ष्म गतीनें ॥५०॥
ही गांधारस्वरासम। म्हणूनी गांधारी हें नाम।
इला देती योगी परम। ही विश्राम दे जीवा ॥ ५१ ॥
अर्ध नकुळाची मात्रा। चाष तो एक मात्रा।
कावळा बोले दोन मात्रा। तीन मात्रा मोर बोले ५२

मनीं आणूनी ह्या मात्रा । प्रणवा साडे तीन मात्रा ।
उच्चारिजे सात मात्रा । चौदा मात्रा त्यानंतर ॥ ५३ ॥
दीर्घ म्हणतां ओंकार । जो होई उच्चार ।
मस्तकीं घुमे तो मनोहर । त्रिकाळ दररोज जपतां ५४
उच्चारितां नेटें । जो ध्वनी उमटे ।
तो उत्तरोत्तर गोड वाटे । मागें हटे मनोराज्य ॥५५॥
घ्यावें धनुष्य ओंकार । अभ्यासानें ओढावें बरोबर ।
लावूनी मन हा शर । वेधावें परब्रह्म तें ॥५६॥
जो कां मांशी[1] मारी । तो लक्ष्य चित्तीं धरी ।
मग अचूक मारी । त्यापरी येथें जाणावें ॥ ५७ ॥
मारितां प्रमत्त[2] होतां । लक्ष्य न राखितां ।
मारगिरी चुकतां । नये हातां जेवीं लक्ष्य ॥ ५८ ॥
तेवीं येथें जाण । प्रमत्त होतां तत्क्षण ।
विक्षेपीं पडे अंतःकरण । दुःख दारुण ये मग ॥५९॥
म्हणूनी सावधान । जो ठेवी आपुलें मन ।
तो पावे समाधान । पुनरावर्तन चुकवी तो ॥ ६० ॥
तीनी मात्रांचे भेद । जाणावे विशद ।
देवता ऋषी छंद । जाणुनी उच्चार करावा ॥६१॥
अग्नी ऋषी अकारासी । गायत्री छंद त्यासी ।
ब्रह्मा दैवत त्यासी । पीत वर्ण जाणावा ॥६२॥
क्लीं बीज क्रियाशक्ती । अथवा जागृती ।
भूःस्थान म्हणती । असे उदात्त स्वर ॥६३॥

---

१ बंदुकीची मारशी. २ बेसावध.

त्याचा ऋग्वेद जाण । विश्व आत्मा रजोगुण ।
भू तत्व प्रातःसवन । असे अग्नी गार्हपत्य ॥६४॥
स्थूल भोग नेत्र स्थान । वैखरी वाचा स्थूल देह जाण
असें मनीं आणून । अकारध्यान करावें ॥ ६५ ॥
अग्नि ऋषि उकारासी । त्रिष्टुप् छंद त्यासी ।
देवता वैकुंठवासी । रक्तवर्ण जाणावा ॥ ६६ ॥
श्रीं बीज ज्ञानशक्ती । स्वप्नावस्था बोलती ।
भुवः स्थान म्हणती । असे स्वर अनुदात्त ॥६७॥
त्याचा यजुर्वेद जाण । अग्नी असे दक्षिण ।
नभस्तत्व मध्यंदिन सवन । सत्वगुण तैजस आत्मा ॥
प्रविविक्त भोग कंठस्थान।मध्यमा वाचा सूक्ष्म देह जाण
असें मनीं आणून । उकारध्यान करावें ॥ ६९ ॥
सूर्य ऋषि मकारासी । जगती छंद त्यासी ।
देवता कैलासवासी । श्वेतवर्ण तयाचा ॥ ७० ॥
र्‍हीं बीजें द्रव्य शक्ति । निद्रावस्था बोलती ।
स्वःस्थान त्याचें म्हणती । स्वरित स्वर तयाचा ॥७१॥
त्याचा सामवेद होय । अग्नि आह्वनीय ।
द्यौस्तत्व सवन तृतीय । प्राज्ञात्मा तमोगुण ॥७२॥
आनंद भोग हृदयस्थान । पश्यंती वाचा देह कारण ।
असें मनीं आणून । मकारध्यान करावें ॥ ७३ ॥
अर्ध मात्रेचा वरुण ऋषी । विराट्छंद तयासी ।
परमात्मा देवता त्यासी । क्रौं बीज विज्ञानशक्ति ७४

तयाचे सर्व वर्ण। भूर्भुवः स्वः स्थान।
तुर्या अवस्था जाण। सर्व गुण सर्व स्वर ॥ ७५ ॥
सांवर्तकाग्नि जाण। तया सर्व सवन।
प्रत्यगात्मा तत्वें तीन। नाद वेद परा वाणी ॥ ७६ ॥
निरतिशयानंद मूर्धास्थान। अस्मिता आहे म्हणून।
देह महाकारण। अर्धमात्राध्यान असें हें ॥ ७७ ॥
ब्रह्म ऋषी ध्वनीचा। परब्रह्म देव त्याचा।
अव्यक्त गायत्रीछंद त्याचा। अवस्था मनोन्मनि
चिच्छाक्ति ॥ ७८ ॥
स्वात्मैक्यावस्थिती। चिदाकाश स्थान म्हणती।
असें जाणून जे ध्याती। तयां मुक्ती ये त्वरें ॥ ७९ ॥
विश्वा विराटासी। तैजसा सूत्रात्म्याशीं।
प्राज्ञा अक्षरासी। अभेदेसी साम्य कीजे ॥ ८० ॥
व्यस्त हा देह पिंड। समस्त ब्रह्मांड।
लक्ष्यार्थी याचा अखंड। स्वभाव ध्यानीं आणावा ८१
पहिली ऱ्हस्व मात्रा। दुसरी दीर्घ मात्रा।
तिसरी प्लुत मात्रा। अर्धमात्रा अगोचर ॥ ८२ ॥
पहिली व्यक्त मात्रा। दुसरी अव्यक्त मात्रा।
चिच्छाक्ति तिसरी मात्रा। अमात्रा परब्रह्म ॥ ८३ ॥
ओंकार उच्चारूनी। क्रमें मात्रा चिंतूनी।
लक्ष्य ठेवूनी मनीं। रहावें ध्यानीं सादर ॥ ८४ ॥
प्रणव आत्मयाचें नाम। म्हणूनी ओंकार ब्रह्म।
अभेद असती नामी नाम। म्हणोनी ही उपासना श्रेष्ठ॥

मृत्युचिन्हें जाणून। जो उपासना करून।
राहे स्वरूप चिंतून। ब्रह्मीं लीन होई तो ॥ ८६ ॥
जरी आपुलें मन। ब्रह्मीं न होई लीन।
तरी वैखरी वाणीनें। प्रणव जपतां मुक्त होई ॥ ८७ ॥
न होतां चित्तलय। वैखरीनें जप होय।
जपतां प्राणलय। तो मुक्त होय ब्रह्मलोकीं ॥ ८८ ॥
गुरुदेवप्रसादानें। प्रणवाच्या ध्यानानें।
येथेंच मुक्त होणें। अथवा घेणें क्रममुक्ति ॥ ८९ ॥
ब्रह्मलोकीं होय गती। ब्रम्ह्यासह ये मुक्ति।
ती होय क्रममुक्ती। पुनरावृत्ती न दे जी ॥ ९० ॥
मात्राभ्यास जसा। लोक मिळे तसा।
प्रणवोपासनें असा। मार्ग सहसा न सुटेल ॥ ९१ ॥
येथेंच होतां ज्ञान। जीवन्मुक्त होऊन।
प्रारब्धातें भोगून। ब्रह्मीं लीन होय तो ॥ ९२ ॥
त्याचें प्राणोत्क्रमण। न होतसे जाण।
स्वरूपीं त्याचे प्राण। श्वास निर्वाण पावती ॥ ९३ ॥
तप्त पाषाणावरी। सोडितां अल्प वारी।
न राहे त्यावरी। पाषाणाभीतरी जिरे जसें ॥ ९४ ॥
तसे मुक्ताचे प्राण। न जाती निघोन।
स्वरूपीं होती लीन। न जाती निघून कोठेंही॥ ९५ ॥
जो कार्यब्रह्मोपासक। त्यासी सुषुम्णामार्ग एक।
तया मिळे ब्रह्मलोक। क्रममुक्त्यर्थ ॥ ९६ ॥

मृत्युकाळ जाणूनी । नव द्वारें कोंडूनी ।
ब्रह्मरंध्र भेदूनी । ओं म्हणूनी तो जाई ॥ ९७ ॥
एक मात्रा ध्यान । घडूनी जातां प्राण ।
तया भूलोकीं पुनः । ये जनन ऋग्वेदें ॥ ९८ ॥
ब्रह्मकुळीं जन्मून । ब्रह्मचर्यें तप करून ।
तो ज्ञानी होऊन । घेई निर्वाण निश्चयें ॥ ९९ ॥
जरी दोन मात्रा ध्यान । घडून जाई प्राण ।
तया सोमलोकीं नेऊन । यजुर्वेद पोंहचवी ॥ १०० ॥
तेथें दिव्य सुख भोगून । तो भूमीवरी पुनः ।
जन्मुनी ज्ञानी होऊन । घेई निर्वाण निश्चयें ॥ १०१ ॥
जरी त्रिमात्रा ध्यान । घडून जाई प्राण ।
तरी सामवेद नेऊन । पोंहचवी तया सूर्यलोकीं १०२
होऊनी पापमुक्त । तो ब्रह्मलोकीं जात ।
तेथें होऊनी ध्यानस्थ । होयी मुक्त निश्चयें ॥ १०३ ॥
कार्याहूनी पर । प्रकृतीहूनी इतर ।
जो पुरुष निर्विकार । अजरामर आत्मा जो ॥ १०४ ॥
त्याचे रूपीं तो उपासक । मिळूनी होयी एक ।
तया कैंचा मोह शोक । नामरूप सोडी जो ॥ १०५ ॥
सार्ध त्रिमात्रा ध्यान । घडे तो होय अपरिच्छिन्न ।
तो राहे व्यापून । त्याचें गमन कोठें व्हावें ॥ १०६ ॥
तया न जाणें न येणें । येथेंच मुक्त होणें ।
राजा त्वां हें जाणणें । प्रणवोपासना करूनी ॥१०७॥
इति श्रीदत्तमाहात्म्ये पंचत्रिंशोऽध्यायः ॥ ३५ ॥

# अध्याय छत्तिसावा

श्रीदत्तात्रेयाय नमः ॥

गुरु म्हणे दीपका । असा उपदेश अलर्का ।
केला उद्धारावया लोकां । गुरुनाथानें दयेनें ॥ १ ॥
असें ऐकूनी अलर्क । मनीं मानी बहु तोख ।
होऊनी गुरुसन्मुख । प्रश्न करी भावार्थें ॥ २ ॥
जय जय दीनबंधो । जय जय कृपासिंधो ।
चित्तचातकविधो । परम साधो तुज नमो ॥ ३ ॥
जय जया दयाघना । बोधानें माझ्या मना ।
पाववीलें समाधाना । आतां वासना तुटेची ॥ ४ ॥
मृत्युकाळ जाणूनी । प्रणवा उच्चारूनी ।
ह्या शरीरा सोडूनी । जाण्याचें उपदेशिलें ॥ ५ ॥
लोकां मृत्यु येतो सहसा । तो जाणावा कसा ।
तो कळतां तसा । करिजेल उपाय ॥ ६ ॥
ऐकोनी अलर्काचें वचन । बोले अत्रिनंदन ।
म्हणे ऐक सावधान । मृत्युलक्षण सांगतों ॥७॥
आपुल्या लग्नापासून । द्वितीय तृतीय स्थान ।
सप्तम अष्टम स्थान । मारक स्थान बोलती ॥ ८ ॥
यांचे जे अधिपती । ते त्या स्थानीं असती ।
त्यांत जो बलिष्ठ अती । त्याच्या दशांतीं ये मृत्यु ९
किंवा मारकाबरोबर । असे अरिष्टकर्ता क्रूर ।
तो होई प्राणहर । ज्योतिःशास्त्रमत हें ॥१०॥

किंवा धारणा करून । होतसे कालज्ञान ।
येतसे मृत्यू कळून । हें योगज्ञ जाणतसे ॥११॥
ज्योतिःशास्त्र नेणें । योगाभ्यासही न जाणे ।
वक्ष्यमाण मृत्यूलक्षणें । जाणावीं त्याणें सादर ॥१२॥
एक वर्षाचे आंत । मृत्युचिन्हें येथ ।
सांगतों समस्त । अनुभूत असती जीं ॥ १३ ॥
नासिकेच्या समोर । शिरी धरावा कर ।
तो सूक्ष्म न दिसे तर । एक संवत्सर आयुष्य ॥१४॥
स्वनासिकाग्र न दिसे । जिव्हाग्रही तसें ।
भ्रूमध्यही न दिसे । वर्ष आयुष्य असे त्याचें ॥ १५ ॥
गंगाप्रवाहवत । आकाशीं जें दिसत ।
तो देवमार्ग म्हणती संत । तो जरी न दिसे ॥ १६ ॥
अथवा न दिसे शुक्रतारा । किंवा ध्रुवाची तारा ।
किंवा अरुंधती तारा । ज्या नरा न दिसती ॥ १७ ॥
त्याच्या आयुष्याची मिती । एक वर्ष बोलती ।
वर्षाचे उपरांतीं । त्याची स्थिती न होईल ॥ १८ ॥
सूर्य दिसे रश्मिरहीत । अग्नीं भासे रश्मिसहित ।
अकरा मास निश्चित । त्याचें जीवित जाणावें ॥१९॥
स्वर्ण रौप्य मळ मूत्र । स्वप्नीं ओकिलें पाहे नर ।
तो दशमासोत्तर । न वांचे निर्धार जाणावा ॥ २० ॥
ज्याचे जागेपणीं । भूत प्रेत ये दिसूनी ।
गंधर्वनगरें देखे नयनीं । नवमासांनीं मरेल तो॥ २१ ॥

किंवा वृक्षजाती। सुवर्णवर्ण दिसती।
त्यालाही नवमासांतीं। ये मृती निश्चित ॥ २२ ॥
त्याचा स्वभाव पालटे। कृश स्थूळ स्थूळ कृश वाटे।
तया आठ मासांनीं नेटें। मृत्यु भेटे निश्चित ॥ २३ ॥
भस्म धूळ किंवा चिखल। यांत चलतां पाऊल।
ज्याचें न उमटे सकळ। दिसे केवळ खंडसें ॥ २४ ॥
बोटें अथवा खोंट। ज्याचें न उमटे नीट।
काळ धरी त्याची पाठ। सात मास वांचेल तो ॥२५॥
मस्तकीं स्पर्शे गीधडा। कावळा किंवा कवडा।
किंवा काळा पक्षी चवडा। मारी मुंडावरी ज्याच्या॥
किंवा मांसभक्षक। पक्षी मस्तकीं स्पर्शी एक।
सहा मास अवधिक। आयुष्यलेख तयाचा ॥ २७ ॥
वस्त्र नसोनी जरी। कावळा मस्तकावरी।
चोंच किंवा पाद मारी। पांच मासांतरीं मरेल नर२८
विरूप दिसे स्वच्छाया। उगीच घेई भया।
चार मासांनीं तया। ये मृत्यु या लक्षणें ॥ २९ ॥
दक्षिण दिशेस नयनीं। आभाळ नसोनी।
बिजली ये देखूनी। तीन मासांनीं मरेल तो ॥ ३० ॥
इंद्रधनुष्याचेपरी। जरी दिसे जळांतरीं।
तरी तीन मासांवरी। न वांचे निर्धारीं हे नृपा॥३१॥
ज्याचा देह आरशांत। किंवा दिसे जळांत।
मस्तकानें विरहित। दो मासांत मरेल तो ॥ ३२ ॥

शवासारखा ज्याचे अंगीं। दुर्गंध ये सर्वांगीं।
उदक पितां वेगीं। टाळू वाळे जयाची ॥ ३३ ॥
जाण तया मानवास। जातां पंध्रा दिवस।
काळ गांठील खास। येथें विश्वास ठेवावा ॥ ३४ ॥
स्नान करितां हृदय। तात्काळ शुष्क होय।
तयाचें आयुष्य। दहा दिवस राहिलें ॥ ३५ ॥
वायू भेदी मर्मस्थान। घेतां चंद्रकिरण।
जया वाटती उष्ण। दश दिन वांचेल तो ॥ ३६ ॥
काळें किंवा रक्त। वस्त्र नेसूनी हंसत।
अथवा नारी गात। नेई हात धरोनी ॥ ३७ ॥
जाई दक्षिण दिशेस। नग्न क्षपणक[1] जयास।
स्वप्नीं दिसे तयास। दहा दिवस आयुष्य ॥ ३८ ॥
तेलानें माखून। स्वप्नीं नर येऊन।
जया देई दर्शन। तया मरण जवळी ॥ ३९ ॥
स्वप्नीं आपण चिखलांत। मग्न होई कीं गोमयांत।
त्याच्या देहाचा अंत। होई त्वरित निश्चयें ॥ ४० ॥
स्वप्नीं अस्थि अंगार केश। अथवा पाहे भस्मास।
किंवा क्रुद्ध सर्पास। मृत्यू तयास त्वरित ये ॥ ४१ ॥
स्वप्नीं पाहे जमीन। वाळून गेली फुटोन।
तयाचे सन्निधान। मृत्यू बसून राहिला ॥ ४२ ॥
स्वप्नीं कराल विकट। पुरुष दिसे निकट।
दांत खाई कटकट। मारी उद्भट होऊनी ॥ ४३ ॥

१ जैनधर्मी.

हातीं शस्त्र घेऊनी । अथवा मारी पाषाणांनीं ।
तयाचे संनिधानीं । मृत्यू येऊनी राहिला ॥ ४४ ॥
सूर्योदयीं ज्याचे पुढें । भालू ओरडे गाढें ।
किंवा देई डावे वेढे । तया मृत्यू पातला ॥ ४५ ॥
जेवतांही[1] जयास । क्षुधा अत्यंत वाटे तयास ।
मृत्यू पातला ग्वास । व्रणदंत होतां तसाची ॥ ४६ ॥
गंध नेणें अग्नीचा । किंवा धूम्र अग्नीचा ।
हुंगून न कळे तयाचा । अंतकाळ पातला ॥ ४७ ॥
दुसऱ्याचिया नेत्रीं । पाहतां न दिसे जरी ।
आपुली बाहुली[2] तरी । मृत्यू दूरी नाहींच ॥ ४८ ॥
इंद्रधनू रात्रीस । दिवा देखे अगणास ।
मृत्यू सत्वर तयास । गांठी ग्वास जाणावें ॥ ४९ ॥
रोगपीडा नसूनी । हीं चिन्हें येती दिसूनी ।
तरी त्याला काळ येऊनी । ग्रासी हें मनीं ठेवावें ॥ ५० ॥
जरी रोगी झाल्यावर । चिन्हें दिसती जर ।
तरी मृत्यू नाहीं दूर । हा निर्धार जाणावा ॥ ५१ ॥
रोग होऊनी जरी । हीं चिन्हें दिसती तरी ।
मृत्यू ये लवकरी । निवारी जरी ईश्वरही ॥ ५२ ॥
स्रवे डावा नेत्र । वक्र होई नासिकाग्र ।
कर्णांत होतां थंडगार । मृत्यू सत्वर येईल ॥ ५३ ॥
जिव्हाग्र काळें होतां । मुख आरक्त होतां ।
इंद्रियें आंत जातां । तत्काळ मृत्यू ॥ ५४ ॥

१ जेवल्यानंतर लागलीच. २ प्रतिमा, छाया.

आपण रोगी असून। खरोष्ट्र्यानीं बसून।
स्वप्नीं करी दक्षिणदिग्गमन। तो तत्काळ मरेल॥५५॥
किंवा स्वप्नीं येऊन। दुसरे करिती बंधन।
अथवा नेती ओढून। तो मरे तत्काळ ॥ ५६ ॥
घट्ट धरितां कान। ऐकूं ये जो स्वन।
तो बंद होतां जाण। आसन्न मरण तयाचें ॥ ५७ ॥
डोळयाचे पात्यावरी। बोट दाबितां तेजापरी।
जी ज्योती दिसे भारी। ती जरी न दिसेल ॥ ५८ ॥
किंवा भ्रांत होऊनी दृष्टी। होई उफराटी।
बेंबी सच्छिद्र जाय पोटीं। त्याची भेटी पुनः नोहे ५९
रोगग्रस्त असूनी। जो पाहे स्वप्नीं।
बळें भूतांनीं येवूनी। मारिला आपणातें ॥६०॥
अथवा स्वप्नीं चिखलांत। अथवा आपण उदकांत।
किंवा प्रदीप्त अग्नींत। पडलों असें जो पाहे ॥ ६१ ॥
असा अडचणींत पडून। बाहेर न येतां तेथून।
जागा होई त्याचें जीवन। संपलें जाण निःशेष॥६२॥
अशीं मृत्यूचीं लक्षणें। जाणावीं विचक्षणें।
सोडोनियां भेणें[1]। ध्यान त्यानें करावें ॥ ६३ ॥
अमर असे कोण। सर्वां ये मरण।
त्याचें भय न धरून। करावें ध्यान निश्चयें ॥ ६४ ॥
जो शरीर राखीतसे। त्याला मृत्यू हंसतसे।
मी सर्वत्र वसें। मग कसें राखील म्हणे ॥ ६५ ॥

---

१ भय.

(श्लोक) ॥ (गारुडे)[1] प्राप्तं मृत्युं न जयति बालो वृद्धो युवापि वा।
मृत्युः शरीरगोप्तारं वसुरक्षं वसुंधरा। दुश्चारिणीव हसति स्वपतिं पुत्रवत्सला॥ ६६ ॥

मृत्यु अढळ जाणून। सर्व भय सोडून।
करून एकाग्र मन। निश्चयें ध्यान करावें ॥ ६७ ॥
असें मरेपर्यंत। ध्यान करावें सतत।
सूत्रकार आप्रायणात्। असें निश्चित बोलतसे ॥६८॥
जरी प्रतिबंध नसे। तरी तेथें मुक्त होतसे।
जरी कां प्रतिबंध असे। तया मुक्ती जन्मांतरीं॥६९॥
व्यर्थ न जाई अभ्यास। वेदसिद्धांत हा खास।
म्हणोनी रात्रंदिवस। योगाभ्यास करावा ॥ ७० ॥
दैवें न होतां ज्ञान। आलें जरी मरण।
तो योगभ्रष्ट जाण। घे निर्वाण जन्मांतरीं ॥ ७१ ॥
जे अभ्यास करिती। ते दैवें मध्येंच मरती।
तरी तया न होई दुर्गती। ये सद्गती[2] याज्ञिकांपरी ७२
अश्वमेधादि करून। जें मिळें याज्ञिकां स्थान।
योगभ्रष्ट तेथें जाऊन। भोग भोगून ये येथें ॥ ७३ ॥
तो पूर्वसंस्कारानें। पुनः अभ्यासानें।
तो मुक्त होई ज्ञानें। हें निश्चयानें सांगें मी ॥ ७४ ॥
येतां अंतकाल। आसन घालावें निश्चल।
देह धरावा अचल। मन चपल न करावें ॥ ७५ ॥

---

१ गरुडपुराण. २ ब्रह्मलोकप्राप्ति.

डावी खोंट गुदावरी । उजवा पाय मांडीवरी ।
ठेवून अपान वरीवरी । पुनः पुनः खेचावा ॥ ७६ ॥
हनू ठेवून उरीं । बोटें सप्तरंध्रांवरी ।
धरूनियां अंतरीं । मन वश्य ठेवावें ॥ ७७ ॥
इंद्रियें मनांत । लीन करावीं समस्त ।
तें मन प्राणांत । अस्तंगत करावें ॥ ७८ ॥
पंचप्राण एकवट । करूनी मधली वाट ।
धरूनी जावें नीट । धीट होऊनी ॥ ७९ ॥
ओंकार उच्चारूनी । परमात्म्या चिंतूनी ।
मूर्धस्थान भेदूनी । घ्यावी मुक्ती ॥ ८० ॥
रात्रौ दिवा असतां । अकस्मात उठतां ।
द्वारभ्रम नोहे चित्ता । त्यापरी येथें जाणावें ॥ ८१ ॥
योगाभ्यासें प्रकाशित । द्वारें असतां समस्त ।
योगी धरी सुषुम्णापंथ । जो परमार्थ देतसे ॥ ८२ ॥
म्हणोनी सोडावा आळस । करावा नित्य अभ्यास ।
मोक्ष मिळे तयास । हें व्यास सांगतों ॥ ८३ ॥
जंवर उभें घर । मुंग्या घुशी उंदीर ।
राहती करूनी बिढार । मोडतां घर पळती ते ॥ ८४ ॥
तसे संसारीं जन । स्त्री पुत्रादिक जाण ।
आशेनें होतां तदाधीन । मरतां क्षण न ठरती ॥८५॥
अशांची कासया संगती । जे पुण्य धन लुटती ।
अंतीं सोडूनी जे जाती । साथी न होती अंतकाळीं ॥

आणूनी देतां अभीष्ट। म्हणती आमुचा हा इष्ट।
आपण ठकतां[1] स्पष्ट। ना ऐकती गोष्ट एकही ॥ ८७ ॥
रोगें पराधीन होतां। म्हणती मग हा आतां।
सत्वर जरी मरतां। तरी बरें होतें ॥ ८८ ॥
त्याचा मानिती त्रास। कुत्र्याप्रमाणें देती ग्रास।
म्हणती थुंकोनी घरास। याणें दूषित केलें हो ॥८९॥
जयां नये काकुळती। अंतीं वैरीसे होती।
तयांची कासया संगती। आपुली गती पाहावी॥९०॥
जरी न घडे विशेष। तरी थोडा थोडा अभ्यास।
घडे तरी सावकास। करावा ग्वास उत्साहें ॥ ९१ ॥
वाळवी तोंडानें जसी। करी मृत्तिका राशी।
ती उपमा योगासी। योजी तयासी सिद्धि ये ॥९२॥
मुंगी तांदुळ घेऊनी। जाई पुनः पुनः पडूनी।
ती उपमा घेऊनी। ध्यानीं उमेद ठेवावी ॥ ९३ ॥
किड्यानेंही तोडितां। जसा वृक्ष ये वरतां[2]।
तसी विघ्नेंही येतां। धैर्यें कारितां योग साधे ॥ ९४ ॥
वत्सांचीं शिंगें जसी। क्रमें वाढती तसी।
योगसिद्धि योगियासी। अनुक्रमेंसी येतसे ॥ ९५ ॥
जाग्रत्स्वप्नीं जो भासक। इंद्रियांचा चालक।
तोचि आत्मा एक। सच्चित्सुख चिंतावा ॥ ९६ ॥
जसा कीट भ्रमरा। चिंतितां पावे तदाकारा।
न सोडितां त्या शरीरा। योगीश्वरा ती उपमा ॥९७॥

१ थकतां, म्हातारपणी. २ वाढतो.

जीव ब्रह्म असून । करितां ब्रह्मध्यान ।
स्वयें ब्रह्म होऊन । घे निर्वाण निश्चयें ॥ ९८ ॥
त्रिकाल साधूनी । अभ्यास करूनी ।
राहे जो सदा मुनी । भवा जिंकून जाई तो ॥ ९९ ॥
वाढावया अभ्यास । भजावें ईश्वरास ।
न होतां सायास । सिद्धी त्यास मिळेल ॥ १०० ॥
कार्या करितां धनी । बेगारी मिळवूनी ।
घे कार्य करूनी । साक्षी होऊनी स्वयें जेवी ॥१०१॥
तेवी इंद्रियें घेऊन । होऊनी सावधान । त्याकरवीं
स्वसाधन। घ्यावें नित्य साधून। अनुमान न करावें ॥
जेवीं बेगाऱ्यांवरी जसा । मुकादम ठेविती तसा ।
इंद्रियांवरी मानसा । योजितां इंद्रियें वावरती॥१०३॥
जेवीं बेगाऱ्यांहून । मुकादमां विशेष धन[1] ।
देती त्या न्यायानें । प्रसन्न मन ठेवावें ॥ १०४ ॥
मना पाहिजे सुंदर । त्रिभुवनीं रुचिर ।
माझ्या रूपाहुनी इतर । नसे निर्धार जाण तूं ॥१०५॥
म्हणूनी माझें स्वरूप सगुण । असे परम शोभन ।
इकडे लावितां मन । योग साधून येतसे ॥ १०६ ॥
इति श्रीदत्तमाहात्म्ये षट्त्रिंशोऽध्यायः ॥ ३१ ॥
॥ श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

---

१ जास्त मजुरी.

# अध्याय सदतिसावा

**श्रीगणेशाय नमः ॥**

गुरु म्हणे शिष्यासी । असें गुरुराया त्यासी ।
सांगती विस्तारेंसी । राजा मानसीं आनंदे ॥ १ ॥
मदालसेचा लेंक । हृष्ट होऊनी अलर्क ।
म्हणे चित्तीं ज्ञानार्क । उदित केला ॥ २ ॥
माझा हात धरून । ह्या भवाब्धींतून ।
मला वर काढून । आनंदीं गढून ठेविला ॥ ३ ॥
एकदां वंदन । करितां प्रसन्न ।
होऊनी दिल्हें ज्ञान । दवडून दुःख माझें ॥ ४ ॥
हीच वंदन भक्ती । ही उत्तम युक्ती ।
जी दे मला मुक्ती । करितां प्रणती तत्काळ ॥ ५ ॥
देव गुरु वेदांत । सेवावा यावज्जीवित ।
अन्यथा कृतघ्नत्व । महंतांची हे उक्ती ॥ ६ ॥
आजीवितं त्रयः सेव्या वेदांतो गुरुरीश्वरः ।
पूर्वं ज्ञानाप्तये पश्चात्कृतघ्नत्वनिवृत्तये ॥ ७ ॥
हें मनीं आणून । जग भगवद्रूप मानून ।
सर्वां करी वंदन । मग कृतघ्न कोण म्हणे ॥ ८ ॥
इदं सदेव[1] म्हणून । बोले वेदवचन ।
हें जग[2] ईश्वराहून । नसे भिन्न निश्चयें ॥ ९ ॥

---

१ सत्+एव इदं; घट ही मातीच आहे. २ जगांत ब्रह्म आहे हेंच खरें.

ईश्वर तोचि गुरुवर । अविद्या गुकार ।
तन्नाशक रुकार । म्हणूनी ईश्वर गुरूची ॥ १० ॥
गुमविद्यां रुणद्धीति गुरुरीश्वर एव सः ॥ ११ ॥
गणेश अग्नि विष्णुयुक्त । हा मंत्र आगमोक्त ।
तोचि गुरु व्यक्त । करी मुक्त भवबंधा ॥१२॥
गणेशवन्हिसंयुक्तो वि ःणुना च समन्वितः ।
वर्णद्वयात्मको मंत्रश्चतुर्वर्गफलप्रदः[१] ॥ १३ ॥
हाचि माझा मंत्र । याणें झालों पवित्र ।
आतां इहपरत्र । नाहीं अभिलाष अणुमात्र ॥१४॥
जरी ह्या देहाचें । चर्म काढूनी त्याचें ।
जुतें पायीं गुरूचे । घालितांही ऋण न फिटे ॥ १५ ॥
दया करा गुरुवरा । मी तुमच्या उपकारा ।
उत्तीर्ण नोहें उद्धारा । प्रत्युपकारा नेणें मीं ॥ १६ ॥
उपकार हा सद्गुरो । माझे अंगीं जिरो ।
हें चित्त तुम्हां स्मरो । न विसरो आपांत[२] ॥ १७ ॥
म्हणोनी घाली लोटांगण । पुनः पुनः वंदून ।
म्हणे झालों पावन । मी वंदनमात्रेंची ॥ १८ ॥
धन्य माझी माता । जीचा लेख पाहतां ।
भेटलों गुरुनाथा । आला माथा कृपाहस्त ॥ १९ ॥
धन्य माझा बंधू । केवळ दयासिंधू ।
जा निरुपम साधू । जो हित साधूनी दे माझें ॥२०॥

---

१ धर्मार्थकाममोक्ष हे चार पुरुषार्थ. २ मरेपर्यंत.

धन्य ज्याची दृष्टी । करी कृपावृष्टी ।
धुंडितां हे सृष्टी । न पुष्टिकर दुजा असा ॥२१॥
धन्य वात्सल्य ज्याचें हें । स्वनिष्ठा सोडूनी मोहें ।
वनांतून येऊन हें । हित करी महेश्वरसा ॥२२॥
धन्य काशीराज हा । ज्यानें सोडूनी स्नेहा ।
करवूनी राज्यविरहा । महाकार्य करविलें ॥२३॥
जे कोश लुटिले । जें सैन्य नष्ट झालें ।
जें स्वयें उलटलें । हें सर्व झालें हित माझें ॥ २४ ॥
होतां हा विनाश । आठवला मात्रुपदेश ।
तेणें भेटला परेश । जेणें निराश केलें मज ॥ २५ ॥
सर्व समृद्धीची प्राप्ती । ईश्वराची अवकृपा ती ।
धनादिकांची आपत्ती । ईश्वरकृपा ती जाणावी ॥२६॥
कनक हातीं मिळतां । नरा ये उन्मत्तता ।
डोळा होई वरता । नवल सर्वथा हें नोहे ॥ २७ ॥
कनक नाम धुत्र्यासी । मिळालें सेवितां त्यासी ।
उन्मत्तता ये क्षणेंसी । हें सर्वांसी ठावें असे ॥२८॥
मिळतां समृद्धवित्त । मी झालों उन्मत्त ।
विषयीं डुबलें चित्त । संतमहंत नोळखावे ॥ २९ ॥
सख्खा बंधू असूनी । ज्याला मानिती मुनी ।
तो स्वयें वनांतूनी । येऊनी भाग मागतां ॥३०॥
म्यां मूर्खपणेंसी । धिक्कारिला तयासी ।
राज्याची चाड त्यासी । काय होती बरें ॥३१॥
तो दयाळू पूर्ण । नेत्रीं दारिद्र्यांजन ।
भरूनी हे नयन । उघडवी पूर्ण प्रकाशें ॥ ३२ ॥

धन्य ती माऊली । तिची कृपासाउली ।
होती म्हणूनी लाधली । सोय आपुली आपणा॥३३॥
धन्य हे गुरुचरण । अज्ञानतमहरण ।
ज्यांना होतां शरण । जन्ममरण संपलें ॥ ३४ ॥
जे शमदमा हरी । वैराग्या निवारी ।
त्या गार्हस्थ्या टाकूनी दूरीं । वनांतरीं आतां जावें ॥
गृहात्प्रव्रजितो[1] धीरः पुण्यतीर्थजलाप्लुतः ॥३६॥
असें बोलते स्मृती । ही न ठेवितां स्मृती ।
भगवंताची विस्मृती । होईल मतिभ्रंशानें ॥ ३७ ॥
असा राजाचा निश्चय । ऐकून दत्तात्रेय ।
म्हणे अलर्का तूं जाय । बंधूचे पाय धराया ॥३८॥
त्याची ही खटपट । तुला मिळाली वाट ।
तरी आतां तूं नीट । तया भेट जाऊनी ॥ ३९ ॥
तूं कृतकृत्य असती । अभिमाना न शिवसी ।
पुढें तुला आवडे जसी । ठेवी तसी स्थिती तूं ॥४०॥
आत्मा असे असंग। इंद्रजाळसें हें जग।
निर्णय होतां मग । वासनारंग न उठेल ॥ ४१ ॥
आत्मासंगस्ततो[2]न्यत्स्यादिंद्रजालं तु मायिकं ।
इत्यचंचलनिर्णीते कुतो मनसि वासना ॥ ४२ ।

१ सर्वसंग परित्याग करून गेलेला. २ आत्मा असंग आहे बाकी सर्व इंद्रजाळ आहे असें निश्चळ चित्त करून विचार केला असतां मनांत वासना कोठून शिरेल ?

वेदप्रमाणानें झालें ज्ञान । त्याचें पुन्हा विनाशन ।
करी असें प्रमाण । नसे भुवन धुंडितां ॥ ४३ ॥
तेव्हां आतां तूं राया । वाटे तिकडे जा सखया ।
न पावसी भया । म्हणूनिया आलिंगिती ॥ ४४ ॥
गुरूनें देतां आलिंगन । अंगीं रोमांच उठून ।
प्रेमें गळा दाटून । आले नयन भरूनी ॥ ४५ ॥
देहभान हरपून । राजा निश्चळ होऊन ।
बाह्याभ्यंतरभान । दे सोडून तत्क्षणीं ॥ ४६ ॥
ज्या सुखा नाहीं मिती । योग्या न ठावी जी स्थिती ।
प्रेमळ भक्ताची स्थिती । ती गती अनिर्वाच्य ॥४७॥
कोटी जन्मांचें सुकृत । जेव्हां मूर्तिमंत ।
दैवें उदया येत । तेव्हां भक्त होईल ॥ ४८ ॥
भक्तीचे प्रकार । जगीं असती चार ।
त्यांत ज्ञानोत्तर । भक्ती थोर जाणावी ॥ ४९ ॥
सायुज्यमुक्तीची वार्ता । ती दूर असो आतां ।
निःसीम भक्तीची कथा । जेथें सर्वथा न घडे ॥५०॥
जो हा ज्ञानी भक्त । भगवंतीं नित्यमुक्त ।
तोचि परम मुक्त । प्रेमरसासक्त सर्वथा ॥ ५१ ॥
त्या भक्तिरसाचा स्वाद । तोचि जाणे विशद ।
त्याचा परमानंद । तोचि स्वच्छंद अनुभवी ॥ ५२ ॥
हा अखंडानंद । जणूं नेणे मुकुंद ।
जरि तो सच्चिदानंद । स्वच्छंद असे जरी ॥ ५३ ॥

तरी धरी अवतार । करी अभिमाने दूर ।
भक्तापाशीं सादर । वागे निरंतर भावलुब्ध ॥५४॥
प्रेमळ भक्ताविण । देवा न पडे चैन ।
म्हणूनी लाज सोडून । राहे तदधीन भक्तांपासीं॥५५॥
असी ही प्रेमभक्ती । हीच एकांतभक्ती ।
इजवरूनी चारी मुक्ती । ओंवाळून टाकाव्या ॥ ५६ ॥
ही भक्ती अलर्कासी । लाधली अनायासीं ।
कोण त्याच्या दैवासी । वाखाणील ब्रह्मांडीं ॥ ५७ ॥
ती छबी दत्ताची । ती शोभा मुखकमळाची ।
ती चपळता नेत्रांची । लावण्याची ती सीमा ॥ ५८ ॥
तें रूपाचें मंडण । तें सुहास्यवदन ।
तें प्रेमकटाक्षवीक्षण । तें वराभय दोन करांचें ॥ ५९ ॥
तो शंखासम कंठ । तें सुचिन्ह वक्षःकपाट ।
तें पर्णासम पोट । गंभीरावर्तसम नाभि ॥ ६० ॥
ते ऊरू नीट रंभोपम । ते चरण निरुपम ।
वज्रांकुशध्वज पद्म । जेथें परम चिन्हित ॥ ६१ ॥
ही स्वरूपाची मात । ही छबी अत्यद्भुत ।
हें एक जाळें निश्चित । मनोमत्स्य ज्यांत सांपडे॥६२॥
जें धांवें जिकडे तिकडे । भटकोनी चहूंकडे ।
जया विसावा कोणीकडे । न मिळे तें जडे भगवद्रूपीं
एकदां छबी पाहतां । हाल चाल त्या चित्ता ।
मग नोहे सर्वथा । बळें ओढितां न हाले ॥ ६४ ॥

१ अवतारिक देहाचा अभिमान.

ज्याला असे मोचन । तें कायसें मोहनें[1] ।
अतर्क्य हें भगवद्ध्यान । जेथूनी मन न फिरे ॥६५॥
मधा चिकटे मासी । उडूं न ये तिसी ।
तसें ह्या मनासी । भगवद्रूपासी न सोडवे ॥ ६६ ॥
मन इंद्रियांचा राव । मनें रूपीं घेतां ठाव ।
इंद्रियां न मिळे वाव । बाहेर धांव घ्यावया ॥ ६७ ॥
जसें धन्या सोडून । न जाती सेवक जन ।
तसा स्वराजा मन । ठरतां न गमन इंद्रियांसी ॥६८॥
श्रीमंतासवें जातां । तया मेजवानी होतां ।
सेवकां मिळे न मागतां । जसें पक्वान्नभोजन ॥ ६९ ॥
तसा मना परमानंद । होतां इंद्रियांचा छंद ।
पूर्ण होई जाई खेद । हा स्वाद दुर्लभ ॥ ७० ॥
घडूनी येतां ध्यान । रूपीं रमे मन ।
इंद्रियेंही तें स्थान । सर्वथा न सोडिती ॥ ७१ ॥
तसी अलर्काची स्थिती । दत्तरूपीं रमली मती ।
सर्वथा खुंटली गती । न हले वृत्ती सर्वथा ॥ ७२ ॥
असा तया पाहून । तया हातीं धरून ।
बोले अत्रिनंदन । अलर्का वचन ऐक हें ॥ ७३ ॥
आतां तुझें मन । न सोडील माझें ध्यान ।
आतां तुवां जाऊन । बंधूचें दर्शन करावें ॥ ७४ ॥

---

१ मोहन थोडा वेळ टिकणारें आहे आणि ध्यान अचल, सतत टिकणारें आहे.

मग वनीं जाऊन । मद्रूपीं लीन होऊन ।
मदाकार अनुदिन । निर्वासन राहसी ॥ ७५ ॥
असें वचन ऐकून । अलर्क कर जोडून ।
करीतसे स्तवन । चित्तीं ध्यान रेखूनी ॥ ७६ ॥
पद ॥ नमो ब्रह्मदेवा नमो वासुदेवा । नमो वामदेवा
सुभावा ॥ ध्रु० ॥
शिष्टजनरंजना दुष्टजनभंजना । दुःखभयतर्जना
शोकशमना ।
हीनजनमाधवा दीनजनबांधवा । तारिं मज केशवा
वारिं भावा ॥ ७७ ॥
दैत्यजनतापना । पतितजनपावना ।
अहितजनदाहना । कोपदहना ॥ ७८ ॥
तापशमना भवा । पापदमना शिवा ।
तव पदीं द्या जिवा । दे विसावा ॥ ७९ ॥
(ओवी) ॥ तूं सच्चिदानंद । प्रत्यगात्मा अभेद ।
असें बोले वेद । ते विशद कळले आतां ॥ ८० ॥
तूं सर्वकारण सर्वाधार । स्वेच्छेनें झालासी नराकार ।
अससी स्वेच्छाचार । वाङ्मनोदूर रूप तुझें ॥ ८१ ॥
ब्रह्मा आणि ईश । हा मायोपाधीचा भास ।
अविद्येचा भास । जीव आणि प्रत्यगात्मा ॥ ८२ ॥
अविद्या माया निरसतां । मग जीव ईशता ।
न भासे तत्वता । अद्वितीयता त्वद्रूप ॥ ८३ ॥

रज्जूपरी भुजंग । त्यापरी हें जग ।
तुझे ठायीं भासे सांग । ज्ञानें भंग होई जें ॥ ८४ ॥
जें पूर्वी नसतें । अंतींही नसतें ।
मध्येंच भासतें । तें नसे कालत्रयीं ॥ ८५ ॥
(श्लोकार्ध)॥ आदावंते च यन्नास्ति वर्तमानेऽपि तत्तथा ॥
जंव भ्रम होता । तंव जगाची सत्यता ।
वाटली ती आतां । तव प्रसादें नासली ॥ ८७ ॥
तुझी दृष्टी पडतां । धन्य झालों आतां ।
हरपली जीवता । ब्रह्मता अंगीं आली ॥ ८८ ॥
तूं ब्रह्म साक्षात । मला दिली प्रचीत ।
अभेदें कळलें अद्वैत । झालें शांत मीतूंपण ॥ ८९ ॥
तरी व्हावें भजन । म्हणूनी माझें मन ।
विकल्प मानून । हें भजन चालवी ॥ ९० ॥
अतएव मानी देव । मी जीव तूं शिव ।
मी भक्त तूं देव । भक्तिभाव हा असा ॥ ९१ ॥
ठेवितां हा भाव । भजनाचा लाघव ।
आनंदा नसे वाव । हा अभाव कोण म्हणे ॥ ९२ ॥
असें प्रेमेंकरून । करितां हें भजन ।
त्वद्रूपीं लपे मन । ध्याता ध्यान विसरूनी ॥ ९३ ॥
लीन होतांही मन । त्याचें करूं उत्थान ।
पुनः घडवूं भजन । आम्हां हीच कर्मणूक ॥ ९४ ॥
ज्याला म्हणती आत्रिज । त्याचें रूप षड्भुज ।
आवडे तो मज । हो कां अज वेदमतें ॥ ९५ ॥

तोचि तूं सगुण । परि तुझे गुण ।
पूर्ण जाणे कोण । अनंतपण तुज साजे ॥ ९६ ॥
कधीं कधीं विप्र । कधीं दिससी क्षत्र ।
कधीं वैश्य कधीं शूद्र । दिससी संकर कधीं तूं॥ ९७ ॥
कधीं बाल[1] कधीं वृद्ध । कधीं किशोर[2] कधीं प्रौढ ।
कधीं सुज्ञ कधीं मूढ । असा गूढ वागसी तूं ॥ ९८ ॥
कधीं होसी तूं भोगी । कधीं दिससी रागी ।
कधीं त्यागी विरागी । कधीं योगी भाससी ॥ ९९ ॥
तो तूं अपापविद्ध । परी भाससी अशुद्ध ।
कधीं शुद्ध कधीं बुद्ध । कधीं बुद्ध अबुद्धसा ॥ १०० ॥
जो तूं मायाधीश । सर्वेंद्रियांचा ईश ।
तूंचि विज्ञानेश । तो तूं अनीश[3] भाससी ॥ १०१ ॥
असी हे तुझी लीला । न कळे ब्रह्मादिकांला ।
हे अनंत लोकपाला । असो तुला नमस्कार ॥१०२॥
आमुचा मोक्ष । हा तूं समक्ष ।
वेद म्हणे ज्या परोक्ष । तो तूं अपरोक्ष आम्हांसी ॥
तूं श्रुतिशिरोगीत । धर्माधर्मातीत ।
तूंची आमुचें अमृत । हें निश्चित त्रिवाचा ॥ १०४ ॥
म्यां करायाचें केलें । मिळवावयाचें मिळविलें ।
पहायाचें पाहिलें । अनुभाविलें अनुभाव्य जें॥ १०५ ॥

---

१ पांच वर्षांपर्यंत. २ पांचपासून सोळा वर्षांपर्यंत. ३ इतर जीवांसारखा असमर्थ.

आतां मीतूंपण। हें बोलेल कोण।
प्रारब्ध अनुसरून। तथापि बोलतों आतां ॥ १०६ ॥
आज्ञा जी आपुली। ती शिरसा मानिली।
असें म्हणूनी तो घाली। पायीं मिठी ॥ १०७ ॥
इति श्रीदत्तमाहात्म्ये सप्तत्रिंशोऽध्यायः ॥ ३७ ॥

श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

# अध्याय आडतिसावा

## श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः

गुरु म्हणे शिष्यासी । श्रीदत्तें अलर्कासी ।
भेटावया बंधूसी । आज्ञा दिधली ॥ १ ॥
ती शिरसा मानून । तो मदालसानंदन ।
नगरांत येऊन । बंधूसी भेटला ॥ २ ॥
ज्या सर्वथा अहंता । गळाली ती ममता ।
मिळाली ज्याला स्वस्थता । निश्चलता सहजची ॥३॥
ज्याचें प्रसन्न मन । असे सुहास्यवदन ।
तो बंधूतें वंदून । स्पष्ट वचन बोलतो ॥ ४ ॥
काशिराजा तूं ऐक । राज्य घे हें निष्कंटक ।
किंवा यथासुख । दे सुबाहूला ॥ ५ ॥
किंवा दोघे मिळून । राज्य घ्या भागून ।
किंवा घ्या लुटून । हें निश्चित सांगतों ॥ ६ ॥
काशिराजा म्हणे त्यासी । तूं क्षत्रिय अससी ।
व्यर्थ कां असा भीसी । करीं आम्हांसी युद्ध तूं ॥७॥
हा धर्म क्षत्रियांचा । तूं नृप सोमवंशीचा ।
अससी शूर साचा । डर मनाचा सोडीं हा ॥ ८ ॥
मरण येतां प्रधाना । मरूनी जातां सेना ।
क्षत्रियांनीं रणा । न सोडिजे सर्वथा ॥ ९ ॥
छाती पुढें करून । धैर्यें समोर राहून ।
क्षत्रियांनीं करावें कदन । पलायन न करावें ॥१०॥

जय मिळे तरी । सुखें राज्य करी ।
समोर मरे जरी । तरी स्वर्गवास होय ॥११॥
उभयतां नसे तोटा । असें असूनी जो करंटा ।
पाहूनियां भटा । पळे तो मोठा अभागी ॥१२॥
शत्रू जिंकूनियां । भोग भोगूनियां ।
यज्ञ यागा करूनियां । त्रिदशालयां जोडावें ॥१३॥
(श्लोक) ॥ अग्निदो[1] गरदश्चैव शस्त्रपाणिर्धनापहः ।
क्षेत्रदारहरश्चैव षडेते आततायिनः ॥१४॥
आततायिनमायांतं हन्यादेवाविचारयन् ।
नाततायिवधे दोषो हंतुर्भवति कश्चन ॥१५॥
आतताई पाहून । जो करी पलायन ।
तो येथें कीर्ती बुडवून । नरकीं गमन करील तो॥१६॥
यज्ञयागासमान । अपूर्व असे रण ।
क्षात्रियां यांहून । सुलभ साधन नसेची ॥१७॥
अलर्क बोले तयासी । पूर्वीं असें मानसीं ।
होतें तें या समयासी । गेलें अस्तासी निश्चयें ॥१८॥
आतां मी देह म्हणून । नसे सर्वथा भान ।
मग क्षात्रियत्व कुठून । असेल आतां सांग बा ॥१९॥
मातीचा घडा जसा । भौतिक हा देह तसा ।
प्राणेंद्रियमानसां । न सहसा शिवें मी ॥२०॥
जीं माझ्या योगें करून । दिसती सचेतन ।
तरी तीं जड म्हणून । जाणें पूर्ण साक्षी मी ॥ २१ ॥

---

१ आग लावणारा व विष देणारा.

मी एक चेतन। द्वितीयत्व कोठून ।
शत्रु मित्र स्वजन । हें अज्ञान आतां नाहीं ॥ २२ ॥
तुम्ही उपकार करितां । म्यां पाहिलें दत्ता ।
त्याची कृपा होतां । द्वैतवार्ता पळाली ॥२३॥
इंद्रिय शत्रू जिंकून । सर्वत्र विजयी होऊन ।
आतां धरितों रान । समाधान होऊनी ॥२४॥
मला नसे अरी । सुबाहू उपकारी ।
तूंही तयापरी । नसे अंतरीं भेद आतां ॥२५॥
मी असें सर्वांठायीं । सर्व असे माझे ठायीं ।
म्हणूनी सुबाहूचे पाईं । मिठी घाली अलर्क ॥२६॥
मग तया उठवून । आलिंगन देऊन ।
सुबाहू बोले हंसून । झालों समान भागी आतां २७
हे मित्रा काशिराजा । मी संग केला तुझा ।
तो मनोरथ माझा । पूर्ण झाला ॥२८॥
तुझें होवो कल्याण । मी पुनः जाऊन ।
सेवितों आतां वन । समाधान होऊनी ॥ २९ ॥
तया म्हणे काशिराज । ह्मणसी भाग देववी मज ।
तों तूं कसा हें आज । बोलसी मज गुज वाटे ॥३०॥
कशासाठीं वनांतून । त्वां येथें येऊन ।
केला हा एवढा यत्न । माझें मन भ्रांत झालें ॥३१॥
राज्य माझ्या पित्याचें । भोगी अलर्क त्याचें ।
पारिपत्य करूनी साचें । तें मला द्यावें ॥३२॥

असें मला सांगून । तूं आलासी शरण ।
आतां सेविसी वन । ह्याचें कारण काय सांग ॥ ३३ ॥
जो अलर्क मदें । पूर्वी तुला भाग न दे ।
तोही आतां वनामध्यें । किमर्थ जातो कळे ना ॥ ३४ ॥
सुबाहु म्हणे तयासी । राज्य कायसें आम्हांसी ।
ज्या करितां ह्या प्रयत्नासी । झटलों ऐक तूं ॥३५॥
तेणें झालों ज्ञानी । म्हणूनी राज्य सोडूनी ।
आनंदें राहिलों वनीं । कृतार्थ होऊनी डुलत ॥ ३६ ॥
तो बोध याचे कानीं । दैवें न पडे म्हणूनी ।
हा कामुक होऊनी । विषयीं गढून राहिला ॥३७॥
पशुप्राय हीनमती । देह दे स्त्रियां हातीं ।
स्त्रैणाची करी संगती । हा दुर्मती होऊनी ॥३८॥
किडा जसा व्रणांत । तसा औपस्थ्यसुखांत[1] ।
हा जाहला निरत । तेणें चित्त खिन्न झालें ॥ ३९ ॥
हा गृहस्थ होऊन । अनेक स्त्रिया भोगून ।
सुखी आपण मानून । राहे दुर्जनसंगानें ॥ ४० ॥
ही सुखाची भ्रांती । अंतीं जी दे दुर्गती ।
मग कैची सद्गती । मूढ नेणती गती हे ॥ ४१ ॥
एका उदरापासून । चौघे झालों उत्पन्न ।
एका येत अधःपतन । तें सहन कसें व्हावें ॥ ४२ ॥
हें मनीं आणून । ह्याला दुःख देऊन ।
विरागी करावा म्हणून । हा यत्न म्यां केला ॥ ४३ ॥

---

१ उपस्थापासून झालेलें स्त्रीसुख.

तुझ्या सहायेंकरून । जो म्यां केला यत्न ।
तो सफल होऊन । समाधान जाहलों ॥ ४४ ॥
दुःख होतां याला । हा वनीं गेला ।
दैवें श्रीदत्त भेटला । त्याणें केला उपदेश ॥ ४५ ॥
तो दैवानें ठसला । हा तत्काळ उमजला ।
म्हणोनी ह्या दशेला । हा आला निश्चयें ॥ ४६ ॥
हें माझें कार्य झालें । म्हणोनी वनीं चालें ।
आतां तो राज्य आपुलें । करो अथवा न करो ॥४७॥
मदालसा योगीमान्या । आमुची माता वदान्या ।
तत्समाना नसे अन्या । जी धन्या शिववरें ॥ ४८ ॥
तिचें दुग्ध पिऊन । ह्याचें न व्हावें पतन ।
असें मनीं आणून । हा प्रयत्न केला म्यां ॥ ४९ ॥
तो यत्न सफल झाला । राज्य मला कशाला ।
मी पांघरूनी दिशांला । पडें भला जनीं वनीं ॥५०॥
मोहरीचें समान । सार्वभौम सुख जाण ।
मेरुपर्वतासमान । सुख जाण आमुचें ॥५१॥
आपण समर्थ असून । बुडतां अपुला जन ।
तया न काढी त्याला कोण । हा विद्वान म्हणेल॥५२॥
जो समर्थ असून । समक्ष बुडतां स्वजन ।
हात न दे तो दुर्जन । हें जाण तूं नृपा ॥ ५३ ॥
असें त्याचें वचन । काशिराजा ऐकून ।
तत्काल विरक्त होऊन । बोले दीन वचन तो ॥ ५४ ॥

सुबाहो तूं धन्य । ख्यास होसी वदान्य ।
बंधू केला मान्य । मी अन्य झालों कीं ॥ ५५ ॥
(श्लोकार्ध)॥ सतां साप्तपदी मैत्री पुनात्युरुतरादघात्[1] ५६
चालतां पाउलें सात । मैत्री करिती संत ।
वारूनियां दुरित । करिती पुनीत निश्चयें ॥५७॥
संत दयाघन । म्हणतां वाटे शीण ।
वर्षाकालीं वर्षे घन । संत अनुक्षण कृपा वर्षती॥५८॥
संतकृपेची साउली । ही केवळ माउली ।
न घटे न वाढे जी भली । जी भली ईश्वराची ती कीं
नमस्कारें संत । होती सुफलित ।
मी तरी संतत । सन्निहित मासमात्र ॥ ६० ॥
तूं दयाळू असती । केवीं मातें उपेक्षिसी ।
आपपर न तुम्हांसी । सर्वांसी समान ॥ ६१ ॥
तरी तारतम्य असे । हा तुमचा दोष नसे ।
जे सेविती जसे । ते तसे फलभागी ॥ ६२ ॥
अग्निजवळ राहतां । अग्नि वारी तमा शीता ।
किंचित्किंचिद् दूर होतां । तारतम्यता जाणावी॥६३॥
तेवीं तुम्ही संत । तारतम्यें होतां फलित ।
मी तरी सन्निहित । असतां च्युत होईन कीं ॥ ६४ ॥
फलदो हि सतां संग । ह्या वचनाचा न हो भंग ।
तुला वाटेल तें सांग । मी निःसंग होईन ॥६५॥

---

१ वितीर्ण पापापासून पवित्र करतें.

असें त्याचें वचन । सुबाहु तें ऐकून ।
म्हणे तुझें सत्य वचन । अन्यथा कोण म्हणेल ॥६६॥
तूं धार्मिक असती । साधिलें त्वां त्रिवर्गासी ।
अजूनी मोक्षासी । साधावया यत्न पडेल ॥६७॥
धर्म अर्थ काम । ह्याचें त्रिवर्ग नाम ।
जयाचें मोक्ष नाम । ब्रह्मधाम चवथा तो ॥६८॥
तो साधनांवाचून । नये सहसा घडून ।
यास्तव करी प्रयत्न । संक्षेपानें सांगतों ॥६९॥
मी माझा हा प्रत्यय । होण्यासी हेतू काय ।
याचा करी निश्चय । शास्त्रीय उपायानें ॥ ७० ॥
अव्यक्तादि[1] विशेषान्त । नामरूपात्मक समस्त ।
हें अनित्य निश्चित । याव्यतिरिक्त सत्य तें ॥७१॥
हा नित्यानित्यविचार । घेई चित्तावर ।
सर्व मानी नश्वर । तया दूर टाकी तूं ॥ ७२ ॥
मग इहामुत्रार्थभोग । सोडूनी घेसी विराग ।
शमादिक मग । साधिती सवेग निश्चयें ॥ ७३ ॥
जसा भुका पुरुष । अन्नावांचुनी इतरांस ।
न इच्छी तसा ग्वास । तूं मुमुक्षेस आदरसी ॥७४॥
मग महावाक्येंकरून । तो मी मी तो हें विवेचन ।
लक्षणा वृत्ती करून । ये ठसून सत्वर ॥७५॥
त्याचें करितां मनन । त्याचें निदिध्यासन ।
होतां अपरोक्षज्ञान । येईल कळून निजांगें ॥ ७६ ॥

---

१ भूतभौतिक.

यद्यपि हा अलर्क। होतां बरा कामुक।
तरी त्याचा दैवयोग एक। एक प्रश्नें उमजला ॥ ७७ ॥
हा मातृकृपेचा लेश। म्हणोनी भेटला योगाधीश।
क्षणें झाला निराश। सर्व पाश तोडोनी ॥ ७८ ॥
दैवें तुला हा संग। घडूनी झाला विराग।
तरी प्रतिबंधभंग। झाल्याविना न तरसी ॥ ७९ ॥
यासी उपाय एक। तूं सोडीं राज्यादिक।
धरीं सत्संग एक। मग विवेक ठसेल ॥ ८० ॥
असें तया सांगून। अलर्का आलिंगून।
सुबाहू बोले वचन। बंधो समान झालों आम्ही॥८१॥
वाटे तरी राज्य करीं। अथवा जा वनांतरीं।
आतां कोठेंही क्षणभरी। लिप्त न होसी सर्वथा॥८२॥
अलर्क बोले वचन। मी जडमूढ होऊन।
विपयगर्तीं रुतून। होतों गढून बहुकाळ ॥ ८३ ॥
तूं दयाळू होऊन। मला हात देऊन।
माझें केलें उद्धरण। असा कोण कृपाळ ॥ ८४ ॥
एकोदरसमुत्पन्न। मान्यनारीनंदन।
आतां झालों समान। हें पुण्य मातेचें ॥ ८५ ॥
असें अलर्क बोलून। धरी सुबाहूचे चरण।
सुबाहू तया आश्वासून। चालिला वन लक्षूनी॥८६॥
काशिराजा विरक्त होऊनी। स्वनगरीं येऊनी।
पुत्रा राज्य देऊनी। चाले वनीं सुबाहू जेथें ॥ ८७ ॥

तेथें अभ्यास करूनी। तो होऊनी ज्ञानी।
सर्व संग सोडूनी। मुक्त झाला ॥ ८८ ॥
अलर्कानें स्वतनया। राज्यीं बसवूनियां।
वनीं येऊनियां। अत्रितनया उपासिलें ॥ ८९ ॥
सोडूनी सर्व संग। झाला वीतराग।
नेणें प्रारब्धभोग। द्वंद्वसंग सुटतांची ॥ ९० ॥
गुरुकृपेकरून। शीघ्र विदेह होऊन।
ह्या जगा पाहून। करी गायन उच्च स्वरें ॥ ९१ ॥

पद ॥ (उद्धवा शांतव०) ॥ अहहा हे जन अविवेकी।
उफराटे पाहति लोकीं ॥ ध्रु० ॥ ९२ ॥

असुरासुर किन्नर नर हे, स्त्रीपुरुष स्वजन स्नेहें,
ह्या गुणमय पाशें मोहें, बांधिलें त्यां रिपुनिवहें॥चा०॥
मकरापरी धरिलें जोरें, ओढिले फरफर सारें,
जाहलें भ्रांतिविकारें, अविकारें ह्यासी विलोकीं॥९३॥
मीतूंपण शिणवी ज्यांना, वेदना वोढिती नाना,
आतां मी पाहुनि यांना, हळहळतों परि हे कुजना॥चा०॥
नाठवे अहहा दुःख, लोक हे कैसे मूर्ख,
त्यांपरि मी पूर्वीं रंक, तो कसा लोळे नरकीं ॥ ९४ ॥
पूर्वीं मी केवळ कुमती, राज्यावरी ठेवुनी प्रीती,
भोगितां विषय न चित्ती, कंटाळा आला निगुती॥चा०॥
विट वाटे आतां त्यांचा, खेळ पाहुनी जेवी शिशूचा,
येतां अनुभव हा योगाचा, चित्ताचा भ्रम उतरे कीं९५

तृष्णेनें एकदा वरिता, ब्रह्मांडीं पशुधन वनिता,
एकाला सर्वही मिळतां, तृप्तता नच ये चित्ता ॥ चा० ॥
तृष्णा ती परती सरतां, भाकरिचा कुटका मिळतां,
जनिं वनीं उघडा पडतां, तृप्तता ये निजचित्ता॥ ९६ ॥
निज रूपीं सुख जे त्यातें, नेणुनिया बाह्य सुखातें,
धुंडितां हें मन शिणतें, तें कळलें आजि गुज मातें॥चा०॥
वात्सल्यें निज बंधूच्या, उपदेशें श्रीसद्गुरुच्या,
पदविला गेलों वरच्या, कोण आमच्या भाग्या जोखी॥
असें गाउनी अलर्क। अभ्यास करी सम्यक।
चरम दशेचें सुख। निर्विकल्पक होऊनी घे ॥ ९८ ॥
संपतां प्रारब्धभोग। सोडूनियां जडांग।
फोडूनी उत्तमांग[1]। लपे असंग ब्रह्मरूपीं ॥ ९९ ॥
प्रसन्न होतां दत्त। असा मदालसासुत।
झाला नामरूपातीत। ज्याचें गीत संत गाती॥१००॥
वेदधर्मा म्हणे दीपकासी। अशा कथा पितयासी।
सांगूनी तो गुणराशी। स्वयें वनासी चालिला॥१०१॥
मग त्याचा पिता भार्गव। विरक्त होऊनी सेवी देव।
दत्तपदीं ठेवुनी भाव। मोक्षवैभव घे त्वरें ॥ १०२ ॥
अलर्क आयु अर्जुन। यदु कयाधूनंदन।
पिंगल नाग साध्यजन। दत्तभजनप्रिय हे ॥ १०३ ॥
खंडुनी हे कालदंड। भजनें गाजवून ब्रह्मांड।
शेवट करूनियां गोड। मिळाले अखंडरूपीं ते॥१०४॥

---

१ शीर्ष.

नर जे असे भजती । ते संसार तरती ।
तेही स्वरूपीं मिळती । न ढळती पुनः ते ॥ १०५ ॥
असें श्रुतीचें वचन । ह्यावरी विश्वास ठेवून ।
जो दत्ता भजे अनुदिन । तो घे निर्वाण निश्चयें १०६
आतां आयुचें आख्यान । पुढें होईल निरूपण ।
श्रोते होउनी सावधान । अवधान देवोत येथें ॥१०७॥

इति श्रीदत्तमाहात्म्ये अष्टत्रिंशोऽध्यायः ॥ ३८ ॥

॥ श्रीगुरुदेवदत्त ॥

---

# अध्याय एकूणचाळिसावा

श्रीदत्तात्रेयाय नमः ॥

जो तूं ओतप्रोत जगद्रूपीं । असती विश्वव्यापी ।
त्वत्कथामृत जो पी । हो कां पापी तरी तो तरे॥ १ ॥
नाला मिळतां नदीसी । कोण अशुद्ध म्हणे त्यासी ।
तसा त्वदधीन हो त्यासी । अशुची कोण म्हणेल २
हें कित्येक न मानितील । तरी ते स्वार्था मुकतील ।
आमुचें काय जाईल । त्यांच्या दोषें ते बुडतां ॥ ३ ॥
खरें सत्व सांगतां । तें न ये ज्याच्या चित्ता ।
त्याचा दोष न ये आप्तां[1] । त्याची दयाळुता न भंगे ४
जो तूं दयासागर । उद्धारावया चराचर ।
झालासी ऋषिकुमार । हे उपकार केवढे ॥ ५ ॥
प्रत्यक्ष ह्या भूमिवरी। रूपें दाविसी नानापरी ।
हा उपकार आम्हांवरी । तूं करिसी दयाळा ॥ ६ ॥
आकार जयासी नाहीं । तो तूं होसी देही ।
यापरतें अधिक कांहीं । दयाळुत्व तेंही दिसेना ॥ ७ ॥
सर्व मिळे ह्या संसारीं । परी मुक्ती होती दूरी ।
ती द्यावया लवकरी । तूं शरीरी झालासी ॥८॥
दुष्टां दंडावयासी । इष्टां पाळावयासी ।
तूं जी जी लीला करिसी । ती आम्हां तारक ॥ ९ ॥

---

१ यथार्थ वक्ता.

मानस शुद्ध व्हावया। तुझ्या लीला सोडूनियां।
आम्ही इतर उपाया। सुगम न मानूं ॥१०॥
जे सर्व खल्विदं म्हणोन। असे श्रुतिवचन।
तेंही ये अनुभवून। त्वल्लीलासेवन होतांची ॥११॥
जें स्वांत चंचळ। त्वल्लीला ऐकतां तत्काळ।
मोहित होऊनी निश्चळ। राहे केवळ निर्विकल्प ॥१२॥
उपास्योपासकभाव[1]। कल्पुनी करी भावें[2]।
होतो द्वैताचा अभाव[3]। हें वैभव त्वल्लीलेचें ॥१३॥
जें रूप तुझें निर्गुण। त्याचे बुद्धीला नोहे ग्रहण।
म्हणूनी हें सगुण। सुखानें मिळो आह्मांला ॥१४॥
सर्वव्यापक जें निर्गुण। त्याचें चित्तीं ग्रहण।
उत्तमाधिकारावीण। नोहे प्रमाण वेद येथें ॥ १५ ॥
जो व्याख्या करी शास्त्राची। वार्ता करी शास्त्राची।
निर्गुणरूपीं साची। मती तयाची न रिघे ॥ १६ ॥
जो आनंद निरतिशय। तो तया केवीं होय।
जो सगुण रूप हें ध्येय। सेवी तया तोही मिळे॥१७॥
सर्वभूतनियामक। तोचि तूं सगुण एक।
खास आमुचा तारक। येथें वितर्क नसेची ॥ १८ ॥
वस्त्रीं तंतू जसे। त्वद्रूपीं जग हें तसें।
ओतप्रोत भरलें असे। मग तें कसें भिन्न होय ॥१९॥
तेव्हां भगवंता मी तुझा। तूं न होसी माझा।
तरी हा भाव[4] माझा। प्रेमा तुझा वाढवूं ॥ २० ॥

१ धर्म. २ भक्ति. ३ नाश. ४ भक्ति.

सद्भाव देऊनी वदविसी। तूंची तुझ्या चरित्रासी।
त्याणें ह्या चित्तासी। प्रेमपाशीं बांधिसी ॥ २१ ॥
जे त्वद्‌भक्त भाविक। त्यांचें जें कथानक।
तें श्रोत्याचे मोह शोक। वारी निःशंक श्रवणेंची २२
तेव्हां विशेषेंकरून। त्वद्भक्तांचे गातां गुण।
तुझेंच घडे भजन। ज्यानें जन उद्धरती ॥ २३ ॥
जो शिष्य तुमचा अर्जुन। जो भक्त मदालसानंदन।
त्यांचें करविलें वर्णन। तसें करवा इतरांचें ॥ २४ ॥
ही मदिच्छा पुरवी आतां। म्हणूनि भावें विनवितां।
कृपा आली गुरुनाथा। स्फूर्ती चित्ता देता झाला॥२५॥
मग तिये स्फूर्तीनें। आठवलें जें दीपकानें।
पुसितां कथिलें वेदधर्में यानें। आयुराजाख्यान तें २६
गुरूस पुसे दीपक। जो भक्त आयुनामक।
त्याचें गोड कथानक। सांगावें कृपा करूनी ॥ २७ ॥
अपूर्व वाटे भक्तलीला। ती गातां देवांला।
आनंद वाटे मग मानवाला। प्रेमाश्रुकला कां न यावी
चित्तमोहक याहून। नाहीं दुसरें साधन।
हा निश्चय करून। धरिले चरण तुमचे म्यां ॥ २९ ॥
ज्या शंका उपजती। त्यांची होतसे शांती।
म्हणूनी करितां प्रणती। गुरुमूर्ती प्रसन्न झाली ॥३०॥
म्हणे रमणीय तुझा प्रश्न हा। आनंद दे मला हा।
जो निवारी मोहा। तो महायोगी आठवे आतां ॥

राजा एक आयुनामक। सोमवंशीय धार्मिक।
पुरूरव्याचा लेंक। झाला सेवक श्रीदत्ताचा ॥ ३२ ॥
राजा वदान्य[1] धर्मरत। चक्रवर्ती विख्यात।
भूमंडल समस्त। जिंकिलें ज्याणें निजबळें ॥ ३३ ॥
अन्याय सर्वथा न करी। भक्ती ठेवी विप्रांवरी।
अदंड्या दंड न करी। दंडन करी दंडयाचें ॥ ३४ ॥
जो सच्चा वचनाचा। त्राता शरणागताचा।
मायबाप प्रजेचा। दुर्जनाचा घातक जो ॥ ३५ ॥
त्या अन्यत्[2] सर्व असे। परी एक संतान मात्र नसे।
म्हणूनी खिन्न होतसे। चैन नसे अनुदिन ॥ ३६ ॥
जें जें त्रिदशां[3] दुर्लभ। तें तें तया होय सुलभ।
परी एक दुर्लभ। अर्भक तया दैवयोगें ॥ ३७ ॥
पुत्रकामेष्टी करी। धर्म करी नानापरी।
परी न वंचे[4] कवणेपरी। अनपत्यदोष तयाचा ॥ ३८ ॥
जें मुला वांचूनी घर। तें अरण्य घोर।
असें मानूनी नृपवर। करी अपार दुःख तो ॥ ३९ ॥
सांगती लोक जे जे उपाय। ते ते करी नृपवर्य।
परी पुत्र न होय। शोक होय रायासी ॥ ४० ॥
म्हणे तंतू तुटतां। पितर जाती अधःपाता।
काय करावें आतां। आमुची पुढें काय गती ॥ ४१ ॥
वंशांत व्हावा पुत्र। तरीच सुख इहपरत्र।
नातरी बुडे गोत्र। असें शास्त्र बोलतें ॥ ४२ ॥

---

१ दाता. २ दुसरें. ३ देवांस. ४ गेला नाहीं.

हें वेदवचन । अपुत्रस्य लोको[1] न ।
जरी होमहवन दान । केलें तरी वृथैव तें ॥ ४३ ॥
जो जाप्योपासनादिधर्म । तोही न देईल शर्म ।
पुत्र नसतां व्यर्थ वर्म[2] । माझें दुष्कर्म काय हें ॥ ४४ ॥
ही शंका मनीं आणून । ज्योतिषिकां बोलावून ।
तयां करी प्रश्न । म्हणे संतान वाढेल कसें ॥ ४५ ॥
तुम्ही रक्षा आमुचें कुळ । असें म्हणे नृपाळ ।
मग ते ज्योतिःशास्त्रकुशल । सांगती वेळ पाहूनी ४६
भूपा एकही योग नसे । मग संतान होईल कसें ।
ज्योतिःशास्त्रीं जें असें । तें परीसे तत्व तूं ॥ ४७ ॥
जो देव गुरु भाव धरी । त्याचा स्वामी जरी ।
षष्ठाष्टद्वादश स्थानावरी । राहे तरी अपुत्र तो ॥ ४८ ॥
जन्मसमयलग्न । आणि पंचम नवम स्थान ।
त्यांचे स्वामी त्रिकीं[3] जाऊन । राहतां संतान न होय्गी
जे गुर्वंघ्री सेविती । सत्पुरुषांतें भजती ।
त्यांना ग्रह इष्ट होती । त्यांची संतती वाढते ॥ ५० ॥
जे बाह्येन्द्रियविषय । सोडून असती ब्रह्ममय ।
तयांचे धरितां पाय । दुर्लभ काय मानवा ॥ ५१ ॥
असें तयांचें वचन । ऐकोनी बोले उर्वशीनंदन[4] ।
तुम्ही सांगा मजलागून । असा सज्जन कोठें वसे ५२
साक्षाद्ब्रह्म ब्राह्मण । म्हणोनी तुमचे धरिले चरण ।
करा माझें उद्धरण । आलों शरण तुम्हांसी ॥५३॥

---

१ लोक नाहीं. २ विशिष्ट नाम. ३ षष्ठाष्टद्वादश. ४ उर्वशीचा मुलगा आयु.

जें तुम्हां आकळे । तें देवाला न कळे ।
म्हणोनी म्यां ये वेळे । चरणकमळें धरिलीं तुमचीं ॥
हृदय तयाचें ओळखून । मग म्हणती दैवज्ञ ।
त्वां सह्याद्रीवरी जाऊन । अत्रिनंदनपद धरी ॥५५॥
असे मातापुर । असे तयाचे समोर ।
सह्यपर्वतशिखर । अनसूयाकुमार तेथें वसे ॥ ५६ ॥
तो आत्मारामदैवत । तयाचा हो तूं भक्त ।
तो तुझे मनोरथ । अविलंबित पुरवील ॥ ५७ ॥
तोचि ब्रह्म केवळ । करी भक्तांचा प्रतिपाळ ।
त्याचें चरणकमळ । धरितां बाळ होईल ॥५८॥
जें ब्रह्मदेवें शिरीं । लिहिलें नसे तरी ।
श्रीदत्तें स्पर्शितां करी । अलभ्य जरी तरी तें मिळे ५९
जो असोनि निराकार । भक्तांकरितां साकार ।
झाला तयाचा किंकर । होतां दुष्कर काय लोकीं ६०
जो भय सोडून । मनीं धीर धरून ।
भावें करी भजन । तया वरदान देतसे ॥ ६१ ॥
ज्याचें माहात्म्य निर्जर । नेणती तेथें पामर ।
कायसे बापुडे हे नर । त्याचे धर चरण तूं ॥६२॥
महात्मा तो जाणून । तूं धरीं त्याचे चरण ।
ऐसें त्यांचें वचन । राजा ऐकून हृष्ट झाला ॥ ६३ ॥
मग चरणीं चालत । राजा आला तेथ ।
जेथें होता अत्रिसुत । ध्याननिष्ठ सिद्धासनीं ॥ ६४ ॥

राजा तुष्ट होऊन । श्रीदत्ता पाहून ।
करी साष्टांग नमन । भाव धरून मानसीं ॥ ६५ ॥
तो बाष्पाकुल होऊन । प्रेमभरें दाटून ।
म्हणे मी झालों पावन । होतां दर्शन भगवंताचें ॥६६॥
जगज्जाळीं पडतां । नाना योनी हिंडतां ।
दैवयोगें हें आतां । भगवंताचें दर्शन झालें ॥६७॥
जो योग याग करितां । नये सहसा हातां ।
तो पूर्वपुण्योदयें आतां । दृष्टिपथा पातला ॥ ६८ ॥
यापरी अंतरीं चिंतून । राजा करी नमन ।
राजाचें पहावया मन । अत्रिनंदन काय करी ॥६९॥
जी अतर्क्य शक्ती । जिला माया म्हणती ।
तिला बनवूनी युवती । अंकीं घे तियेसी ॥७०॥
अंकीं स्थान देऊन । घे तिचें आलिंगन ।
दे तिला चुंबन । प्रेमें करून आदरें ॥ ७१ ॥
ते विनोद पाहून । राजाचें न विटे मन ।
म्हणे हा खेळ करून । मला भ्रमून ठेवितसे ॥ ७२ ॥
हा तो बहुरूपधर । कोण जाणे त्याचा पार ।
दत्त म्हणे येथून सत्वर । जा बाहेर भूपाळा ॥ ७३ ॥
मी बहिष्कृत न जाणसी । तूं कां येथें आलासी ।
जरी सत्वर न जासी । तरी प्राणासी मुकसी ॥ ७४ ॥
माझा प्रबळ कोप । मी व्रात्य तूं संभावित भूप ।
येथुनी न जातां घेसी शाप । मग वदे भूप वंदोनी ७५

नाभिज्ञः[1] शपति असें। मला ठाऊक असे।
मी तरी शरणागत असें। आतां भय कसें ये मज ॥
तूंचि समर्थ जाणून। धरिले तुझे चरण।
आतां मला कसें कोठून। ये मरण सांगावें ॥७७॥
जो शप्तां[2] तारितो। सर्व पापा उद्धारितो।
मग स्वयें शापा देतो। न घडे हें तो कालत्रयीं ॥७८॥
आतां गती[3] खुंटली। मिळतां कृपेची साउली।
जरी मारील माऊली। तरी लाड आपुले पुरवील ७९
असा एक निर्धार। करूनी राहे नृपवर।
जरी दत्त दे मार। तरी दूर न सरे तो ॥८०॥
तूं नको राहूं म्हणून। वारंवार लोटे भगवान।
तरी तो सर्व साहून। राहे मन दृढ करूनी ॥८१॥
तन्मन ओळखून। मग बोले अत्रिनंदन।
जरी करिसी सेवन। तरी राखीन तुज येथें ॥८२॥
एरविं बाहेर घालवीन। ऐसें ऐकतां उर्वशीनंदन।
म्हणे आज्ञा पाळीन। अनुमान न करीन मी ॥८३॥
योगीश तें ऐकून। म्हणे नृकपालांतून।
ताजें मद्य मांस आणून। अनुदिन त्वां द्यावें ॥८४॥
नृपती तें ऐकून। तसें देतों म्हणून।
साक्षात् पशु सोम मानून। दे आणून मद्य मांस ८५

१ अभिज्ञः न शपति, ज्ञानी शाप देत नाहीं. २ शापित झालेल्यास. ३ ईश्वरापर्यंत गती होती त्याप्रमाणें मी येथें तुमच्येजवळ आलों. आतां यापुढें कोणीकडेही जाणें नाही.

यागमुखें हवी खातां । ज्या न ये तृप्तता ।
तो प्रेमें मद्य मांस देतां । मानी तृप्तता यज्ञेश्वर॥८६॥
सुमुख होऊनी दत्त बोले । भूपा त्वां वचन पाळिलें ।
माझें मन तृप्त केलें । वर घे भले देतों मी ॥ ८७ ॥
नर स्थूलदृष्टीनें पाहती । ते माझें तत्व नेणती ।
म्हणूनी दोष ठेविती । मंदमती मजवरी ॥ ८८ ॥
विशालदृष्टी माझें तत्व । नेणूनी ते अज्ञत्व ।
धरूनी माझें अभोक्तृत्व । अलिप्तत्व नेणती ॥ ८९ ॥
यज्ञभुग् मी सर्वसाक्षी । परी किमपि न भक्षी ।
जो जीव कर्मफळें भक्षी । तया निरीक्षी साक्षित्वें ९०
अहं वैश्वानर म्हणून । असे माझें वचन ।
तें यथार्थ जाण । माझ्याविण कोण चालक ॥ ९१ ॥
मी वैश्वानरांतर्गत । सर्व भोगी निश्चित ।
परी अभुक्त असें सतत । म्हणूनी अलिप्त कर्मांसी९२
ऐकून श्रीदत्तवचन । राजा हृष्ट होऊन ।
म्हणे मी झालों पावन । आपण प्रसन्न होतांची॥९३॥
जो पुरःसर देवांचा । तो तूं विष्णु साचा ।
तरी मनोरथ आमुचा । पुरवी वर देउनी ॥ ९४ ॥
मी अप्रज असें देवा । तरी मला वर द्यावा ।
मला सुपुत्र व्हावा । पितृदेवां भजे असा ॥ ९५ ॥
सत्पथवर्ती सुरासुराजेय । देवविप्रपर सर्वज्ञ पूज्य ।
शूर रणक्रूर महावीर्य । अनाथपति पूज्य दक्ष कवी९६

ज्या नमस्कारितील मांडलिक। रणक्रूर शूर धार्मिक।
दाता भोक्ता याजक। शरणागता वत्सल ॥ ९७ ॥
प्रजापालक मान्य होय। पितृगुर्वतिथिश्लाघ्य।
असा व्हावा तनय। वीरगेय यशस्वी ॥ ९८ ॥
जो सदस्यां[1] मान्य होय। असा उर्वशीतनय।
वर मागे मग दत्तात्रेय। म्हणे अलभ्य जरी हें ॥९९॥
तरी स्वभक्ताचें मन। न करावें उद्विग्न।
म्हणोनी देतों वरदान। देतों म्हणून बोलिलों जें १००
हा स्वप्नसमान संसार। पुत्रादिसुख हें नश्वर।
तरी तूं पुत्रार्थी होऊनि वर। मागसी मायामोहित ॥
मुक्तिस्थानापन्न होऊन। मागशी केवळ संतान।
ज्ञानप्रतिबंध आहे म्हणून। तुझें मन हेंचि इच्छी ॥
हें हि नोहे सुकृतावांचून। करितां सकाम भजन।
क्रमें निष्काम होऊन। घे निर्वाण मद्भक्ता ॥ १०३ ॥
यत्प्रातः संस्कृतं चान्नं सायं तच्च विनश्यति।
तदन्नरसवृद्धेस्मिन्काये का नाम नित्यता ॥ १०४ ॥
असें प्रत्यक्ष अनुभवून। लोक जाती मोहून।
हें मायेचें आवरण। मत्प्रसादाविना दूर नोहे ॥१०५॥
न राज्ञः खलु दोषोत्र। असें म्हणूनि अत्रिपुत्र।
म्हणे तसाच तुला पुत्र। होईल सर्वत्र विख्यात १०६

१ सदस्य=श्रेष्ठ.

भूपास असा वर देऊन। हातीं एक फल देऊन।
हें जायेस दे म्हणून। तया पाठवून दे दत्त ॥ १०७ ॥

तो सप्तांगांसह मनें करून। देवा नमस्कार करून।
आज्ञा श्रीदत्ताची घेऊन। करी प्रयाण निजपुरा १०८

इति श्रीदत्तमाहात्म्ये नवत्रिंशतितमोऽध्यायः ॥३९॥

॥ श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

# अध्याय चाळिसावा

## श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

जो योगज्ञ वेदधर्म मुनी । सांगे शिष्यालागूनी ।
असा वर घेऊनी । आयू स्वसदनीं पातला ॥ १ ॥
राजा एवढा सुज्ञ असून । न मागे पुत्रावांचून ।
तरी अर्थार्थी भक्त मानून । दे वरदान तदनुरूप ॥२॥
जडो कोणतीही भक्ती । तरी अनुक्रमें ती ।
पुढें होईल परा भक्ती । हे युक्ति भगवंताची ॥३॥
पुण्य नसे ज्याचे पदरीं । तो क्षुद्र देवाची भक्ति करी ।
तो पडे संसारीं । येराजारी न चुके त्याची ॥४॥
ह्या गोविंदाची जरी । सकाम भक्ति घडे तरी ।
अनुक्रमें हो अधिकारी । पुनः संसारीं न पडेल तो ५
निराश होईल उत्तरोत्तर । ह्या भक्तीचा हा महिमा थोर
असो हें तो नृपवर । स्वभार्येसी भेटला ॥ ६ ॥
नृपति म्हणे प्रियेसी । म्यां सेविलें दत्तासी ।
वर दिधला आह्मांसी । आतां लाधसी पुत्र तूं ॥ ७ ॥
पुत्रमुख आतां पाहून । आम्ही जाऊं तरून ।
असें भार्येसी सांगून । फळ दे तिच्या हातांत ॥ ८ ॥
प्रमुखः[1] सर्वदेवानां सुमुखः पुण्यकारिणां ।
य उन्मुखः स्वभक्तानां स दत्तोऽदा[2]दिदं फलं ॥ ९ ॥

---

१ समोर येणारा. २ अदात्=देता झाला.

दत्तप्रसाद झाला आतां । नको पुत्राची चिंता ।
हें फळ भक्षण करितां । तूं सुना लाधसी ॥ १० ॥
आतां विस्तारेल कुल । ह्मणूनी सांगे भूपाळ ।
मग राज्ञी हर्षूनी तत्काळ । तें फळ भक्षीतसे ॥११॥
मग विलासें करून । पतीसीं रत होऊन ।
राज्ञी करी गर्भधारण । दत्तवचन अन्यथा नोहे॥१२॥
ती भुक्तभोग होऊनी । पहुडे आपुले शयनीं ।
तंव अकस्मात स्वप्नीं । देखे नयनीं महापुरुषा ॥१३॥
चार भुजा दिसती । केयूर कंकणें झळकती ।
मोतियाचे हार कंठी । कर्णीं शोभती कुंडलें ॥१४॥
स्वभक्तैकगम्य[1] जें । तें हास्यमुखीं विराजे ।
दिशा भासे स्वतेजें । शिरीं विराजे शेषछत्र ॥ १५ ॥
सुतेज रत्नांकित । शेषाच्या फणा अनंत ।
छत्रापरी शिरीं शोभत । वरहस्त पुरुष दिसे ॥ १६ ॥
तो हसोनी तिच्या हातीं । देतसे अमूल्य मोतीं ।
दुग्धपूर्ण शंख हातीं । घेऊनी प्रोक्षी तिच्यावरी॥१७॥
ती तद्विलोकनेंकरून । परमानंद पावून ।
आश्चर्य करी तंव तत्क्षण । अदृश्य होऊनी गेला तो॥
असें ती स्वप्नीं पाहून । तात्काळ जागृत होऊन ।
पुनः पुनः तें आठवून । होऊनी दीन बोलतसे ॥१९॥
हें प्रायः भगवद्रूप कीं । स्वप्नीं जें मी विलोकी ।
तें पाहतां एकाएकीं । गुप्त झालें कां कळेना ॥२०॥

१ जें स्वरूप भक्तानांच कळणारें.

माझें पाप प्रचंड । म्हणोनी देव झाला आड ।
सोडुनी विषयाची चाड । मन आवड ठेवी ज्याची २१
यो यादःपतिशायी[1] । तो कीं स्वप्नीं येयी ।
दर्शनें प्रीति देयी । किमर्थ होयी गुप्त तो ॥२२॥
तन्मय ती होऊनी । इंदुमती राजपत्नी ।
स्वर्भानुची नंदिनी । खेद मनीं करी असा ॥ २३ ॥
सर्वत्र ती अवलोकूनी । न दिसतां तें रूप नयनीं ।
तेंची पुनः पुनः मनीं । आणुनी हृष्ट होतसे ॥२४॥
हा वासुदेवाचा प्रसाद । म्हणोनी मानी आनंद ।
ती आयुराजाला विशद । सांगे गोविंद देखिला तें २५
मी सुप्तोत्थित होतां । न दिसे तें रूप आतां ।
असें पत्नीचें वाक्य ऐकतां । राजा आनंद पावला २६
वदे नरपती तियेसी । आतां सोडी निद्रेसी ।
तरीच स्वप्नफला लाधसी । निजतां फससी निश्चित॥
अनुकंपा करूनी । काय सुचविलें देवें स्वप्नीं ।
हें प्रातःकाळीं मुनीपासुनी । तें कळून येईल ॥ २८ ॥
स्वप्न चमत्कारिक जाणून । त्वां न करावें शयन ।
असें राजाचें वचन । राणी मानून न निजे ती ॥ २९ ॥
तें ध्यान धरून । राहे राणी तंव अरुण ।
उदित झाला तो पाहून । दंपती उठोन स्नान करिती॥
प्रातःकालीं कर्म करून । मंगलद्रव्य स्पर्शून ।
शौनका पाचारून । राजा वंदून प्रश्न सांगे ॥ ३१ ॥

१ समुद्रांत—निजणारा, विष्णु.

तें सुमंगल जाणून । ऋषी बोले सुहास्यवदन ।
ह्मणे भूपा हें उत्तम स्वप्न । सावधान ऐक आतां ॥३२॥
तूं जी कामना धरून । केलें दत्ताचें आराधन ।
तें सफळ झालें जाण । वाहे आण निश्चयें ॥ ३३ ॥
परम भाग्य तुझें जाण । जें केलें फळभक्षण ।
त्या प्रभावेंकरून । गर्भधारण करी राणी ॥ ३४ ॥
तुझा यत्न सफळ झाला । दिक्पाळांश गर्भी आला ।
आतां पुत्र होईल तुला । होईल भाविक वैष्णव ॥३५॥
महातेज धर्मनिपुण । सोमवंशाचें भूषण ।
ख्यातीनें जसा नारायण । बळपूर्ण वेदवेत्ता ॥ ३६ ॥
सज्जनपालक होईल । हुंडासुरा मारील ।
चक्रवर्ती नामा पावेल । तो शोभेल सर्वगुणीं ॥ ३७ ॥
अनुकंपा करून । पंगु दीनांध आर्तजन ।
यांचें करील पालन । म्हणून सांगे शौनक ॥ ३८ ॥
अग्नी चद्रंकडून । करो गर्भाचें रक्षण ।
मृत्युपाशापासूनी वरुण । करो रक्षण दहा मास॥३९॥
तो शौनक आशीर्वचन । असें देतसे हर्षून ।
मग तया पूजून । करी बोळवण भूपाळ ॥ ४० ॥
जें हें स्वप्नफळ मुनी । सांगे ते देवांनीं जाणूनी ।
पुष्पवृष्टी करूनी । स्वर्गीं केला उत्सव ॥ ४१ ॥
सुस्वप्नं जातं म्हणूनी । देव गाती हर्षूनी ।
असें होतां तेच क्षणीं । हुंडनंदिनी स्वर्गीं गेली ॥४२॥

पृथ्वीपती आयू जे वेळीं। तपा गेला ते वेळीं।
हुंडनामा दैत्य त्या वेळीं। भूमंडळीं उपजला ॥ ४३ ॥
जो वश्य करी भूगोल। जिंकी देव सकळ।
असा तो दैत्य खळ। बळें धरीं शुककन्येतें ॥ ४४ ॥
तीणें तिरस्कारूनी तयातें। आयूपुत्र मारील तूतें।
असें शापितां तो तीतें। कारागृहीं ठेवितसे ॥ ४५ ॥
कन्या तयाची सुंदरी। ती गेली स्वर्गावरी।
खेळे नंदनवनांतरीं। अंतरीं आनंद पावूनी ॥ ४६ ॥
द्विषत्सुता[१] ही असें नेणून। परस्पर बोलती चारण।
हुंडासुराचें हनन। आयुःसुत करील ॥ ४७ ॥
जो सुषुप्त[२] होतां निश्चिंत। तया मृत्यु अकस्मात।
पातला देवनिर्मित। हें निश्चित वाटतें ॥ ४८ ॥
प्रसुप्तं च प्रमत्तं च कार्याकार्याविदं खलं।
मृत्युर्ग्रसिष्यति क्षिप्रं देवगोविप्रपीडकं ॥ ४९ ॥
असें सुरचारणभाषण। ती कन्या ऐकून।
त्वरें कांचननगरीं येऊन। सांगे वर्तमान हुंडासुरा ५०
जो इषुधी धनुष्य ठेवून। राहे तो हें ऐकून।
आठवे मनीं इचकून। शापवचन अशोकसुंदरीचें ५१
तो गुप्तपणें येऊन। पाहे राज्ञीस भिऊन।
कृष्णाग्रपुष्टस्तन। तो पाहून म्हणतसे ॥ ५२ ॥
अवस्था इची पालटली। ही खास गर्भिणी झाली।
तरी गर्भपात ये वेळीं। प्रयत्नें करावा ॥ ५३ ॥

---

१ वैऱ्याची मुलगी. २ निष्काळजी, बेफिकीर.

जंव न झाली प्रसूत । तंव मारावा इचा पोत ।
असें म्हणे तो अकस्मात । दिसलें त्याला सुदर्शन ५४
त्वरें एकसरें गरगरां । राणी भोंवतें घाली फेरा ।
तें पाहतां त्या असुरा । थरथरां कांपरा आला ॥५५॥
विलोकितसे दुरोन । म्हणें इचें रक्षण ।
गुप्तरूपें करी कोण । माझा यत्न थकला आतां ॥५६॥
स्वर्गीं भूमीतळीं । अथवा रसातळीं ।
मत्समान नाहीं बळी । तरी हा ह्या वेळीं कोण आला
ही प्रातःकालीन सूर्यासमान । तेजें भासे म्हणून ।
इचे पोटीं दारुण । माझा शत्रू पातला ॥ ५८ ॥
जरी प्रयत्नेंकरून । याचा घ्यावा प्राण ।
तरी हें सुदर्शन । आड येऊनी राहिलें ॥ ५९ ॥
ही प्रज्ञा येथें खुंटली । आतां शक्ती गळाली ।
आयुष्याची दोरी तुटली । म्हणोनी बली हा झाला ॥
तरी न टाकावा प्रयत्न । यत्नें न टळतां मरण ।
मग अपराध म्हणेल कोण । हा पूर्ण सिद्धांत ॥ ६१ ॥
जें न घडे उद्योगानें । तेथें दोष कोण म्हणे ।
असें म्हणून असुरानें । दुःस्वप्नें दाविलीं तियेसी ६२
मरून गर्भ बाहेर । पडे तया नसे शिर ।
भिन्न दिसे उदर । असें स्वप्न पाहे ती ॥ ६३ ॥
एकाएकीं डचकून । उठे भयभीत होऊन ।
म्हणे हें दुःस्वप्न । काय दुश्चिन्ह सुचवितें ॥ ६४ ॥

बरवा वर लाधून । मी झालें गर्भीण ।
आतां हें दुःस्वप्न । काय सुचवून देतसे ॥ ६५ ॥
अत्रिनंदना आठवून । ती प्रातःकाळीं उठून ।
प्रातःस्नान करून । प्रार्थी वंदून सूर्यासी ॥ ६६ ॥
नमो दयासागरा । श्रीसूर्या प्रभाकरा ।
अभयदा दिवाकरा । सुरवरा त्रिमूर्ते ॥ ६७ ॥
हें मम दुःस्वप्न । निवारूनी करी सुस्वप्न ।
तुला करितें नमन । माझें मन प्रसन्न करी ॥ ६८ ॥
जें हें योगीश्वरें फळ । दिधलें तें होवो सफळ ।
सुखें उपजो हा बाळ । वाढो कुळ आमुचें ॥ ६९ ॥
आतां ह्या दुःस्वप्ना पाहून । मनीं भीत होऊन ।
आल्यें तुला शरण । करी रक्षण आमुचें ॥ ७० ॥
तूं आनंददाता । असती जगत्प्रसविता ।
अशी प्रार्थूनी ती वनिता । स्वस्थचित्ता राहिली ॥७१॥
तें सुदर्शन राणी न पाहे । तें तो असुरचि पाहे ।
म्हणूनी दुष्ट स्वप्न पाहे । दावितसे दैत्य तिला ॥७२॥
हुतभुक्सम चक्रकांती । पाहूनी दैत्य घे भीती ।
म्हणे उद्योग निष्फळ होती । म्हणूनी खंती करी तो॥
दैत्याचे माये करून । न हो गर्भाचें पतन ।
ज्याला रक्षी अत्रिनंदन । वरदान सफळ व्हावया ७४
मग तो दुष्ट असुर । सोडूनियां आहार ।
गुप्त राहूनी अहोरात्र । पाहे अंतर घात कराया॥७५॥

ज्याचें मुनी करिती ध्यान। तो दत्त स्वतः राहून।
करी गर्भाचें संरक्षण। तेथें कोण घात करी ॥ ७६ ॥
जो सुखस्वरूपदाता। कसा कोण तया दत्ता।
ठकवील हें सर्वथा। कानीं कथा न पडेल ॥ ७७ ॥
निज प्रारब्ध नेणून। दैत्य गेला व्यर्थ शिणून।
तंव राणीचा गर्भ पूर्ण। सुखें करून वाढला ॥ ७८ ॥
मंत्रज्ञ विप्र बोलावून। राजा करी पुंसवन।
अनवलोभन सीमंतोन्नयन। करी हर्षून विष्णुबली ॥
सुविस्तृत होईल वंश। म्हणूनी राजा धरी आस।
अमित धन ब्राह्मणांस। दे संतोष मानूनी ॥ ८० ॥
मग ती दहा मास लोटतां। राणी प्रसूत न होतां।
राजा करीतसे चिंता। अजूनी प्रसूत कां न हो ही ८१
हें प्रायः कांहीं तरी विघ्न। असावें असें मानून।
विप्रा म्हणे जळ मंत्रून। देतां सुखानें प्रसवेल ही ८२
तें नृपाचें वचन। ते ब्राह्मण मानून।
देती जळ मंत्रवून। चिंतून अश्विनीकुमारां ॥ ८३ ॥
वचोदः शृणुतं दस्रौ[1] सप्तवध्रिं च मुंचतं।
नाथमानमृषिं भीतं दशमास्यं यथासुखं ॥ ८४ ॥
मंत्रें एक वेळ देतां जळ। तें पितां तत्काळ।
ती प्रसवली बाळ। न होतां व्याकुळ सुखानें ॥८५॥

१ हे दस्रौ, अदः वचः शृणुतं. नाथमानं सप्तवध्रिं मुंचतं इ. अश्विनी-कुमार हो. हें वचन ऐका. सप्तधातुवेष्टित सोडा. प्रार्थना करणारा दहा महिन्यांचा सुटो.

अशेष तेज एकवट । होऊनी झाला कीं बाळ स्पष्ट ।
असें वाटे अवचट । बाळाचा ललाट लागतां ॥ ८६ ॥
योग सकळ पातले । पांच ग्रह परमोच्चीं आले ।
अस्त नसे तये वेळे । कोणत्याही ग्रहाचें ॥ ८७ ॥
जो सर्वेश्वराचा प्रसाद । तो मध्यरात्रीं झाला विषद ।
त्याच्या तेजें दीप होती मंद । नृपा आनंद जाहला ॥
योगीश्वराचें वरदान । तें हें पुत्ररूपेंकरून ।
उपजतां सर्वांचें मन । समाधान जाहलें ॥ ८९ ॥
जसा रवी नभोमंडळीं । तसा पुत्र तो भूमंडळीं ।
शोभे मग तये वेळीं । आयुराजा तेथें आला ॥ ९० ॥
बाळ एकाएकीं पाहून । राहे हृष्ट होऊन ।
म्हणें मी ऋणापासून । मुक्त झालों निश्चयें ॥ ९१ ॥
संतोष मानूनी असा मनीं । राजा स्नान करूनी ।
ब्राह्मणा बोलावूनी । जातकर्म करी तो ॥ ९२ ॥
विप्रांस धन देऊनी । नांदीश्राद्ध करूनी ।
सुवर्णे मधु घृत घेऊनी । बाळाचे वदनीं घाली तो ९३
अपूर्व लाभ मानून । राजा भांडार फोडून ।
विप्रां म्हणे लुटा धन । समाधान व्हा तुम्ही ॥ ९४ ॥
दैवज्ञ येथें येऊन । जन्मलग्न साधून ।
ग्रहयोग पाहून । म्हणती सावधान ऐक भूपा ॥ ९५ ॥
नृपा एवढा राजयोग । आम्ही न ऐकला चांग ।
हा बळें घेईल स्वर्ग । असा सुयोग दिसतसे ॥ ९६ ॥

चंद्रा षोडश कला असती । हा जाणेल कला चौसष्टी ।
चौदा विद्या जाणूनी ख्याती । मिरवील हा सर्वत्र ॥
जन्मान्तरींचें होतें सुकृत । म्हणोनी हा झाला सुत ।
हा महावीर प्रख्यात । दाता धर्मरत होईल हा ॥९८॥
हा आर्यांचा रक्षक । अनार्यांचा शिक्षक ।
परंतु बाल्यावस्थेंत शोक । देईल तोक हां तुम्हां ॥९९॥
हो साम्येसी याचिया । असा न दिसे दुसरा राया ।
असें वचन ऐकूनियां । राजा तयां ग्राम देई ॥ १०० ॥
संतोष मानूनी असतां । विप्राचें वचन परिसतां ।
मग राजाच्या चित्ता । ये खिन्नता किंचित ॥ १०१ ॥
शोकयोग न यावा म्हणून । तत्काळ विप्रां वरून ।
म्हणे करा अनुष्ठान । शोकशमन व्हावया ॥ १०२ ॥
ज्याणें निःशेष दोष वारून । दिधला हा नंदन ।
तो अत्रिनंदन । शोकशमन करो माझें ॥ १०३ ॥
माझा सर्वपरी भार । आहे ज्याच्या पादावर ।
तो श्रीदत्त देववर । आपुला वर सत्य करो ॥ १०४ ॥
म्यां सर्वभावेंकरून । धरिले त्याचे चरण ।
पुनः पुनः प्रार्थून । काय मागून घ्यावें म्यां ॥ १०५ ॥
सर्वस्य चाहं हृदि संनिविष्ट । ही त्याची प्रतिज्ञा स्पष्ट ।
तो सर्वज्ञ अंतर्निष्ठ । सर्व कष्ट वारील ॥ १०६ ॥
बाळ प्रत्येक वेळीं । रडे मातेजवळी ।
माता आश्वासी त्या त्या वेळीं । प्रेमें सांभाळी ज्यापरी

आम्ही भक्तवत्सला जवळी । आम्ही त्यापरी[1] मारूं आरोळी ।
तोचि राखो वेळोवेळीं । असा त्या वेळीं प्रार्थी भूप ॥
इति श्रीदत्तमाहात्म्ये चत्वारिंशोऽध्यायः ॥ ४० ॥
॥ श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

१ त्या पोराप्रमाणें.

## अध्याय एकेचाळिसावा

### श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

म्हणे वाराणसीवासी । वेदधर्मा दीपकासी ।
पाहतां त्या राजपुत्रासी । हुंडासुरासी भय झालें॥१॥
वैरूप्य वैवर्ण्य होऊन । म्हणे माझें सरे जीवन ।
तेजस्वी हा नृपनंदन । करील कदन पुढें माझें ॥ २ ॥
हाचि यौवना येतां । मग नये माझ्या हाता ।
जरी धरावा आतां । तरी चित्ता भीति वाटे ॥ ३ ॥
कोणीहि समर्थ देव । ह्याचा रक्षी जीव ।
म्हणोनी माझें बुद्धिवैभव । सर्वथैव ग्वचलें हें ॥ ४ ॥
स्वर्ग भूमी पाताळ । ह्यां धुंडितां असा प्रबळ ।
कोणी नसे तेव्हां घननीळ । हा सबळ खास असे॥५॥
असता इतर जरी । तरी खास तयावरी ।
माझी माया पडती निर्धारी। तेव्हां दैत्यारी हा असावा
होईना कां घननीळ । महामाया[1] असे सबळ ।
तिचें धरितां चरणकमळ । ती बळ देईल मला ॥ ७ ॥
हें मनांत आणून । हुंडदैत्य कर जोडून ।
म्हणे महामाये ये धांवून । दे आश्वासन ह्या दासा ॥
हें अंतःकरण माझें । इच्छी चरण तुझे ।
तूं सर्व दुःखांचें ओझें । आज माझें उतरीं हें ॥ ९ ॥

१ मोहिनी देवता.

तुझा प्रसाद झाल्यावरी। मग कोण मशीं वैर करी।
मीच सर्वांच्या उरावरी। बसेन मातोश्री निश्चयें॥१०॥
मी अज्ञ तुझा बाळ। तूं करी माझा प्रतिपाळ।
माझ्या हातीं दे हा बाळ। करी सफळ उद्योग माझा
मी अन्नपान सोडून। टपून राहिलों अनुदिन।
आतां तूं कृपाकरून। अवलोकन करीं माते ॥ १२ ॥
जरी बळी असेल अरी। किंवा साह्य करी हरी जरी।
तूं कृपा करिसी तरी। पर्वा न धरी कोणाची ॥ १३ ॥
मी बहिःस्थ असोन। राहिलों दीनवदन।
आंत जावया मन। अनुमान करीतसे ॥ १४ ॥
तूं क्षिप्र प्रसाद करिसी। तरी अशक्य काय आम्हासी
मग मी कोणासी। न आटोपेन ॥ १५ ॥
सर्वज्ञ जो वैकुंठवासी। प्रळयीं तूं तयासी।
निद्रारूपें व्यापिसी। मग इतरासी कोण गणी॥१६॥
मी अन्नोदकाविण। येथें पावतों शीण।
तूं न करितां कृपेक्षण[1]। मजला मरण येईल ॥ १७ ॥
आतां भक्तवत्सले हो प्रसन्न। तुला मद्यमांस बळी देईन
महामाये तुला नमन। दे वरदान मोहिनी ॥ १८ ॥
दैतेय असा मोहिनीसी। भक्ति धरूनी राजसी।
प्रार्थी मग तियेसी। ये करुणा तयाची ॥ १९ ॥
तों अंतःपुरांतून। दासी बाहेर येऊन।
बैसली तिला पाहून। दैत्याचें मन हृष्ट झालें ॥ २० ॥

१ कृपावलोकन.

म्हणे प्रवेशून इच्या शरीरीं । सुखें जावें अंतःपुरीं ।
असें आणूनि अंतरीं । तिच्या शरीरीं प्रवेशिला॥२१॥
जी विज्ञप्ती[1] तियेची । तिला तो सर्वथा खेंची ।
जी शक्ती स्वतःची । तिची व्याप्ती करी अंगीं ॥२२॥
प्रच्छन्नपणें तो असा । सूतिकागृहीं सहसा ।
आला तिच्यासह तसा । कोण कसा ओळखी तया ॥
म्हणे प्रसन्न झाली मोहिनी । म्हणूनी आलों या सदनीं॥
आतां जपून प्रस्वापिनी[2] । सर्वां मोहूनी ठेवितों॥२४॥
जी तूं ज्ञान्याच्याही बुद्धीसी । प्रस्वापिनी मोह घालिसी
ती तूं आतां या समयासी । निजवीं सर्वांसी सत्वर॥
कोणी न पाहावें मज । अशी सर्वां येवो नीज ।
प्रातःकाळीं सहज । सर्वांची नीज खुलावी ॥ २६ ॥
झोंप घनदाट सर्वां यावी । असा मंत्र मायावी ।
योजी मग ती देवी । गाढ निजवी सर्वांतें ॥ २७ ॥
तो आनंद पावूनी । त्या बाळा उचलूनी ।
घे त्वरेंकरूनी । चाले निजपुरा ॥ २८ ॥
तया न वारी दत्त । मंत्रशक्तीतें मान देत ।
सर्व होती मोहित । दैत्यचेष्टा नेणती ॥ २९ ॥
सर्व प्रसुप्त पडले । कोणी त्याला न पाहिलें ।
त्याणें आकाशगमन केलें । बाळा नेलें नगरांत॥३०॥
सर्वज्ञ भगवान् दत्त । ज्याचें अगाध चारित्र ।
भक्तांचें करावें हित । हेंचि संतत चिंती जो ॥ ३१ ॥

---

१ ज्ञानशक्ति. २ या नांवाचा मंत्र.

सकृन्नाम[1] उच्चारितां । जो तारी निजभक्तां ।
मग सतत सेवितां । तो नित्ययुक्तां टाकील कीं ॥३२॥
बाळाप्रति नेऊनी । दैत्य स्वभार्येला बोलावूनी ।
तिचे करीं बाळा देऊनी । म्हणे छेदूनी शिजवीं यातें॥
जो यज्ञ तप आदिक । करूनी राजा उपजवी लेंक ।
तो हा माझा अंतक । याचा पाक करीं वेगें ॥ ३४ ॥
म्यां हा महा यत्न । करूनी मिळविला जाण ।
याला आतांच हाण । प्रातरशन करावया ॥ ३५ ॥
हें अदृष्ट माझें सबळ । म्हणूनी मिळाला हा बाळ ।
हयगय करितां हा काळ । निर्मूळ करील ॥ ३६ ॥
अरिष्ट माझें टाळावया । याला आणिलें भक्षावया ।
त्याचें हें वाक्य ऐकूनियां । त्याची भार्या म्याली ३७
बोले मग ती पतीसी । कां मारितां बाळासी ।
हा काळ तुम्हासी । केवीं शत्रु होईल ॥ ३८ ॥
तुम्ही व्यर्थ घात । करितां शास्त्रनिंदित ।
कुळाचा करील घात । बाळहत्यापाप हें ॥ ३९ ॥
हें केवळ साहस । लोकीं होय परिहास ।
दैत्य म्हणे तियेस । काय उपदेश तुझा हा ॥ ४० ॥
दैवें हा शत्रु उपजविला । हा घेईल माझ्या प्राणाला।
कष्टें म्यां मिळविला । हा दयेला पात्र नाहीं ॥ ४१ ॥
आचार्य आमुचा विरोचन । त्याचें असें वचन ।
अकार्यही करून । आत्मरक्षण करावें ॥ ४२ ॥

---

१ एकवार.

हेंचि मत मान्य असे। देह हाची आत्मा असे।
हा प्रत्यक्ष दिसतसे। न तसें तें असद्ब्रह्म ॥ ४३ ॥
हेंचि ग्राह्य होय मत। होतां आत्मयाचा घात।
मग कोण भोगील अर्थ। हा पुनः दुर्लभ ॥ ४४ ॥
हें गुह्य शास्त्रमत। स्त्री पुत्र गृह वित्त।
ज्याकरितां प्रिय होत। तो प्रेष्ठ देह आत्मा ॥ ४५ ॥
देहमत्र सदा रक्षेद्दारैरपि धनैरपि।
पुनर्दाराः पुनर्वित्तं न देहात्मा पुनः पुनः ॥ ४६ ॥
हेंचि लक्ष्यांत आणून। गुरुमतासी मानून।
ह्या बाळा मारून। पाक करूनी दे सत्वर ॥ ४७ ॥
समक्ष करवीं पाक। असें सांगूनी तो बालक।
तिच्या करीं दिधला ती धाक। मानूनी तोक घेतसे॥
चरण धरूनी बाळाचे। ती हातीं दे सैरंध्रीचे[1]।
तिला सांगे याचें। हनन करीं सत्वर ॥ ४९ ॥
हा मम पतीचा वैरी। ह्याचा पाक शीघ्र करीं।
आतां ह्याचीच न्हेरी। करील राक्षसेंद्र ॥ ५० ॥
मृत्युचिंता मग जाईल। पती अमर होईल।
असें सांगोन देई बाळ। स्वयें गुंते कार्यांतरीं॥ ५१ ॥
अपत्य तें घेऊन। पाकस्थानीं नेऊन।
बल्लवाचे हातीं देऊन। सैरंध्री वचन बोलतसे ॥५२॥
तुवां महाशस्त्र घेऊन। याचें करीं हनन।
मग मी पाक करून। देईन नेऊन हुंडासी ॥ ५३ ॥

१ दासी.

तो सव्य करें धरी बाळ। वामहस्तें करवाल।
धरूनियां दोन वेळ। प्रहार करी जोरानें ॥ ५४ ॥
शस्त्र पडतां तयावरी। धार मोडोनी पडे दूरी।
मग तो बाळा भूमीवरी। ठेवूनी मारी जोरानें॥५५॥
दत्त देवानें सुदर्शन। तयावरी ठेविलें रक्षण।
म्हणूनी शस्त्र गेलें मोडून। हें कोणी नेणती ॥ ५६ ॥
अदृश्य असे सुदर्शन। त्यावरी शस्त्र खणखण।
बाजूनी जाय मोडून। बाळ हंसूनी राहिला ॥ ५७ ॥
बाळा मेषापरी माराया। यत्न केला तो वायां।
गेला हें पाहूनियां। आश्चर्य तया वाटलें ॥ ५८ ॥
बाळका धरी सैरंध्री। म्हणे बल्लवा बाळावरी।
आतां शस्त्र न मारीं। याचा कैवारी थोर असे॥५९॥
हा आत्मज कोणाचा। कोण कैवारी याचा।
हा निश्चय आमुचा। होत नाहीं यथार्थ ॥ ६० ॥
दैव प्रबळ याचें। म्हणोनी मन आमुचें।
द्रवलें आतां याचें। आम्ही रक्षण करावें ॥ ६१ ॥
कां दैत्य मारवी त्यासी। हें न कळे आम्हासी।
राजचिन्हें दिसती यासी। हा दैवाचा पुतळा ॥ ६२ ॥
हा होय रत्नोपम। याला मारील कोण अधम।
याचीं लक्षणें उत्तम। हा परमभाग्यशाली ॥ ६३ ॥
मग साहस सोडूनी। बल्लव द्रवला मनीं।
बाळाचे दैवेंकरूनी। शांत होऊनी बोले तो ॥ ६४ ॥

हे सैरंध्री याला आतां। मी न मारीन सर्वथा।
तेजस्वी हा ह्या पाहतां। पशुघ्नचित्ताही द्रव ये॥६५॥
पहा प्रबल दैव याचें। शस्त्र मोडलें आमुचें।
परी एक रोम न तुटे याचें। वज्राचें कवच यावरी ६६
शस्त्रें पंचत्व न पावे। याला दुष्ट दानवें।
व्यर्थ कां मारवावें। परि हा दैवें रक्षिला कीं ॥ ६७ ॥
हा वांचोनी हंसतसे। ज्याचें दैव प्रदक्षिणें असे।
त्याला कर्म रक्षितसे। तया कसें कोण मारील॥६८॥
जे आपत्तीमध्यें पडती। घोरवनीं हिंडती।
नदीप्रवाहें वाहती। किंवा पडती अडचणींत ॥६९॥
तया शरण होतां देव। कोण घेई त्याचा जीव।
शस्त्राग्नी विष वैभव। तेथें अभाव पावेल ॥ ७० ॥
हा अमंदभाग्य जाणून। म्यां शस्त्र दिलें ठेवून।
असें बल्लवाचें वचन। ऐकून बोले सैरंध्री ॥ ७१ ॥
तुझें शांत मन झालें तर। दुसरें ठायीं सत्वर।
नेऊन ठेवी हा कुमार। हें कृत्य असुर न जाणो॥७२॥
असो तंतू हा कोणाचा। तूं प्राण वांचवीं याचा।
मग असा हा बोल तिचा। बल्लवाच्या मना आला ॥
ही अशि मती तयांची। वळे ही कृपा दत्ताची।
अंतर्यामी तो सर्वांचीं। अंतःकरणें कां न वळवी॥७४॥
बाळा वसिष्ठाचे दारांत। ते नेऊनी ठेविती त्वरित।
मारूनी मृगाचा पोत। विश्वासें मांस ते देती ॥७५॥

---

१ खाटिक. २ शुभ, अनुकूल. ३ पराभव. ४ मुलगा.

दैत्य मनीं हर्षूनी । तें बाळमांस मानूनी ।
विश्वासें खाऊनी । धन्य मानी आपणा ॥ ७६ ॥
हें मद्वैऱ्याचें मांस । मी भक्षिलें आतां खास ।
म्यां जिकलें मृत्यूस । चिरंजीवी झालों म्हणे मी॥७७॥
अस्वतंत्र असूनी । मूर्खही घमंडी मानी ।
ज्यावेळीं ज्याची मृत्युहानी । तीतें कोण फिरवील ॥
तो पांच घटी शेष रात्र । राहतां इकडे मुनीश्वर ।
उठोनी ये बाहेर । तंव दारीं पोर रडतसे ॥ ७९ ॥
तें कौतुक मानूनी । मुनिगणासह येऊनी ।
त्या बाळकातें पाहूनी । आश्चर्य मनीं करीतसे ॥८०॥
किमर्थ ह्याला कोणी रात्रीं येथें । ठेविलें हें न कळे मातें ।
आतां लावूनी ध्यानातें । ज्ञानें यातें जाणावें ॥ ८१ ॥
जो सम्मत देवांस । तो वसिष्ठ ध्यानें जाणें त्यास ।
मग म्हणे मुनिगणास । याचा इतिहास सांगतों॥८२॥
वदान्य जो श्रीदत्त । तो आयुराजातें वर देत ।
इंदुमतीच्या उदरांत । हा सुत जन्मा आला ॥ ८३ ॥
शुक्रान्तेवासी[1] हुंडासुर । त्यानें रिपु मानूनी हा पोर ।
माराया आणिला सत्वर । तो हा दैवें येथें आला ८४
हा दिसतो दिव्यलक्षण । पूर्णचंद्रसम वदन ।
रत्नोपम राजलक्षण । विशाळ लोचन सुंदर ॥ ८५ ॥
वाटे आतांच जन्मला । देवगर्भसा दिसे मला ।
दत्त रक्षितसे याला । यावर घाला कोण घालील॥८६॥

१ शुक्राचा शिष्य.

परात्मा दत्तात्रेय । जगद्व्यापक श्रुतिगेय ।
त्याचा प्रसाद मिथ्या न होय । हा बाळ अजेय होईल॥
दैत्यास मारूनी सत्वर । सर्वापत्ती करील दूर ।
हा चक्रवर्ती होईल शूर । सोमवंशाधार हा ॥ ८८ ॥
हें भविष्य खास म्हणूनी । जंव बोले वसिष्ठमुनी ।
तंव आकाशांतूनी । देवांनीं केली पुष्पवृष्टी ॥ ८९ ॥
मुन्याज्ञेनें ते ऋषी । आशिर्वाद देती बाळासी ।
जो व्यापी जगासी । तो दत्त बाळासी प्रतिपाळो ९०
जो पयःफेनधवल । तो दत्त रक्षो हें बाळ ।
आपत्ती वारूनी त्रिकाळ । रक्षो भूतखलग्रहहंता॥९१॥
तो वसो हृदयांत । अरिष्टांचा करो घात ।
असें म्हणूनी विभूत । लाविती ते बाळासी ॥ ९२ ॥
हृदय वसिष्ठाचें मोहिलें । तया बाळा उचलिलें ।
अरुंधतीचे करीं दिलें । मन झालें तिचें हृष्ट ॥ ९३ ॥
जसा मातेच्या स्तना । बाळ पाहतां सुटे पान्हा ।
तसा सुटला पान्हा । तिच्या स्तनांतुनी तेव्हां ॥९४॥
सर्वात्मा अत्रिपुत्र । त्याचें कौतुक विचित्र ।
आपण राहूनी स्वतंत्र । जगद्यंत्र चालवी ॥ ९५ ॥
मुन्यध्यक्ष वसिष्ठऋषी । म्हणे हा बांधील शत्रूसी ।
म्हणूनी नहुष[1] नाम यासी । ठेविलें म्यां ॥ ९६ ॥
सत्पक्ष हा धरूनी । दुष्टां ठेवील बांधूनी ।
नह बंधन असें स्मरूनी । नहुष नाम ठेविलें ॥ ९७ ॥

१ नहनं बंधन योऽरेः कर्ता स नहुषः स्मृतः

ह्याचि रक्षिल देवांस। म्हणूनी नाम ठेविलें नहुष।
असें म्हणूनी बाळास। आशिर्वाद देई ॥ ९८ ॥
जो नमोंतप्रणवादी। दत्तात्रेय चतुर्थ्यंत मधीं।
तो मंत्र लिहूनी कंठी बांधी। आधिव्याधि हरावया॥
बाळकावरी प्रीती। ठेविती दंपती।
सर्व प्रकारें रक्षिती। न विसंबिती क्षणभरी॥ १०० ॥
त्याणें रोदन करितां। अरुंधती गाऊनी गीता।
थारवी तया पोता। दैवनाथा[1] क्षणोक्षणीं ॥ १०१ ॥
समाधिसुख अंतरून। मुनी करी बाळासी जतन।
त्याचा स्नेह वाढवून। राजनंदन वाढे तो ॥ १०२ ॥
मानी माता अरुंधतीसी। ताता म्हणे वसिष्ठासी।
असा तो पुत्र तयांसी। मोहाविष्ट करी ॥ १०३ ॥
तो मात्रंतर नेणें बाळ। दैवें वाढला विशाळ।
येतां मुंजीबंधनकाळ। उपनयन करी मुनी ॥ १०४ ॥
जो नृपाचा अधिकार। तदनुसार संस्कार।
करूनी सांगे वेद चार। सहाशास्त्रांसहित ॥ १०५ ॥
तो चौदा विद्या निपुण। झाला चौसष्टकळाप्रवीण।
धनुर्वेदनिपुण। न्यायसंपन्न झाला तो ॥ १०६ ॥
परमादरें करून। मुनीचें करी सेवन
वसिष्ठ प्रसन्न होऊन। दे सांगोन अस्त्ररहस्य ॥ १०७ ॥
त्या पुत्रा सोमवंशी। जन्म असूनी वसिष्ठापाशीं।
विद्या मिळाली दैववशीं। हें आयुसी न ठावें ॥ १०८ ॥
इति श्रीदत्तमाहात्म्ये एकचत्वारिंशोऽध्यायः ॥ ४१ ॥
श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

[1] दैव हेंच नाथ.

# अध्याय बेचाळिसावा

## श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः

दैत्यें माया जी योजिली। ती प्रातःकाळीं दुरावली।
सर्वांची झोंप खुलली। जागी झाली इंदुमती ॥ १ ॥
ती पुत्रातें न पाहूनी। इकडे तिकडे शोधूनी।
पुसे दासीलागुनी। त्याही झोंपेंतूनी उठल्या ॥ २ ॥
त्या आश्चर्य मानिती। डोळे पुसोनी पाहती।
बाळाची न दिसे गती। चित्तीं खंती करिती त्या॥३॥
माता पाहे इकडे तिकडे। परी बाळ दृष्टीस न पडे।
मग ती मोठ्यानें रडे। मूर्छित पडे भूमीवरी ॥ ४ ॥
राणी दाटे शोकेंकरून। म्हणे हाय हाय माझें जीवन
कोणी नेलें चोरून। हें पसरून मायाजाळ ॥ ५ ॥
म्हणे अहा हा परमेश्वरा। कोणी नेलें माझ्या पोरा।
हाय हाय जगदीश्वरा। करुणाकरा काय करूं ॥ ६ ॥
ह्या शोकाग्नींत ढकलून। कोठें गेला माझा नंदन।
सोमवंशभूषण। मनोरंजन न दिसे कोठें ॥ ७ ॥
पामर कोणगे आला। कसा माझा पुत्र नेला।
हा घाला कसा घातला। मला निद्रा कां आली ॥८॥
कष्ट उत्कट करितां। दुष्कर तप आचरतां।
तीव्रतर नियम होता। जो हातां ये सुत ॥ ९ ॥
तो एकाएकीं कसा। हाय हाय झाला नाहींसा।
दिसे जो देवसुतसा। स्वप्नींही तसा न पाहिला॥१०॥

तो हिरोनी कसा। कोणी नेला सहसा।
श्रीदत्ताचा प्रसाद कसा। दे असा ताप मला ॥ ११ ॥
ज्याचा महिमा अगाध। ज्याला वंदिती विबुध[1]।
तोचि दत्त विबुध[2]। दे प्रसाद आम्हांसी ॥ १२ ॥
ज्याला काल भीतसे। त्या दत्താचें वचन कसें।
व्यर्थ झालें हें असें। वाटतसे आश्चर्य ॥ १३ ॥
मनोरमा सुकुमारा। येरे वत्सा गुणाकरा।
कोठें लपसी सुंदरा। प्राणाधारा ये त्वरें ॥ १४ ॥
तूं कां इतुका रागावसी। मी निजल्यें म्हणोनी कीं रुससी।
ये रे आतां त्वरेसी। हयगय ती न करीन ॥ १५ ॥
दुर्मति हरहर मी सुता। हाय हाय काय करूं। मी अतां ॥ ध्रु० ॥ १६ ॥
जरी जागीं राहती। जरि मी न निजती।
तरि अशि कशी गती। मग होति बा पुता ॥ १७ ॥
गुणगण मंडित। होसील पंडित।
ही आस खंडित। केली तुवां बा पुता ॥ १८ ॥
तूं अरि मारशिल। पुढें राज्य करशिल।
वृद्धपणीं तारशिल। आम्हा वाटलें पुता ॥ १९ ॥
सतत मी नवमास। ओझें पाळिलें हें त्रास।
न मानिली तुझी आस। धरि ख्वास बा पुता ॥ २० ॥

१ देव. २ पंडित.

अवस्था ती स्वप्नापरी। भासली या अवसरीं।
दुःखाद्रि हा मजवरी। कोसळला कीं पुता ॥ २१ ॥
जो मनोरथ माझा। होता तो तूं आत्मजा।
पुराविला नच दुजा। कोण पुरवी आतां ॥ २२ ॥
माझी वैखरी हे शिणे। परि नोहे दुःख उणें।
वाटे माझें सरें जिणें। कोण भेणें नच वारितां ॥२३॥
मी विश्वास तुझा केला। कसा टाकसी तूं मला।
द्रव कसा नये तुला। सांग मुला तूं आतां ॥ २४ ॥
होतां न तूं ह्या दिशा। शून्य वाटती मदाशा।
भंग होतां ये दुर्दशा। वांचूं कशाला आतां ॥ २५ ॥
असें रोदन करून। त्याचें रूप आठवून।
घे कपाळ फोडून। म्हणे कां मरण मला नये ॥ २६ ॥
पुत्रा कारे मुख न दाविसी। तूं कोठें लपलासी।
पान्हा आला स्तनासी। कां न येसी अजूनी ॥ २७ ॥
हें उरःस्थळ जळजळतें। मन हें कळकळतें।
मी एथें वळवळतें। परी न वळे तुझें मन ॥ २८ ॥
पुत्र प्रसवलें तुला। हें म्हणतां लाज ये मला।
ह्या तोंडा काळिमा आला। हें दावूं कोणाला आतां॥
तूं प्रथमतः जरी। न येतासी उदरीं।
दुःख न वाटतें भारी। परी हें गिरिप्राय वाटे॥ ३० ॥
दूध माझें जातें वांयां। ये लौकर धावूनियां।
तूं कोठें जाऊनियां। लपसी वांयां रुसोनी ॥ ३१ ॥

काय माझा अन्याय। पाहूनी लपला तनय।
जो वाटे आनंदमय। एकदां ही पय जया न दिलें ३२
रे पुत्रा ये धावून। तुझ्या मुखीं देतें स्तन।
न राहीं आतां लपून। कठोर मन करूनी ॥ ३३ ॥
जो प्राप्तेश्वरप्रसाद[1]। तोही पुत्राचा खेद।
न साहेल मी तरी मंद। हा खेद कसा वारूं ॥ ३४ ॥
ईश्वरानें पाठ केली। म्हणोनी ही दशा आली।
जीवनकळा तुटली। आपुली आतां वाटते ॥ ३५ ॥
दिसे दिव्य दर्शन। उपजतांची नंदन।
तयाचें म्यां लालन। न केलें पालन पापीण मी ॥३६॥
परम[2] पुत्रा मांडीवरी। न घेतला क्षणभरी।
पाळण्यांत घालोनी दोरी। मी न धरीं मुखें गात ३७
ममत्वानें ओढूनी। जो गेला मज सोडोनी।
एकदांही म्यां न माखूनी। किंवा न्हाणूनी न ठेविला
होते द्वारीं द्वारपाळ। त्यांच्या डोळयांवरी पटल।
बांधोनियां कोण खळ। नेला बाळ कळेना ॥ ३९ ॥
हें स्वप्नोपम सर्व झालें। व्यर्थ म्यां ओझें वाहिलें।
कष्टें व्यर्थ मी प्रसवलें। व्यर्थ केलें जातकर्म ॥ ४० ॥
मागुति पुत्र दिसेल म्हणोन। भरंवसा धरील कोण।
मी जाईन मरून। शोक करून पुत्राचा ॥ ४१ ॥
हळहळतें माझें मन। कशी मीही पापिण।
कां न गेल्यें मरून। माझें प्राक्तन असें कसें ॥ ४२ ॥

---

१ मुक्त. २ उत्तम.

केलें वैषम्य पंक्तींत। किंवा केला विश्वासघात।
किंवा कोणाचें वित्त। अपहृत केलें कीं ॥ ४३ ॥
किंवा सर्प मारिला। किंवा विप्र लुटला।
किंवा गांवावरी घाला। घातला पूर्वजन्मीं ॥ ४४ ॥
जें सर्वांहूनी अधिक। ब्रह्मस्वापहारपातक।
जें केवळ पावक। सकळ कुळ जाळी जें ॥ ४५ ॥
महान्[1]का होईना। जरी घे ब्राह्मणधना।
तरी जन्मांतरीं संताना। न देखे ह्या वचना ऐकें मी॥
तरी माझ्या हातून। घडलें ब्रह्मस्वहरण।
म्हणोनी हा नंदन। नष्ट होऊनी गेला कीं ॥ ४७ ॥
हा विना कर्मावांचून। अनर्थ न ये घडून।
कीं केलें न्यासापहरण[2]। तें वृजिनें[3] हें ये कीं ॥ ४८ ॥
पुत्र दिसला रत्नासमान। पूर्वी मी कोणाचें रत्न।
घेतलें कीं चोरून। म्हणून पुत्ररत्न नष्ट झालें॥ ४९ ॥
हें आश्चर्य वाटे केवळ। पुढचें गेलें बाळ।
जेवतां पुढची पत्रावळ। म्यां कोणाची ओढली कीं५०
जो शुभलक्षणी सुत। एकाएकीं झाला गुप्त।
हें मित्रद्रोहदुरित। झालें उदित वाटतें ॥ ५१ ॥
किंवा वधिला ब्राह्मण। किंवा बाळहत्या केली दारुण।
त्या पापापासून। माझा नंदन नष्ट झाला ॥ ५२ ॥
किंवा यति क्षोभविला। कीं अतिथी परतविला।
कीं ग्रास हिरोनी घेतला। म्हणूनी गेला हा पुत्र॥५३॥

---

१ मोठा पुरुष कां होईना. २ ठेवा, विश्वासानें ठेवलेलें द्रव्य. ३ पातक.

अभय देऊनी कीं कोणाला। पूर्वीं मी फसविला।
कीं देवाचा दिवा मालविला। म्हणोन गेला हा सुत५४
पापें एवढीं जरी। न करितें जन्मांतरीं।
तरी बाळ ये अवसरीं। कोण चोरी करूनी नेता॥५५॥
कीं न वंदिले महांत। कीं निंदिलें परदैवत।
कीं पूजितां स्वदैवत। अकस्मात मध्येंच उठे ॥ ५६ ॥
बरवें अन्न करून। म्यां पंक्तिभेद करून।
केलें असेल कीं भोजन। म्हणूनी नंदन अंतरला॥५७॥
कीं मदभरेंकरून। अपमानिला ब्राह्मण।
कीं गोग्रास घेतला हिरोन। म्हणून नंदन अंतरला५८
किंवा स्वजनाचा केला भेद। कीं पतीस दिधला खेद।
कीं दंपतीसी लाविला वाद। म्हणोनी खेद हा झाला॥
दुःस्वप्न जें पाहिलें। त्याचें हें फळ आलें।
सूर्याचें स्तवन केलें। व्यर्थ गेलें तें कसें ॥ ६० ॥
अवस्था ही माझी असी। म्यां सांगावी कोणासी।
धीर माझ्या जीवासी। देईल दुःखासी वारून ॥६१॥
हें मन झालें उद्विग्न। काय करावें राज्य घेऊन।
सर्व वाटे विषासमान। पुत्रधन हरपतां ॥ ६२ ॥
समस्तैश्वर्याहून। अधिक वाटे पुत्रधन।
जया नसे संतान। त्याचें सदन कोण पाहे ॥ ६३ ॥
जी वांज असे नारी। भिक्षा न घेती तिचे घरीं।
पुत्रवती होय जरी। जगाभीतरी मान्य तीं ॥ ६४ ॥

वनासमान तें घर । ज्या घरीं नसे पोर ।
कासया संपत्ती थोर । घरीं कुमार नसतां ॥ ६५ ॥
स्वर्गीं उभय कुळ । वाट पाहती निश्चळ ।
म्हणती वंशीं झालिया बाळ । आम्हा निश्चळपद ये॥
आतां कासया वांचावें । वांज म्हणून घ्यावें ।
त्या पक्षीं वाटे मरावें । न उरावें लोकांत ॥ ६७ ॥
असें रोदन करून । ती पडे मूर्च्छा येऊन ।
दासी राजाप्रती जाऊन । वर्तमान कळविती ॥ ६८ ॥
तो उद्विग्न होऊन । तेथें आला त्वरें धांवून ।
तंव मूर्च्छा येऊन । राणी दीन पडली पाहे ॥ ६९ ॥
शोकें ती पडे भूमिवरी । वाऱ्यानें केळ ज्यापरी ।
दासी तीसी सांवरी । परी न उठे सर्वथा ॥ ७० ॥
त्या रायाचें मन । मग गेलें घाबरून ।
हायहाय म्हणून । तोही पतन पावला तेथें ॥ ७१ ॥
क्षणमात्र पडून मूर्च्छित । उठे उर्वशीचा सुत ।
मारी कपाळावरी हात । पुनः रडत पडे तो ॥ ७२ ॥
जें पुत्रोत्सवें झालें सुख । त्याला झांकीं पुत्रशोक ।
एकाएकीं उसळे दुःख । त्याला लेख न करवे ॥ ७३ ॥
तें उत्कृष्ट दुःख येतां । भूपा आली शून्यता ।
भ्रम जाहला चित्ता । म्हणे मरतों आतां शोकानें ७४
जो वर्षाकालीन घन । तो ते अश्रुपात पाहून ।
लज्जायमान होऊन । आश्चर्य पाहून राहिला ॥ ७५ ॥

थोडे उघडी नयन। ते दिसती रक्तवर्ण।
सूर्य तया पाहून। गेला लाजून आभाळांत ॥ ७६ ॥
राजा भयभीत होऊनी। पाहे तों वत्सावांचुनी।
गाय हंबरडे तशी राणी। तिला पाहूनी स्वयें रडे७७
अभय देऊनी माघारी। कां देवा दुःखसागरीं।
लोटिसी आम्हां शोकसागरीं। तूं हरी मग कसा७८
पुत्रत्वा पाववूनी। मग अपुत्र करूनी।
ठेविसी कां या भुवनीं। काय मनीं तुझ्या देवा॥७९॥
मी द्वंद्वोत्कट दुःख सोसूनी। जें फळ घेतलें मागूनी।
तें घेसी कां हिसकूनी। काय मनीं तुझ्या असे॥८०॥
मी सत्कर्म जें केलें। तें माझें बुडालें।
माझें दैव आतां फुटलें। देव रूसले मजवरी ॥ ८१ ॥
जो हर्ष मज झाला। तो अकस्मात डुबाला।
आतां वाचावें कशाला। मृत्यु आला तर बरा॥८२॥
असति परिखा प्राकार[1]। तयां असो धिक्कार।
असती कपाटें थोर। तयां धिक्कार सर्वथा ॥ ८३ ॥
जें व्यूह रचूनी ठेविलें सैन्य। त्यां टाकावें धिक्कारून।
जे वीर शस्त्र धरून। होते तयां धिक्कारावें ॥ ८४ ॥
कोण वैरी आला कोठून। पुत्र नेला उचलून।
तो गेला कसा कोठून। इकडे कोणं लक्ष्य न देती ८५

१ वाडे, हवेल्या.

मी आज्ञा दिली वीरांला । वेढा द्या गर्भगृहाला ।
कशी झोंप आली त्यांला । असो तयांना धिक्कार ८६
सुर नर कीं असुर । घेऊनी पळाला कुमार ।
ठेविलें यंत्र मंत्र । तया धिक्कार असो ॥ ८७ ॥
माझी संतती खुंटली । कुळदेवता रुसली ।
तपःशक्ती वायां गेली । भंगली धर्मशक्ती ॥ ८८ ॥
वाटतसे धर्म निर्बळ । तपा अंगी नाहीं फळ ।
दान समजे निष्फळ । माझा बाळ नष्ट होतां ॥ ८९ ॥
दुर्गतिंत पितरांसहित । आतां मी पडेन निश्चित ।
जन्मांतरींचें दुरित । तें हें फळित जाहलें ॥ ९० ॥
मला संतान नाहीं म्हणून । असें ज्योतिष्यांचें वचन।
तें ऐकतांही मूर्ख होऊन । केलें साधन व्यर्थ ॥ ९१ ॥
कसें माझें मूर्खपण । व्यर्थ पावलों शीण ।
हटानें तप करून । फळ कोण लाधला ॥ ९२ ॥
दैवीं नव्हतें म्हणून । धरिले देवाचे चरण ।
जो अनन्य शरण । तयाचें रक्षण करी जो ॥ ९३ ॥
तपश्चर्यादिकें करून । जो न होई प्रसन्न ।
तो भगवान अत्रिनंदन । मज प्रसन्न जाहला ॥ ९४ ॥
जो स्वभक्तांचा कैवारी । तो फळ दे माझे करीं ।
त्याच्या वचनावरी । विश्वास धरीं मी खास ॥ ९५ ॥
भगवद्भक्तां कैचें दैन्य । हेंचि सर्वांसी मान्य ।
मी भक्त अनन्य । कां वदान्य मज उपेक्षी ॥ ९६ ॥

मन्मति पालटली। कीं मला भूल पडली।
कीं काय चूक झाली। न उमजली ती मला ॥ ९७ ॥
जो नानारूपधर। ज्याच्या माहात्म्याचा पार।
नेणती सुर योगीश्वर। मी पामर काय जाणें ॥ ९८ ॥
सुहास्यान्वित मुख। ज्याचें पाहतां हो हरिख।
तोचि देईल सुख। सर्व दुःख वारूनी ॥ ९९ ॥
ज्याचा ब्रह्मादिकां पार। न कळे त्याला नमस्कार।
असो तो सर्वेश्वर। दुःख दूर करो माझें ॥ १०० ॥
जो ब्रह्मचि केवळ। तयाचें वंदूं पदकमळ।
तो करो प्रतिपाळ। दोष सकळ वारूनी ॥ १०१ ॥
देवा विश्वेश्वरा दत्ता। सांभाळीं आपुल्या भक्ता।
तुझ्या विना बा आतां। ह्या आर्ता कोण पाळी १०२
तूं सत्कुल विद्या धन। न पाहसी तप आचरण।
धरितां भावें चरण। शरण होसी निश्चित ॥ १०३ ॥
जे भले भले असती। ते पदोपदीं चुकती।
मी तरी मंदमती। चुकलों किती वेळ नेणें ॥ १०४ ॥
आतां भक्तवत्सला। पदरीं घेई मला।
आर्त होऊनी तुला। प्रार्थी मला अभय दे ॥ १०६ ॥
तूं देव अनंत। माझा काय पाहसी अंत।
मी करितों आकांत। होऊनी आर्त ये वेळीं॥ १०६ ॥
ही मति खचली आतां। पुत्र आत्मा नष्ट होतां।
आर्तावरी दृष्टी आतां। करी दत्ता दयाब्धे ॥ १०७ ॥

अभय दे मज आतां। सर्वापराध जातां।
क्षमा करीं बा दत्ता। दुजा त्राता कोण मला॥१०८॥
असा एकाग्र होऊन। श्रीदत्ता आठवून।
आयुराजा करी नमन। अति दीन होऊनी ॥ १०९ ॥
इति श्रीदत्तमाहात्म्ये द्विचत्वारिंशोऽध्यायः ॥ ४२ ॥
॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

---

# अध्याय त्रेचाळिसावा

**श्रीदत्तात्रेयाय नमः ॥**

दत्ता वंदितों तुझे चरण। अपराधक्षमापन।
करीं असें म्हणून। पडे भूमीवरी भूप ॥ १ ॥
म्हणे वेदधर्मा दीपकासी। त्या आयुराजासी।
चिंता जाहली अशी। होय मानसीं उद्वेग ॥ २ ॥
चार दत्ताचे भक्त। पहिला अर्थी दुजा आर्त।
तिसरा मुमुक्ष चौथा मुक्त। पुण्यवंत हे सर्व ॥ ३ ॥
जरी सुकृत असे पदरीं। तरी भक्ती जोडे ईश्वरीं।
ना तरी क्षुद्रदेवतांतरीं। भक्ती जडे खास ॥ ४ ॥
जें इषुकार[1] लक्ष्यावरी। चित्त ठेवी तयापरी।
मुक्ताची वृत्ती त्यापरी। ईश्वरीं सादर ॥ ५ ॥
सुषुप्त हो कां जरी। लक्ष्य त्याचें ईश्वरीं।
लक्ष्य न चुके निर्धारीं। त्यापरी न दुज्याचें ॥ ६ ॥
अवस्था ही मुक्तांची। अंतर्निष्ठा ईश्वराची।
जशी जारीं जारिणीची। वृत्ती जडे दृढ ॥ ७ ॥
जें मनःपूर्वक। होई तेव्हां तें सम्यक।
न तसें तें कायिक। न घडे सम्यक केवळ ॥ ८ ॥
मुक्त प्रायः अंतर्निष्ठ। जरी होई बहिर्निष्ठ।
तरी चिदन्वयें[2] स्पष्ट। व्यवहार त्याचा ॥ ९ ॥

---

१ बाण करणारा. २ चैतन्याचे व्याप्तीनें.

हा प्राज्ञोत्तम वरिष्ठ। चहूंमाजी श्रेष्ठ।
त्याहूनी तो कनिष्ठ। मुमुक्षु जो प्रेमळ ॥ १० ॥
घरीं मन त्याचें न लागे। उदासीनपणें वागे।
भगवद्भजनीं जागे। तया न लागे विषयगोडी ॥११॥
टाकी काम्य कर्म। करी निष्कामकर्म।
आदरे भागवतधर्म। सेवी शर्म व्हावया तो ॥ १२ ॥
ईश्वरप्रीत्यर्थ क्रिया। करी भाव ठेवूनियां।
तिसरा आर्त म्हणोनियां। तो याहूनी कनिष्ठ ॥१३॥
जी विस्तृत आशा संसारीं। ती एकाएकीं भंगे तरी।
आर्त होय निर्धारी। तो तत्क्षणीं जाण ॥ १४ ॥
किंवा तीव्र पीडा होई तरी। जरी पुण्य असे पदरीं।
आर्त भक्ती होय तरी। ईश्वरीं केवळ ॥ १५ ॥
व्हावया ज्ञानिभक्तता। आधीं पाहिजे जिज्ञासुता।
ही अशी येतां आर्तता। जिज्ञासुता सहज ये ॥ १६ ॥
जो कामार्थी लोकीं। धन स्त्री पुत्रादिकीं।
दृष्टी ठेवी अविवेकीं। न विलोकी परमार्थ ॥ १७ ॥
तो पुत्रादिक अर्थ इच्छी जरी। पुण्य असतां पदरीं।
भक्ती जडे ईश्वरीं। ना तरी क्षुद्रदैवतीं ॥ १८ ॥
अर्थ मिळावया जरी। क्षुद्रदेवभक्ती करी।
भजनासी असे बरोबरी। परी मूढ भुलती ॥ १९ ॥
देवतेचा प्रेरक। फलदाता ईश्वर एक।
हें न जाणती लोक। म्हणूनी दुःख पुनः भोगिती२०

ईश्वर सर्वही देतो। असें जो जाणतो।
तो ईश्वरासी भजतो। सुकृती तो अर्थार्थी होय॥२१॥
जो पापी अर्थाअर्थी। त्याची ईश्वरीं न वळे मती।
तो शीघ्र फलाची प्राप्ती। इच्छी ती नश्वर ॥ २२ ॥
देवतेपरी ईश्वर। फळ न दे सत्वर।
भजनें पापाचा संहार। होतां वर देतसे तो ॥ २३ ॥
हे पूर्वार्जितानुसार। भक्ती घडे जीणें नर।
हो कां जरी पामर। तरी सत्वर पावन हो ॥ २४ ॥
जरी मिळे एखादी भक्ती। तरी नये दुर्गती।
ती आणि तयावरती। दुर्मती पालटूनी ॥ २५ ॥
जे नानोपाय मुक्तीचे। ते सर्व कष्टाचे।
सुलभ साधन भक्तीचें। हें सुखाचें साधन ॥ २६ ॥
सुमति मग तो जरी। दैवयोगें पडे तरी।
ईश्वर खास तयावरी। कृपा करी सर्वथा ॥ २७ ॥
हें महत्व भगवद्भक्तीचें। पतन न होऊं दे भक्ताचें।
दुर्वर्तन जें पूर्वीचें। तेंही तयाचें पालटी ॥ २८ ॥
दुष्ट वासना ज्या असती। त्याही नष्ट होती।
उत्तरोत्तर ये शांती। जडे विरक्ती अनुक्रमें ॥ २९ ॥
असें इतर साधन। दीपका नसे जाण।
पहा हा ऊर्वशीनंदन। पुण्यवान निश्चित ॥ ३० ॥
राजा दंभादि टाकूनी। पुत्रार्थी होऊनी।
दत्तापाशीं येऊनी। सेवा करूनी राहिला ॥ ३१ ॥

त्याचें सर्व पाप जाऊन। पुत्ररूपी अर्थ मिळवून।
राहतां सुखेंकरून। आर्तपण दैवें ये ॥ ३२ ॥
तो पूर्वभक्तयनुसार। आर्त झाला तरी सत्वर।
दत्तपदीं निर्धार। ठेवी सादर आर्तत्वें ॥ ३३ ॥
सकाम भक्ती एकपट। ती आर्त होतां दुप्पट।
ती करावी तिप्पट। म्हणूनी स्पष्ट देव इच्छी ॥ ३४ ॥
शोकें पीडित होऊन। राजा राहिला हें जाणून।
नारदाप्रती वचन। अत्रिनंदन बोलतसे ॥ ३५ ॥
नृपति शोकें व्यापिला। दैवें आर्त भक्त झाला।
उपदेशूनी तयाला। भला बोध करीं तूं ॥ ३६ ॥
तपश्चर्या करून। झाला शुद्धांतःकरण।
आतां बोध घेऊन। मुमुक्षु होऊन राहिला ॥ ३७ ॥
असें भगवद्वचन। तें नारद मानून।
स्कंधीं वीणा घेऊन। हरिभजन करित आला॥ ३८ ॥
मुनी वदे हरिहरी। वीणा वाजवी करीं।
राजा त्या अवसरीं। नमन करी नारदाला ॥ ३९ ॥
नृपति म्हणे स्वागमन। झालें दैवें करून।
असें म्हणून बसवून। त्याचें पूजन करी तो ॥ ४० ॥
विनयपूर्वक बोले। आजि सुदिन हें आपुलें।
मला दर्शन झालें। संतपाउलें पूजिलीं ॥ ४१ ॥
संतांएवढे उपकारी। नसती ब्रह्मांडोदरीं।
जे कोमळ अंतरीं। मेघापरी दया वर्षती ॥ ४२ ॥

ज्याला वंदितां दैवत। सर्व होती संतृप्त।
नर जे अज्ञानसुप्त। तयां जागृत करिती जे ॥ ४३ ॥
मी ये वेळीं दुःखाब्धींत। वुडालों हें श्रीदत्त।
जाणुनी द्यावया हात। तुम्हां येथें धाडी कीं ॥ ४४ ॥
मला दत्तानें पुत्र दिला। तो अकस्मात् नष्ट झाला।
त्याचा विरहशोक मला। झाला आतां काय करूं४५
त्याचें असें तें वचन। हंसे नारद ऐकून।
म्हणे ज्याचें एकदां स्मरण। करितां भवभंजन होतसे॥
राजा माहुरीं तूं राहून। त्या दत्ताचें सेवन।
शंभरवर्षें करून। अजून शोक करसी कीं ॥ ४७ ॥
तो पुत्र गौणात्मा तुला। जरी असता कळला।
तरी अवकाश या शोकाला। कसा झाला असता रे॥
हें आश्चर्य वाटे फार। पुत्रदारादि नश्वर।
तसेंच हें कलेवर। परी नर शाश्वत मानिती ॥ ४९ ॥
राजा तुला भ्रम हाची। म्हणूनी गौणात्म्याची।
चिंता करिसी वायाची[1]। मुख्यात्म्याची वार्ता सोडूनी
समर्थोक्ती अवधारी। देह घटसा विकारी।
त्याचा साक्षी तूं अविकारी। जाण अंतरीं अजरामर
नको व्यर्थ करूं भ्रमण। प्राण इंद्रियें मन।
बुद्धी अहंकार यांहून। साक्षी तूं आन जाण रे ॥५२॥
देह वधू पुत्रादिक। ज्याला आवडे तो तूं अधिक।
लोहचुंबकसा चाळक। तूं एक केवळ ॥ ५३ ॥

---

१ व्यर्थ.

हे देहादिक तुझ्या योगें रे। चेतनसे होती सारे।
तो तूं ह्या मनाचे फेरे। पाहसी रे स्वस्थपणीं ॥ ५४ ॥
अनार्यः स तु विज्ञेयो देहेंद्रियमनोधियां।
साक्षिणं परमात्मानमसंगं यो न वेत्त्यजं ॥५५॥
बुद्धी प्रलीन होतां। मग ये सुषुप्त्यवस्था।
तीच बुद्धी जागी होतां। जागृतावस्था दिसतसे॥५६॥
हा प्रपंच बुद्धिनिष्ठ। तूं तिचा साक्षी स्पष्ट।
तूं असती अदृष्ट। तुला शोककष्ट कसा ये ॥ ५७ ॥
मी वांचोनी असावें। हे प्रेम घे स्त्रीपुत्रादिक अवघें।
जो स्वप्रीत्यर्थ जोडूनि घे। न होई आपण तत्प्रीत्यर्थ ॥
जो हा पर सर्वांहूनी वेगळा। तो तूं आतां सांगतों तुला।
सर्वज्ञ म्हणती ज्याला। पाळी लोकांला ईश्वर जो॥५९॥
प्रति शरीरीं जीवरूपें खेळे। ज्याला जाणतां सर्व कळे।
जीवा कर्तृत्व ये ज्यामुळें। कर्मफळें देतो जो ॥ ६० ॥
जो तमः[1]कार्या न शिवे। ज्याला स्थूल सूक्ष्म न म्हणवे।
सर्वानंदाचे ठेवे। जेथें विसावा घेतात ॥ ६१ ॥
हेंचि शिव परमात्मरूप। तें मी असे लक्षितां रूप।
मग दुःख शोक कामकोप। पाप ताप कोठें रे ॥ ६२ ॥
देह ओंवळा मिथ्यात्मा। साक्षी सोहळा मुख्यात्मा।
पुत्र जाण गौण आत्मा। तो दुःखात्मा निरंतर॥ ६३ ॥

---

१ माया=प्रपंच.

हें अद्वैत ज्याला न विदित। त्यांना न होतां सुत।
दुःख देई संतत। येतां गर्भांत पीडी मग ॥ ६४ ॥
तो सुत प्रसूतिसमयीं। मरणप्राय वेदना देई।
उपजतां चिंता देई। गृहपीडा होईल कीं याला॥६५॥
व्याधी एकाएकीं येती। तेणें मायबापां ये भीती।
थोर होतां आळी येती। गाळी देती सेजारी ॥ ६६ ॥
होतां वयानें थोर। वाटे मूर्ख होईल कीं पोर।
विद्या न येतां थोर। चिंता घोर वाढवी तो ॥ ६७ ॥
वर्षें मोजिती तयाचीं। म्हणती अजूनी याची।
योजना नोहे विवाहाची। पुढें याची काय गती॥६८॥
ही शंका थोर वाटे। दैवें विवाह होतां पुढें।
परस्परांची प्रीती न जडे। चिंता पडे ती मोठी॥६९॥
ते परस्पर हृष्ट असतां। तया संतती न होतां।
मग दुसरा विवाह आतां। करावा कीं याचा॥ ७० ॥
दैवें आपत्काळ येई। संतती बहुत होई।
तरी चिंता येई। काय सोई निर्वाहाची ॥ ७१ ॥
पुत्रात्मैकदृष्टी देऊन[1]। जे राहती जन।
तयां उत्तरोत्तर दारुण। आमरण दुःख घोर ॥ ७२ ॥
प्रसवन झाल्यापासूनी। हा पुत्रशोक अग्नी।
मायबापां जितेपणीं। टाकी जाळुनी निश्चयें ॥ ७३ ॥
असें संतानसुख जाणून। गौणात्म्याचें प्रेम टाकून।
मुख्यात्म्या प्रीती धरून। समाधान राहें तूं ॥ ७४ ॥

१ आरोप.

तूं ज्याविषयीं शोक करिसी । हुंडासरें त्या सुताशी।
शत्रू मानूनी मारावयासी । नेला नगरासी आपुल्या॥
तोचि शत्रूच्या हातांतून । दैवयोगें सुटून ।
एका मुनीच्या हातीं मिळून । सुख पावूनी असे तो।
पुढें त्या शत्रूला मारून । विद्यावंत होऊन ।
स्वयें विवाह करून । भेटेल येऊन स्त्रियेसह ॥ ७७ ॥
त्या आत्मजाची नको चिंता । तो राज्य करील आतां
पुढें इंद्रपदावरता । त्याच देहानें बसेल ॥७८॥
असें नारद सांगोन । गेला त्वरें निघोन।
राजा समाधान होऊन । बोले वचन प्रियेप्रती ॥७९॥
जो आत्मानात्मविवेक । नारदानें केला सम्यक ।
त्याचा करूनी विवेक । सर्व शोक टाकी तूं ॥ ८० ॥
कोण नंदन कोणाचा । कासया मोह वायांचा ।
तोडी पाश स्नेहाचा । मग होय मनाचा उपशम ८१
मी प्रयत्न करून । श्रीदत्ता केलें प्रसन्न ।
माग म्हणतां वरदान । पुत्रावांचून न मागें मी॥८२॥
मग एकची वरदान । मागतां दत्त दे सुचवून ।
शोक देईल नंदन । हें उमजून घेतलें ॥ ८३ ॥
माझा वंश वाढावा म्हणून । कपाळांत वेड भरून ।
व्यर्थ गेलों फसून । आतां उमजून आलें तें ॥ ८४ ॥
वदे वेद परोक्ष जें । तें मूढां न उमजे ।
तें भलतेंच समजे । मग होईजे तो अनर्थ ॥८५॥

नारद बोलिला जें वचन । तें आलें उमजोन ।
जें केलें दत्ताचें सेवन । फळ जाण त्याचें हें ॥८६॥

तपो यज्ञ जप दान । करितांही न दे दर्शन ।
जो भक्तिगम्य अत्रिनंदन । मला दर्शन दे तो ॥८७॥

त्याचा एवढा हा उपकार । असें बोले नरेश्वर ।
तें ऐकतांचि सत्वर । राणीचें अंतर द्रवलें ॥८८॥

राणी वंदून दत्तासी । प्रेमें दाटूनी मानसीं ।
म्हणे प्रिया या वचनासी । मृतसंजीवन मानी मी ॥

सर्ववेदसारभूत । तें नारदाचें भाषित ।
ऐकतां माझें मन शांत । होऊनी निवांत राहिलें ९०

त्या श्रीदत्तें कृपा केली । म्हणूनी नारदाची फेरी झाली ।
मनाची भ्रांती फिटली । भक्ती जडली दत्तपदीं ॥९१॥

जय भगवंता दत्ता । पुरुषोत्तमा अनंता ।
अधोक्षजा तूंचि कर्ता । भर्ता संहर्ता विभु तूं ॥९२॥

गुणद्रव्यक्रियात्मक । भाससी तूं ज्ञानशक्तिक ।
नानारूपनायक । मायीकसा दीससी तूं ॥९३॥

तूं शङ्कर संहारक । तूं ब्रह्मांड उत्पादक ।
तूं विष्णू जगत्पालक । तूंचि एक अनेक होसी ॥९४॥

अपर्णेश्वरा लक्ष्मीवरा । सावित्रीहृदयसंचारा ।
तुज नमो सर्वाधारा । परात्परा सगुणरूपा ॥९५॥

मायाभिः पुरुरूपस्त्वं[1] प्रतिरूपो विभासि यत्।
रूपं रूपं स्वभक्तानामुद्धारायेंद्र ते क्रिया ॥ ९६ ॥
मोह शृंखला माझी तोडी। हे देह खोडी[2] मोडी।
कामादि पायिकां दवडी। लावी गोडी त्वद्भजनाची ॥
मी नेणुनी त्वत्पद। केले हे नाना फंद।
आतां त्वद्भजनस्वाद। देऊनी भेद दवडी माझा॥९८॥
विषया इच्छितां विषय देशीं। मुमुक्षूला मोक्ष देशी।
मुक्ता स्वपदीं रमविशीं। तूं भाससी चिंतामणीसा९९
तूंची मम सद्गती। अशी प्रार्थी इंदुमती।
मग हात जोडूनी नृपती। दत्ता प्रार्थी सप्रेम ॥१००॥
देव देवा दत्ता। तव पदीं चित्ता।
ठरवी विश्वनाथा कथा गातां॥ ॥ १०१ ॥
माझी वाणी गूण तुझे वाखाणून।
रमो हेंचि धन दान दे गा॥ ॥ १०२ ॥
तुझ्या भजकांची सेवा करो कर।
हाची देई वर वरदेशा॥ ॥ १०३ ॥
मन द्रवो माझें गुण गातां तुझे।
उतरे कर्मओझें माझें जेणें॥ ॥१०४ ॥
सकम्प रोमांच अंगीं व्हावे उंच।
न दिसावें उच्च-नीच कोठें॥ ॥ १०५ ॥

---

१ मायेचे योगानें तूं अनेक रूपें घेणारा होतोस. प्रत्येकरूपीं तूं निरनिराळा भासतोस. हे इद्र ( परमेश्वर ) भक्ताच्या उद्धारार्थ ही तुझी लीला आहे. २ खोडा.

जेवी श्येन जाळें तोडोनियां पळे।
तसें भवजाळें बळें तोडवी हें ॥ ॥ १०६ ॥

आतां माझा भाव तव पदीं ठाव।
घेवो हें वैभव नित्य असो ॥ ॥१०७॥

असा क्ष्मापति[1] सादर। दत्ता स्तवी वारंवार।
राहे तो संसारसागर। गोष्पदाकार मानूनी ॥१०८॥

इति श्रीदत्तमाहात्म्ये त्रिचत्वारिंशोऽध्यायः ॥ ४३ ॥
श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

---

१ पृथ्वीचा पति.

# अध्याय चव्वेचाळिसावा

श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

निरभिमानी दीपक । गुरुचें वंदूनी पदक ।
म्हणे आयुराजाचा लेंक । काय कौतुक करिता झाला॥
जो सूर्यसंकाश । उपजला दिक्पालांश ।
ज्याला रक्षी योगीश । तो दैत्यास कसा मारी ॥ २ ॥
हें मज विस्तारूनी । सांगा म्हणतां तो मुनी ।
म्हणे एकाग्र होऊनी । पी कानीं कथामृत ॥३॥
सगोत्राः पितरौ चास्य वियुक्ता बाल्य एव सः ।
निमित्तीकृत्य नहुषो मुनिन्दत्तेन रक्षितः ॥ ४ ॥
मुनी स्थितप्रज्ञ असून । श्रीदत्तानें वळवितां मन ।
दे सोडूनी ध्यान । करी पालन नहुषाचें ॥ ५ ॥
असुरैश्वर्यहारक । देवैश्वर्यवर्धक ।
वसिष्ठशिक्षणें सम्यक । कुमार समर्थ झाला ॥ ६ ॥
जो वारंवार धनुर्वेद । अभ्यासी न मानितां खेद ।
शस्त्रशास्त्रविशारद । झाला वादप्रवीण ॥ ७ ॥
ज्याची गैर चाल नसे । नित्य गुरुसमीप वसे ।
कधीं उद्धत नसे । विनीत असे संतत ॥ ८ ॥
निंदा स्तुती दे सोडून । आपल्या अभ्यासा झटून ।
सर्वविद्यानिपुण । नहुष झाला तो ॥ ९ ॥
तें सुष्ठु आचरण । वसिष्ठ त्याचें पाहून ।
म्हणे नहुषा वनीं जाऊन । करी हनन हिंस्रांचें ॥१०॥

तेधवां तो राजनंदन । आज्ञा शिरसा मानून ।
धनुष्यबाण घेऊन । चाले वन लक्षूनियां ॥११॥
गार्यींस जे मारिती । मनुष्यास जे पीडिती ।
त्या व्याघ्रादि हिंस्र जाती । तेणें वनांतीं मारिल्या ॥
तें हस्तलाघव त्याचें । अचूक पाहतां देवांचें ।
मन हृष्ट झालें साचें । असें वाचेनें बोलती देव ॥१३॥
तूं तनूज इंदूमतीचा । सोमवंशीय आयुराजाचा ।
पुत्र असती साचा । नससी ऋषीचा सुत ॥ १४ ॥
हा अभिमान दे सोडून । मायबापां दे दर्शन ।
तुझ्या पदीं लावी मन । अशोकसुंदरी वरीं तिला १५
जो चर्व्य[1] मानितो नरा । त्वां तयां हुंडासुरा ।
मारूनी जा निजपुरा । मातापितरां भेटावया ॥१६॥
तूं निःशेष दैत्यासी । निजबळें मारिसी ।
दत्तवरें समर्थ असससी । न करीं मानसीं तूं चिंता १७
तो व्योमध्वनी ऐकून । नहुष करी चिंतन ।
मी तरी वसिष्ठनंदन । हें आकाशवचन कां चळवी ॥
नभीं देव हें वदती । किंवा कपटी हे उक्ती ।
गुप्तपणें येथें वदती । कराया मतिभ्रंश कीं ॥१९॥
असें वचन ऐकून । अनेक तर्क करून ।
नहुष आश्रमीं येऊन । सांगे वंदून मुनीला ॥२०॥
मुनीहि तें ऐकून । म्हणे नहुषा तूं जाण ।
इंदुमतीगर्भरत्न । आयुनंदन सोमवंश्य ॥२१॥

१. चुरमुरे, पोहे वगैरे चावून खाण्याचे जिन्नस.

जो स्वतंत्र दत्तदेव । तत्प्रसादें तुझा उद्भव ।
तो तुला रक्षी सदैव । अरिष्ट सर्व वारूनी ॥२२॥
तो होय तुझा कैवारी । जेव्हां इंदुमतीचे उदरीं ।
तूं आलासी ते अवसरीं । असुरें तें जाणिलें ॥२३॥
हुंड दानव गर्भाला । माराया सिद्ध झाला ।
सुदर्शन ठेवूनी रक्षिला । तुला गर्भी दत्तानें ॥ २४ ॥
हा आयुःसुत पुढें मज । मारील म्हणूनी दनुज ।
उपजतांची तुज । माया पसरूनी नेता झाला ॥२५॥
तुला स्वनगरीं नेऊन । माराया दे स्त्रियेलागून ।
मग तिचे हातांतून । दासीकरीं गेलास तूं ॥ २६ ॥
तूं नास्तिकाच्या हातांत । पडतांही तेथें दत्त ।
राखी तुझें जीवित । ही मात न वर्णवे रे ॥ २७ ॥
ऐक नहुषा नवल तें । दासी उचलोनी स्वहस्तें ।
तुला देऊनी बल्लवातें । म्हणे यानें शीघ्र तोड ॥ २८॥
मग इंद्र वज्र जसें । पर्वतावरी टाकी तसें ।
बल्लव शस्त्र मारीतसे । तुझेवरी तीन वेळ ॥ २९ ॥
नरद्रोही असुर हिंस्त्र । जेव्हां तुझ्यावर शस्त्र ।
टाकी तेव्हां दत्त चक्र । तुझ्यावरी धरीतसे ॥ ३० ॥
तो प्रवृद्धक्रोध दानव । खपतां बळवैभव ।
मनीं आणी दयाद्रव । तुझा जीव राखावया ॥ ३१ ॥
तूं विद्ध न होसी तें पाहून । शस्त्र मोडितां विस्मित होऊन ।
म्हणे याला नेऊन । कोठें तरी ठेवावा ॥ ३२ ॥

ह्या आश्रमीं तो मग । तुला आणुनी ठेवी सवेग ।
असा तुझा दैवयोग । तुझें अंग दत्त राखी ॥ ३३ ॥
दानवानें[1] तुला टाकलें । तेव्हां म्यां न पाहिलें ।
मग ध्यानें सर्व जाणलें । पालन केलें तुझें म्यां ॥३४॥
तुझें स्वस्ति व्हावें म्हणून । येथेंच केलें पालन ।
जरी देतों पाठवून । पितयालागून तुजला ॥ ३५ ॥
तैं नास्तिक पुनः जाऊन । तुला पीडितील म्हणून ।
येथेंच केलें पालन । आतां दैत्यहनन करीं तूं ॥ ३६ ॥
तूं पुनः येथें येऊन । माझा प्रसाद घेऊन ।
स्वपुरासी जाऊन । राज्य करूनी सुखी राहें ॥ ३७ ॥
शापी पूर्वी अशोकसुंदरी । दैत्या तूं मरशील नहुषाचे करीं ।
मग दैत्यें कारागारीं । अशोकसुंदरी ठेविली ॥ ३८ ॥
नहुषा ती तप करून । तुला वरावें म्हणून ।
तव चरणीं मन । लावूनी ती राहिली असे ॥ ३९ ॥
आतां विलंब न करी । सर्व दैत्यांसी मारी ।
जाऊनीयां स्वपुरीं । दर्शन करी मायबापांचें ॥ ४० ॥
जो विश्वपालक दत्तात्रेय । तो तुझा वारील अपाय ।
त्याचे चिंतूनियां पाय । युद्धीं दैतेय मारिसी ॥ ४१ ॥
आतां वेळ न लावी वीरा । आयुष्मान्भव शूरा ।
महाबाहो धरीं धीरा । सर्व असुरां हाण तूं ॥ ४२ ॥
वरदाः संतु पितरो बलदाः संतु ते सुराः ।
यशोदाः संतु ते मंत्रा आयुर्दाःसंतु ते द्विजाः ॥४३॥

१ बळवानें.

असो स्वस्ति क्षेम तुझें। हें आशिर्वचन घे माझें।
सुयश पसरो तुझें। दिगंतरीं रे नहुषा ॥ ४४ ॥
तो आस्तिकपणें नहुष। शिरसा मानी आशिष।
पावूनीया संतोष। म्हणे विशेष काय बोलूं ॥ ४५ ॥
असें नहुष बोलून। धरी वसिष्ठाचे चरण।
म्हणे माझें हेंचि तारण। सर्वज्ञ आपण जाणतां॥४६॥
मनस्ताप देती अधिक। ते वैरी कामक्रोधादिक।
हे चरण सेवितां घेती धाक। होती सेवक ते मग ४७
जैं तार्क्ष्योड्डाण[1] पाहून। सर्प जाती भिऊन।
तेवीं सेवितां तुमचे चरण। अरिगण निर्बल होती४८
असा असे चरणप्रसाद। मग ह्या वैऱ्याची काय बिशाद
करूनी चरणाची याद। दैत्याचा शिरच्छेद करीन ४९
यापरि बोलतां नहुष। उठवी मुनी त्यास।
हुंगून त्याच्या मस्तकास। म्हणे जयश्रीस वरीं तूं ५०
अरिष्ट सर्व वारून। रक्षोत पितृदेवब्राह्मण।
द्यावाभूमी करो पालन। अघशमन करो पूषा॥ ५१ ॥
ऋषीनें असें बोलतां। नहुष झाला चालता।
म्हणे श्रीदत्त प्रसन्नता। करो आतां मजवरी ॥ ५२ ॥
न नमितां जो गर्भापासून। आजपावत करी रक्षण।
लोभ ठेवी पूर्ण। वंदूं चरण त्या दत्ताचे ॥ ५३ ॥
करो स्वस्ति क्षेम तोची। रणीं जय देऊनी आमुची।
वासना पुरवूनी पदाची। सेवा साची घेवो ॥ ५४ ॥

१ गरुडाचें उड्डाण.

जो नास्तिकशिक्षक । जो आस्तिकरक्षक ।
तोची श्रीदत्तदेव एक । माझा रक्षक सर्वथा ॥ ५५ ॥
जो मनोविनोदास्पद । त्या दत्ताचें चिंतितां पद ।
न होतां अणुमात्र खेद । जय विशद मिळो मला ५६
कुंठे बृहस्पतीची मती । गातां ठके अहिपती ।
परी त्याच्या गुणाची समाप्ती । न करिती कोणी ५७
दोनी हस्त जोडून । तया करूं भावें वंदन ।
तो दत्त कृपा करून । करो रक्षण सर्वथा माझें॥ ५८ ॥
परस्पर युद्ध होतां । किंवा कपटें कोणी मारितां ।
किंवा रणीं संकट येतां । तोचि रक्षो सर्वथा ॥ ५९ ॥
मद्गति सुगम व्हावी । देवांनीं सर्वत्र रक्षा करावी ।
वेळीं सुजळान्नें मिळावीं । आगती व्हावी संतोषें ६०
संमर्दन रणीं करितां । ज्याला बोलाविती तो आतां ।
इंद्र करो सहायता । भयभीतां तो रक्षी ॥ ६१ ॥
सावधानपणीं असें । नहुष स्तवन करीतसे ।
देवां हर्ष होतसे । त्याचें तैसें धैर्य पाहुनी ॥ ६२ ॥
माथा तुकाविती सुर । वर्षती पुष्पांचे भार ।
नहुष चाले सत्वर । तंव मार्गावर शकुन झाले ॥६३॥
ये गाई कन्या समोर । दही फळें फुलांचें हार ।
पूर्णकुंभ दोघे विप्र । मृगवर करीती प्रदक्षिणा ॥६४॥
तो तशा शकुनांप्रती । पाहूनी हर्षे चित्तीं ।
पायीं चालतां पुढती । इंद्र तयाप्रती पाहतसे ॥ ६५ ॥

मघवा देवाप्रती बोले । हा आमुच्या काजा चाले ।
दुखती तयाचीं पाऊलें । सहाय केलें पाहिजे याला ॥
माझा स्यंदन[1] मी आतां । पाठवितों भूमीवरता ।
तुम्ही करा सहायता । युद्ध करितां दैत्यासी ॥ ६७ ॥
मग मिळेल जय तुम्हांसी । असें म्हणूनी मातलीसी ।
घेऊनी साश्वरथासी । नहुषासी भेट जा ॥ ६८ ॥
छत्र दंशन[2] तूणीर । किरीट कुंडलें केयूर ।
चाप विविध शस्त्रास्त्र । जा सत्वर घेऊनी तूं ॥ ६९ ॥
तें वासवाचें[3] वचन । मातली मान्य करून ।
आज्ञेप्रमाणें सर्व घेऊन । येऊन नहुषा भेटला ॥७०॥
जो गुर्वंघ्रि स्मरून । चाले दत्ता चिंतून ।
त्या नहुषापुढें येऊन । इंद्राचें वचन सांगे मातली॥७१॥
हा हययुक्त रथ । सर्व सामग्रीसहित ।
इंद्रें पाठविला येथ । हा स्वीकारीं युद्धांत सुख व्हाया॥
अन्यत्किंचिन्न्यून नसे । यावरी सर्व भरलें असे ।
मातली बोलतां असें । स्वीकारितसे नहुष तो ॥७३॥
चकचकित रत्नजडित । शिरीं धरी तो मुकुट ।
कानीं कुंडलें लखलखित । घालितसे तो ॥ ७४ ॥
सुतेज दृढ कवच तें । अंगीं बांधी तयातें ।
मंत्रपूर्वक सर्वांतें । धारण करी अनुक्रमें ॥ ७५ ॥
तो मग रथा वंदून । प्रदक्षिणा करून ।
यथोक्त मंत्र म्हणून । दत्ता आठवूनी चढे रथीं ॥७६॥

१ रथ. २ चिलखत. ३ इंद्राचें.

तो मोत्यांचे हार कंठीं । घालून बैसला रथीं ।
म्हणे मातलीप्रती । चालवीं रथ सत्वर ॥ ७७ ॥
तें राजपुत्राचें वचन । मातली अंगिकारून ।
हातीं चावुक घेऊन । लगाम धरून रथ चालवी॥७८॥
जो जगत्पालक दत्त । तो होतां सहायीभूत ।
न्यून काय मग तेथें। होय समस्त परिपूर्ण ॥ ७९ ॥
मग तेतीस कोटी देव । तेथें घेती धांव ।
म्हणती नहुषा आम्ही देव । आलों तव साह्यार्थ ८०
बोले नहुष देवांला । दत्त राखी सदा मला ।
तोचि करवी तुम्हाला । मला सहाय ये वेळीं ॥ ८१ ॥
मी नित्य गुर्वाज्ञा प्रमाण । मानी त्याचें हेंच कारण ।
करी कष्टें निवारण । सदा प्राणरक्षिता तो ॥ ८२ ॥
जो भक्तेच्छापूरक । तो दत्त योगीनायक ।
साह्य होतां कांहीं एक । न्यून नसे साख माझी घ्या॥
असें नहुष बोलून । तो देवांस घेऊन ।
पुढें करितां गमन । ये कळून अशोकसुंदरीसी ॥८४॥
या विभुं प्रार्थयंतीशं नहुषो मां वृणोत्विति ।
सा तदागमनं ज्ञात्वा रंभां तस्मै समीरयत्[1] ॥ ८५ ॥
रंभा जी पाठविली । ती नहुषासमोर आली ।
म्हणे ऐक माझी बोली । मी आल्यें ज्यासाठीं ॥८६॥
तूं रथारूढ होऊन । येसी हें ध्यानें जाणून ।
मजला दे पाठवून । अशोकसुंदरी ये वेळीं ॥ ८७ ॥

१ प्रेरिती झाली.

सखी माझी अशोकसुंदरी। ती पडे हुंडाचे कारागारीं।
नित्य तुला अंतरीं। चिंती चिंतातुरा ती ॥ ८८ ॥
तुझी गृहिणी ती जाण। तिचें करीं मोचन।
जरी भोगितसे बंधन। निर्दोष जाण ती साध्वी॥८९॥
वा अधःपात होवोआह्मांसी।जर बोलूं मिथ्या वचनासी
नहुष म्हणे तीसी। येथूनी तूं जा आतां ॥ ९० ॥
मज कळलें यथार्थ। तूं धरीं आपुला पंथ।
होतां हुंडासुराचा अंत। दर्शन तेथें होईल ॥ ९१ ॥
सुहास्य होऊनी रंभा मग। भूपाज्ञेनें ये सवेग।
सखीसी सांगे सोड उद्वेग। येतो सुयोग लवकर॥९२॥
तपस्विनी अशोकसुंदरी। ऐकतांचि आनंद करी।
इकडे तों सुरवरीं। केला भारी कोलाहल ॥ ९३ ॥
ते सिद्ध साध्य विद्याधर। गंधर्व यक्ष किन्नर।
नाग गुह्यक यांहीं घोर। कलकलाट थोर केला ॥९४॥
जो आनंदें होतां सुप्त। तो हुंडासुर झाला जागृत।
म्हणे कोण येतो अहित। कलकलाट करीत हा॥९५॥
दूता कुठोनि हा कोण। शत्रू आला दारुण।
हा कोणाचा कोण। किती सैन्य घेऊन आला हा॥९६॥
जा सर्व हें जाणून। तूं सत्वर ये परतून।
असें दूताला सांगोन। पाठवून दे हुंडासुर ॥ ९७ ॥
आसन्नेसी येऊन। दूत सर्व घे जाणून।
पुनः हुंडापासीं तो जाऊन। म्हणे सावधान ऐक तूं ॥
येतो वेगें आयुराजसुत। तेतीस कोटी देवांसहित।
तुझा करावया घात। असें दूत बोलिला ॥ ९९ ॥

तें सहन न झालें त्यासी। बोलावूनी भार्येसी।
म्हणे पूर्वीं दिल्हा त्या बाळासी। त्वां समक्ष मारविला कीं ॥ १०० ॥
त्याला कसा कोणी हातीं। मारिला हें सांग निगुती।
ती म्हणे मारिला दासीहातीं। मी होत्यें तेथेंच १०१
तच्चर्मास्थि सुद्धां जाण। न दिधल्या टाकून।
असें तिचें वचन ऐकून। पुसे बोलावून दासीस १०२
तो कोणी मारिला बाळ। ती म्हणे राणी होती जवळ।
म्यां मारिला तो बाळ। सत्य सत्य बोलत्यें ॥ १०३ ॥
दैत्य जिव्हा चावून। म्हणे तरी आला हा कोठून।
आधीं शत्रू मारून। तुम्हां शिक्षा करीन मग॥१०४॥
हा आजी शत्रू आला। आतां मारावया याला।
आज्ञा देतों सर्व दैत्यांला। चला सत्वर युद्धासी १०५
जे जीविताशेनें न जाती। त्यांला आधीं या हातीं।
मारूनियां उपरांती। शत्रुप्रती जाईन ॥ १०६ ॥
अभिषेक करून। सेनापती पांच योजून।
सर्वां देईं पाठवून। उग्रशासन दैत्य तो ॥ १०७ ॥
ते तच्छब्द कठोर। मानुनी युद्धा निघती असुर।
म्हणती रणीं मरतां होऊं सुर। करूं उपकार धन्यावरी॥

इति श्रीदत्तमाहात्म्ये चतुश्चत्वारिंशोऽध्यायः ॥ ४४ ॥

॥ श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

# अध्याय पंचेचाळिसावा

## श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः

परतंत्र असोनी जीव । होऊं म्हणती चिरंजीव ।
वेदधर्मा म्हणे जंव । तत्वभाव न कळला ॥ १ ॥
देहास आत्मा म्हणती । अजरामरता इच्छिती ।
परी देहाची स्थिती । भंगे ती क्षणोक्षणीं ॥ २ ॥
निगमाः प्रलयोत्पत्ती कथयन्ति प्रतिक्षणं ।
पांचभौतिकदेहस्य जडस्याग्नेरिवार्चिषाम्[1] ॥ ३ ॥
असा एवढा मूढ असुर । करी मृत्युप्रतीकार ।
परी मृत्यु आला घोर । कोण पामर वारी तया ॥ ४ ॥
भाग्यवंत जो असे । तो देवाचे पाय धरीतसे ।
तया मृत्यु भीतसे । इतरां असे मृत्युभय ॥ ५ ॥
अजत्व आपुलें जो जाणे । भगवत्पदीं ऐक्यपणें ।
ठेवी आपुलें येणें । तो नेणें जन्ममृत्यु ॥ ६ ॥
तो होईना कां सुर । जो नेणें प्रत्यग्विचार ।
जाणावा तो क्रूर असुर । तया अमर कोण म्हणे ॥ ७ ॥
अशा नाशवंत देहासी । अजरामर करावयासी ।
हुंडासुर इच्छी त्यासी । दैवें मृत्यु पातला ॥ ८ ॥
तो सैन्य सर्व घेऊन । रथीं आपण बैसून ।
सर्व शस्त्रें घेऊन । सन्नद्ध होऊन चालिला ॥ ९ ॥

---

१ ठिणग्या, ज्वाला.

तों तेथें शत्रूसमोर। वेगें आला हुंडासुर।
तंव पाहिला नहुषवीर। शूर इंद्ररथावरी ॥ १० ॥
भासे तो सूर्यापरी। धनुर्बाण घे करीं।
किरीट कुंडलें शोभती शिरीं। पाहतां सुरारी डचकला॥
तो हस्ति अश्व रथ पदाती। देऊनियां सेनापती।
पाठवी असुरपती। तेही जाती युद्धार्थ ॥ १२ ॥
ते दानव महाशूर। चालिले देवसैन्यावर।
करिती शब्द घोर। ब्रह्मांडोदर गाजविती ॥ १३ ॥
दैत्य करिती वाद्यगजर। कोलाहलें भरे दिगंतर।
करिती घोर समर। ते अमरशत्रूशीं ॥ १४ ॥
ते वर्म भेदिती असुर। सोडिती शूल तोमर।
शक्ती परशू तलवार। गदा शर सोडिती ॥ १५ ॥
ते बलिष्ठ असुर। देवां करिती जर्जर।
देती नाना शस्त्रांचा मार। अनिवार असुर ते॥१६॥
वैरूप्य करिती परस्पर। शस्त्रें तोडिती परस्पर।
असें युद्ध झालें घोर। नभीं अमर पाहती ॥ १७ ॥
दैत्य तेजस्वी असती। देवां पराभूत करिती।
मग खचे देवांची शक्ती। न राहती समोर ते ॥१८॥
हनन करितां दैत्यांनीं। युद्ध सोडिलें देवांनीं।
देव आर्त झाले तें पाहूनी। पुढें होऊनी नहुष ये १९
म्हणे रे रे हुंडासुरा। माझेवरी लोटीं असुरां।
करितों तयांचा चुरा। यमपुरा धाडितों ॥२०॥

तुम्हीं असुर महापाप । द्विजदेवां देतां ताप ।
तुह्मांवरी म्यां केला कोप । तुम्हीं झोंप उघडा आतां
तुम्हीं सुरांचीं घेतलीं पदें । तुम्ही माजलेंत मदें ।
आतां तुम्हां रगडून पादें । देवपदें हिसकून घेतों ॥२२॥
अनार्यांचें करितां कदन । संतोषे जनार्दन ।
असें नहुष बोलून । शरसंधान करीतसे ॥२३॥
दैत्य नानायुधें सोडिती । नहुष तत्काळ तोडी तीं ।
असुर त्याशीं भिडती । बळें पडती त्यावरी ॥२४॥
राजा मग घे इंद्रचाप । टणत्कारूनी करी कोप ।
टणत्कारें दैत्यां ये कंप । आपोआप भ्रांत होती ॥२५॥
राजा तेजस्वी प्रबळ । निर्दाळी तो दैत्यकुळ ।
चवताळले महाखळ । चतुरंगबळ घेऊनी ॥ २६ ॥
सैन्य लोटिती नहुषावर । नहुष तरी महाधीर ।
महाशूर महावीर । करी जर्जर दैत्यांसी ॥२७॥
दैत्य काळाला न जुमानिती । ते ह्या नहुषाला भिती
बाणजाळें सोडिती । आच्छादिती भूपाला ॥२८॥
पडे अंधकार घोर । ओळखूं नये परस्पर ।
मग नहुष महावीर । तोडी शरजाळ तेव्हां ॥२९॥
आयुधें दैत्यांचीं तोडी । कित्येकांचे चाप मोडी ।
गजांची गंडस्थळें फोडी । खालीं पाडी निषाद्या[1] ३०
त्या दानवां पाशें ओढी । घोड्यांचे गळे तोडी ।
ध्वजांसह रथ मोडी । वीरां पाडी भूमीवरी ॥३१॥

१ महात.

बळें तयांचीं कवचें फोडी । शस्त्रांसह हात तोडी ।
एकाएकीं मान खंडी । पोटें फोडी तयांचीं ॥३२॥
दैत्य मग देती दडी । तयांपुढें मारी उडी ।
दडतांही शोधून काढी । भूमीवरी पाडी धडधडा ३३
सहसा दैत्यांची बांधी मुंडी । तयां फरफरां ओढी ।
सर्वांची तो खोड तोडी । शौर्य झाडी तयांचें ॥३४॥
तो प्रवृद्धकोपें हांक फोडी । म्हणे भोगा पापाची जोडी
आली शेवटली घडी । सद्धर्मी गोडी ठेवा आतां ३५
ये मृताः समरे धर्मे शुद्धास्ते सूर्यमंडलं ।
भित्त्वा याता विरजसो योगज्ञा यतिनो यथा ॥३६॥
हें आतां मनीं आणून । पुढें समोर राहून ।
युद्धीं देह सोडून । चला भेदून सूर्यमंडळ ॥३७॥
स्वर्णस्तेय ब्रह्महनन । सुरापान गुरुतल्पगमन ।
ह्या पापांचें होईल क्षालन । युद्धीं मरण येतां धर्मे ३८
असें प्रेमळ बोलून । धर्मयुद्ध करून ।
केलें दैत्यांचें हनन । सरसरोन नहुषानें ॥ ३९ ॥
त्या दैत्यांच्या सेनेचा भंग । करून टाकी तो सवेग ।
असें सैन्य मारितां मग । रक्ताचे ओघ चालिले॥४०॥
छिन्न भिन्न होतां वीर । करिती मग हाहाकार ।
तें देखूनी हुंडासुर । ये समोर नहुषाच्या ॥४१॥
हुंड गर्जोनी बोलत। असे तूं मनुष्याचा पोत ।
व्यर्थ सांडिसी जीवित। माय तात रडतील जा॥४२॥

मी स्वच्छंद लोकशास्ता । माझा प्रताप नेणसी पोता ।
जरी वांछिसी जीविता । तरी आतां शरण ये ॥४३॥
तूं मतिमंद बाळ । म्हणोनी सांगतों एक वेळ ।
नको मरूं निष्फळ । पदकमळ धरी माझे ॥ ४४ ॥
जरी येसी शरण । तरी देतों जीवदान ।
नातरी देवांसहवर्तमान । तुझें हनन करीन मी ॥४५॥
अशी केवळ भीति । घालितसे दैत्यपती ।
नहूष म्हणे तूं मंदमती । नेणसी गती सोमवंशाची॥
तूं वाचाळपणा करिसी । येणें काय मिळविसी ।
जरी तूं शूर अससी । करीं मशीं युद्ध आतां ॥४७॥
तूं आत्मस्तुती करिसी । परी धर्मतत्व नेणसी ।
तूं महापापी असमी । स्वदोष मानसीं विचारीं॥४८॥
बाळहत्या करायासी । उपजतांचि मज पळविसी ।
विरहदुःख जननीसी । तूं देशी पापिया ॥ ४९ ॥
जो मनोरथ करून । मला आलासी घेऊन ।
तो तुझा झाला कीं पूर्ण । मला कोण मारील ॥५०॥
अत्रिज जो श्रीदत्त । तो मला राखी संतत ।
मूढा तूं माझा कसा घात । करिसी मृतप्राय तूं ॥५१॥
मलिनाः कुदृशो हिंस्रा घातकाः परवंचकाः ।
स्वकर्मणैव ते सर्वे म्रियन्ते सहसा स्वयं ॥ ५२ ॥
खळा असा तूं घातुक। मी झालों तुझा अंतक ।
आतां दावीं युद्धकौतुक । न धरीं धाक मानसीं॥५३॥

मृत्युनें दिल्हें आमंत्रण। म्हणोनी जिव्हेसी फांटे फोडून
करिसी असें वल्गन। आतां वचन पुरें हें ॥ ५४ ॥
तूं मज ठावा अससी। आतां न सोडीं युद्धासी।
असें सांगोनी दैत्यासी। ओढी चापासी आकर्ण ५५
जोडी देवदत्त बाण। सोडी असुरा लक्षून।
तोडी त्याचें तनुत्राण। मोडी शरासन तयाचें ॥५६॥
दैत्य कंकपत्रांचित। बाण सोडी असंख्यात।
तितुकेही अकस्मात। आयुःसुत तोडितसे ॥ ५७ ॥
दैत्य मग काय करी। आसुरी माया पसरी।
नहुषासी भ्रम करी। तो अमरारी तेधवां ॥ ५८ ॥
जेथें नसे तेथें भासे। जेथें भासे तेथें नसे।
दैत्य ख्यालं[1] करी असे। जाणतसे नहुष तो ॥ ५९ ॥
तो हंसोनी म्हणे मातलीस। जेथें पाहसी दैत्यास।
त्याच्या उलट रथास। फिरवीं खास मारितों ॥६०॥
तें राजपुत्राचें वचन। त्या मातलीनें मानून।
उलट फिरविला स्यंदन। मग हनन करी नहुष ॥६१॥
महावीर नहुष। करी आसुरी विद्येचा नाश।
मग समोर नहुष। भासे दैत्यास भास्करसा ॥ ६२ ॥
म्हणे योद्धा हा दुर्धर। मला नाटोपे हा वीर।
असें म्हणूनी असुर। सोडी अपार शस्त्रें तो ॥ ६३ ॥
राजा नैसर्गिक बळेंकरून। टाकी शस्त्रें तोडून।
मग दैत्य शक्ति तोमर बाण। सोडी प्राणहारक॥६४॥

१ खेळ

राजा न लागता क्षण। एका बाणें दे तोडून।
सर्वांचे बाण सोडून। छिन्न भिन्न करी दैत्या ॥ ६५ ॥
तो तद्देह भयंकरसा। शोभे पुष्पित पळस जसा।
मूर्च्छा येऊनी सहसा। दैत्य रथावरी पडे तो ॥ ६६ ॥
जरा वारा घेऊन। पुनः सावधान होऊन।
अमित बाण सोडून। ठेवी आच्छादून राजाला॥६७॥
थोर आरोळी देऊन। म्हणे मी शत्रू जिंकून।
आतां विजयी होवून। समाधान पावलों मी ॥ ६८ ॥
मामाप्नुवन्श्री[1]भूतिजया इति। असा तो दैत्यपती।
गर्जना करी खोटी। प्रौढी मोठी दाऊनी ॥ ६९ ॥
ते देव गर्जना ऐकून। नहुषा न पाहून।
जाहले दीनवदन। मुनिगण तेही तसे ॥ ७० ॥
महान्पूर्वी पराक्रम। ज्यानें दाविला निःसीम।
त्याच बाळाचा होम। दैत्यपराक्रम करी कीं आतां॥
हे सर्व आम्ही सुर। आलों ज्याचे भरंवशावर।
तो आतां न दिसे शूर। राजकुमार कोठेंही ॥ ७२ ॥
ते अमरादिक दीन। होतां उठे आयुनंदन।
सोडूनियां एक बाण। तोडी बाणजाळ तें ॥ ७३ ॥
विमर्शात्[2]त्रिदशगण। त्यांचा संशय निवारून।
दैत्याचें धनु तोडून। सहसा टाकून दे नृप ॥७४॥
पुनः तत्सारथी घोडे। मारूनी करी रथाचे तुकडे।
मग दैत्य अन्यरथीं चढे। त्याचेही तुकडे करी तो ७५

१ लक्ष्मी, ऐश्वर्य, विजय. २ संशय पावलेला.

ते सिद्धादिक पाहून । नहुषा देती आशीर्वचन ।
स्वस्त्यस्तु ते जय म्हणून । सुप्रसन्न होवूनी ॥ ७६ ॥
दानव मग शक्ती घेऊन । दे नहुषावरी सोडून ।
नहुषें बाण सोडून । तिलशः खंडन केलें तिचें ॥ ७७ ॥
मग तो नृपनंदन । वसिष्ठातें वंदून ।
भावें दोनी कर जोडून । दत्ता चिंतून बोलतसे ॥७८॥
मी अन्या न जाणतों । दत्ता तुझा मी म्हणवितों ।
आतां तुलाच स्मरतों । तरी दैत्य तो मरो आतां॥७९॥
असें नमन करून । अर्धचंद्राकार दोन बाण ।
धनुष्यास जोडून । दे सोडून असुरावरी ॥ ८० ॥
ते दैत्येश्वराचे हातावर । लागले दोनी शर ।
हात तोडूनी सत्वर । भूमीवर पडती ते ॥ ८१ ॥
तो अतिभयंकर । शब्द करूनी घोर ।
तोंड पसरून नृपावर । धांवे असुर भक्षावया ॥ ८२ ॥
नृपति पुनः दोन बाण । तसेचि तीक्ष्ण सोडून ।
दोनी पाद तोडून । टाकी क्षण न लागतां ॥ ८३ ॥
तो ओष्ठ चावूनी असुर । तोंड करूनी वर ।
सर्पापरी नृपावर । आला सत्वर भक्षावया ॥ ८४ ॥
श्रीदत्तपद चिंतून । नृप दे ऐंद्री शक्ती सोडून ।
तिणें तो भग्न होऊन । गेला मरून हुंडासुर ॥ ८५ ॥
सुविस्मित होती मुनीश्वर । आश्चर्य करिती सुर ।
पुष्पें वर्षती नृपावर । जयजयकार करूनी ॥ ८६ ॥

प्रसन्न होती सुर । म्हणती नृपा घे वर ।
नृप म्हणे धर्मावर । श्रद्धा निरंतर असावी ॥ ८७ ॥
त्या नृपोत्तमाप्रती । देव तथास्तु म्हणती ।
आज्ञा घेऊनी जाती । स्वर्गाप्रती स्वस्थानीं ॥ ८८ ॥
हातीं माळ घेऊन । रंभेसह येऊन ।
अशोकसुंदरी नमून । बोले वचन नहुषाप्रती ॥ ८९ ॥
मी ही तनू तुला अर्पिली । अंगीकारीं ही आपुली ।
असी तिची ती बोली । ऐकूनी बोले तो नहुष ॥९०॥
मीं वरितां येथें तुज । दोष लागे मज ।
गुरुआज्ञा झालिया मज । मग तुज वरीन मी ॥ ९१ ॥
तें आश्वासन मानून । ती तथास्तु म्हणून ।
रंभेसह रथारोहण । करून त्यासवें चालिली ॥ ९२ ॥
आनंद पावून नृपती । लुटी असुरांची संपत्ती ।
आणूनी दे वसिष्ठाप्रती । करून प्रणती बोले तो ९३
जी आधार आपुला । होता परिपूर्ण मला ।
म्हणून असुर मारिला । जय मिळाला दत्तवरें ॥९४॥
मी मतिमंद अधीर । हा तुमचा कृपावर ।
असें वदता राजकुमार । मुनीश्वर हृष्ट झाला ॥९५॥
मग तच्चरणावरी । पडे अशोकसुंदरी ।
म्हणे मला नृपाचे पदरीं । तुम्ही घाला मुनीश्वर हो॥
आनंदें मग मुनी वदे नहुषा । ही असे निर्दोषा ।
ही आवडे मला स्नुषा । स्वीकारीं योषारत्न हें ॥९७॥

तूं आजची वरीं इला । सुमुहूर्त असे ये वेळा ।
नृप तथास्तु असें वदला । मग करविला स्वयंवर ९८
त्याप्रती म्हणे मुनी । तूं स्त्रियेसह पुरा जाऊनी ।
मायबापां भेटूनी । राज्य करूनी राहें सुखें ॥ ९९ ॥
असें तयाचें वचन । नहुषें स्वीकारून ।
अरुंधतीवसिष्ठाचे चरण । धरून प्रेमाश्रू गाळी॥१००॥
संपन्नैश्वर्य असून । मायबाप गेले अंतरून ।
आपण मायबाप होऊन । केलें पाळण तें कोण विसरे॥
जे आजपर्यंत । स्नेहें पाळण केलें तें सतत ।
घोळतसे माझ्या मनांत । तेणें दुःखित होतसें मी ॥
नृपति असें स्नेहें बोले । वसिष्ठें तया तत्व उपदेशिलें।
मग तया पाठविलें । ते आले स्वनगरीं ॥ १०३ ॥
भेटे तया मायबापा। सर्व सांगूनी म्हणे कृपा ।
मजवरी करा हो मायबापा । दैवें अपराधी असें मी॥
जें मद्दूरगमनादिक । तें जाणा सर्व दैविक ।
आयुराजा म्हणे तो शोक । नसे आम्हां दुःख दत्तवरें॥
विसरे मी शोकमोहासी । असें म्हणून नहुषासी ।
देऊनी राज्य वनासी । चाले भार्येशीं सह आयु १०६
तेथें तप आचरोनी । उभयही ज्ञानी होऊनी ।
दत्तरूपीं जाती मिळोनी । भक्तिप्रभाव हा दीपका१०७
जगद्वंद्य हा नहुष । येथें राज्य करून देवेश ।
त्याच देहें झाला खास । काय भक्तांस न मिळे वरें॥
इति श्रीदत्तमाहात्म्ये पंचचत्वारिंशोऽध्यायः ॥ ४५ ॥
॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

# अध्याय सेहेचाळिसावा

## श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

प्रणाति करून दीपक वदे । म्हणे गुरुजी मी आनंदे ।
श्रीदत्तचरित संवादें । परी तृप्ती न दे ढेंकर ॥ १ ॥
मी हो केवळ तृषित । मज पाजा दत्तकथामृत ।
तुम्ही संत कीर्तनभक्त । श्रवणभक्त भाविक मी ॥२॥
दत्त तरी ब्रम्हानंदमूर्ती । जो पूर्वी घेवूनी भक्ती ।
मग स्वभक्तां दे मुक्ती । ज्याचे चित्तीं असा लोभ॥३॥
जो सदंतरीं करी विहार । जें भक्तांचें शरीर ।
तें त्या देवाचें दुकान थोर । तेथें व्यापार होत याचा ४
भक्त तया परी सादर । करिती उधार व्यापार ।
मुद्दलासी न लावितां कर । वरचेवर वाढविती ॥ ५ ॥
घेणार जसे जसे जाती । तशा तशा तयांप्रती ।
आळस सोडुनी दाविती । करिती साचा व्यापार॥६॥
आलस्य तयां नसे । दुकान बंद होत नसे ।
जें एकदां खरेदी केलें असे । तें जसें तसें जयांचें ॥ ७ ॥
तयांस न ठावा दुकाळ । तयांचा सदां सुकाळ ।
त्यांवरी कधीं नये खोटसाळ । ज्यांचा सांभाळ करी हरी
जे सर्व जनांसी रसाळ । मग कोण त्यांवरी घे आळ ।
त्यांच्या पदीं सकळ । शिरकमळ ठेविती ॥ ९ ॥
रहस्य सर्वांचें जाणती । तयां संतांची गती ।
मूढ लोक नेणती । देवही नेणती गती त्यांची ॥१०॥

ही हो तयांच्या व्यापाराची रीती। तेच करूं जाणती।
जरी सर्वस्व गमविती। तरी भले म्हणविती आपपरां॥
अशा दुकानावर। हा मी पातलों लाचार।
मला द्यावया उधार। तुम्ही धीर समर्थ आहां॥ १२॥
आयूस जसा मुक्त केला। तसा यदूस तारिला।
असें ऐकिलें ती मला। दत्तलीला ऐकवा ॥ १३॥
अपूर्व वाटे हरिलीला। नित्य नूतन वाटे कालाला।
ती नको होईल कोणाला। पशुघ्नाला[1] भली होवो॥१४॥
तपस्या हेचि आमुची। चाड नाहीं यज्ञदानकर्मांची।
असी वाणी दीपकाची। ऐकतां मुनीची मती द्रवे १५
रहस्य जे उपनिषत्सार। ती अवधूतगीता मनोहर।
यदूप्रती योगेश्वर। ती सादर ऐक म्हणे ॥ १६॥
शुक्रबाला देवयानी। वृषपर्वकन्येशीं नग्नपणी।
जळीं खेळतां नरा देखूनी। लाजून ये बाहेर ॥ १७॥
ती बाह्यप्रदेशीं येतां। तत्पूर्वीं त्वरें वृषपर्वसुता।
जीचें नाम शर्मिष्ठा। ती देवयानीचें वस्त्र नेसे ॥१८॥
तें स्वतःचें वस्त्र जाणूनी। तीवर कोपे देवयानी।
शर्मिष्ठा तिला निंदूनी। दे ढकलून कूपांत ॥ १९॥
दैवें ययाती तेथें आला। शर्मिष्ठा गेली गृहाला।
रोदन ऐकूनि राजा द्रवला। म्हणे तिला कोण तूं॥२०॥
तिणें स्तुती करून। सर्व दिलें सांगून।
कर धरूनी तिला काढून। स्वार्ध वसन दे तिला तो २१

१ खाटकाला.

नृपास म्हणे देवयानी। कचें शापिलें म्हणूनी।
त्वां धरिला माझा पाणी। झालें त्वत्पत्नी ब्राह्मणजा मी
तो पूर्वापर जाणूनी। तिला घे वरूनी।
शुक्रा हृष्ट करावा म्हणूनी। दासी शर्मिष्ठा करूनी
दिली दैत्यें ॥ २३ ॥
ते क्षणि शुक्र म्हणे। शर्मिष्ठेचा संग न करणें।
ययाती तथास्तु म्हणे। चाले पुरा स्त्रियांसह ॥ २४ ॥
रमे भूप देवयानीशीं। शर्मिष्ठा झाली तिची दासी।
दोन पुत्र झाले देवयानीसी। यदु तुर्वसू नामक॥२५॥
जी सुता वृषपर्व्याची। ती सेवा करितां राजाची।
म्हणे एकांती रतिसुखाची। गोडी थोडी तरी द्या २६
अनन्या ती जाणून। तिशीं रमला नृप द्रवून।
ती गर्भिणी होवून। प्रसवली तीन आत्मज ॥ २७ ॥
ते आत्मज तिचे पाहून। देवयानी कोपून।
पितयातें दे सांगून। शुक्र कोपून शापी भूपा॥ २८ ॥
या कन्येच्या दासीसी। राजा तूं रत झालासी।
माझ्या वाक्या टाळलेंसी। वृद्ध होसी आतांच तूं २९
असें वाक्य परिसतां। तत्काळ भूपा ये वृद्धता।
कांप वळ्या पलितां पाहतां। भूप खिन्न झाला ॥३०॥
त्राण नुरे शरीरांत। खोकला ये अकस्मात।
विषयभोगानें ज्याचें चित्त। तृप्त नाहीं जाहलें ॥३१॥
असा पती क्षीण होतां। देवयानी करी चिंता।
म्हणे पापीण मी ह्या अनर्था। करवीं आतां काय करूं

अवश्य जें होणार । पूर्वींच तसा विकार ।
बुद्धीस होतो अनिवार । तेव्हां अविचार सहज ये ॥३३॥
हा पति असा होतां । माझे भोग अंतरले सर्वथा ।
अजूनी माझ्या चित्ता । असें चिंता विषयांची ॥३४॥
भूपासह ती देवयानी । असा पश्चाताप करूनी ।
शुक्रापाशीं जावूनी । प्रार्थूनि मागे ती तारुण्य ॥३५॥
तें सर्व समजून । बोले शुक्र दयाघन ।
भूपा तुझें वृद्धत्व देऊन । पुत्राचें तारुण्य घे तूं ॥३६॥
मग भूप म्हणे पुत्रांसी । कोणी ह्या वृद्धत्वासी ।
घेऊनी द्या तारुण्यासी । तें चौघांसी नावडे ॥३७॥
राजा तेव्हां तयांसी । शापी तुम्ही सह संततीसीं ।
छत्र सिंहासनासी । योग्य न व्हाल निश्चयें ॥३८॥
शप्तेषु तेष्वग्रजेषु कनिष्ठः पूरुरात्मजः ।
शर्मिष्ठाया वयो दत्वा पित्रे स्वं तस्य चाददे ॥३९॥
पित्याचा तोष व्हावा म्हणूनी । स्वतारुण्य देऊनी ।
राजाची अवस्था घेऊनी । वृद्ध होऊनी राहे पुरु ॥४०॥
जो आत्मनात्मविवेक । न करी म्हणुनी मूर्ख ।
गोड मानी विषयसुख । केवळ दुःखरूप जें ॥४१॥
तो आनंदित होऊनी । शतवर्षें विषय भोगूनी ।
दैवें विरक्त होऊनी । देवयानीप्रती बोधी ॥४२॥
संतत प्रबल इंद्रियगण । ज्ञात्यालाही वळवी म्हणून ।
हो कां माता पुत्री बहीण । एकासन वर्जावें ॥४३॥

हो कां तो स्वयें जीर्ण । निकट न घ्यावी स्त्री हो कां
जीर्ण ।
जेवी वस्त्र अतिजीर्ण । जडे जीर्ण गोदडीस ॥४४॥
जें मन विषयासक्त । तें विषयभोगानें न हो तृप्त ।
जेवीं ओतितां घृत । अग्नि प्रदीप्त होतसे ॥ ४५ ॥
आतां विरक्तता येतां । मना ये शांतता ।
असें बोलूनी कनिष्ठसुता । देता झाला तारुण्य॥४६॥
तो त्यजुनी विषयवासना । घेई आपुल्या वृद्धपणा ।
पुरूला राज्य देऊनी वना । चालिला मना शमऊनी॥
जे भागुन दिले देश । तयांवरी पुरू अधीश ।
हें पाहून त्रास । यदूच्या मनास वाटला तो ॥ ४८ ॥
तो अप्सरातुल्य भोगी नारी । गजाश्वधनपुत्राढ्य जरी
तरी शिणे अंतरीं । पुरू राज्य करी म्हणूनी ॥ ४९ ॥
वदे तेव्हां यदु त्रस्त । हा मातृदासीचा कनिष्ठ सुत ।
सिंहासनीं बसे मुदित । तेणें दुःखित चित्त माझें ५०
हा मी यदु विनीत । ज्येष्ठ राणीचा ज्येष्ठसुत ।
हें पाहूनी आतां येथ । कसें जीवित घालवूं हें ॥५१॥
हें विस्मित झालें माझें मन । कीं हें पूर्व कर्म दारुण ।
आतां सर्व सोडून । वनसेवन करावें कीं ॥५२॥
महान्समर्थ दैवयोग । तोच भोगवी भोग ।
तो येतां सवेग । त्याचा कोण भंग करी कसा ॥५३॥
म्यां पूर्वापर विचारितां । निश्चित केलें स्थिरऊनी चित्ता
संसारीं सुखवार्ता । नसे सर्वथा कदापी ॥ ५४ ॥

हें प्राणिमात्र जाणूनी । व्यर्थ पडती मोहूनी ।
त्या सुखा धिक्कारूनी । जातों वनीं मी आतां ॥५५॥
असा भूप विचार करूनी । दृढ वैराग्य धरूनी ।
सुखदुःखादि साहूनी । फिरे वनीं मोक्षार्थी ॥ ५६ ॥
तो होता दत्तार्चक । त्याला होतां विवेक ।
दत्त ह्मणे हा सम्यक । ज्ञानाधिकारी जाहला ॥५७॥
जो संन्यासाचा अधिकार । तो याला ये साचार ।
आतां श्रवणीं सादर । होईल राजकुमार हा ॥ ५८ ॥
जें स्वात्मैकरहस्य । तें याला सांगावें अवश्य ।
असें म्हणूनी तया दृश्य । जाहला अदृश्य असतांही
पार्थिवाचे दृष्टीसमोर । एकाएकीं दिसे दिगंबर ।
पहुडला धरणीवर । अंतरीं दर न धरितां ॥ ६० ॥
हर्षे भूप तया पाहूनी । त्याच्या समीप जाऊनी ।
भावें वंदन करूनी । ह्मणे या घोर वनीं कोण तूं ६१
येथें द्वितीय कोणी नसे । हें घोर वन असे ।
येथें योगक्षेम कसें । होतसे हें कळेना ॥ ६२॥
मनुजाची स्थिती पाहतां । कोणी आयुष्याकरितां ।
कोणी संपत्तीकरितां । झटती यशा करितां कित्येक॥
कोणी न राहती सडे । कोणी वळती धर्माकडे ।
कोणी अर्थकामभोगाकडे । मोक्षाकडे विरळ ॥६४॥
हें अंतःकरण । कांहीं करमणुकीवांचून ।
कसें निश्चळ होऊन । राहे समाधान चिरकाल ॥६५॥

जगांत पाहतां जागोजाग । कामक्रोधलोभ आग ।
पेटतां हें तुझें आंग । सांग कसें न भाजलें ॥६६॥
सर्वत्र तूं उदासीन । संपत्तीकडे न देसी मन ।
जिविताची पर्वा सोडून । कीर्तीची गरज न ठेविसी॥
जगीं कोणी ज्ञानहीन । कोणी शक्ती नसोन ।
कोणी निपुणता नसून । राहती बसून अकर्तृत्वें ॥६८॥
मला मोह पडतो आतां । तुला शक्ति निपुणता ।
अंगी उत्तम ज्ञान असतां । अकर्तृता कशी ये ॥६९॥
हें रहःस्थान गहन । कसा निर्वाह करून ।
येथें राहसी हें मजलागून । दे सांगून आवडे तरी ७०
हा मी कःपदार्थ । आपुल्यापुढें असमर्थ ।
तथापि प्रश्नोत्तर यथार्थ । सांगे समर्थ तूं दयाळू॥७१॥
मोहशोकाग्नि सोडून । निराशपणें राहून ।
स्त्रीपुत्रादि नसून । आनंदघन कसा होसी ॥ ७२ ॥
हे लोक आम्ही कुटुंबांत । धनस्त्रीपुत्रांसहित ।
असतांही होतों दुःखित । आपुलें विपरीत वर्तन कसें॥
असे एवढें प्रश्न । यदू करी ते परिसून ।
अवधूत तो हंसून । बोले वचन तयाप्रति ॥ ७४ ॥
मन करून समाधान । राजा ऐक माझें वचन ।
मला लाधलें तत्त्वज्ञान । तेणें असा होवून राहिलों ७५
हें तत्त्वज्ञान जाण । म्यां चौवीस गुरूंपासून ।
यत्नें केलें संपादन । तें सांगेन तुज आतां ॥ ७६ ॥

ज्याचें मनन करितां। ब्रह्म उमजे तत्वतां।
निदिध्यासन करितां। साक्षात्कारता होईल ॥ ७७ ॥
हा मनुष्यासच विचार। घडतसे साचार।
शरीरें जीं इतर। आहार विहार घेण्याचीं ॥ ७८ ॥
येथें परमात्मा उघड। अन्यत्र अवघड।
येथें प्रज्ञानाचें बिऱ्हाड। असे दृढ जाण तूं ॥ ७९ ॥
अवश्य नरदेहीं जाण। मिळविजे विज्ञान।
शास्त्रानुमानें करून। ये कळून सर्वही ॥ ८० ॥
जें अंतःकरणबिंबित। तें ब्रह्म निश्चित।
वृत्तिज्ञानें होई विदित। जेणें मुक्त होई नर ॥ ८१ ॥
चौवीस गुरूंपासून। हेयोपादेय[1] लक्षण।
घेतलें मी तत्वज्ञान। तेणें मन शांत झालें ॥ ८२ ॥
घेणें परि त्याग करणें। असें जगीं शोधणें।
हेय तें टाकणें। आदरें घेणें उपादेय तें ॥ ८३ ॥
अनार्य हें नेणती। त्यांची पशूबरोबर गणती।
ते तृण न भक्षिती। पशू जातीचें हें भाग्य ॥ ८४ ॥
श्रुति गाजती मोठ्यानें। महती विनष्टि[2] म्हणून।
तरी नरजन्मा येऊन। हेंच साधन करावें ॥ ८५ ॥
ज्या इच्छु नये म्हणे वेद। त्या विषयांचा नाद।
न सोडिती मतिमंद। करिती विशेष छंद ते ॥ ८६ ॥

१ हेय=टाकण्याचा आणि उपादेय=घेण्याचा. २ विनष्टी=हानि, हेमकोटिभिरप्यायुः क्षणमात्रं न लभ्यते। तत् चेद्याति मृषा सर्वं का हानिरधिका ततः ॥ तेल तूप सांडलें तर हानि झाली म्हणतात, परंतु आयुष्य जातें आहे त्याची हानी कोणी मानीत नाहीं.

अनुक्रमें करून। सांगतों तत्वज्ञान।
पहिला गुरु पृथ्वी जाण। दुसरा पवन तो गुरु ॥८७॥
हें व्योम तिसरा गुरु। चौथा उदक गुरु।
पांचवा जाण अग्नि गुरु। सहावा गुरु चंद्रमा ॥ ८८ ॥
सूर्य कालात्मा सातवा गुरु। कपोत आठवा गुरु।
नववा अजगर गुरु। दहावा गुरु समुद्र ॥ ८९ ॥
तो होय अकावा गुरु पतंग। बारावा गुरु भृंग।
तेरावा गुरु मातंग। मधुंहा[1] गुरु चौदावा ॥ ९० ॥
मृग मम गुरु पंध्रावा। मत्स्य गुरु सोळावा।
पिंगळा वेश्या गुरु सत्रावा। गुरु अठरावा कुरर[2]॥९१॥
जे तीव्र मानापमान चिंता। तत्परिहाराकरितां।
बालक गुरु तत्वतां। हा आतां एकुणिसावा ॥ ९२ ॥
कंकण कुमारीचें विसावा गुरु। एकविसावा सर्प गुरु।
बाविसावा गुरु। शरकारें[3] जाण तूं ॥ ९३ ॥
गुरु मम तेविसावा। पेशस्कार[4] जाणावा।
कोळी गुरु चोविसावा। ज्ञानार्णवा घे यापासुनी॥९४॥
त्यात स्नान करून। सर्व पाप धुवून।
ज्ञानसंपन्न होवुन। मी भय सोडून पडें येथें ॥ ९५ ॥
मी ह्या विवेकें संपन्न। झालों असें म्हणून।
सर्व तळमळ जाऊन। आनंदें भरून राहिलों येथें ९६

१ मधमाशी. २ टिटवी. ३ बाण करणारा शिकलगार. ४ कुंभारीण माशी.

निजरंगें रंगून । मी सर्वदा असें म्हणून ।
सुखदुःखाचें स्फुरण । नसे जाण सर्वथा मला ॥ ९७ ॥
नित्य शुद्धबुद्धमुक्त । मी असें योगयुक्त ।
केलें सर्व परित्यक्त । असें असक्त सर्वत्र ॥ ९८ ॥
विशुद्ध ज्ञानाकारितां । एका गुरुचे पाद धरितां ।
येतसे कृतार्थता । तरी इतुके गुरु किमर्थ ॥ ९९ ॥
जेंवी मना आवडती । तितके करितां पती ।
त्या स्त्रीला व्यभिचारिणी म्हणती । निंदिती जगांत॥
तेवी पाहिजे तितुकें जरी । नर तसे गुरु करी ।
तरी तो व्यभिचारी । होय म्हणसी तरी ऐक तूं १०१
गुरु परमार्थे ऐक । श्वेतकेतु भृगुप्रमुख ।
करूनी गुरु एक । घेऊन विवेक मुक्त झाले ॥ १०२ ॥
गुरु विद्योपदेश करी । मग असंभावनादि[1] ये तरी ।
मग वेदांतानुसारी । अंगिकारी जे तर्क ॥ १०३ ॥
विशुद्धं ब्रह्मविज्ञानं बुद्धिं नारोहतीति चेत् ।
वेदानुकूलतर्केण[2] तर्क्यतां मा कुतर्क्यतां ॥ १०४ ॥
असा करणें तर्क तर । कीजे ह्या द्वैतावर ।
अद्वैत ब्रह्मावर । नसे अवसर तर्काला ॥ १०५ ॥
तर्के विवेक घ्यावया । म्यां हें गुरु केले राया ।
येणें असंभावनादिक लया । गेले निश्चय ठेवितां १०६

---

१ संशय दूर करण्यासाठीं. २ देवाला अनुकूल तर्क करावा परंतु कुतर्क करूं नये.

हें वर्म जाणून । सूक्ष्म वस्तू कळावी म्हणून ।
असे गुरु केले म्हणून । मग कोण दोष देईल ॥१०७॥
ऐकुनी असें वचन । त्या अवधूता वंदून ।
परमानंद पावून । राजा वचन पुनः बोले ॥ १०८ ॥

इति श्रीदत्तमाहात्म्ये षट्चत्वारिंशोऽध्यायः ॥ ४६ ॥
॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

# अध्याय सत्तेचाळिसावा

## श्रीदत्तात्रेयाय नमः ॥

हा ऋषी असें मानून । यदु लीन होऊन ।
म्हणे चोवीस गुरूंपासून । मिळालें तें ज्ञान मला सांगा
असें परिसोनि त्याचें वचन । अवधूत हर्षून ।
सांगतसे ज्ञान । म्हणे चित्त देऊनि ऐक शिष्या ॥२॥
उंपरि जावया शिडी जशी । सहनशीलता तशी ।
पाहिजे मुमुक्षूसी । हें भूमीपाशीं शिकलों मी ॥ ३ ॥
जेंवी भूमीवरी नर । टाकिती मळमूत्र ।
थुंकिती तरी त्यांवर । न होतां क्रूर क्षमा करी ॥ ४ ॥
म्हणे स्वदैवानुसार । घडे सर्व संस्कार ।
हा बोल कोणावर । कवणेपरी कसा ठेवावा ॥ ५ ॥
जो स्वयंभु ईश्वर । त्याणें हे दैवानुसार ।
प्राणी ठेविले मजवर । तयां आधार दुसरा नसे॥ ६ ॥
सर्वभूतांचें जीवन । योजिलें मजपासून ।
म्हणोनी मला खोदून । फाळून जाळून पीक घेती॥७॥
स्वकार्याकारितां चालतां । जीव मजवरी देती लाता ।
म्हणों तरी त्यांणीं जातां । पाय कोठें ठेवावे ॥ ८ ॥
सर्वथा मी मातेपरी । हे जीव पोरापरी ।
यांहीं कांहीं केलें तरी । म्यां अंतरीं तें न धरावें ॥९॥
पोरा तनूवरी धरूनी । दूध पाजितां लातांनी ।
मारितां तया जननी । न हाणी सर्वथा ॥ १० ॥

जरी थान देतां बाळ । अंगावरी मूत्रमळ ।
टाकी तरी माता तत्काळ । तया न दे गाळ न मारी ॥
मींही तो भाव धरीं । असें पृथ्वी माने बरी ।
मींही तसी क्षमा धरीं । सहन करीं सर्वथा ॥ १२ ॥
मोक्षार्थीकडे दृष्टि देवून । करावें सर्व सहन ।
जरी पीडिती जन । त्यांवरी कोप न करावा ॥ १३ ॥
महान्व्यवसाय[1] हाची । धैर्य धरून साची ।
पदवी न सोडावी धर्माची । हाचि उपदेश धर्माचा ॥
नेत्रें दटाविती कोणी । अपमान करिती कोणी ।
अपशब्द बोलती कोणी । हाणिती कोणी जरी तरी ॥
कोणी धाड घालिती । कोणी अपहार करिती ।
कोणी बडीमार[2] देती । कोणी थुंकती अंगावरी ॥१६॥
परेच्छाप्रारब्ध एक । दुजें स्वेच्छापूर्वक ।
अनिच्छाप्रारब्ध देख । तीन प्रकारचें प्रारब्ध ॥ १७ ॥
हा नश्वर देह जाणून । त्याला प्रारब्धाधीन करून ।
साक्षिभूत होऊन । राहतां आपण दुःख कोणा ॥१८॥
टोंचितीं जरी काट्यानें । त्यांवरी कोप न करणें ।
जरी लिंपती चंदनें । न करणें हर्ष त्यांवरी ॥ १९ ॥
असभ्य कोणी म्हणो । कोणी सभ्य म्हणो ।
कोणी मूर्ख म्हणो । आपण क्षमा धरावी ॥ २० ॥
जें दुस्सह मानवांसी । तें क्षमा धरी तयांसी ।
सुसह होई तत्क्षणेंसी । निश्चयेंसी जाण ॥ २१ ॥

---

१ मोठा निश्चय, २ काठीनें मारती.

ही क्षमा ज्याचें पदरीं। त्याला ब्रह्मांडोदरीं।
कोणी न दिसती वैरी। दैवावरी दृष्टी ज्याची॥ २२ ॥
असभ्यः सभ्यतां याति क्षमा यस्य वशे स्थिता।
सभ्योप्यसभ्यतां याति क्रोधनो[1] यः क्षमोज्झितः[2]॥२३॥
क्रोध अंधकार घोर। क्षमा ही देवलोक थोर।
असा जाणे जो नर। तोचि पार जाईल ॥ २४ ॥
कीजे धंदा परोपकारार्थ। हें जन्मही तदर्थ।
ह्याची आपुला स्वार्थ। कृतार्थ हो जेणें नर ॥ २५ ॥
केला तरु गुरु त्यासाठीं। तरु पृथ्वीचे पोटीं।
भेद केला ज्ञानासाठीं। उत्तम गुण घ्यावया ॥ २६ ॥
जे तमःप्रभव[3] असून। ते वृक्ष नित्य उभे राहून।
परोपकार करून। सर्व जन्म घालविती ॥ २७ ॥
नित्य प्रसन्न असती। जरी पराधीन असती।
तरी परोपकार करिती। वृक्षजाती आमरणांत ॥२८॥
पक्षी विविध येऊन। वरी राहती बसून।
कित्येक घरें करून। राहती तयां न निवारती ॥२९॥
भयशंका न धरिती। शीत उष्ण सोशिती।
जरी पशु पाला खाती। तरी न होती वृक्ष दुःखी ३०
तोडिती कोणी कोणी उपटती। कोणी मुळया काढिती
कोणी साल काढिती। कोणी तोडिती फुलें ॥ ३१ ॥
कितीयेक पाला नेती। कित्येक फळें तोडिती।
कित्येक चीक नेती। ढाळया तोडिती किती एक ३२

---

१ क्रोधवश झाला. २ क्षमेला सोडलेला. ३ तमोगुणापासून झालेला तरू.

असें विविध दुःख होतां। ते मनीं न आणतां।
परोपकार करितां। सर्व जीविता घालविती ॥ ३३ ॥
सुख द्यावें परासी। हें जितेपणीं त्यांसी।
घडे तसें मेलियासी। देती लोकांसी वृक्ष सुख ॥३४॥
वृक्ष मुळासह तोडिती। त्याचीं काष्ठें काढिती।
घरें दारें बांधिती। काष्ठें जाळिती यथेच्छ ॥ ३५ ॥
स्वयंपाक करणें। तरी काष्ठाविना न होणें।
राख झाली तरी तिणें। पिकें उत्तम संपादिती ॥३६॥
असा सर्व प्रकारें वृक्षांचा। उपयोग होतो साचा।
तसा मनुष्यानें देहाचा। उपयोग करावा ॥ ३७ ॥
जसे ते श्रमलियासी। विसांवा देती पांथांसी।
तसा गृहस्थें पांथांसी। विसांवा द्यावा ॥ ३८ ॥
ते शीत उष्ण साहून। मार्गीं उभे राहून।
आल्या देती आश्वासन। वांकडी मान न करिती ३९
नरें तोचि उपदेश घेऊन। सुख दुःख साहून।
घरीं आल्याचें आश्वासन। करावें खिन्न न होतां ४०
नरें भूक तहान दुसऱ्याची। जाणूनि तयाची।
पुरवावी इच्छा त्याची। करूनि शक्तीची मर्यादा॥४१॥
दैवें यदा कदाचित। संपत्ती येतां न व्हावें उन्मत्त।
जेवीं फलसंपत्ति येतां वृक्ष। ताठा न धरिती ॥ ४२ ॥
नरा इतर मदांहून। संपत्तीचा मद गहन।
पुढें जयापासून। अनर्थ घडून येतसे ॥ ४३ ॥

यास्तव नरांनीं । संपत्ति येतां नमूनी ।
असावें हें वृक्षांपासूनी । घ्यावें शिकूनी उत्तमें ॥४४॥
वृक्षाते फलसंपत्ति येतां । खालीं करिती माथा ।
कोणी फळें तोडितां । चित्तीं खिन्नता न करिती॥४५॥
पर्वतपृथ्वीपासून । घेतलें मी शिक्षण ।
पोटीं सर्व संग्रह करून । परोपकारार्थ ठेवावा ॥ ४६ ॥
मोठ्या मोठया खाणी रत्नांच्या।पोटीं असती पर्वताच्या
त्यापासूनी लोकांचा । उपयोग बरा होतसे ॥ ४७ ॥
नरें यत्नेंकरून । उत्तम विद्या सांठवून ।
द्यावा लोकां लाऊन । तरीच भूषण तयांचें होय॥४८॥
जसे उदकाचे झरे । पर्वत सोडीतसे तसे नरें ।
थंड गोड शब्द बरे । सोडावे खरे शांतिकर ॥ ४९ ॥
जेंवी विविध गुहा राखून । पर्वत राही म्हणून ।
संतसज्जन येवून । आश्रम करून राहती ॥ ५० ॥
तसा द्यावा नरें नरा आश्रय । सत्संगती होतां श्रेय ।
होईल हा निश्चय । पर्वतांपासून हें शिकलों ॥ ५१ ॥
हा वायांचा संसार । ह्यामध्यें हेंची सार ।
सत्संगतीच घडे तर । चुकेल येरझार आपुली ॥ ५२ ॥
चतुरपणें असा म्यां । पृथ्वी गुरु करूनियां ।
असा उपदेश घेऊनियां । शांत होवूनियां राहिलों ॥
विरक्ताः[1] परिमुच्यंते । असीं असती मतें ।
जरी क्षमा अंगी ठरे ते । विरक्ततेवांचूनि व्यर्थ ॥५४॥

---

१ विरक्त असतात ते मुक्त होतात.

क्षमा असोनी अंगीं। बहिर्मुख विषय भोगी।
न होय तो विरागी। मग योगी कसा होईल ॥ ५५ ॥
जो अन्य गोडी न पाहतां। आहारमात्रें घे तृप्तता।
त्याला ये योग्यता। वायु गुरु करितां हें कळे ॥ ५६ ॥
प्राण देहस्थ वायु जाण। त्यापासून जें शिक्षण।
घेतलें तें सांगेन। चित्त देऊन ऐक राया ॥ ५७ ॥
प्राणवायु अन्न न मिळतां। शिथिल होय तत्वतां।
आहारमात्र मिळतां। रसाची अपेक्षा न ठेवी ॥५८॥
हें बहु मिष्ट असे। हें अन्न गोड नसे।
हें अन्न विरस असे। कदापि प्राण असें न विचारी ॥
जें चर्वित अन्न। मिळे तें सेवून।
आपुला व्यापार चालवून। राहे प्रसन्न प्राणवायू॥६०॥
जें खाद्य असे आपुलें। दैवयोगें मिळालें।
म्हणजे मन आपुलें। समाधान केलें पाहिजे ॥ ६१ ॥
या भयानें जरी नर। सोडीन म्हणेल आहार।
तरी मनाला ग्लानी थोर। येईल विकार वाचेला॥६२॥
हीं शून्य होतां दोनीं। ज्ञान जाईल नासूनी।
मग मुक्ति तरी कोठूनी। येईल शयनीं लोळतां॥६३॥
आनंदाचाही मग। सर्वथा होईल भंग।
मिताहार नसतां योग। सर्वथा व्यंग होईल ॥ ६४ ॥
जो बहु स्वादिष्ट अन्न। खाई पोटभरून।
त्याचेंही चित्त विक्षेपून। न होय ध्यान सर्वथा ॥६५॥

सर्व रस रसना जाणे। तिच्या नादा लागतां क्षणें।
परमार्थापासूनी मुकणें। जन्म घेणें घडे पुनः ॥ ६६ ॥
जो हें विरस हें सरस। असें पारखी अन्नास।
थोडे मीठ पडतां त्यास। एकहि ग्रास न गिळवे॥६७॥
सुविद्य अथवा अविद्य नर। सर्व रस जिंकी तर।
तोचि जाणावा ईश्वर। हो कां नर देहानें ॥ ६८ ॥
विषया सर्वथैव टाकावें। असेंही स्वयें न करावें।
आपोआप ते सुटावे। तरीच बरवें वैराग्य ॥ ६९ ॥
नरें इच्छा असतां किंवा नसतां। दैवें विषयभोग मिळता।
न ठेवावी आसक्तता। वायु गुरु करितां कळे हें॥७०॥
जो गति करिता वात। शीत उष्ण मार्गांत।
भेटतां न हो आसक्त। न शिवे तो गुणदोषां ॥७१॥
नरें शुद्ध स्वभावें रहावें। गुणदोषादि न मानावें।
शीतोष्णांत फिरावें। न रमावें कोठेंही ॥ ७२ ॥
नित्य श्रुतिमार्ग लंघून। यथेच्छ करावें गमन।
विटाळ न घ्यावा लावून। जसा पवन निर्दोष॥ ७३ ॥
देहामध्येंही राहून। अहंकार द्यावा सोडून।
जसा गंधाश्रय होवून। जसा पवन वेगळा ॥ ७४ ॥
जो सुधी देहधारी। दैवें विषय घे जरी।
आपणावेगळा पाहे तरी। न धरी विषयसंबंधासी७५
त्या नरासी विषय घेतां। कसी येईल अलिप्तता।
तरी सांगतों आतां। ययातीसुता ऐक तूं ॥ ७६ ॥

कारणांवांचून। कार्य न घडे म्हणून।
विकल्पासी कारण। प्रमाद जाण सर्वथा ॥ ७७ ॥
हरयेक प्रकारेंकरून। इतर व्यासंग सोडून।
ठेवितां स्वरूपानुसंधान। अलिप्त होऊन राहिला॥७८॥
हे दोन प्रकारेंकरून। अंतर्बाह्य वायु जाणून।
म्यां घेतलें हें शिक्षण। दिली सोडून रसासक्ती ७९
समस्त साधनांहून। प्राणवृत्तीनें संतोषून
राहणें हें उत्तम साधन। नित्य सोडून रसासक्ती ८०
हेंची द्वितीय गुरुपासून। असे घेतलें मी ज्ञान।
आतां तिसऱ्या गुरुपासून। मिळालें ज्ञान तें ऐक ८१
आत्मा चराचर व्यापून। निर्विकारपणें एक असून।
राहे अचळ असें ज्ञान। आकाशापासून शिकलों ८२
चराचर देहांतरीं। आत्मा एकची अवधारीं।
जेवीं नाना घटांतरीं। असे आकाश तरी एक ॥८३॥
जो साक्षिभूत आत्मा। तो जरी भासला गुणात्मा।
तरी तो नोहे जडात्मा। सच्चिदानंदात्मा एक तो ८४
हें खरेंपण असून। आवरण आहे म्हणून।
मना न ये ठसून। म्हणून विचार करावा हा॥ ८५ ॥
ह्या विविध देहासी जाण तूं। काल कर्म गुण हेतू।
जोवरी असे हेतू। तंव वरी जाण तूं भेद हा ॥ ८६ ॥
हे नद्यांच्या पुरापरी। चालती एकसरी।
जो ह्यांचा विचार न करी। तो ह्या पुरीं वाहूनि जाई

गुणांचा जो क्षोभक। त्याला काळ म्हणती लोक।
जें जन्माला निमित्त एक। नृपा ऐक कर्म तें ॥ ८८ ॥
जे त्रिविध गुण। सत्व रज तम म्हणून।
तेंची उपादान कारण। घड्याला कारण माती जसी॥
जे आद्यांतीं[1] नसती। ते देह मध्यें भासती।
त्याला हे कारण असती। काल कर्म गुण जाण ॥९०॥
चराचर देह जाण। कालकर्मगुणाधीन।
हें सिद्ध असे म्हणून। नश्वर जाण ते सर्व ॥ ९१ ॥
भूपा यदाकदाचित। काल कर्म गुणांचे विभाग होत॥
तेधवां अकस्मात। देह नासत असे हा ॥ ९२ ॥
समस्त देह मेले तरी। आत्मा न मरे न मारी।
तो आकाशाचे परी। निर्विकारी व्यापक एक॥ ९३ ॥
मग द्वेष्टा कोण प्रिय कोण। आत्मा एकचि परिपूर्ण।
म्हणसी प्रसिद्ध जन्म मरण। हें कोण दूर करी ॥९४॥
जंव दोषदृष्टी असे। तंव हें भासतसे।
आकाशा तळ मलिनता[2] नसे। परी भासे ती मूढां९५
हो कां भलीं दिसोंत शरीरें। तीं तेजोन्नजलविकारें।
येती जाती जसीं अभ्रें। वायूच्या जोरें आकाशीं ९६
जो नियंता आत्मा एक। तो सर्वदेहव्यापक।
जरी देह अनेक। तरी एक प्रत्यगात्मा हा ॥ ९७ ॥
देहासह तो हाले चाले। असें जरी भासलें।
तरी तो न हाले न चाले। असें जाणिलें म्यां राजा९८

१ आधीं आणि अंती. २ मलिनपणा.

जो देहयोगें आत्म्यास। दिसे आकाराचा भास।
तो जेवीं आकाशास। घड्यानें कारभारास दिसे तसा
जरी अचळ आकाश असे। तरी घड्याबरोबर. जसें।
चालतसे असें भासे। परी नसे तसें तें ॥ १०० ॥
तो जेवि अचळ। आत्मा तसा निश्चळ।
देह चालेल तरी अढळ। जो केवळ अकंद ॥ १०१ ॥
महद्यशा म्हणून। वेद बोले ज्यालागून।
तो अप्रतिम जाण। तया कोण हलवील ॥ १०२ ॥
आत्मा यापरी निराभास। त्याचा कोण करील नाश।
जसा घडा फुटतां आकाश। अविनाश न फुटे १०३
फुटे मृत्तिकेचा पिंड। तेवीं मरतां देहपिंड।
आत्मा न मरे जो सुदृढ। तो अखंड अज सदैव १०४
ह्यो मृत्युंजय तच्चिंतक। यापुढें बापुडा अंतक।
जो प्रत्यगात्मा तेंच एक। ब्रह्मविवेक असा केला१०५
तया तीनीं देहांचा। संग नसे तयाचा।
भेद नोहे ह्या साचा। आकाशाचा शिष्य जाणे हें१०६
ये तीर्त्वाऽपारमज्ञानसागरं ज्ञाननौकया।
आकाशकल्पमात्मानं प्रत्यंच यांत्यभेदतः ॥ १०७ ॥
असें विज्ञान म्यां राया। आकाश गुरु करूनियां।
मिळविलें म्हणूनियां। सोडिलें भया एकत्वें॥ १०८ ॥
इति श्रीदत्तमाहात्म्ये सप्तचत्वारिंशोऽध्यायः ॥ ४७ ॥
श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

# अध्याय अठ्ठेचाळिसावा

## श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

जो आद्यन्तरहित । तो भगवान् श्रीदत्त ।
म्हणे राया सतत । स्वच्छ असावें उदकापरी ॥ १ ॥
नित्य या जगीं सर्वांशीं । स्नेह ठेवावा दिवानिशीं ।
कटू न व्हावें कोणासी । रहाटी अशी असावी ॥ २ ॥
जे अमृतासम भाषण । तें परिमित बोलून ।
सर्वांशी गोडी ठेवून । अनुदिन वागावें ॥ ३ ॥
अमृतप्राय गोड बोलतां । सर्व वळती तत्त्वतां ।
उदकाला गुरु करितां । ये हाता हा गुण ॥ ४ ॥
जसें मधुर स्वच्छ जळ । स्वभावें असे निर्मळ ।
म्हणोनी लोक सकळ । पाहतां जळ धांवती ॥ ५ ॥
या अश्नुवंति ता आपः । म्हणोनी उदका म्हणती आप
पाहिजे तिकडे होतां व्याप[1] । आप समान ॥ ६ ॥
नरें तेवीं गोड भाषण । सर्वांशीं स्नेह ठेवून ।
सर्वांत जावें रवपून । उदकासमान निरंतर ॥ ७ ॥
जळ अंगी प्रोक्षितां । पितां आचमन करितां ।
किंवा दृष्टीनें पाहतां । स्नान करितां पवित्र करी ॥८॥
सर्व धंदे जळावर । लोक करिती वारंवार ।
परी तें न विटे साचार । तसा आचार नरें ठेवावा॥९॥

---

१ व्यापणारा.

सतत स्वच्छ राहे नर। त्याचें होतां दर्शनमात्र।
पाणी होई पवित्र। असें चरित्र स्वच्छतेचें ॥ १० ॥
जो नमस्कार करी। किंवा सेवा करी।
तयातें स्वच्छ नर तारी। तीर्थजळापरी निरंतर ॥ ११ ॥
नरें प्रशास्तपणा धरून। जलाप्रमाणें राहून।
स्वयें पवित्र असून। इतरां पवित्र करावें ॥ १२ ॥
ह्याच विशेष गुण। जळ पोटीं मळ ठेवून।
बाहेर स्वच्छ असून। करी मळक्षालन इतरांचें ॥ १३ ॥
जो निःशंकपणें हा देह। मळमूत्रकफांचें गेह।
पंच भूतांचा समूह। तयाचा मोह कासया ॥ १४ ॥
सुमति जो मानव। मोह न धरितां सदैव।
ह्याच देहें ज्ञानवैभव। मिळवी भवनाशक ॥ १५ ॥
ज्ञान येतां हातासी। कृतार्थता ये तयासी।
तरी न टाकी देहासी। राखी लोकांसी तारावया ॥ १६ ॥
कर्म संचित जाळून। क्रियमाण टाकून।
प्रारब्धमात्रा घेवून। राहे पावन कराया लोकां ॥ १७ ॥
स्वेच्छें भूमिवरी फिरून। दर्शन स्पर्शन देवून।
करी लोकांतें पावन। उदकासमान होवूनी ॥ १८ ॥
स्वगति करितां जळ। सोडूनी दे उच्चस्थळ।
उन्नत वृक्षा पाडी समूळ। तारी नम्र लव्हाळया ॥ १९ ॥
तसा मुक्त नर जाण। गर्वें ताठरती त्यां टाकून।
वळती लीना देखून। घालवून त्याचें पाप ॥ २० ॥

जे कां पाखंड दुर्मती । शापूनी तयांप्रती ।
समूळनाशा पाववितो । तारिती सदा लीनांतें ॥२१॥
जळास गुरु करून । घेतलें म्यां हें शिक्षण ।
हा चवथा गुरु जाण । पांचव्याचा गुण सांगतों॥२२॥
तपें तेजस्वी असावें । लोकां प्रदीप्त दिसावें ।
पाहिजे तिकडे खावें । परी न शिवावें दोषासी ॥२३॥
जनांत वागतां आपण । राहावें गुप्तपणा धरून ।
केव्हां केव्हां प्रगटपण । धरून राहटी करावी ॥ २४ ॥
भजतो जो आपणासी । पुरवावें त्याच्या कामासी ।
भक्तांच्या पापासी । नाश करावें समूळ ॥ २५ ॥
जरी भूमीवरी फिरतां । कांहीं मिळे खाण्याकरितां ।
त्याचा न करावा सांठा । अग्नि गुरु करितां कळे हें ॥
जो स्वयमेव तेजस्वी । लोकां आपुली दीप्ति दावी ।
तापें शीत पळवी । प्रकाशें घालवी अंधकारा॥ २७ ॥
अग्नी इकडे तिकडे फिरून । पाहिजे तें खावून ।
पुनः सोंवळा राहून । सर्वां समान वागतसे ॥ २८ ॥
अग्नी वरिष्ठ होवून । पाहिजे तें खावून ।
दोषाचा लेशही न घेवून । शुद्धपणा न विटवी ॥२९॥
ज्याचा तेजस्वीपणा अचाट । कोठेंही जया नये वीट ।
हें शिक्षण नीट । साधकें धीटपणें घ्यावें ॥ ३० ॥
कुंडांत अग्नीस ठेवून । काष्ठानें प्रदीप्त करून ।
अग्निहोत्री करिती हवन । तया पावन करी तो॥३१॥

कोणी मोकळा ठेविती । तो अजस्त्र पक्ष म्हणती ।
कोणी गोळा देवून झांकिती । उद्धरण करिती
होमकाळीं ॥ ३२ ॥
तया यजमानाचे स्वाधीन । अग्नी सदा राहून ।
नित्य सेवा घेवून । करी पावन तयासी सदा ॥ ३३ ॥
जशी उपासना जयाची । तशी इच्छा पुरवी तयाची
आहुती ज्या देवांची । देती तयां ती पोंचवी ॥ ३४ ॥
अग्नी संग्रहही न करी । त्याला काष्ठादि मिळे तरी ।
जाळुनी त्याची राख करी । यापरी नरें वागावें॥३५॥
जो विभू परमात्मा जाण । तया आकार नसून ।
आकार ये दिसून । तो मिथ्या जाण अग्नीपरी ॥३६॥
मिळे त्यांत प्रवेशून । त्या त्या काष्ठा जाळून ।
स्वयें निराकार असून । तसा दिसून ये अग्नी ॥३७॥
जें थोर काष्ठ असे । तया झळकूनी थोर दिसे ।
लहानाच्या योगें लहान दिसे । लांब चवडा[1] वाटोळा
विमता[2]: सकला जीवा धौव्यादाकारवर्जिताः ।
यत्तारतम्यं तेषां तु तत्काष्ठाश्रितवन्हिवत् ॥ ३९ ॥
अग्नी असे निराकार । काष्ठ मिळतां तदाकार ।
दिसे तसा हा साकार । नाना शरीरयोगें आत्मा ४०
अनन्यशरण जो नर । तो ज्ञानबळें सत्वर ।
टाकी उपाधी नश्वर । होई निराकार परब्रह्म ॥ ४१ ॥

१ रुंद. २ वादग्रस्त.

कर्म देहाचें मूळ। तें ज्ञानें जाळी समूळ।
मग निरुपाधिक केवळ। होयी विमळ परब्रह्म॥ ४२ ॥
अग्नी वाढूनी काष्ठाबरोबर। दावी काष्ठासारिखा आकार।
राख करूनी सत्वर। आकार टाकी तसा आत्मा ४३
जो बहुधा बहुरूप। रूपं रूपं प्रतिरूप।
हा वेदाचा आलाप। तेव्हां रूपरहित आत्मा ॥ ४४ ॥
हें निस्संदेह कळावें म्हणून। अग्नीस गुरु करून।
देहाभिमान सोडून। राहे पडून ये स्थळीं ॥ ४५ ॥
क्षणभग्नत्व देहाचें। जाणतां वैराग्य बाणे साचें।
हेंही जाणाया अग्नीचे। ज्वाळेचें शिष्यत्व कीजे॥४६॥
बरवा विचार करून। पाहतां क्षणोक्षण।
देहसंबंधीं भूतें उपजोन। जाती मरोन प्रत्यहीं ॥४७॥
ज्वाळा दरवेळीं जशा। उपजूनी पावती नाशा।
देहसंबंधीं भूतांची ती दशा। सूक्ष्मदशा कळे ही ४८
हें मान्य करी जो नर। तो देहा क्षणभंगुर।
मानूनी वैराग्य सादर। भवसागर उलंडी ॥ ४९ ॥
हें उदारत्व थोर। सोडावें देहाचें ममत्व सत्वर।
हा बोध घेतला सादर। पांचव्या गुरूपासून ॥ ५० ॥
जे बहु विकार। भासती तें शरीरावर।
न घडे न वाढे आत्मा पर। हे निशाकर गुरू सांगे ॥
पहा रवी हा तेजोमंडळ। ग्रह नक्षत्रें उदकमंडळ।
तेव्हां चंद्र जळमंडळ। हे निर्मळ[1] जाणावें ॥ ५२ ॥

---

१ स्वच्छ.

जेव्हां संयोग सूर्यचंद्रांचा। एक नक्षत्रयोगें साचा।
तेव्हां चंद्रकलांचा। नाश होय ती अमावास्या ॥५३॥
चंद्र भचक्रीं साठ कलांनीं। जाय नक्षत्र भोगूनी।
सव्वादों दिवसांनीं। तेरा दिनांनीं रवी जातो ॥५४॥
[1]ग्लौर्जवात्[2] पुरतो[3] याति रवेः स्वस्थान्वहं[4] गतिः
मध्या गोक्षाः[5] कला इंदोरभ्रगोश्वमिताः[6] कलाः ॥५५॥
त्यांची इतुकी गती म्हणून। प्रतिपदेपासून।
विषम सूर्यमंडळ होऊन। प्रतिबिंबून दिसतसे ॥५६॥
जो प्रतिदिनीं पंध्रावा भाग। चंद्रमंडळीं भासे चांग।
ती कला होय मग। अशा पंध्रा बिंबती ॥ ५७ ॥
कला शुक्लपक्षीं चढती। कृष्णपक्षीं कमी होती।
तेरा नक्षत्रें अंतरती। समोर होती तेव्हां दोघे ॥५८॥
ती विश्रुत पूर्णिमा जाण। संपूर्ण मंडळ बिंबून।
चंद्र दिसे वाटोळा होऊन। भूछाया चिन्हसहित॥५९॥
प्रथम अमावास्येची। सूक्ष्म कला चंद्राची।
शुक्लपक्षीं बेरीज पंध्रांची। मिळोनी सोळांची संख्या
हा सुधींचा[7] उपचार। सोळा कळा चंद्रावर।
अशा दिसती तदनंतर। प्रतिपदेपासून वैषम्य ॥६१॥
उफराटे मंडळा। येतां कमी होती कळा।
अशा चंद्रमंडळा। कळा घटती वाढती ॥ ६२ ॥
कारणांतें न जाणून। केवळ कार्या पाहून।
जे जन जाती भुलून। ते कुतर्क करून फसती॥ ६३ ॥

१ चंद्र. २ वेगानें. ३ सूर्याचे पुढें. ४ अन्वहं=दररोज. ५ लंकेंतील सूर्याची ५९ गती. ६ चंद्राच्या ७९० कळा. ७ सुधी=पंडित.

जेवीं येतां जातां कळा । विकार नसे चंद्रमंडळा ।
जरी दिसला डोळा । तरी तो व्यर्थ भास होय॥६४॥
आत्मा न होयी न वाढे न मरे । हे विकार सारे ।
भूपा जाण देहावर रे । चंद्रमंडळीं कळा जशा ॥६५॥
समस्त देह असे जरी । तरी कां वागती व्यवहारी ।
असें म्हणसील तरी । अवधारीं सांगतों ॥ ६६ ॥
चंद्र द्वितीय मंडळापरी । भासतां आकाशांतरीं ।
सूर्यसत्तेनें त्याचे परी । निवारी अंधकारातें ॥ ६७ ॥
स्वयें चंद्रमंडळ जळ । म्हणोनी भासे शीतळ ।
यापरी आत्मसत्तेनें केवळ । देह सकळ चेतनसे॥६८॥
जळ चंद्रमंडळीं जसें । देहीं अंतःकरण तसें ।
त्यांत आत्मा बिंबितसे। तेणें भासे विषयजात ॥६९॥
हा साक्षिभूत आत्मा न नासे । हें चंद्रापासून असें ।
ज्ञान घेतलें असे । सातवा परिसें गुरू आतां ॥ ७० ॥
हा फिरे देह जसा । आत्माही फिरतो तसा ।
मग अचल आत्मा कसा । प्रश्न असा तरी ऐक॥७१॥
आत्मा संपूर्ण देहगत । असा झाला प्रतीत ।
तरी तो भेदशून्य स्वतः । आकाशापरी कथिला ७२
व्यंक्तीभूत[1] देहाद्युपाधी[2] । तद्वत आम्ही ही बुद्धी[3] ।
जाणावी कुबुद्धी[4] । सूर्यप्रतिबिंबन्यायानें[5] ॥ ७३ ॥

१ देहादि व्यक्ति. २ उपाधि. ३ त्यामध्यें आत्मा भासतो ही बुद्धि. ४ ही कुबुद्धि आहे. ५ सूर्यप्रतिबिंब जळामध्यें दिसतें तसा आत्मा देहामध्यें दिसतो.

हें मतिंत भरावें म्हणून । सांगतों उदाहरण ।
घटीं जळ भरून । सूर्यमंडळाखालून फिरवावें॥ ७४ ॥
पात्रच फिरतां प्रतिबिंब फिरे । पात्र हालतां हाले बरें ।
असें पाहती सारे । परी तें खरें काय असे ॥ ७५ ॥
जे जे विकार जळावर । ते ते प्रतिबिंबावर ।
भासती ते सूर्यावर । नसती हें सादर आण मनीं ७६
जे जे नाना विकार । ते ते उपाधीवर ।
ते नसती आत्म्यावर । ते (तो) साक्षी पर उपाधीहूनी॥
हें निःशंक जाणून । भ्रम द्यावा सोडून ।
आणिक एक सूर्यापासून । शिक्षण घेतलें तें ऐक॥७८॥
चराचर जगांत । जें दिसेल उपयुक्त ।
तें ठेवावें सुरक्षित । आपण आसक्त न होतां ॥ ७९ ॥
पुढें यथा योग्य काळ । पाहूनी मग तें सकळ ।
पात्रीं सोडावें केवळ । परोपकारमतीनें ॥ ८० ॥
समस्त संपलें तरी । खेद न धरावा अंतरीं ।
पुढें तसें काळांतरीं । मिळतां अंतरीं न हर्षावें ॥८१॥
राग द्वेष सोडून । अनायासें अर्थ जोडून ।
यथाकाळीं पात्रीं सोडून । अलिप्त होऊन रहावें॥८२॥
गुणदोषबुद्धी नसून । हा व्यवहार करून ।
आतां नये बंधन । हें सूर्यापासून शिकलों ॥ ८३ ॥
सूर्य भविष्य जाणून । जळ ठेवी करीं सांठवून ।
तें यथाकाळीं दे सोडून । परी अभिमान न करी ८४

अभयंकर हें ज्ञान। घेतलें सूर्यापासून।
आतां आठव्या गुरूपासून। घेतलें ज्ञान तें ऐक॥८५॥
जरी सतत स्त्रीपुत्रांशीं। ठेवीं अति स्नेहासी।
किंवा करी अतिप्रसंगासी[1]। त्यासी कपोतापरी बंध ये
जे मोहयुक्त होती। तयां कपोतापरी ये गती।
एका वनीं कपोत कपोती। करिती निवास ॥ ८७ ॥
कधीं विरहित न होती। अन्योन्य स्नेहें बद्ध होती।
असे ते दंपती। बांधती मती परस्पर ॥ ८८ ॥
त्या वनामध्यें बरोबर। करिती दोघे संचार।
जातां येतां अंतर। परस्पर ठेविती ॥ ८९ ॥
ते विशेषेंकरून। घरट्यामध्यें बसून।
परस्परांचें वदन। परस्पर विलोकिती ॥ ९० ॥
हर्षून ते चुंबन। घेती मोहित होऊन।
मंजुळ शब्द करून। पक्ष उभारून आलिंगिती॥९१॥
पुढें मृत्यु येईल। अकस्मात देह पडेल।
असें नेणतां हे ख्याल। करिती निष्फल विषयार्थ९२
जो मृत्युंजय ईशान। त्याचें न करिती स्मरण।
असे भोग भोगून। हर्ष मानून रमती ॥ ९३ ॥
दंपती असें खेळतां। काळ कितीक गेला आतां।
हें नेणती सर्वथा। वाटे आतां क्षण गेला ॥ ९४ ॥
मासत्वादि काळ। घिरट्या घालून केवळ।
आयुष्याला घाली पीळ। हें नेणती मूढ मत्त॥ ९५ ॥

---

१ ललनादिकांची आसक्ति.

असे संसारी कवड्याचें। मन रमलें स्त्रियेचें।
सहास[1] वीक्षणालाप त्यांचे। चित्ता रमविती ॥ ९६ ॥
मग भूक तहान नाठवून। तो तिचें राखी मन।
तीही संभोगालिंगन देवून। ठेवी बांधून चित्त त्याचें
मग त्याच्या संगेंकरून। कपोती गर्भिणी होवून।
अंडें प्रसवे तें पाहून। तिची जतन करी तो ॥ ९८ ॥
तो अमृतप्राय ग्रास। कष्टें आणूनी दे तीस।
ती उबेनें त्या अंडांस। रात्रंदिवस रक्षितसे ॥ ९९ ॥
अंडांत जळ असून। स्वभावकर्मादि शक्तींकरून।
तीं अंडीं फुटून। पोरें व्यक्त दिसूं आलीं ॥ १०० ॥
त्यांचें मन हृष्ट होवून। पोरांचें करिती पालन।
त्यांला आच्छादून। मुखीं कवल आणून सोडिती १०१
यो नाश्नुते निजानंदं स्वाधीनं सुलभं परं।
स्त्रीपुत्रादिभवं सौख्यं भुक्त्वापि स न तुष्यति॥१०२॥
मग ते पोरां आलिंगन। घेती देती आलिंगन।
आपणा घडल्याही उपोषण। त्यांला कण देती ते ॥
पोरहि थोर जाहले। त्यांचे आहार वाढले।
म्हणूनी दोघेही वनीं चालले। पोर आले घराबाहेर॥
त्यावर जाळीं घालून। भोयी घेई धरून।
तंव माता येऊन त्यां पाहून। ती मोहें बंधनगत झाली॥
हिरणमय स्वगृह शून्य पाहून। विरहें विधुर होवून राहे कोण।
असें तो कवडा मानून। स्वयें बंधनगत झाला॥१०६॥

१ हास्ययुक्त.

विषयें जे शांत न होऊन। घरीं राहती परिवारीं रमून
कवड्यापरी सहसा काळ येवून। परिवारासह मारून
ने तयां ॥ १०७ ॥

असे नसे मोकळें मुक्तिद्वार। तें हें दुर्लभ नरशरीर।
सुटतां ये पुनः दुःख घोर। हें कवडा गुरू करूनी
जाणिलें ॥ १०८ ॥

इति श्रीदत्तमाहात्म्ये अष्टचत्वारिंशोऽध्यायः ॥ ४८ ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

# अध्याय एकुणपन्नासावा

श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

जो कृपासागर । तो श्रीदत्त मुनीश्वर ।
म्हणे राजा ऐक सादर । नवव्या गुरूचा उपदेश ॥१॥
स्त्रीपुत्रेच्छा धरून । विषयीं राहे रमून ।
तया अकस्मात ये पतन । म्हणून सोडून द्यावें घर २
कल्याण किंवा अकल्याण । तें आपोआप ये घडून ।
त्याला कर्म कारण । मग वांयां भ्रमण कां करावें॥३॥
सर्वांस प्रारब्ध कारण । तेणें अवश्य सुख मिळे जाण
जसें उद्योगाविण । दुःख येऊन भिडतें ॥ ४ ॥
हें सत्य मानून । व्यर्थ उद्योग करून ।
सुखार्थ आयुष्य न खर्चून[1] । राहावें पडून आरापरी[2] ५
रहस्यार्थ हाच जाण । स्वर्गीं नरकींही असतां जाण ।
इंद्रियसुख ये मिळून । प्रारब्धाधीन तें असे ॥ ६ ॥
यद्यपि कुत्रा झाला । कुत्री मिळे भोगाला ।
दैवयोगें स्वर्गीं गेला । इंद्राणी त्याला मिळेल ती॥७॥
इंद्रहि इंद्राणीशीं रमून । सुख घे मैथुन करून ।
कुत्राही कुत्रीपाशीं जावून । घेई रमून तेंच सुख॥८॥
परतंत्र इंद्रियसुख । सर्वांसी समान देख ।
आदि अंतीं सर्वत्र दुःख । मध्यें हा सुखभासमात्र ९

---

१ अनुभवीत नाहीं. २ अजगर.

हें तों मुख्य सुख नसे । तथापि जीव जेथें वसे ।
तेथें दैवें तेंही मिळतसे । कळे असें आरापासून॥१०॥
मनीं खंती न धरून । आर राहे पडून ।
तसें रहावें उदासीन । नित्य धरून अजगरवृत्ती ११
संतत पडूनी आर । विश्वास ठेवी दैवावर ।
जो जेव्हां जसा आहार । संतोषें तसा तो खातसे ॥
स्वल्पत्व महत्व न पाहून । मिळेल तें घे खावून ।
कधीं ये मिष्ट मिळून । कधीं विरस तरी न टाकी १३
तें सम्पूर्ण खाऊन । तेथेंच राहे पडून ।
न मिळतांही तेथें अन्न । धैर्य धरून पडून जागे॥१४॥
विशेष धैर्य नरें धरून। आरापरी रहावें पडून ।
थोडें अधिक गोड अन्न । मिळे तें जेवून तोषावें १५
तें अन्न तसेंही न मिळतां । धीरपणा दैवावरता ।
धरूनी पडावें न निजतां । स्वरूपीं दृष्टी लावुनी॥१६॥
अंगीं पाहिजे तसें बळ । असतांही रहावें निश्चळ ।
असा पडतां सकळ । दर्शनादि व्यापार लोपती॥१७॥
भाळीं वृत्ती जी लिहिली । आयुष्यरेखा जी काढिली
असें पडतां ती नष्ट झाली । न ऐकिली बोली ही ॥१८॥
हें जाणून मी येथ । पडलों अजगरवत ।
सदा आनंदभरित । सांगतों आतां दहावा गुरू॥१९॥
असा सतत पडतां । भोग मिळतां अथवा न मिळतां
न कीजे हर्षविषादता । समुद्र गुरू करितां हें कळे॥२०॥

तो नित्य पूर्ण असून। वर्षाकाळीं नद्या येऊन।
मिळतां न जाय फुटून। हर्षें वेळा सोडून बाहेर॥२१॥
विविध नद्या त्या ग्रीष्मीं वाळती। समुद्रा न मिळती
तरी दुःखें न वाळे सरित्पती। ती रीती घ्यावी॥२२॥
स्वधर्माधीन राहावें। भोग मिळतां हृष्ट न व्हावें।
न मिळतांही दीन न व्हावें। असावें एकरूप ॥ २३ ॥
जरी यत्न केला तरी। ठाव न लागे समुद्रीं।
रत्नें किती अंतरीं। हा लांब रुंद किती असे ॥ २४ ॥
हेंची दृढ निश्चय करून। जसें नये कळून।
तसें योग्यानें होवून। अनुदिन स्वस्थ असावें ॥ २५ ॥
विशिष्ट किंवा हा निकृष्ट नर। असा लोकीं करितां विचार।
न लावूं द्यावा अंतपार। दुरत्यय[1] असावें ॥ २४ ॥
गुण येथें किती असती। न करूं द्यावी ही गणती।
निर्विकारपणें स्थिती। धरूनी राहावें निश्चळ ॥ २७ ॥
सदा पूर्ण समुद्रापरी। प्रसन्नता दावावी बाहेरी।
हें समुद्रापासुनी स्वीकारीं। अवधारीं आतां अष्टावा गुरू ॥ २८ ॥
जो विषय पांच पंचेंद्रियांनीं। सेवी तो जाय मरूनी।
हे पांच गुरू करूनी। शिक्षण घेवूनी विषय सोडी २९
स्वपन्नेव न जानाति सतोऽपि विषयान्यथा।
तथैव जागरूकश्चेत्को न मुच्येत बंधनात् ॥ ३० ॥

---

१ दुःखाचें अतिक्रमण करून जावें.

जो न करी इंद्रियें स्वाधीन। स्त्रियांचे विलास लावण्य।
पाहून
जाई मोहित होवून। पतंगासमान मरे तो ॥ ३१ ॥
जो हर्षे पाहतां रूप। तो पतंग देखोनी दीप।
त्यावरी घाली झेंप। मग आपोआप जळे तेथें॥ ३२ ॥
जो जाय नर भुलुनी। पाहतां नवी रमणी।
फडीं विलासिनी तरुणी। तो व्यर्थ मरून जाईल॥३३॥
वस्त्रें मणी सुवर्ण भूषण। टिळे टिके भांग सोडून।
पाहतां काय ये दिसून। प्रेतासमान जें असे ॥ ३४ ॥
ती असूनी अमंगळा। हाडामांसांचा एक बोळा।
तेथें कां भूल घे डोळा। घ्यावया सुखकळा म्हणाल
जरी ॥ ३५ ॥
अनार्य हे त्याहुनी। मंडुकाचें पोट फाडूनी।
कां रमाना सुख इच्छूनी। समान दोनी असती हो॥
व्रणप्राय जें स्थळ। किड्यांचें घर केवळ।
तेथें वाटे सुख विपुळ। तरी किड्यांचें कुळ सोडूं नका॥
इश्श जाऊं द्या तो भाग। हर हर शिरशिरतें अंग।
आतां बारावा गुरू भृंग। दे ज्ञानयोग द्विविध तो ३८
राजा परिसे मधुकृत। दोन असती प्रख्यात्।
मधु कृंतति पुष्पादाच्छिद्य गृह्णातीति मधुकृत्। तो
मधुकृत् भ्रमर रे ॥ ३९ ॥
हा सत्य दुसरा मधुकृत्। मधुमक्षिका नांवें ख्यात।
आह (हा)रत्वेन स्वरूपेण च मधु करोतीति मधुकृत्।
यांपासून शिकलों तें ऐक ॥ ४० ॥

शास्त्र व्यूह नानाप्रकार। ते न मिळती पढतां जन्मभर
त्याचें घ्यावें सार। हें भ्रमर ज्ञान देई ॥ ४१ ॥
हें रहस्य दुसरें ऐक। रस मिळेल अधिक।
म्हणोनी कमळ धरितां एक। हो दुःख तें मावळतां॥
मंदिर एक धरी अबुध। जरी रस मिळती विविध।
तरी त्यांचा स्नेहें ये बंध। ध्यानछंद सुटोनी ॥ ४३ ॥
जें रश्मीश्वरापासून। घेतलें संग्रहाचें शिक्षण।
हें जाण त्याहून। विलक्षण जाण भूपा ॥ ४४ ॥
महान्सङ्ग्रह करून। न खाती न देती जे जन।
जिभेस कांटा लावून। धन सांठवून ठेविती जे ॥४५॥
तें समूळ नेती चोर चोरून। पूर्वी घेती त्याचा प्राण।
जरी ठेविती लपवून। तरी शोधून काढिती ॥ ४६ ॥
जेवी हर येक प्रकारेंकरून। अडचणींत जाऊन।
माशा उंच वृक्ष पाहून। यत्नें मधु झांकून ठेविती४७
तसें तेथें राखतां। कोणा न देतां स्वयें न खातां।
यत्नें त्यां जाळून सर्वथा। लोक नेती तें मधु ॥ ४८ ॥
तेव्हां जो सांठा करी। त्याचा उपयोग न करी।
तो त्या साठ्याबरोबरी। खरोखरी नाश पावेल॥४९॥
असा यदुराया हा उपदेश। सांगे गुरू द्वादश।
आतां तेराव्या गुरूचा उपदेश। सावकाश ऐक तूं५०
स्वसत्तेची किंवा पराची। नारी असो तिची।
प्रीति धरितां स्नेहाची। बेडी दृढ पडेल ॥ ५१ ॥

जरी रूपवती काष्ठमयी । नारी असो तिला पायीं
स्पर्श करतां बद्ध होई । गज देई साक्ष ही ॥ ५२ ॥
गजा पंचाननावांचून । आकळी असा नसे कोण ।
तया खड्यांत घालून । ठेवी हत्तीण काष्ठाची ॥ ५३ ॥
मग कसी बरें नारी । मांसमयी असे तरी ।
न बांधील हें अंतरीं । कोण धरी सांग बा ॥ ५४ ॥
आपुल्या हितासाठीं । नारी मोहगतीं लोटी ।
तिचें प्रेम जो पाठीं । ठेवी तो शेवटीं नरकीं जाय ५५
हत्तीण पाहून हत्ती । आलिंगावया धांवती ।
तेथें जे बलिष्ठ असती । ते हाणती निर्बळा ॥ ५६ ॥
नर तसे जे स्त्री पाहून । जाती जरी धांवून ।
त्वरें बलिष्ठ येवून । त्याला मारून टाकिती ॥ ५७ ॥
स्त्री अमंगळ प्रेतापरी । दृष्टीही तिजवरी ।
न करावी मग दूरी । आलिंगनाची वार्ता ती ॥ ५८ ॥
जगांत भुलले हे जन । जेथूनी होती उत्पन्न ।
तेथेंची राहती रमून । मग पशूसमान कां न म्हणावें ॥
जो मत्तेभा[1]चेपरी । पाहतांचि सुंदरी ।
धांव घे तिजवरी । तो नरकाभीतरीं लोळेल भूपा ६०
तोचि परम पावन । जो नर वयांत येवून ।
स्त्रियांसी न घे शिवून । शिवसमान जाण तो ॥ ६१ ॥
स्वर्वेश्यावलोकन करून । जसा न भुलला नारायण ।
तसें धैर्य धरून । राहे तो जाण परब्रह्म ॥ ६२ ॥

१ मत्त हत्ती.

स्त्रीतमिस्रा[1] दिसतां । विलासांधकार पसरतां ।
हर्ष वाटे कामीभूतां[2] । नानाचेष्टा करावया ॥ ६३ ॥
धीर योगी चतुर । स्त्रीतमिस्रा दिसतां सत्वर ।
बसती सिद्धासनावर । निरंतर जागती ॥ ६४ ॥
मी असा गजापासून । उपदेश घेतला जाण ।
चौदाव्या गुरूपासून । घेतलें शिक्षण सांगतों ॥ ६५ ॥
जरी वसे ध्यानयोगीं । किंवा गुंते तपालागीं ।
विद्याभ्यासालागीं । तरी पोटालागीं न शिणावें ॥६६॥
भूपा सौख्यकारक धन । भूक लागल्या जाण ।
हातीं झोळी घेवून । भिक्षाटण करावें ॥ ६७ ॥
गृही पुरुष फिरून । अनेक उद्योग करून ।
नानाठायीं फिरून । कष्ट करून जें संपादी ॥ ६८ ॥
जो पुरुष गृहस्थ । त्याला श्रम पडती बहुत ।
ग्रामी वनीं दुकानीं हिंडत । काष्ठ भाजी धान्य घ्याया॥
जे उषःकालापासून । इकडे तिकडे फिरून ।
धान्यादिक संपादून । स्वयंपाक करून ठेविती ॥ ७० ॥
दुःख सोसून पाक करिती । पोराबाळांलाही न देती ।
तंव भिक्षु घाला घालिती । मधुहा[3] जेवीं ॥ ७१ ॥
ज्या महत्तर कष्ट करून । नाना वनीं फिरून ।
मिळेल ते संपादून । माश्यां[4] सांठवून ठेविती मधु ७२

१ स्त्रीरूपी रात्र. २ कामिरूपीपिशाचाला. ३ मध हरण करणारा मनुष्य.
४ मधमाशा.

माश्या महत्तर कष्ट करिती। यत्नें मधु मिष्ट करिती।
स्वयें बिंदूमात्र न खाती। न देती पोरांलाही ॥ ७३ ॥
सुविस्मित मधुहा होऊन। यत्नें तेथें जावून।
त्यांच्या खाण्यापूर्वीं घाला घालून। तें घेवून जातसे॥
पार्थिवा पाहें हें उद्योगावांचून। अकस्मात ये मिळून।
हें शिक्षण घेवून। सुखें जेवून असावें ॥ ७५ ॥
हीच युक्ति बरी जाण। चूल चौका करी कोण।
धूमानें डोळे फोडून। हात भाजून कोण घेई ॥ ७६ ॥
आहारमात्र सिद्धान्न। भिक्षा मागून आणून।
अनायासें खावून। ध्यान करून जिरवावें ॥ ७७ ॥
खावूनि जो विशेष अन्न। ध्यानादिक न करून।
राहे बोकळून। त्याला पतन येईल खास ॥ ७८ ॥
बा ख्याल खुशाली करावया। ही वृत्ती नसे राया।
केवळ ध्यान करूनियां। जिरवितां उभयां ये श्रेय ७९
पंच महापापें गृहस्थाचीं। भिक्षा देतां तीं जाती त्याचीं
अतिथि फिरविती तयांची। हानी मोठी होईल॥८०॥
पक्षीमृगयुक्त जसें वन । तसें तें घर जाण।
जेथूनी अतिथी जाई फिरून। पुण्य घेवून गृहस्थाचें८१
घरांत वैश्वदेव न होतां। ब्रह्मचारी यती येतां।
यज्ञफळ ये त्यांला अन्न देतां। त्या फिरावितां चांद्रा-
यण प्रायश्चित्त ॥८२॥
भूपा मला शिक्षण। मिळालें चवदाव्या गुरूपासून।
आतां पंध्राव्यापासून। घेतलें शिक्षण तें ऐक ॥८३॥

त्वरें थेट सारखे धांवती । वायूपरी ज्यांची गती ।
जे मृग हातीं न लागती । ते बद्ध होती गीनशब्दें ॥
हें उदंड मोहन । जाई चित्ता वेधून ।
जें टाकी मृगां बांधून । एक क्षण न लागतांची ॥८५॥
वनीं भले गवयी जावून । वीणा सारंगी वाजवुन ।
नाना आलाप घेऊन । सुस्वर गावुन राहती ॥ ८६ ॥
अकस्मात तें ऐकून । त्या गीना लुब्ध होऊन ।
मृग सर्व विसरून । पडती येऊन त्यावरी सारे ॥८७॥
मृग तंत्रीवरी होतां लीन । मृगयु[1] त्यांचें करी बंधन
त्यापासून घेतलें शिक्षण । नाद सोडून द्यावया॥८८॥
गीतशब्द वाटे मधुर । ऐकतां कोमळ सुस्वर ।
तो वेधीतसे अंतर । हें दुस्तर बंधन जो ॥८९॥
ज्या नारी सुस्वर गाती । कोकिळेपरी आलाप घेती ।
ऐकतांच तें चित्तीं । लागे अति मोहकसें ॥ ९० ॥
नाना रंग दावून । तालकाल साधून ।
रागरागिणी उजळून । गाती तें तुम्न ऐकावें ॥९१॥
जेथें ॐकारपूर्वक । साम गाती भक्तिपूर्वक ।
किंवा गाती भाविक । ईश्वरगुणानुवाद ॥ ९२ ॥
तें आक्रंदन जाण । हो कां सुस्वर गायन ।
जें भगवद्गुणाविण । किंवा कोल्ह्याची ओरड ॥९३॥
जसा तो ऋष्यश्रृंगमुनी । जो झाला मृगीपासुनी ।
स्त्रियांचें नृत्यादिक पाहूनी । भुलूनी बद्ध जाहला ९४

१ पारधी.

तेव्हां स्मरणसुद्धां ग्राम्यगीताचें । न कीजे हें पंध्राव्या गुरूचें ।
सांगणें आतां सोळाव्याचें । मित साचें सांगतों ९५
सत्वर गती जया असे । जो जळीं धांवतसे ।
धरितां हाता न येतसे । तो बद्ध होतसे जिव्हेमुळें९६
नित्य कृतजळवास । जिव्हा नावरी त्यामुळें ग्वास । [1]
धरिती त्या मत्स्यास । सोडुनी बडिश मांसयुक्त ९७
नको तंववरी सुखाशा । जव न सुटली रसाशा ।
मासा अशा उपदेशा । देतसे रसाशा टाकावया ९८
मनीं स्मरतां रसाला । लाळ सुटे जिव्हेला ।
मग घेतां सुवासाला । त्या नराला कोण आवरी ९९
जे ही रसना नावरती । ते देशोदेशीं भडकती ।
गुरें घरें पोरें विकिती । रसनातृप्ति करावया ॥१००॥
पराक्रम थोर करिती । जे शत्रूंलाहि जिंकिती ।
तयांलाही नावरे ती । रसना बरी हुळ्ळकी[2] जी ॥१०१॥
जरी तो विचारशीळ । सभेंत जिंकी शास्त्रीमंडळ ।
तयालाही जिव्हा केवळ । निखळ दुर्जेय हो ॥ १०२ ॥
हा विस्मय वाटे आह्मां । चार आंगुळें जिव्हा तुह्मां ।
कां नावरे हें आह्मां । कारण सांगा विचारूनी ॥१०३॥
असा रसनेचा हा अभ्यास । चालिला बहुत दिवस ।
चालिला ह्मणतां तुम्हांस । सांगतों तसें आचरा१०४

---

१ गळ. २ लालूच ठेवणारी.

असें कृत्य आतां करा । थोडा थोडा रस कमी करा ।
प्राणवृत्ती परी आचरा । जिंकाल मग रसना ती १०५
तुम्ही तंववरी जितेंद्रिय न व्हाल । जंवर रसना न जिंकाल ।
रस जिंकितां सर्व जिंकाल । जितं सर्वं जिते रसे १०६
हेंची स्मरण ठेवून । अनुक्रमें रस जिंकून ।
सर्वत्र विजयी होऊन । येथें पडून राहिलों सुखें।।१०७।।
असें रसना आवरण्याचें । हें सोळाव्या गुरूचें ।
शिक्षण लाधलें साचें । रसाचें प्राबल्य निवारिजे १०८

इति श्रीदत्तमाहात्म्ये एकोनपंचाशत्तमोऽध्यायः।।४९।।

।। श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ।।

---

# अध्याय पन्नासावा

## श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः

म्हणे अवधूत यदूसी । सत्रावा गुरु केला पिंगलेसी ।
म्हणोनी झालों निराशी । असे ऐशी शिक्षा हे ॥ १ ॥
ज्या लग्न न करिती । प्रतिवारी पती वरिती ।
तयां वारस्त्रिया म्हणती । काळजें तीं लांडग्यांचीं ॥२॥
जयां नसे सोंवळेपणा । नेणती सतीच्या आचरणा ।
त्यांच्या मद्ययुक्त चुंबना । घेती त्यांना अधोगती ॥३॥
असो एव्हढाचि हा बोल । एक विदेहनगर विमळ ।
जेथें वसती पुण्यशील । तेथें पिंगळा वेश्या होती॥४॥
जीची सुवर्णापरी दीप्ती । नवयौवन चंद्रकांती ।
जिला पाहतां वस्त्रें गळती । नरांची मती भ्रष्ट होई ५
थट्टा परिहास कौटिल्य । ती जाणे चटक कापट्य ।
गीत वादित्र नाट्य । वारस्त्री ती जाणतसे ॥ ६ ॥
सर्वथा जेथें दुर्गण । कापट्याची पूर्ण खाण ।
असी ती वेश्या जाण । आशा दारुण जिला असे ७
धनराशी मिळावी म्हणून । जो ये त्यापाशीं मागे धन।
तो जें दे त्याहून । अधीक इच्छून फिरवी तया ॥ ८ ॥
हा तियेचा ल्हाव जाणून । कामी पुरुष तिचें सदन ।
मग देती सोडून । तरी ती नटून राहे द्वारीं ॥ ९ ॥

वेश्या असी बसे दारांत । पुनः जाई घरांत ।
दोल्याप्रमाणें[1] फिरत । निद्रा न ये तियेसी ॥ १० ॥
अकस्मात् दैवयोगेंकरून । वैराग्य तिला होऊन ।
म्हणे हाय मी हीन । दुराचरण इच्छीं हें ॥ ११ ॥
महान्विचार माझ्या चित्ता । झाला द्रव्यतृष्णा करितां।
विवेक तृप्ती ये आतां । मूर्खता जातां ती ॥ १२ ॥
जो विश्वाधार अंतर्यामी रमण । तो रती अर्थ देऊन ।
रमवी तया सोडून । भयशोकमोहदा कां इच्छी॥१३॥
मी अनित्य मर्त्या इच्छीं मला । धिक्कार असो ये वेळा।
हा देह विकून विमळा । आत्मारामा भजेन ॥ १४ ॥
मी त्या देवाशीं रमेन । असा निश्चय करून ।
सांकेतवृत्ती सोडून । निराश होऊन सुखें निजे ॥१५॥
आशा वसे ज्यापाशीं । सुखें निद्रा नये त्यासी ।
हें शिक्षण घेतलें वेश्येपाशीं ।
आतां अठराव्या गुरूचें ऐक ॥ १६ ॥
जंववरी निराश न झाला । तंववरी सुख नये त्याला ।
तसाही होतां परिग्रहाला[2] । सोडी त्या स्वस्थता ये १७
म्यां हे युक्ती घेतली कुररापाशीं । एकदां कुरर[3] मांसासी।
विभागूनी खाती त्या वेळेसी । मांससंग्रह करी एक॥
जें ज्यांना वाटलें । तें त्यांणीं भक्षिलें ।
ज्यानें शिल्लक राखिलें । त्याला टोंचूं लागले सर्व ते॥

१ पाळणा. २ संग्रह. ३ टिटवी.

सर्वांनि आम्हीं संपविलें । त्वां विशेष घेऊन हें ठेविलें।
असें ऐकतां तें त्याणें सोडिलें। त्यांहीं सोडिलें तया मग
म्यां हें विलोकन करून। नृपा घेतलें हें शिक्षण।
परिग्रह दुःखाला कारण। टिटांवूपासून कळलें॥ २१ ॥
जो विद्वान् परिग्रहरहित। मिळे तें खाई अग्निवत्।
तो जरी धनरहित। तरी तो सतत सुखी होई ॥२२॥
मांसयुक्त होतां जंव कुरर। त्याला तंव मिळाला मार।
मांस टाकून होता दूर। दुःखही त्याबरोबर दुरावलें॥
जरी योगी परिग्रह करी। त्याचें चित्त जाई तयावरी।
त्याचें चित्त नये अंतरीं। म्हणूनी परिग्रह नसावा २४
स्वसाध्य साधावें म्हणून। कुररांचें घेतलें शिक्षण।
मानापमानचिंता सोडून। द्यावया बाळ गुरु झाला॥
जो भस्म किंवा चिखल। नेणे सुगंधी परिमळ।
सत्कार तिरस्कार सकळ। नेणे बाळ निजानंदें॥२६॥
हा रज्जु किंवा सर्प। नेणे तो न करी अनुताप।
जो नेणे पुण्य पाप। न घे लेप आपणावरी ॥ २७॥
हो बहु सर्वगायी। अथवा होवो महागायी।
त्याची चिंता न घेई। न होई जो कदापि खिन्न॥२८॥
ह्या घरांत काय न्यून। कसें करावें संपादन।
आतां होईल कीं अपमान। हेंही घरीं राहून न चिंती॥
मरण आतां हें येईल। किंवा आपत्ती होईल।
किंवा अपकीर्ती होईल। हेंही बाल न चिंती ॥ ३० ॥

---

१ टिटवी.

धन मेळवावें कसें । तें रक्षावें कसें ।
परिवारा पाळावें कसें । बाळ असें कधींही न चिंती ।
जो मनोरथ न करी । आपण आपुल्यासीं क्रीडा करी
आपणावरी प्रीती करी । यापरी बाळ सुखी ॥ ३२ ॥
ज्याची भूक तहान भागतां । खेळे असो का एकुलता
ह्या बाळा गुरू करितां । अंतर्निष्ठता सहज ये ॥३३॥
हा मायिक संसार । कोण कोणाचा परिवार ।
कोणाचें कोठें घर । चिंतेचा बाजार हा सर्वही ॥३४॥
तें मिष्टान्न कसें मिळेल । ह्या लोकांशीं स्नेह कसा जुळेल ।
दुःख कसें टळेल । सवंगाई होईल कधीं आतां ॥३५॥
ह्या चिंतेनें निरंतर । व्याप्त असती जे नर ।
न व्हावा तिरस्कार । व्हावा सत्कार म्हणती जे ॥३६॥
त्यांची न होई अंतर्वृत्ती । जरी ते श्रवण करिती ।
तरी आंत नये वृत्ती । म्हणोनी बाळरीती घेतों ॥३७॥
तो कामचार[1] तें वय । मननीं उपयोग काय ।
म्हणूनी रागद्वेषादिराहित्य । घेतलें एकुणिसाव्या गुरूपासून ॥ ३८ ॥
असा उक्त बालवत । व्हावया आनंदभरित ।
अभ्यास कीजे पाहूनी एकांत । हें कुमारीकंकणाशिक्षित सांगेन ॥ ३९ ॥

---

१ पाहिजे तिकडे पाहिजे त्याकडे जाणें.

विविक्तिं हित होईल। हें ह्याच शिक्षणें कळेल।
एक कन्या सुशील। विवाहयोग्य जाहली होती॥४०॥
आले विद्वान ब्राह्मण। तिला वरावी म्हणून।
तत्पूर्वी निघून। तिचें स्वजन गांवीं गेले ॥ ४१ ॥
घरीं धेनू होती म्हणून। गेले घरीं तिला ठेवून।
तिणें त्यांला देखून। आसन देऊन सत्कार केला ४२
त्यांच्या मध्यान्हाकारितां। तिणें साळी कांडतां।
कांकणें खळखळतां। तिच्या चित्ता वाईट वाटे॥४३॥
हें ये पूर्वजांस कीं दूषण। म्हणून दोन दोन कंकणें राखून।
कांडी तींही आपटून। खणखण होती ॥ ४४ ॥
संपूर्ण काढितां ये दोष। म्हणोन एक एक राखून शेष
त्यांचा न झाला घोष। तिला संतोष झाला मग ४५
तेंच मज मिळालें शिक्षण। बहुत जमतां होई भांडण
दोहोंचेंही होई भाषण। एक असतां ध्यान घडे॥४६॥
प्रमादः खलु संगेन। असा निश्चय करून।
राहिलों एकला पडून[1]। तेणें समाधान विसावा ये ४७
जरी पूर्णानंदभरित। राहावें म्हणेल सतत।
तरी त्याणें एक नियमित। स्थान कदापी न धरावें ४८
संपूर्ण लोक जाणती। असी करितां वसती।
लोक उपद्रव देती। सर्पापासूनी ती शिक्षा घेई॥४९॥

१ एकांती.

सर्प मिळोनी न फिरती। शब्द न करितां सावधान जाती।
गुहेमध्यें वास करिती। नित्य न राहती एके ठाईं ५०
विशदपणें न फिरे सर्प। निर्धोकानें न घे झोंप।
निष्कारण आपोआप। न करी कोप कोणावरी॥५१॥
हे सम्पूर्ण गुण घ्यावे। सर्पापरी वागावें।
सिद्धस्थान लक्षावें। आइत्या घरांत नागोबा जसा॥
कां पर्णाचेंही घर। करी त्या दुःख ये घोर।
हें नश्वर शरीर। नकळे पूर्वींच पडेल कीं ॥ ५३ ॥
सरित्पूर[1] जसा पळे। तसें आयुष्यही पळे।
तें माघारां न वळे। नकळे केव्हां संपेल तें ॥ ५४ ॥
संपूर्ण आयुष्य ज्यासी। कर्म एकत्र न ठेवी तयासी
म्हणोन न बांधावें घरासी। सर्पापाशीं शिकलों हें ५५
ध्यानीं मुख्य आसन श्वासजय। होतां न कळे बाह्य।
शरकार गुरु दे हें ऐकाग्र्य। बाविसावा हा गुरु॥५६॥
बाणदत्तचित्त शरकार। पुढयांतून राजा सपरिवार।
चाले सवें गजर। होई तरी नेणें तो ॥५७॥
अवाच्य बोले कोणी। हो कां जवळ मोठा ध्वनी।
राहे जो एकाग्र होवूनी। त्याचे मनीं हें न भरे॥५८॥
योगी तेवीं आसनश्वास जिंकून। वैराग्याभ्यासें लक्ष्य धरून।
राहे तरी द्वैतभान। सोडून होई समाधिस्थ ॥ ५९ ॥

१ नदीचा पूर.

जर पूर्वीं आसन श्वासजय। न करी तरी ये अंतराय।
होतांच श्वासजय। मनोजय होतसे ॥ ६० ॥
संपूर्णपणें अंतरीं। चित्त न ठरे जरी।
तरी सगुण ईश्वररूप अंतरीं। धरितां चित्त रमेल ६१
रहस्य हेंची योगाचें। अभ्यासें बंधन होय मनाचें।
मग लक्ष्यावरी त्याचें। स्थैर्य होतसे ॥ ६२ ॥
तें अपूर्व देखावा दिसतां। विषया न स्मरतां।
झोंपेंतही न जातां। स्वरूपींच लीन होई ॥ ६३ ॥
संपूर्णपणें सत्वगुण। वाढतां रजस्तमगुण।
लीन होई मन। काष्ठ जळतां अग्नी जसा ॥ ६४ ॥
असें मानस लीन होतां। नेणवे बाह्याभ्यंतरता।
शरकार गुरू करितां। हें तत्वता कळलें ॥ ६५ ॥
जो सदा ज्याचें करी ध्यान। तो जाई तदाकार होऊन
हें पेशस्कारापासून[1]। म्यां शिक्षण घेतलें ॥ ६६ ॥
जेव्हां यत्नें कीटा आणून। भिंतीवरी घरांत ठेवून।
पेशस्कार पुनः पुनः येवून। कूंस[2] मारी त्यावरी ॥६७॥
तेव्हां पूर्व रूप विसरून। भयानें पेशस्कार चिंतून।
कीटरूप टाकून। पेशस्कार होऊन राहे कीट ॥ ६८ ॥
जो वर्ण आश्रम जाती। सोडूनी सर्वदा चित्तीं।
चिंती ईश्वराची मूर्ती। त्याला गती तीच ये ॥ ६९ ॥
स्वयमेव ब्रह्म असून। ब्रह्माचेंच करितां चिंतन।
जीव जाई ब्रह्म होऊन। हें आश्चर्य कोण मानील॥७०॥

---

१ कुंभारीण मांशी. २ नांगी.

ह्या जीवा कीटापरी । स्नेहें द्वेषें भयें जरी ।
ईश्वराचें ध्यान घडे तरी । ईश्वरापरी होईल तो ॥७१॥
जो जीव स्नेहें करून । करी ईश्वराचें चिंतन ।
तो ऐहिक सुख भोगून । घे निर्वाण परत्र ॥ ७२ ॥
ऐक शिष्या जो ईश्वरा । भयें द्वेषें भजे त्याही नरा ।
परत्र मोक्ष मिळे बरा । हा तेविसाव्या गुरूचा
उपदेश ॥७३॥
म्यां शिष्य होऊन कोळियाचा । उपदेश घेतला
अद्वैताचा ।
हा चोविसाव्या गुरूचा । ऐक साचा उपदेश ॥ ७४ ॥
भूप तेहें नोहे चित्र । कोळी नाभीपासून काढी सूत्र ।
त्याचें घर करोनी अहोरात्र । करी विचित्र क्रीडा तेथें
मग अन्तीं तें सूत्र खावून । राही एकला होवून ।
असा ईश्वर जाण । सृष्टिसंरक्षण करीतसे ॥ ७६ ॥
पूर्वी तो ईश्वर एक असून । कांहीं सामग्री नसून ।
ईक्षणलेशेंकरून । स्वयें उत्पन्न करी लोकां ॥ ७७ ॥
तोचि देव विश्वाधार । येथें करी विहार ।
मग त्याचा करी संहार । काळशक्तीनें आपुल्या ठाईं
तेधवा सत्वरजस्तमःशक्ती । प्रधान पुरुषासह लीन
होती ।
उपाधी नष्ट होती । मग होतो एकला ॥ ७९ ॥
पूर्वी अखिल ब्रह्मादि जीव । त्याचे ठाईं जे घेती ठाव।
त्यांचा पुनः करावा उद्भव । असें तो देव इच्छी मग॥

जे जिवंतपणीं नर मुक्त न होती । मेल्यावरी कर्म
भोगिती ।
ते प्रळयींही न मिळती । ईश्वरस्वरूपीं सर्वथा ॥ ८१ ॥
त्या हेतुभूत वासना त्यांच्या । फळोन्मुख होतां
ईश्वराच्या ।
चित्तीं येई आतां त्यांचा । उद्भव करावा असें भूपा ८२
त्या मनोरथेंकरून । गुणात्मक माया प्रगटून ।
अनुक्रमेंकरून । पुनः उत्पन्न करी तो विश्व ॥ ८३ ॥
हा प्रयत्न त्याला न पडे । संकल्पमात्रें सर्व घडे ।
क्रीडा करूनी तो पुनः पुढें । पूर्ववत संहारी ॥ ८४ ॥
तेव्हां तो आत्मा आहे एक । दिसतें हें सर्व मायिक ।
सर्वही नामरूपात्मक । असा विवेक केला म्यां ॥८५॥
हा जेवि कोळी एकला । इच्छीना सामग्रीला ।
तसा हा आत्मा मला । गमला अभिन्ननिमित्तोपादान
तो विष्णु व्यापक । मीच असें एक ।
असा घेतला विवेक । असे चोवीस गुरू करून म्यां ॥
हें निर्विशेष ब्रह्मज्ञान । न ठसे वैराग्यावांचून ।
त्यासाठीं देहास गुरू करून । घेतलें हें शिक्षण ऐक तूं
माझाच हा देह म्हणून । व्यर्थ करिती पालन ।
अंतीं ज्याला कोल्हे श्वान । जाती खावून तो कोणाचा
जो शुक्रशोणितापासून । मातेच्या विटाळांत झाला
उत्पन्न ।
त्याचें नित्य धारण । करितां क्षीण वाटला ॥ ९० ॥

या अमेध्य देहावांचून। वैराग्य कारण आणावें कोठून
येथें ज्याचे विटे मन। त्याला कोण बोध करी ॥९१॥
देह पृथिव्यादिभूतांचा गोळा। जो आपुल्यासह परिवाराला।
रक्षूनी मागे बीजाला। ठेवून मरे वृक्षापरी ॥ ९२ ॥
ह्या पृथिवीवरी वृक्षजाती। मागें बीज राखून मरती।
बीजाचे वृक्ष पुनः होती। तीच रीती देहाची ॥ ९३ ॥
नाना व्यासंग करून। त्रिविध कर्म करी उत्पन्न।
तेंच पुढें देह करी उत्पन्न। असें ज्ञान होई तंव ॥९४॥
मनस्सङ्कल्प उठती। इंद्रियें इकडे तिकडे ओढती।
जेवी एका पुरुषा सवतीं। ये ती गती देहास ॥ ९५ ॥
विक्षिप्तसा होई व्याकुळ। सर्व तापांचें हें मूळ।
असा हा देह अमंगळ। तरी दुर्भिळ असे हा॥ ९६ ॥
विविधाकार शरीरें। निर्मिलीं जरी ईश्वरें।
तरी शेवटीं हीं मनुष्यशरीरें। पाहतां नुरे ठाव हर्षा॥
याच मनुष्यशरीरें करून। मिळे असें हें मोक्षसाधन।
तें म्यां घेतलें साधून। म्हणून निःशंक पडे येथें॥९८॥
युक्तिभिः सततं भूप पूर्वोक्ताभिर्यया धिया।
स्वात्मरूपं विविच्येह ब्रह्मभूतोऽस्म्यसंशयः ॥ ९९ ॥
असें इतुकें हें ज्ञान। ऐकतां यदू झाला सावधान।
हाच आहे अत्रिनंदन। असें जाणून वंदन करी॥१००॥
म्हणे। दंभदर्पादि टाकून। म्यां घेतलें हें ज्ञान।
तुम्ही मला केलें पावन। आतां किमपि न इच्छीं मी॥

हेंची विश्वरूप तुमचें । मी अर्चन करीन याचें ।
आतां येथें द्वैत कैचें । वाक्य तुमचें ऐकतां ॥ १०२ ॥

विष्णु विधि हर । असें म्हणोनी करी नमस्कार ।
आज्ञा घेवूनी भूमीवर । ययातीकुमार स्वच्छंद फिरे॥

श्रीदत्तमाहात्म्ये पंचाशत्तमोध्यायः ॥ ५० ॥

श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

# अध्याय एकावनावा

श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः ॥

जें निर्विकल्प परब्रह्म । तेंच परंधाम ।
तें कळावया सगुणब्रह्म । कथिलें दीपकवेदधर्मसंवादें १
हा पांच हजार चारशें ग्रंथ । पन्नास अध्याय केले येथ
भक्ति ज्ञान वैराग्य येथ । स्पष्ट यथार्थ वर्णिले ॥ २ ॥
अनुक्रमेंकरून । ज्या अध्यायांत जें कथन ।
तें संक्षेपेंकरून । आतां निरुपण करुं येथें ॥ ३ ॥
स्वयमेव केलें मंगलाचरण । नवविध भक्तीचें वर्णन ।
सांगितलें क्रमेंकरून । सृष्टिक्रमण संक्षिप्त ॥ ४ ॥
दत्तात्रेयाचे मायबाप । यांचे गुणस्वरुप ।
गुरुशिष्यकथेचा संक्षेप । प्रथमाध्यायीं जाणावें ॥ ५ ॥
बहुधा केले दीपकें प्रश्न । वेदधर्मा हर्षून ।
पितृपुत्रसंवाद सांगून । कौशिकाख्यान कथन करी ६
शापूनि सूर्या ठेवी सती । अनसूयेसी देव स्तविती
अनसूया ये सतीप्रती । द्वितीयाध्यायीं ही कथा ॥७॥
सूर्योदय करविता । कौशिका मृत्यू येतां ।
अनसूया करी जिता । स्ताविती देवता अनसूयेसी ॥८॥
वसुधेश्वरें मांडव्या सोडिला । त्रिमूर्ति दत्त अवतरला
नानापरी करी लीला । तृतीयाध्यायीं हे कथा ॥ ९ ॥
व्हावा परमोत्कृष्ट सुत । म्हणून भानुसप्तमीव्रत ।
कथिलें अनंतव्रत । कार्तवीर्यार्जुन जन्मला ॥ १० ॥

गर्गें दंडनीती ऐकवून । दत्तमाहात्म्य सांगून ।
वळविलें अर्जुनाचें मन । हे कथा चवथ्यांत ॥ ११ ॥
भूपास सांगे गर्गमुनी । देव जिंकिले दैत्यांनीं ।
ते दत्तापाशीं येवूनी । सेवा करुनी राहिले ॥ १२ ॥
दैत्यां मूढ करुन । देवांहातीं मारवून ।
स्वर्गीं पाठविले देवगण । पंचमाध्यायीं हे कथा॥१३॥
समूळह होवूनी भक्तीरसें । दत्ता अर्जुन भेटतसे ।
दत्त बीभत्सरुप दावीतसे । न विटतसे अर्जुन ॥१४॥
दत्तें मनोरथ पुरवितां । अर्जुन बसे गादीवरता ।
त्याच्या राज्याची व्यवस्था । षष्ठाध्यायीं वर्णिली १५
स्वारस्य विषयांचें जावून । अर्जुन विरक्त होवून ।
दत्तापाशीं येवून । करी स्तवन नानापरी ॥ १६ ॥
त्या नृपांतःकरणा पारखून । दत्त दे आश्वासन ।
मग नृप करी प्रश्न । हें कथन सप्तमाध्यायीं ॥ १७ ॥
गुरुसुरेंद्रसंवाद । सात गाथेचा अनुवाद ।
शिल्पज्ञकथा विशद । जन्मांतर तयाचें ॥ १८ ॥
एक रेवातटस्थ ब्राह्मण । कामशास्त्रप्रवीण ।
तो अनुक्रमें घे निर्वाण । अष्टमाध्यायीं हे कथा ॥१९॥
गायत्रीजापकसुशीलास । पीडिती सात राक्षस ।
श्रीदत्त भेटोनी त्यांस । मंत्र देवूनी वालधी ॥ २० ॥
प्रामाणिक विष्णुदत्त । भूतें तया दाविला दत्त ।
दत्त तया मुक्त करीत । नवमाध्यायीं हे कथा ॥ २१ ॥

जो उपजल्यापासून। रोगें ग्रासिला ब्राह्मण।
कर्मविपाक सांगून। त्या दे जीवन विष्णुदत्त ॥ २२ ॥
फल दावूनी औषध पाजिलें। झोटिंगाचें बंधन केलें।
शास्त्रतत्त्व कथिलें। दहाव्या अध्यायांत ॥ २३ ॥
जीवा विविध भ्रमण। कर्मयोगेंकरून।
गर्भवासनिरूपण। अवस्था लक्षणयथार्थ ॥ २४ ॥
पुत्र चतुर ज्ञानी असून। जड होयी भिवून।
विष्णुदत्त त्या दे आश्वासन। अकरावे अध्यायीं हे कथा
सृष्टिक्रमकथन। व्याष्टिसमष्टिलक्षण।
विक्षेप आवरण। सदाचरण गुरुसेवा ॥ २६ ॥
त्या क्रमें श्रवण मनन। परोक्षापरोक्षज्ञान।
जीवस्वरूपकथन। हें वर्णन बाराव्या अध्यायांत ॥२७॥
वाक्यविवरण पूर्ण। षड्लिंगांचें कथन।
प्रत्येकाचें लक्षण। तत्त्वंपदार्थलक्षणही ॥ २८ ॥
तो विष्णु आत्मा तत्पदार्थ। जीव हा त्वं पदार्थ।
लक्षलें यांचें ऐक्य यथार्थ। तेराव्यांत असें हें ॥ २९ ॥
जें स्वर्गोपविष्ट देवांही। सुख ठावें होत नाहीं।
अष्टांगयोगें तेंही। मिळे निश्चित अभ्यासें ॥ ३० ॥
हें नृपा सांगे दत्त। यमनियमासन यथार्थ।
प्राणायामादिक समर्थ। चौदाव्यांत बोलिला ॥ ३१ ॥
सांगे अवधूत ज्ञान। सजातीय प्रत्ययलक्षण।
विजातीयनिरसन। निदिध्यासन यथार्थ ॥ ३२ ॥

दत्त दावी अभ्यासमार्ग । तसा राजा करी सांग ।
समाधिस्थ हो मग । पंध्राव्यांत हे कथा ॥ ३३ ॥
जो अभ्यस्तयोग । त्याचें दार्ढ्य करवी मग ।
दत्त म्हणे असंग । प्रारब्ध भोग अर्जुना ॥ ३४ ॥
आला अर्जुन स्वनगरीं । समुद्राचा गर्व हरी ।
यज्ञदानादिक करी । षोडशांतरीं हे कथा ॥ ३५ ॥
नृप तो यज्ञ करी । तेणें देव भीती अंतरीं ।
आतिथि होवून रवि ये द्वारीं । राख करी वृक्षांची॥३६॥
राजा धर्मिष्ठ असून । दैवें वसिष्ठ कोपून ।
शाप दे हें कथन । सत्राव्या अध्यायांत ॥ ३७ ॥
स्वधर्मानें मरण । दत्तापाशीं मागे अर्जुन ।
ऋचीकाचें आख्यान । विधिनें लग्न सत्यवतीचें ॥३८॥
वाखाणी भविष्य भृगुमुनी । शिव झाला जमदग्नी ।
विश्वामित्र राजा झाला मुनी । अठराव्यांत हे कथा॥
राम धाकुटा पुत्र जमदग्नीचा। अवतार विष्णूचा।
निरोप मानून पित्याचा। तोडी मातेचा गळा तो४०
त्या परशुरामें ख्याती केली । रेणुकेला वांचविली ।
पित्याची सेवा केली। एकुणिसाव्या अध्यायीं हें॥४१॥
देव यन्महत्व ठेविती । त्या देवांची केली स्तुती ।
मुनिगृहीं ये भूपती । आतिथ्य करी मुनि त्याचें॥४२॥
राजा विधिवशें भुलून । चाले धेनूस घेवून ।
त्यावरी धांवे भृगुनंदन । हें कथन विसाव्यांत॥ ४३ ॥

श्रीविष्णोः कलेयं असें मानून। युद्ध करी अर्जुन।
रामें परशु धरून। भुज तोडून टाकिले त्याचे॥ ४४ ॥
राम करी अर्जुनाचा नाश। पिता म्हणे दोषी त्यास।
राम जाई तीर्थाटणास। एकविसाव्या अध्यायीं हें४५
अधर्मातें स्वीकारून। जमदग्नीची मान।
तोडिती अर्जुनाचे नंदन। करी आक्रंदन रेणुका॥४६॥
ते क्षणिं राम वनांतून। येई दुःखी होवून।
करी शत्रूंचें हनन। हें निरूपण बाविसाव्यांत ॥४७॥
मग परशुराम मायबापांसी। घेवून भेटे दत्तासी।
रेणुका स्तवी दत्तासी। रेणुकेसी स्तवी दत्त ॥ ४८ ॥
आवश्यक करून। रेणुका सिद्ध होवून।
करी सहगमन। हें निरूपण तेविसाव्यांत ॥ ४९ ॥
तत्सुत राम करी क्रिया। पूजी दत्ताचार्या।
दत्त पुनः दावी तया। मायबापांसी ते क्षणीं ॥ ५० ॥
क्षत्रियहनन करून। राम कश्यपा दे भूदान।
राहे समुद्रतीरीं जाऊन। हें कथन चौविसाव्यांत ५१
पुत्र तोचि सांगे पित्यासी। गालवें अश्व देवूनी
ऋतध्वजासी।
नेला यज्ञरक्षणासी। पातालकेतूसी तों वेधी ॥ ५२ ॥
तो तीव्रबाणासह गेला पाताळीं। राजा मार्गे चाले
त्या वेळीं।
तया मदालसा भेटली। पंचविसाव्यांत हे कथा॥५३॥

ती सुता गंधर्वाची । सखीकरवीं गुरूची ।
भेटी करवूनि भूपाची । भार्या साची जाहली ॥५४॥
दैत्या निर्दाळूनि भूप ये पुरासी । कपटी फसवी
मदालसेसी ।
तिणें देह दिला अग्नीसी । सव्वीसाव्यांत हे कथा ५५
तो नृप स्त्रीच्या विरहें । भोग सोडूनि वनीं राहे ।
अश्वतर नाग सुतस्नेहें । नाग तत्स्नेहें दुःखी होती ५६
दुःखास्पद सुत पाहूनि नाग । सरस्वतीवरें मग ।
शिवतोषें मदालसेला अव्यंग । मिळवी हें
सत्ताविसाव्यांत ॥ ५७ ॥
नृपा शेषानें पाताळीं आणून । स्ववृत्त सर्व सांगून ।
दे मदालसादान । पूर्ववत तिला पाहून नृप हर्षे ५८
दिसे इंदिरेपरी तिला । नृप घेऊनि पुरा आला ।
एक पुत्र तिला झाला । बोधी त्याला अठ्ठाविसाव्यांत
नरेंद्र मूर्ख पुत्र जाणून । करी शोक अनुदिन ।
मग तया सांगे नंदन । माता हें ज्ञान दे आम्हा॥६०॥
वैरस्य तें मानून । मदालसेवरी नृप कोपून ।
प्रवृत्तिमार्गाचें स्तवन । करी एकुणतिसाव्यांत ॥६१॥
ते अयुक्त जरी तरी । मदालसा स्वीकारी ।
अलर्काला व्यवहारीं । हुशार करी नृपाज्ञेनें ॥ ६२ ॥
साम्राज्य अलर्काचें पाहून । त्याला विरक्त करावा
म्हणून
सुबाहु करी रण । हें कथन तिसाव्यांत ॥ ६३ ॥

तें दुस्सह दुःख पाहून । करी अलर्क पलायन ।
मातृवचन स्मरून । भेटे येऊन श्रीदत्ता ॥ ६४ ॥
त्या दुःखातें वारून । अलर्का प्रबुद्ध करून ।
दत्त उपदेशी ज्ञान । हें कथन एकतिसाव्यांत ॥६५॥
सांगे तत्वज्ञान आत्रेय । मनोभंग वासनाक्षय ।
यांचे सुगमोपाय । योगिराय अलर्कातें ॥ ६६ ॥
त्या अद्वितीयात्मक दर्शन । व्हाया अष्टांगयोगसाधन
सांगे सयुक्तिक अत्रिनंदन । बत्तिसाव्या अध्यायीं ॥
तद्विष्णोः परमं पदं । असें सांगे जें वेद ।
तें कळावें विशद । म्हणूनि धारणाभेद सांगे दत्त ६८
योग पदरीं पडावा म्हणून । अभ्यासाचे दोष गुण ।
दत्त करी निरूपण । तेतिसाव्या अध्यायीं ॥ ६९ ॥
सुविरक्त व्हावें म्हणून । अणिमादिसिद्धींचें वर्जन ।
सांगे दत्त नृपा ध्यान । सगुणागुण भेदानें ॥७०॥
योग भंग न व्हावा म्हणून । दत्त सांगे योगचर्यालक्षण
भिक्षेचेंही वर्तन । चौतिसाव्या अध्यायीं ॥७१॥
सांगे परम योगसाधन । अनाहताचें अनुसंधान ।
करावया स्थिर मन । प्रणवध्यान सांगे दत्त ॥७२॥
नृपोदंत[1] सांगे विशद । साडेतीन मात्रांचा भेद ।
क्रममुक्तिपद । पस्तिसाव्या अध्यायीं ॥ ७३ ॥

१ नृपाची वार्ता.

भूपास सांगे दत्त । मृत्युज्ञान वर्षांचे आंत ।
योगी लावावया चित्त । शीघ्र विरत व्हावया ॥७४॥
सर्वदा योग करितां । मध्येंच मृत्यु येतां ।
म्हणे ये क्रममुक्तता । छत्तिसाव्यांत श्रीदत्त ॥ ७५ ॥
नृप परमानंद पावून । करी दत्तगुरूचें स्तवन ।
बंधूचे उपकार मानून । भक्तिरस प्रगटवी ॥ ७६ ॥
अदृश्य रूपाहून । सगुण अधिक मानून ।
अलर्क करी स्तवन । हें कथन सदतिसाव्यांत ॥७७॥
तो भ्रान्ति वारून । नृप दत्ताज्ञेनें येऊन ।
स्वबंधूस भेटून । आत्मज्ञान निवेदितसे ॥७८॥
अनसूंयू[1] सुबाहु काशिराजासी । बोधून जाई वनासी ।
पुत्रा राज्य देवूनि वनासी । अलर्क ये अडतिसाव्यांत
पुरूरव्याचा लेंक । आयुनाम पुण्यश्लोक ।
पुत्र नाहीं म्हणून करी शोक । होई सेवक दत्ताचा ॥
तो वयःप्रमाण बरेंच । दत्त सेवेंत करी खर्च ।
मिळवी प्रसाद साच । कथन हेंच एकुणचाळिसाव्यांत
राजा दिव्य फळ दे राणीला । तिला गर्भ राहिला ।
तिणें स्वप्नीं देव पाहिला । शौनकें कथिला तदभिप्राय॥
महावीर्य हुंडासुर । गर्भा माराया हो सादर ।
दत्तप्रसादें जन्मला कुमार । हा प्रकार चाळिसाव्यांत॥
दानव मोहन घालून । नगरीं पोरा नेवून ।
माराया दे त्याचें रक्षण । आत्रिनंदन करिता झाला८४

१ दोषारोप न करणारा.

दत्तेंच रक्षिला म्हणून। वसिष्ठाचे हातीं मिळून।
नहुषाचें झालें रक्षण। हें एकेचाळिसाव्यांत ॥ ८५ ॥
तें चक्षुर्बंधन मोहून। नासतां राणी उठोन।
पुत्रातें न पाहोन। दुःखी होवून प्रलापी ॥ ८६ ॥
आयुराजा तेथें येऊन। सर्वां धिःकारून।
शोक करी दारुण। बेचाळिसाव्यांत हे कथा ॥ ८७ ॥
दुःखित राजा जाणून। दत्त नारदा दे पाठवून।
नारद तेथें येऊन। सांगे ज्ञान रायासी ॥ ८८ ॥
अस्वतंत्र आपणा जाणून। राजा राणी करिती स्तवन
श्रीदत्ताचें हें कथन। त्रेचाळिसाव्यांत ॥ ८९ ॥
वनांत नहुष जावून। आकाशवाणी ऐकून।
वसिष्ठापाशीं येऊन। घे जाणून सर्व तें ॥ ९० ॥
देवद्विजपीडकासुर। त्या माराया चाले कुमार।
त्याचें साह्य करिती सुर। हें चौवेचाळिसाव्यांत॥९१॥
सोडी प्राणहारक बाण। दैत्यसैन्य मारून।
नहुष तो निर्भर्त्सून। मारी झुंजून हुंडासुरा ॥ ९२ ॥
ख्याती सोमवंशाची करून। अशोकसुंदरीस वरून।
मायबापां भेटे तो येऊन। हें पंचेचाळिसाव्यांत॥९३॥
विनंवितां गुरूंसी। गुरु सांगे दीपकासी।
ययाती वरी देवयानीसी। केली दासी शर्मिष्ठा॥९४॥
पुरूपकार जाणून। त्या दे ययाती सिंहासन।
दुःखें यदु वनीं जाऊन। दत्ता भेटे शेचाळिसाव्यांत॥

त्या शून्य वनीं असून। निर्भय व्हावयाचें कारण।
पुसतां करी कथन। तत्त्वज्ञान अवधूत ॥ ९६ ॥
स्वभावोदित गुण। घेतले म्हणे गुरूपासून।
पृथ्वीवाताकाशशिक्षण। सांगे सत्तेचाळिसाव्यांत ॥
त्या राजासी सांगे अवधूत। जलाशिक्षणें झालों पूत।
अग्निशिक्षणें वीट। घालवून नीट राहिलों ॥ ९८ ॥
ह्या जागृदादि अवस्था सोडाया। चंद्रार्क गुरु केलें म्हणे त्यां।
कवडा गुरु स्नेह सोडाया। अठ्ठेचाळिसाव्यांत दत्त वदे
म्हणे वांछा सोडाया आर गुरु। गांभीर्यार्थ समुद्र गुरु
रूप सोडाया पतंग गुरु। सार घ्यावया गुरु मधुकर॥
स्त्रियेस सोडाया गज गुरु। भिक्षार्थ मधुहर गुरु।
गीत रस सोडाया मृग मत्स्य गुरु। हें एकुण-पन्नासाव्यांत ॥ १०१ ॥
मनस्समाधानार्थ। गुरु केले यथार्थ।
पिंगला वेश्या बाळ ख्यात। कुरर म्हणजे टिटावू१०२
गुरु मी केले म्हणे दत्त। स्त्रीकंकण सर्प शरकार ख्यात
पेशस्कार कोळी देह विश्रुत। पन्नासाव्यांत बुद्धीबळें॥
विविध धर्मान्वित। ज्ञान भक्तिरसभरित।
असें हें श्रीदत्तचरित। मूर्तिमंत ब्रह्म कीं ॥ १०४ ॥
ब्रह्म ते अरूप असून। कोणा नये दिसून।
करितां उपनिषदांचें श्रवण। मनन ध्यानें मग कळे ॥
मंदां विशेषेंकरून। नुमजे औपनिषदज्ञान।
त्यांकरितां हें लेखन। करवी अत्रिनंदन दयाळू॥१०६॥

श्रीविष्णो जगत्पालका । जय विधे जगत्कारका ।
जय शंभो जगत्तारका । चित्तहारका तुज नमो १०७
तूं आर्यसंरक्षक । तूंची अनार्यशिक्षक ।
तूंची हें ग्रंथकौतुक । करविसी लोक तारावया॥१०८॥
परात्पर परंज्योती । तूंची परब्रह्ममूर्ती ।
कोण जाणे तुझी गती । स्वयंज्योती तूं श्रीदत्त १०९
विहार तुझा स्वभक्तहृदयांत । तूं भक्ताधीन सतत ।
मी मागतों पसरून हात । ह्या ग्रंथीं सतत सान्निध्य ठेवीं ॥ ११० ॥
तूंच मंदानुग्राहक । तूंचि वक्ता श्रोता पृच्छक ।
तूंचि चालक भासक । होसी ग्रंथग्राहक निर्मत्सर१११
कधीं पद्मिनी बोलावी भ्रमरा । कधीं चंपक फिरवी माघारा ।
धरूनि ह्या विचारा । एवढा पुरा केला लेख ॥११२॥
त्र्यश्विदंतिक्षिति (१८२३) मिते शालिवाहशाके कलौ ।
अभ्राभ्राक्ष (५००) मिते क्षिप्रातटे ग्रंथोयमुद्गतः॥११३॥

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यश्रीवासुदेवानंद-
सरस्वतीकृतं श्रीदत्तमाहात्म्यं संपूर्णम् ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥